# The Making of Marath

# मराठी भाषेची घटना

ग्रंथकार


**रामचंद्र भिकाजी जोशी**

प्रौढबोध व्याकरण, बालबोध व्याकरण, मरा०

शब्दसिद्धी, सुलभ अलंकार,

इत्यादि पुस्तकांचे कर्ते





फेब्रुवारी, १९१९

प्रकाशक— बळवंत गणेश दाभोळकर

४६८ नारायण पेठ, पुणें शहर

किंमत तीन रुपये

हें पुस्तक पुणें, पेठ शनवार, घर नंबर ४३२ येथें जगद्धितेच्छु
छापखान्यांत केशव रावजी गोंधळेकर यांनीं छापिलें
आणि
बळवंत गणेश दाभोळकर यांनीं पुणें, पेठ नारायण
घर नं. ४६८ येथें प्रसिद्ध केलें

# प्रस्तावना

प्रस्तुत ग्रंथामध्यें मराठी भाषा आणि तिच्या अनुषगानें मराठी वाङ्मय यांची घटना मूळपासून आतापर्यंत कशी होत आली याचें विवरण केलें आहे. या ग्रंथाचे सहा भाग केले आहेत. पहिल्या भागात फार प्राचीन काळच्या आर्यभाषेची, निरनिराळ्या काळची संस्कृत भाषेची स्वरूपें आणि प्राकृत भाषा यामध्यें परिणती होत होत मराठी भाषा कशी उद्भवली हें सांगितलें आहे. दुसऱ्या भागात व्याकरणातील रूपें कशीं घडलीं आणि वाक्यें कशी बनलीं हें सांगितलें आहे व्याकरण घटनेचा ऐतिहासीक विचार माझ्या प्रौढबोध व्याकरणामध्ये सविस्तर केला आहे. या पुस्तकात अगदीं आरंभींचा विचार आणि व्याकरण घटनेचें सामान्य स्वरूप याचें थोडं विस्तारेंकरून विवरण केलें आहे. तिसऱ्या भागात शब्दघटना कशी होते ? सांगितलें आहे. हा भाग म्हणजे शब्दव्युत्पत्ती अथवा शब्दसिद्धी नव्हे याचें विवरण माझ्या शब्दसिद्धीच्या स्वतंत्र पुस्तकात आहे. येथें शब्द कसे बनतात, त्यांचीं स्वरूपें कशीं बदलतात, त्यांचे अर्थ कसे फिरत जातात आणि तसेंच लोकव्यवहारात शब्दाचे चमत्कारीक उपयोग कसे होतात, आणि या गोष्टींमुळें शब्दाचे चमत्कारीक अर्थ कसे उत्पन्न होतात, याचें सामान्य विवरण आहे हा भाग म्हणजे अशा प्रकारच्या शब्दचिकित्सेचें केवळ दिग्दर्शन आहे चौथ्या आणि पाचव्या भागात प्राचीन आणि अर्वाचीन मराठी गद्य पद्य वाङ्मय कसें बनत आलें, तें बनण्यास मुख्यतः कोणत्या ग्रंथाचें, लेखाचें, ग्रंथकाराचें आणि निबंधकाराचें साह्य झालें, आणि त्याची सांप्रतची स्थिती कशी आहे याचें विहंगमदृष्ट्या वर्णन आहे. सहाव्या भागात भाषादूषण आणि भाषासंवर्धन याचें थोडक्यात विवरण केलें आहे.

अशा प्रकारचा हा अगदीं नवीन ग्रंथ आहे. असा ग्रंथ असावा असें बरेच दिवसापासून मला वाटत होतें. परंतु हें माझ्यासारख्या एकट्याचें काम नव्हे, असें मनात येई. कोणी तरी मोठ्या योग्यतेचे

गृहस्थ हें काम हातीं घेतील, असें वाटे; परंतु तसेंही कांहीं झालें नाहीं. आपण हें काम आणखी कोणा विद्वान गृहस्थाच्या साह्यानें करावें, असेंही वाटलें; परंतु तसें साह्यही मिळालें नाहीं. तेव्हां काय होईल तें आपणच करावें असें ठरवून या कामास हात घातला, आणि दोन वर्षांपूर्वी पुस्तक तयार केलें. परंतु युद्धकालामुळें छापण्यास आरंभ करवेना. शेवटीं आरंभिलेल्या कार्याचा शेवट लावल्याखेरीज स्वस्थपणा न वाटे, म्हणून असल्या अडचणींच्या दिवसांतही पुस्तक प्रसिद्ध केलें.

प्रस्तुत पुस्तकांतील विवेचनाच्या संबंधानें बराच मतभेद दिसून येणार आहे. असला मतभेद असावयाचाच; आणि एकाद्यानें आपल्या शिरावर जोखीम घेऊन आपलीं मतें पुढें मांडण्याचा धीर केल्याखेरीज ऊहापोह होऊन योग्य विचार आणि निर्णय करण्याला मार्ग खुला होणेंही कठीण असतें. तेव्हां यांत जीं मतें प्रदर्शित केलीं आहेत, तीं अगदीं कायम ठरलेलीं नव्हत, तसेंच हा या विषयावरील परिपूर्ण ग्रंथ ही नव्हे, असें वाचकांनीं लक्षांत ठेविलें पाहिजे. हा केवळ या विचाराचा आरंभ आहे. त्याचप्रमाणें हा आरंभ म्हणजे एकटा मनुष्य आज इतकीं वर्षें मराठी वाङ्मयाचा अभ्यास करीत असतां त्याच्या अवलोकनांत जें आलें, त्याचें अल्प फळ आहे. तसेंच यांतील मतें माझीं स्वतांची आहेत; त्यांच्यासंबंधाची जबाबदारी दुसऱ्या कोणावर नाहीं.

या ग्रंथांतील विवरण अगदीं संक्षिप्त आहे. प्रत्येक भागांतला एकेक विषय आणि त्यांतले कांहीं पोटविषयही एकेका स्वतंत्र ग्रंथाला पुरेसे आहेत, असें दिसून येईल. तेव्हां हा ग्रंथ लिहून मीं या संबंधाचें मोठेंसें काम केलें आहे, असें म्हणतां येणार नाहीं. तथापि या योगानें या पुस्तकांत विवेचिलेल्या महत्त्वाच्या विषयांकडे वाङ्मयविषयक उद्योग करणारांचें लक्ष गेल्यास माझ्या उद्योगाचें सार्थक झालें असें मी समजेन.

वाङ्मयघटनेचें विवरण करितांना वाङ्मयाचा पूर्ण इतिहास सांगणें अशक्यच होतें. म्हणून येथें घटनेस साह्यभूत झालेल्या केवळ मुख्य मुख्य ग्रंथांचा आणि प्रमुख ग्रंथकार आणि लेखक यांचा निर्देश

केला आहे. तसे कांहीं ग्रंथ नमूद करावयाचे राहिले असतील, अथवा ग्रंथकारांचा उल्लेख आला नसेल, त्याबद्दल वाचक क्षमा करतील अशी मी आशा करितों.

ग्रंथकारांचीं नांवें लिहितांना आरंभी ' रा० रा० ' आणि पुढें उपपदे वगैरे घालावीं कीं नाहीं, आणि नांवें पूर्ण लिहावीं की काय, असा विचार पडला. नांवें पुष्कळ येणार यामुळें असले प्रकार कटाळवाणे होतील आणि विवेचन करीत असतां मध्येंच लांब नांवें आल्यानें विवेचनाच्या ओघाचा विघाड होईल, असें मनात येऊन फक्त आड-नांवें—भांडारकर, रानडे, टिळक, आगरकर, इत्यादि अशीं—घातलीं आहेत. जेथे एवढ्याच नांवावरून नीट बोध होणार नाहीं असें वाटलें, तेथे कांहीं तरी जास्त व्यवस्था केली आहे.

या पुस्तकांतील लेखनाच्या संबधानें पुढील विशेष व्यवस्था केल्या आहेतः—(१) माझ्या मताप्रमाणे मराठी भाषेच्या स्वभावानुरूप शब्दाच्या अन्तीचे ई, ऊ, दीर्घ लिहिले पाहिजेत; आणि निदान भाषेंत फार रूढ झालेल्या संस्कृत अकारान्त शब्दाचे उपान्त्य ई, ऊ, ही दीर्घ लिहिणें रास्त आहे. यासाठीं तशी व्यवस्था केली आहे. (२) ओळीच्या शेवटीं त्याच ओळींत ज्याचा पूर्ण समावेश होऊ शकणार नाहीं असा शब्द आला असता साम्प्रत पदे पाडण्याची पद्धत अशुद्ध आहे. पद पाडणें ते त्यांतले त्यांत पूर्ण असेल अशा अवयवावर पाडलें पाहिजे. कित्येकदां तर अ–थवा, म्हणू–न, प–रतु, आ–णि, अ–वगत, अशीं ही विलक्षण तन्हेचीं पदें पाडतात. यासंबधाची नीट व्यवस्था सरकारी नवीन क्रमीक पुस्तकांत मात्र केली आहे, इतरत्र गोंधळ आहे. प्रस्तुत पुस्तकात क्रमीक पुस्तकांतली पद्धत स्वीकारली आहे. (३) या पुस्तकांत शब्द अवतरणचिन्हांकित करून घालण्याचे प्रसग फार आले आहेत. तसेंच विशेष महत्वाचा शब्द जाड अथवा काळ्या अक्षरांत घालण्याचे प्रसंगही वारंवार आले आहेत. अशा ठिकाणीं घालण्याजोगीं जाड अक्षरें मराठींत मुद्दाम केलेलीं नाहींत. सध्या घालण्यांत येणारीं बोजड काळीं अक्षरें पुनःपुन्हा आल्यानें वाईट दिसतात. यासाठीं अशा शब्दांतील अक्षरें मध्यें जागा ( स्पेस ) टाकून

घातलीं आहेत. अशी रीत जर्मन पुस्तकांमध्यें असते, आणि इंग्रजी-मध्येंही बरीच आली आहे. या तिन्ही गोष्टी ग्रंथकार, मुद्रा जुळविणारे आणि तपासणारे यांना अगदीं नवीन असल्यामुळें या व्यवस्था करण्या-मध्यें क्वचित् घरसोड झाली आहे.

पुस्तक तयार करण्याच्या व तपासण्याच्या कामांत माझे जुने विद्यार्थी व मित्र प्रो० परशुराम लक्ष्मण वैद्य, बी. ए. यांनीं अगदीं आरंभापासून मोठ्या आस्थेनें साह्य केलें, त्यांचा मी अत्यंत आभारी आहे. शब्द-घटनेवरील तिसरा भाग लिहितांना येथील न्यू इंग्लिश स्कूलांतील शिक्षक रा. रा. गो० कृ० मोडक यांच्या परिश्रमांचें पुष्कळ साह्य झालें. यासाठीं त्यांचा मी ऋणी आहे. त्याचप्रमाणें जगद्धितेच्छु छापखान्याचे मालक रा. रा. केशव रावजी गोंधळेकर आणि छापखान्यांतील मंडळी यांनाही पुष्कळ त्रास पडला, तथापि त्यांनीं यत्किंचित् कुरकूर न करितां चांगलें काम करून दिलें, यासाठीं मी त्यांचाही आभारी आहे.

सरतेशेवटीं स्वभाषेची केलेली ही अल्प सेवा विद्वज्जनांस मान्य होईल अशी आशा बाळगून तूर्त त्यांची रजा घेतों.

पुणें,
फेब्रुवारी १९१९

रा० भि० जोशी

# विषयानुक्रमणिका

[ विषयांपुढील अंक पृष्ठांचे आहेत ]

## भाग पहिला

### भाषेची मूलपीठिका आणि प्रारंभ [पृ० १–८३]

## भाग दुसरा

### मराठी व्याकरणाची घटना [ पृ० ८४–१७० ]

## भाग तिसरा

### मराठी शब्दांची घटना [पृ० १७१–२१४]

## भाग चौथा

### वाङ्मयघटना–पूर्वार्ध [पृ० २१५–२९८]

## भाग पांचवा

### वाङ्मयघटना–उत्तरार्ध [पृ० २९९–३९७]

## भाग सहावा

### भाषादूषण आणि भाषासंवर्धन [पृ० ३९८–४४०]

# मराठी भाषेची घटना

## भाग पहिला



## भाषेची मूलपीठिका आणि प्रारंभ

### (१) थोडी पूर्वहकीगत

हिंदुस्थानांतील आणि युरोपांतील सर्व भाषांच्या इतिहासावरून सांप्रत असें सिद्ध झालें आहे कीं, इतिहासाचें मूळ जेव्हांपासून सांपडतें तेव्हांपासून हिंदुस्थान व इराण हे आशियांतील देश आणि युरोपामधील तुर्कस्थान खेरीज सर्व देश यांमध्यें आर्य नांवाचे लोक राहात आहेत, आणि त्यांच्या भाषा आर्य आहेत. या आर्य भाषांमध्यें कित्येक मूळशब्दांच्या संबंधानें फार मेळ आहे, त्यावरून त्या सर्वांचें मूळ एकच असावें असें ठरतें. इंग्लिश भाषा आणि आपली मराठी भाषा फार लांब नात्याच्या बहिणी होत. आशियाखंडामध्यें हिंदुस्थानांतले आर्य आणि प्राचीन इराणांतले आर्य म्हणजे पारशांचे पूर्वज हे मूळचे एकच आहेत. पारशांची भाषा फारसी किंवा परसियन ही सांप्रत आरबी वगैरे तिकडील भाषांच्या साहचर्यानें जरी थोडी भिन्न झाली आहे, तरी तिच्या अगोदरच्या पारशांच्या धर्मभाषा ज्या झेंद व पेल्हवी या संस्कृतासारख्याच आहेत. फारशी धर्मभाषा आपल्या लोकांत 'आसुरी भाषा' म्हणून प्रसिद्ध आहे, आणि ती भाषा आणि आमची वेदभाषा यांच्यामध्यें अत्यंत साम्य आहे. या आसुरी भाषेचें संस्कृत व्याकरणही आहे.

पारशांचे पूर्वज आणि आपले पूर्वज हे प्रथमारंभीं एकच असून ते कास्पियन समुद्रापासून हिमालयाच्या वायव्येकडील प्रदेशापर्यंत राहात होते. पुढें त्यांच्यामध्यें कांहीं ध र्म म तां सं बं धा नें भां ड ण होऊन दोघे विभक्त झाले; आणि पारशांचे पूर्वज इराण आणि त्याच्या वायव्येकडील प्रदेश यांत राहूं लागले, आणि आमचे पूर्वज काबूलच्या प्रदेशांत उतरूं लागले. पारशांचे पूर्वजांस 'दानव' किंवा 'असुर' ह्मणत आणि आपल्या पूर्वजांस 'देव' ह्मणत. असुर याचा मूळचा अर्थ 'शक्तिमान्' असा होता. पारशांचे पूर्वज आपणास चांगल्या अर्थी 'असुर' ह्मणत आणि आमच्या पूर्वजांस वाईट अर्थी 'देव' ह्मणत. इकडे आमचे पूर्वज आपणांस चांगल्या अर्थी 'देव' ह्मणत, आणि पारशांचे पूर्वजांना वाईट अर्थी 'असुर' ह्मणत. दोघांच्या देवता अग्नी, वरुण, मित्र, मरुत्, उषा वगैरे एकच होत्या. मात्र त्यांचा मुख्य देव 'अहुर-मझ्द' हा आमचा मुख्य दैत्य म्हणजे बहुधा 'वृत्र,' आणि आमचा मुख्य देव इन्द्र, हा त्यांचा मोठा शत्रू. यानंतर आमचे पूर्वज सिंधू नदीच्या बाजूस सरकत आले व त्यांनीं सर्व काबूल देश व्यापिला व नंतर ते सिंधूनदी उतरून पंजाबांतही आले. तथापि त्यांचे कित्येक भाईबंद काबूलच्या उत्तरेकडील प्रदेशांतच राहात होते, ते इकडे आले नाहींत. इकडे आलेल्या आर्यांस म नु ष्य आणि मागें राहिलेल्यांस दे व अशीं नांवें पडलीं. त्या काळीं 'देव' आणि 'असुर' यांचीं युद्धें होत तेव्हां आमच्या इकडील मनुष्यांचे पराक्रमी क्षत्रिय राजे आपले तिकडले भाईबंद 'देव' यांना साह्य करण्यास जात. यानंतर इराणांतील आर्य म्हणजे पारसीक यांचें तोंड हल्लींच्या तुर्कस्थानाकडे फिरून त्यांनीं तिकडे मोठें राज्य स्थापिलें; इकडे आमचे हिमालयाच्या उत्तरेकडील पूर्वज 'देव' यांना तो प्रदेश कोणत्या तरी कारणानें राहाण्यास अयोग्य होऊन ते हळू हळू काबूल, पंजाब, काश्मीर आणि हिमालयाच्या इकडील उतरणी यांमध्यें येऊन राहूं लागले; आणि देव व असुर यांचा संबंध अगदींच तुटून, आह्मांस त्यांची आठवण केवळ पौराणिक दन्तकथांमध्यें मात्र राहिली.

हिंदुस्थानांत आलेले आर्य प्रथमारंभीं काबूल आणि पंजाब या दोहोंच्या

उत्तरेकडचा प्रदेश व हिमालयाच्या उतरणी या ठिकाणीं स्थायिक झाले, व नंतर त्यांची वस्ती गंगा-यमुना या नद्यांच्या उत्तरेकडील हिमालया-पर्यंतच्या प्रदेशांत होत जाऊन पूर्वेकडे सांप्रतच्या बहार, बंगाल, या प्रांतांपर्यंत पसरली. पंजाबाबाहेर गंगायमुनांच्या दक्षिणेस प्रथम बरींच वर्षे आर्यांची वस्ती झाली नाहीं. हिंदुस्थानांत आल्यानंतर आर्यांची प्रबळ आणि बरेच सुधारलेले अशा लोकांबरोबर गांठ पडली. हे लोक आमच्या प्राचीन ग्रथांत 'द स्यु' या नांवाने प्रसिद्ध आहेत. हे द्र वि ड नांवाचे, आर्यांच्या अगोदर सर्व हिंदुस्थानभर राहणारे लोक असें मानलेलें आहे. हे लोक बहुतकाळापासून दक्षिणेकडे स्थायिक झालेले होते; उत्तरेकडे ते तितके स्थायिक झालेले नव्हते. तथापि त्यांचीं गांवें, नगरें, राज्यें, किल्ले इत्यादिकांचें वर्णन प्राचीन आर्य ग्रन्थांत म्हणजे वेदांत आहे. आर्यांना या लोकांबरोबर युद्ध करून त्यांस जिंकावें लागलें. त्यांपैकीं कित्येक, आर्यांचा धर्म आणि रितीभाती घेऊन त्यांच्यांत मिसळले; कित्येक जिंकले जाऊन आर्यांचे सेवक बनले. या सेवकवर्गांपासूनच पुढें हिंदूंमधील निरनिराळ्या जाती उत्पन्न झाल्या. त्यांपैकीं कित्येक आर्यांच्या बरोबरीनें नांदत आहेत. तथापि आर्यांच्या श्रेष्ठ संस्कृतीचा त्यांचेवर पगडा पडून आर्यभाषा जी सं स्कृ त, तिचा त्यांच्या द्रा वि डी भाषांवर पुष्कळ परिणाम झाला आहे.

आमचे पूर्वज आणि पारशांचे पूर्वज आपणांस आ र्य म्हणवीत. 'आर्य' या शब्दाचा अर्थ 'शेतकी करणारे' असा दिला आहे. अर्थात् ते स्थायिक सुधारणेच्या मार्गाला लागलेले होते. 'हिंदू' हा शब्द पारशांच्या पूर्वजांच्या भाषेंतून मुसलमान लोकांच्या द्वारें आला. असुर लोक आह्मांस सिंधूच्या कांठीं राहणारे, अतएव 'सिंधू लोक' असें म्हणत. असुरांच्या भाषेंत 'स' चा 'ह' होतो असा नियम आहे. त्या-प्रमाणें 'सिंधू' या शब्दापासून 'हिंदू' हा शब्द झाला. मुसलमान लोकांच्या भाषेंत 'हिंदू' याचा अर्थ वाईट आहे. पण तोच शब्द आह्मांस सांप्रत कायमचा लावलेला आहे. प्राचीन आर्य लोक विंध्य आणि हिमालय या दोन पर्वतांच्या मधल्या प्रदेशांत फार दिवस राहात होते. त्यांनीं त्याला 'आ र्या व र्त' असें नांव दिलें आहे. तसेंच त्यांनीं

आपल्या देशास ' भरतवर्ष ' आणि 'भारत' अशीही नांवें दिलीं आहेत. 'भरत' या नांवाचा एक सूर्यवंशीं प्रख्यात राजा झाला, त्याच्या नांवावरून हीं नांवें या देशास पडलीं असें मानितात. तथापि अगदीं जुन्या वेदवाङ्मयांत 'भारत' नामक लोकगणाचा उल्लेख आहे. यावरून हें नांव फार प्राचीनकाळीं त्या लोकांवरून पडलेलें असावें.

आर्य लोक इकडे आले ते सर्व मिळून एकदम आलेले नाहींत. त्यांचे लहान लहान निरनिराळे संघ किंवा टोळ्या आलेल्या असल्या पाहिजेत, आणि त्या निरनिराळ्या वेळींही आलेल्या असल्या पाहिजेत. तथापि त्यांचा धर्म आणि रितीभाती बहुतांशीं एकसारख्याच होत्या. त्याचप्रमाणें त्यांची भाषाही एकच होती. तथापि ती भाषा सर्व टोळ्यांची व सर्व काळीं अगदीं एकसारखी होती असें मानतां येत नाहीं. या गोष्टीच्या समजुतीसाठीं आपण आपल्याच भाषेचें उदाहरण घेऊं. एकच भाषा बोलणारे अगदीं शेजारचे प्रांत जरी घेतले, तरी त्यांतील भाषा सर्वस्वी एकसारखी नसते; तींत फरक बराच असतो. त्याचप्रमाणें आर्यांची भाषा एकच होती तरी ती पूर्णपणें एकसारखी नव्हती. आर्यांच्या निरनिराळ्या टोळ्यांची भाषा आणि त्या स्थायिक झाल्यावर त्यांच्या निरनिराळ्या वसाहतींची भाषा या थोड्या थोड्या भिन्न असत. सांप्रत सर्व महाराष्ट्राची भाषा जरी मुख्य बाबतींत एक आहे, तरी दहाबारा कोसांच्या प्रदेशांत थोडे थोडे भिन्न प्रचार आपणास स्पष्टपणें दिसून येतात. तसाच प्रकार त्या वेळीं असला पाहिजे.

आर्य लोक हिंदुस्थानांत आले ते निरनिराळ्या टोळ्यांनीं आले असतीलच. परंतु त्यांच्या मोठ्या स्वाऱ्यांचा विचार केला तर आर्यांच्या हिंदुस्थानावर तीन मुख्य स्वाऱ्या झाल्या, असें प्राचीन ग्रंथांवरून दिसून येतें. प्रथमतः जे आर्य आले, ते वसाहती करीत पूर्वेकडे बरेच लांबवर पसरले. या आर्यांना सूर्यवंशी असें पुढें नांव पडलें. सूर्यवंशांतील भगीरथ नांवाच्या एका राजानें गंगानदीच्या प्रदेशाचा पूर्व-सागरापर्यंत शोध लाविला असें दिसतें. प्रथमच्या आर्यानन्तर बरेच वर्षांनीं दुसरे आर्य स्वारी करून आले. त्यांना पुढें चंद्रवंशी असें नांव पडलें. या दोन्ही आर्यांचा धर्म, भाषा, वगैरे एकच होतीं.

त्याचा परस्पर संबंध असून दळणवळणही होतें. त्याच्या आपसांत लढाया झाल्याचें वर्णन ऋग्वेदांत आहे. हे दुसरे आर्य काश्मीर, कुरुक्षेत्र, या बाजूनें विंध्य पर्वतापर्यंत पसरले. दुसऱ्या स्वारींत जे आर्य आले, त्यांचाच अवशेष काश्मीर वगैरे प्रदेशाच्या उत्तरेस आणि वायव्येस शिल्लक राहिला असावा असें दिसतें. हे लोक पुढें पा चा ल आणि या द व म्हणून प्रसिद्धीस आले आणि आपल्या चंद्रवंशी नाव प्राप्त झालेल्या भाऊबंदांत येऊन मिसळले. यांच्या स्वारीमुळेंच पुढें भारतीय युद्ध उपस्थित झालें, असें अनुमान काढता येतें.

आर्य लोक आरंभापासून विद्याव्यासंगी होते. आमचे पूर्वज आणि पारश्यांचे पूर्वज, म्हणजे देव आणि असुर या दोघांमध्येंही आराध्यदेवतांचीं स्तोत्रें असत. प्राचीन आर्यांतील मुख्य लोकांचीं विप्र, ब्राह्मण, ऋषि, अशीं नावें आहेत. त्यांचा अर्थ सुशिक्षित, विद्वान् असा आहे. आपले अतिप्राचीन धर्मग्रंथ वे द यांच्या नांवाचा अर्थ वि द्या किंवा ज्ञा न असाच आहे. तेव्हां अर्थात् या विद्याव्यासंगी प्राचीन आर्यांची भाषा आरंभापासून उत्तम स्थितींत असलेली आपणांस आढळते. या वेळीं या भाषेला 'संस्कृत' असें किंवा दुसरें कोणतेंही नांव नव्हतें. भाषा, वाणी, गी, गिरा, सरस्वती, अशा 'बोलणें' किंवा 'वाचा' या अर्थाच्या शब्दांनीं तिचा उल्लेख केलेला आहे ही जशी आर्यांच्या वि द्ये ची आणि वा ङ्म या ची उच्च प्रतीची भा षा होती, तशीच दुसरी लो क व्य व हा रा ची कमी प्रतीची भा षा आर्य लोकांत चालू होती. या वेळीं आर्य लोकांची एकंदर संख्या थोडी होती, आणि सर्वांचा निकट संबंध होता, म्हणून ही कमी प्रतीची भाषा उच्च भाषेपेक्षा फारशी भिन्न नव्हती. सध्या सर्व महाराष्ट्रीय लोकांची मराठी भाषा आहे, तरी तिचें वाङ्मयांत सांपडणारें प्रौढ स्वरूप निराळें आहे आणि लोकव्यवहारांत घरोदारीं सांपडणारें स्वरूप निराळें आहे. आपली पुस्तकी भाषा आणि खेड्यापाड्यांतील शेतकरी, कामगार, कारागीर आणि इतर रहिवाशी यांची भाषा यांच्यामध्यें अंतर बरेंच असतें. तितका तरी फरक त्या वेळीं ग्रंथभाषा आणि लोकव्यवहाराची भाषा यामध्यें असलाच पाहिजे. असा फरक अगदीं

आरंभापासून होता. अर्थात् अगदीं आरंभापासून ( १ ) वाङ्मयाची आणि ( २ ) लोकव्यवहाराची अशा दोन आर्यभाषा एकमेकींच्या बरोबरीनें चालू होत्या. वाङ्मयाची भाषा ही सर्व प्रमुख आणि सुशिक्षित लोकांची एकच होती; तिचें स्वरूप विशेष चांगलें होतें. लोकव्यवहाराची भाषा ही तितकी चांगली नसावयाचीच. ती मुख्यतः जरी सर्वांची एक असली, तरी तिच्यामध्यें निरनिराळ्या टोळ्या व अंतराअंतरावरच्या वसाहती यांचे मानानें फरक असे. तसेंच ही लोकव्यवहाराची भाषा, वाङ्मयाची जी मुख्य भाषा, तिच्यावर अवलंबून असे. ही जी वाङ्मयाची किंवा आर्यांची मुख्य भाषा, तीच सं स्कृ त भाषा. पण हें नांव तिला पुढें मिळालें. सध्यां आपण हिला वेदांचे वेळची म्हणून 'वे द–भा षा' असें म्हणूं; आणि जिला पुढें प्रा कृ त भाषा असें नांव पडलें, तीच ही एकंदर आर्यजनसमूहाची व्य व हा र भा षा; वास्तविक हीं दोन्हीं एकाच भाषेचीं दोन निरनिराळीं स्वरूपें होत. तथापि तीं अगदीं आरंभापासून आहेत, हें लक्षांत ठेविलें पाहिजे. सध्यां या लोकांच्या व्यवहाराच्या भाषेचा उल्लेख आपण 'ज न प द भा षा' अशा नांवानें करूं. ज्या आर्यभाषेचीं हीं दोन स्वरूपें आहेत, ती वेदभाषा हिंदुस्थानांतील उत्तरेकडच्या जनपदभाषांची आणि सांप्रतच्या संस्कृताची ही जननी होय. या ठिकाणीं जननी याचा अर्थ अगदीं अक्षरशः नेहमींसारखा घ्यावयाचा नाहीं. आई आणि मुलगी अशा निराळ्या असतात, तसा येथें प्रकार नाहीं. तर या वेळची म्हणजे वेदकालीन आर्यभाषा ही आमची धर्माची भाषा जी संस्कृत तिचें आणि देशभाषा ज्या मराठी, हिंदी, गुजराथी, सिंधी, बंगाली, उरिया, पंजाबी, मारवाडी वगैरे यांचें पूर्वस्वरूप किंवा आद्यस्वरूप आहे. वेदभाषेपासून या भाषा निर्माण झाल्या आणि नंतर ती नष्ट झाली, असा कांहीं अर्थ नव्हे. तर त्या वेदभाषेची परिणती होत जाऊन कालांतरानें प्रांतोप्रांतीं सांप्रतच्या चालू भाषा बनल्या. यांतील जी उत्तम, व्यवस्थित परिणत भाषा ती सं स्कृ त आणि सर्व साधारण म्हणजे प्रा कृ त.

कित्येक असें प्रतिपादन करतात कीं प्राचीन आर्य लोकांची संस्कृत ही एकच भाषा होती. पुढें ते लोक हिंदुस्थानांत आल्यावर येथें जे रानटी

हायची वेदभाषा आणि लोकव्यवहाराची जनपदभाषा या आरंभापासून चालत आलेल्या आहेत. संस्कृत किंवा वेदभाषा ही ग्रंथांची, विद्वत्तेची, आणि प्रमुख सुशिक्षित लोकांच्या व्यवहाराची भाषा; आणि प्राकृत ही साधारण जनसमूहाची आणि साध्या व्यवहाराची घरगुती भाषा. प्रमुख लोक साध्या व्यवहारांत प्राकृत वापरीत; तथापि जनसमूहास संस्कृतही चांगलें समजत असे, आणि त्यांचा धार्मिक व्यवहार त्याच भाषेत चाले. प्रथमारंभीं या दोन भाषांत फार फरक नसे. सध्याही आपण पाहातों कीं, आपली जी विद्येच्या व्यवहाराची आणि ग्रंथांची मराठी भाषा आहे, ती साधारण लोकांना समजते. परंतु त्यांचा व्यवहार ज्या मराठींत चालतो, ती जरी ग्रंथांच्या मराठीपेक्षां पुष्कळशी भिन्न नसते, तरी तींत भिन्न प्रकार बरेच दिसून येतात. कित्येक शब्द, कित्येक रूपें आणि कित्येक वाक्यरचनेचे प्रकार दोघांचे बरेच भिन्न असतात. विशेष प्रकार असा असतो कीं, ग्रंथांची किंवा विद्वानांची भाषा व्यवस्थित, टापटिपीची, आणि डौलदार अशी असते; आणि लोकसमाजाची साध्या व्यवहाराची भाषा साधी, सोपी आणि चालचलाऊ असते. असा भाषेचा प्रकार आमच्या इकडेच आहे असें नाहीं, तर जगांतील सर्व देशांत आणि सर्व लोकांत आहे; आणि तो अगदीं स्वाभाविक आहे.

याप्रमाणें आमच्या पूर्वजांच्या भाषेची आरंभींची स्थिति होती, आणि पुष्कळ वर्षे तसेंच चाललें होतें. पुढें आर्य लोकांची वस्ती वाढत गेली. त्याच प्रमाणें मूळचे अनार्यलोक यांच्याशीं असलेला व्यवहारही वाढत चालला. त्यांतले पुष्कळ लोक आर्यांचे अंकित होऊन त्यांच्या सांनिध्यास येऊन राहिले. कित्येक आर्यांचा धर्म घेऊन त्यांच्यांतलेच झाले. अर्थात् दोघांच्याही भाषा मिसळल्या, आणि त्यामुळें अनार्यांच्या भाषांतले पुष्कळ प्रकार आर्यांच्या भाषेत शिरले. तथापि आर्यांच्या भाषेचें वर्चस्व कायम राहिलें. या संसर्गानें तिची एकंदर ठेवण बदललेली दिसत नाहीं. आर्यभाषेत अनार्य शब्द आले ते केवळ जनपदभाषेतच शिरले असें नाहीं, [illegible]र्यांच्या मुख्य भाषेतही शिरले. हे प्र[illegible] [illegible]ावताच प्रथम[illegible] [illegible]न आले,

आणि मग त्यातले जे ग्राह्य वाटले, त्याचा समावेश मुख्य भाषेंतही झाला. यापुढें या दोन भाषाचें स्वरूप कसें बदलत गेलें, आणि विद्वानांच्या भाषेस संस्कृत आणि व्यवहारभाषेस प्राकृत हीं नावें कशीं प्राप्त झालीं हें पाहू.

आर्य लोकांची वस्ती हिंदुस्थानांत उत्तरोत्तर वाढत गेली व पंजाब हें मूळ ठिकाण धरलें तर ते लोक तेथून गुजराथ, वैदर्भ, बंगाल वगैरे जे सांप्रतचे प्रांत, तेथपर्यंत जाऊन पसरले त्यांच्यामध्यें पुष्कळ अनार्य लोकही मिळाले. अशा रीतीनें वाढलेली संख्या, दळणवळण आणि अनार्यांच्या भाषेची भेसळ यामुळें आर्यांची व्यवहारभाषा फार विस्तृत झाली. तसेंच प्रथमतः निरनिराळ्या प्रांतांतून भिन्न भिन्न व्यवहारभाषा बनून राहिल्या. आजला मराठी ही जरी सर्व महाराष्ट्राची एकच भाषा आहे, तरी महाराष्ट्राच्या निरनिराळ्या भागांत थोडा थोडा फरक होऊन पुष्कळ पोटभाषा झाल्या आहेत. तसाच प्रकार प्रथमारंभीं होता. पुढें आर्यांच्या वस्तीचा प्रसार दूरदूरच्या प्रांतीं झाल्यावर तो फरक वाढून आज जशा मराठी, हिंदी, गुजराथी, सिंधी, बंगाली, पंजाबी इत्यादि निरनिराळ्या भाषा झाल्या आहेत, तशा पुष्कळ भाषा झाल्या. प्रथमची जी वेदभाषा, तिचेंच साधें, सोपें स्वरूप, ती ज न प द भा षा. ती निरनिराळ्या प्रांतांत निरनिराळी झाली. सध्या ज्या प्रांतिक देशभाषा आहेत, त्या याच जुन्या निरनिराळ्या भाषांचीं कालांतरानें आणि देशांतरानें परिणत झालेलीं स्वरूपें आहेत. निरनिराळ्या लिप्या आणि उच्चारांच्या तऱ्हा यामुळें या भाषा सांप्रत आपल्यास बऱ्याच भिन्न वाटतात परंतु त्यांतील शब्दांचें स्वरूप पाहू गेल्यास त्या फारशा भिन्न नाहींत. आजला युरोपांतील भिन्न भिन्न देशांतल्या ज्या निरनिराळ्या भाषा, त्यांमध्यें परस्पर जितका भिन्नपणा दिसून येतो, तितका हिंदुस्थानांतील प्रांतिक भाषांत दिसून येत नाहीं, असें भाषाभिज्ञांचें मत आहे. अर्थात् त्यांचें निरनिराळ्या प्रांतांत मागें जें भिन्न स्वरूप होतें, त्यांतही फार मोठा फरक नव्हता. एकंदर आर्यांची जनपदभाषा जवळ जवळ एकच असून तिला प्रा कृ त असें साधारण नांव प्राप्त झालें. एक मोठी व मुख्य प्राकृत भाषा आणि

तिच्या कित्येक किरकोळ झाला किंवा तऱ्हा असाही प्रकार झाला. आतां इकडे मुख्य आर्यभाषा म्हणजे प्रमुख लोकांची आणि विद्याव्यासंगाची भाषा, हिची काय स्थिति झाली तें पाहूं.

आर्य लोक हे मोठे विद्याव्यासंगी होते हें मागेंच सांगितलें आहे. आरंभापासून वेद, ब्राह्मणें, उपनिषदें, सूत्रें वगैरे यांचे ग्रंथ होते. हे ग्रंथ त्यांची भाषा आणि त्यांतले विषय यांसंबंधानें आजमितोस कौतुक करण्यासारखे उत्कृष्ट आहेत. तसेंच आर्यलोक तऱ्हेतऱ्हेचे यज्ञयाग आणि धर्मसत्रें करीत. वेद वगैरे धार्मिक ग्रंथांचा व्यवहार आणि धर्मसत्रें मुख्य आर्य जे ऋषी किंवा आचार्य, यांच्या साह्यानें एकंदर जनसमूहांत वेदभाषेमध्यें चालत. यामुळें ही श्रेष्ठ आर्यभाषा एकंदर लोकांना परकी नव्हती. ती सर्वांना चांगली कळत होती. मात्र तिचें स्वरूप ज्यास्त कठीण असल्यामुळें साधे लोकव्यवहार लौकिकांतल्या साध्या भाषेंत चालत होते. वेदभाषा विद्याव्यासंगी लोकांच्या हातांत होती यामुळें तिची उन्नती होत गेली. तीमध्यें नवीन शब्द त्या भाषेंतलीच धातु, प्रत्यय वगैरे साधनें या योगानें तयार केले. तसेंच, जनसमूहाच्या भाषेंत जे नवीन चांगले शब्द उत्पन्न झाले, त्यांतलेही अनेक शब्द या उच्च भाषेंत सामील झाले. त्याचप्रमाणें अनार्यांच्या बरोबरील व्यवहारांत जे चांगलें शब्द आढळले, त्यांमधलेही कांहीं या भाषेंत आले. तसेंच तिची व्याकरणसंगतीही उत्तम प्रकारची लावण्यांत आली. अशा प्रकारें ही भाषा उत्तरोत्तर उत्तमच होत गेली. विद्याव्यासंगी आर्यलोक अनार्यांचे आणि आपल्याच लोकांच्या लौकिकव्यवहारांतले शब्द वगैरे आपल्या भाषेंत घेत यांत शंकाच नाहीं. ते शब्द आपल्या भाषेला जुळतील असे सुरेखसे बनवून घेण्याची त्यांची चाल होती. यामुळें पुष्कळ शब्दांचें उच्च भाषेंतलें स्वरूप निराळें आणि जनपदभाषेंतलें स्वरूप निराळें असा प्रकार आहे. संस्कृत भाषेत शब्दभरणा फार मोठा आहे, हें आपण पाहातोंच. अशा रीतीनें आर्यांची मुख्य भाषा उन्नत होत चालली आणि ती भाषा आणि लौकिकभाषा यांमध्यें बराचसा भेद होत चालला, तेव्हां दोन्ही भाषांना निराळीं नांवें देण्याची वेळ साहाजिकच येऊन पोंचली. अशा प्रकारें उच्च भाषेस

संस्कृत असें नाव मिळालें आणि जनपदभाषेस प्राकृत म्हणू लागले. 'सस्कृत' म्हणजे चागलें, नीटनेटकें केलेलें. या नावावरून ही भाषा अगदीं व्यवस्थित अशी राखली गेली, आणि तिच्यामध्यें शब्द वगैरे नीटनेटके करून घेतले, आणि दुसऱ्याही अनेक सुव्यवस्थेच्या गोष्टी करून घेतल्या असें सिद्ध होतें, आणि यामुळें सस्कृत ही कृत्रिम भाषा आहे, खरी स्वाभाविक बोलण्याची भाषा नव्हे, अशी कल्पना पुष्कळाना करावयास सवड झाली आहे. परतु सस्कृत हें नाव अर्वाचीनकाळीं प्राप्त झालें, तें नाव प्राप्त झाल्यावर आणि त्यानतर त्या भाषेचें स्वाभाविक स्वरूप कमी होऊन बराच कृत्रिमपणा आला हें खरें, पण ती भाषा फार पर्वी वेदभाषा आणि जनपदभाषा या दोन स्वरूपात आर्यांची बोलण्याची भाषा होती यात अगदीं शका नाहीं. विद्वत्तेच्या कामात आर्य लोक मोठे व्यवस्थित, टापटिपीचे आणि हौशी होते, असें दिसून येतें, त्यामुळें त्याची भाषा सुरेख असली ह्मणून तिला कृत्रिम म्हणण्याचें काहीं कारण नाहीं.

'प्राकृत' हें नाव कसें उत्पन्न झालें हें अजून कोणास सागता येत नाहीं. एवढें मात्र दिसून येतें कीं, तें नाव सस्कृत हें नाव प्रचारात आल्यानतर उत्पन्न झालें आणि विद्वानाच्या भाषेला नाव मिळालें तेव्हा आता लौकिक भाषेलाही नाव पाहिजे असें वाटू लागल्यानतर उपयोगात आलें असावें हा शब्द 'सस्कृत' या शब्दासारखाच बनविलेला दिसतो. 'प्रकृति' म्हणजे मूळ भाषा, तिची 'विकृति' म्हणजे तिच्या पासून झालेली ती 'प्राकृत' अशी व्याख्या कित्येक करितात, ती खोटी. कारण मूळभाषा म्हणजे सस्कृत हिला 'प्रकृति' असें नाव दिलेलें कोठेंही आढळत नाहीं उलटपक्षीं "प्रकृत्या सिद्ध प्राकृत" म्हणजे मूळपासून जें आहे तें प्राकृत, आणि तेंच उत्तम बनविलें, तेव्हा सस्कृत झालें अशाही व्याख्या कोणीं केल्या आहेत प्रथमत जनपद भाषेला 'प्रकट' भाषा म्हणजे सर्वांना सहज समजते अशी भाषा असें नाव पडलें असावें. 'प्रकट' याचें नियमाप्रमाणें लौकिकात 'पाअड' व्हावयाचें, तसें तें झालें. आणि मग 'पाअड' याचें 'सस्कृत' याशीं जुळण्यासारखें 'प्राकृत' असें रूप बनविलें. असा

'प्राकृत' याचा अर्थ करितात; तो बावगा दिसत नाहीं. 'प्रकट' म्हणजे सर्वांना स्पष्ट होईल असें; 'प्राकृत' म्हणजे सर्वसाधारण, उच्च नव्हे. लोकभाषेचा संस्कृताशीं भिन्नपणा दाखविण्यासाठीं तिला 'प्राकृत' असें अजूनही म्हणतात. संस्कृत, आणि प्राकृत म्हणजे मराठी, असें शास्त्री लोक आजकालपर्यंत मानीत आले आहेत. संस्कृत, प्राकृत, आणि मराठी अशीं तीन नांवें अलीकडल्या सुशिक्षितांनीं प्रचारांत आणलेलीं आहेत.

आतांपर्यंत सांगितलेल्या हकीगतींत काळाचा संबंध कांहीं एक आला नाहीं. इतिहास म्हटला म्हणजे त्याच्या बाजूला सनांचे आंकडे मांडावे लागतात. तसे येथें मांडतां येत नाहींत. कारण आमच्या जुन्या ग्रंथांत आणि त्यावरून बसविलेल्या इतिहासांत वर्षांचा उल्लेख येत नाहीं; यामुळें काळाची संगती लागत नाहीं, ही खरोखरी मोठ्या दुःखाची परंतु नाइलाजाची गोष्ट आहे. विद्वान लोक कल्पनेनें संगती लावीत असतात. परंतु अजून निरनिराळ्या प्रसंगांच्या काळांची मान्य करण्यासारखी संगती लागलेली नाहीं. एकंदर आर्यसंस्कृतीचा काळ फार लांब आहे, एवढें मात्र स्पष्ट दिसून येतें. आमच्या सांप्रतच्या विषयास अमुक गोष्ट अमक्या गोष्टीच्या अगोदर अथवा मागून घडली, व अमक्या अमक्या गोष्टींत अजमासें काळाचें अंतर अमुक असावें, असें ठरविण्याची थोडीबहुत जरूरी आहे. असा अजमास ठिकठिकाणीं शक्य तितका सांगितला आहे; आणि कित्येक ठाम झालेले काळ मांडले आहेत. यापेक्षां ज्यास्त सांगणें अशक्य आहे, आणि केवळ तर्क करीत बसण्यांत कांहीं अर्थ नाहीं.

---

## (२) संस्कृत भाषेचें कथानक

मागें सांगितलेंच आहे कीं, प्राचीन आर्य लोक इकडे आले, तेव्हां त्यांचे निरनिराळे संघ आले. त्यांचा निकट संबंध होता; आणि त्यांची भाषा जरी थोडीफार भिन्न असली तरी एकंदरींत एकच होती. तिचीं दोन प्रकारचीं स्वरूपें होतीं. एक धर्म, विद्या आणि तत्संबंधाचे

ग्रंथ किंवा प्रबंध याचें जें वाङ्मय त्याची भाषा. ही व्यवस्थित आणि प्रौढ असली पाहिजे. हिला पुढें संस्कृत असें नांव मिळालें, आणि तेंच नांव पुढें एकंदर भाषेला आरंभापासून कायम झालें. दुसरें स्वरूप जनपद भाषा, सर्व लौकिक व्यवहार हींत चालत. हिला पुढें प्राकृत हें नांव पडलें. प्राकृत भाषा ही सरावानें सोपी झालेली प्रौढ भाषा; अथवा प्रौढ भाषा, ही टापटिपीनें सुधारून घेतलेली प्राकृत भाषा. यांतलें मुख्य काय हे सांगतां येणार नाहीं, कारण दोन्ही प्रकार चालू होते. या प्राकृताचें स्वरूप प्रांतोप्रांतीं परिणतीच्या द्वारें बदलत जाऊन मराठी आणि दुसऱ्या देशी भाषा उद्भवल्या. त्या तयार होण्यांत संस्कृत व प्राकृत यांचें परस्परास साह्य झालें आहे. या गोष्टी चांगल्या समजण्यासाठीं संस्कृत आणि प्राकृत यांचा इतिहास पाहिला पाहिजे. प्रथमतः संस्कृत भाषा आणि तिचें वाङ्मय यांचा थोडक्यांत इतिहास सांगूं.

आर्य लोक आपल्या देवांचीं स्तोत्रें रचीत. तसेंच यज्ञाच्या वेळीं ह्मणण्याचीं सूक्तें असत. हीं स्तोत्रें आर्यावर्तभर पसरलेल्या मुख्य मुख्य ऋषींकडे होतीं. तीं फार प्राचीन काळापासून निरनिराळ्या वेळीं रचिलीं. पुढें त्यांतलीं महत्त्वाचीं सूक्तें एकत्र करून त्याच्या संहिता म्हणजे समुदायरूप व्यवस्थित ग्रंथ बनविले. अत्यंत जुना वेदग्रंथ ऋग्वेदाची शाकल संहिता हा होय. ऋग्वेदांत देवांच्या स्तुतीपर प्राचीन सूक्तें आहेत. यजुर्वेदांत बहुतेक यज्ञास उपयोगी अशा मंत्रांचा आणि यज्ञवर्णनपर गोष्टींचा संग्रह आहे. सामवेद म्हणजे यज्ञाच्या वेळीं गावयाचीं ऋग्वेदांतील वगैरे निवडक सूक्तें. ऋग्वेदांत फार जुन्या काळांत घडलेल्या आणि लोकांच्या केवळ आठवणींत राहिलेल्या अशा गोष्टींचा उल्लेख आहे. त्या उल्लेखावरून त्या गोष्टींना तेव्हांच पौराणिक स्वरूप आलें होतें असेंही दिसतें. यावरून हीं सूक्तें रचण्याचा काळ अत्यंत प्राचीन असला पाहिजे. तसेंच निरनिराळीं सूक्तें निरनिराळ्या काळीं रचलीं आणि अगदीं जुनें सूक्त आणि नवें सूक्त यामध्यें अनेक शतकांचें अंतर असलें पाहिजे, असें सूक्तांच्या भाषेवरून दिसून येतें. वेदानंतर ब्राह्मणें, आरण्यकें, उपनिषदें वगैरे ग्रंथ झाले. यांचे निरनिराळे भाग निरनिराळ्या वेळीं रचलेले आहेत. पाणिनीच्या

वेळीं निदान शाकल आणि तैत्तिरीय या संहिता होत्या. त्याच्या व्याकरणांत ब्राह्मण ग्रंथांचें नांव येतें, परंतु 'आरण्यक' हा शब्द ग्रंथ या अर्थी येत नाहीं. पाणिनी आपल्या व्याकरणाच्या भाषेस केवळ भा षा म्हणजे बो ली असें म्हणतो आणि वेदांच्या भाषेस छं द स् असें म्हणतो. तसेंच वेदांच्या भाषेंतले नामें, क्रियापदें व इतर रूपें यांचे त्याच्या वेळीं उपयोगांतून गेलेले किंवा फिरलेले अनेक प्रकार तो सांगतो.

वेदभाषेंत धातूंचे गण वगैरे व्यवस्था नव्हत्या व व्याकरणाचें नियमन नव्हतें असें वाटतें. परंतु तैत्तिरीय संहितेंत इंद्र नांवाचा प्राचीन व्याकरणकार आणि त्यानें केलेली व्याकरणव्यवस्था यांचा उल्लेख आहे. वेदभाषा ही पाणिनीच्या वेळींही फार प्राचीन म्हणून मानली जात होती. त्याच्या वेळीं अनेक जुने शब्द आणि जुनीं रूपें उपयोगांतून गेलीं होतीं. आणि वेदाचा अर्थ लोकांना कळेनासा झाला होता. वेद नुसते घोकून पाठ करीत. वेदवाक्यांना किंवा मंत्रांना कांहीं अर्थ नाहीं, मंत्र नुसते म्हटले म्हणजे झालें, अशा प्रकारची समजूत त्या प्राचीन काळींही उत्पन्न झाली होती. यामुळें यास्कानें आपल्या निरुक्तांत

> 'स्थाणुरयं भारवाहः किलाभूद्
> अधीत्य वेदं न विजानाति योऽर्थम् ।'

अशी एक जु नी ऋ चा सांगितली आहे. हींत अर्थ न समजतां पाठ करणारास ठोंब्या म्हटलें आहे. अर्थ समजत नाहीं असा झालेला जो वेद त्यांतील शब्दांत–अक्षरांतही–फरक होऊं नये, म्हणून बनविलेली जी 'क्रम' नांवाची वेद म्हणण्याची तऱ्हा तिचा पाणिनीनें उल्लेख केला आहे. यावरून वेद आणि वेदभाषा या पाणिनीच्या वेळींही फार फार जुनाट गोष्टी झाल्या होत्या. पाणिनीच्या वेळीं जी भाषा जागती होती आणि जिचें व्याकरण त्यानें रचिलें तिला तो बो ली असें म्हणतो. त्याच्या वेळीं ती त्यानें वर्णिलेल्या स्वरूपांत जागती होती, म्हणूनच तिला तो बोली असें नांव देतो. पाणिनीनें आपलें व्याकरण त्याच्या वेळीं बोलण्यामध्यें चालत असलेल्या भाषेचें म्हणून

लिहिलें आहे. ऐतरेय ब्राह्मण, शतपथ ब्राह्मण इत्यादि काहीं जुने ब्राह्मणग्रंथ, तशींच अगदीं जुनीं उपनिषदें याशिवाय त्यावेळच्या भाषेचा लेखी मासला उरलेला नाहीं. या ग्रंथाची भाषा साधी होती वाक्यें लहान लहान असत. क्रियापद पूर्णक्रियापदानें सांगितला जाई. लांब समास नव्हते. संधी एकत्र बनलेल्या शब्दात होई. वाक्यात जुळविलेल्या परंतु स्वतंत्र अशा शब्दाचा संधी पाणिनीनें वैकल्पिक सांगितलेला आहे. अर्थात् पाणिनीची भाषा बोलण्यामध्यें होती, आणि बोलताना असे संधी करणें अशक्य म्हणून त्यानें विकल्प सांगितला आहे.

पाणिनीच्या काळानंतर लवकरच सं स्कृ त असें नाव उत्पन्न होऊन ती भाषा उत्तरोत्तर धर्मग्रंथ, इतर वाङ्मय आणि विद्वान् लोक यांची भाषा होत चालली. पाणिनी केव्हां झाला हें अजून ठरलें नाहीं. वैय्याकरण ग्रंथकारांपैकीं भाष्यकार पतंजली याचा काळ इसवी सना पूर्वी दीडशें वर्षे, असा विद्वानांनीं ठरविला आहे. त्यानें वर्णिलेली संस्कृत भाषा आणि त्याचे अगोदरचा व्याकरणकार कात्यायन याची भाषा यात फारसा भेद नाहीं, यामुळे कात्यायन पतंजलीचे अगोदर सुमारें दोनशें वर्षात झाला असावा. कात्यायन मात्र पाणिनीच्या भाषेमध्यें बराच फरक झालेला दाखवितो तसेंच पाणिनीला जे सभोंव तालचे देश आणि लोक ठाऊक होते, त्यापेक्षा कात्यायनाला पुष्कळ अधीक ठाऊक होते असें दिसून येतें. यामुळें पाणिनी कात्यायनाच्या बराच अगोदर झाला असावा, आणि त्या अवधींत संस्कृत आणि प्राकृत अशीं नावें प्रचारात आलीं असावीं. शिक्षा म्हणून जो शब्दोच्चारनियामक ग्रंथ आहे, तो पाणिनीच्या पद्धतीवर रचला आहे, असें त्यातच म्हटलें आहे. या शिक्षाग्रंथाचा पतंजलीनें उल्लेख केला आहे, त्यावरून तो पतंजलीच्या पूर्वीचा होय या ग्रंथात संस्कृत आणि प्राकृत अशीं भाषाचीं नावें आहेत.

पाणिनीचा काळ इसवी सनाच्या आठव्या शतकाच्या अगोदर फारसा नेता येत नाहीं. पाणिनीनंतर लौकरच संस्कृत भाषा केवळ विद्वानाची भाषा होत चालली, आणि जनभाषा बळावत चालल्या.

त्यांना प्रा कृ त म्हणूं लागले, आणि उत्तमावस्थेप्रत पोंचलेली जी विद्वानांची, धर्माची आणि वाङ्मयाची भाषा, तिला सं स्कृ त असें नांव मिळालें. हीं दोन्हीं नांवें पाणिनीच्यानंतर लौकरच कायम झालीं.

बुद्धाच्या काळीं म्हणजे इ. स. पूर्वी सहाव्या शतकांत संस्कृत भाषा एकंदर जनतेला कळेनाशी झाली होती. म्हणून बुद्धाची धर्मचर्चा प्राकृतांत झाली. या वेळापासून इसवी सनाच्या दुसऱ्यातिसऱ्या शतकापर्यंत म्हणजे बौद्धधर्म जोरांत असतांना संस्कृत भाषेस बरीच ओहोटी लागली होती. परंतु त्या सुमारास ब्राह्मणी धर्माची पुन्हा ऊर्जितदशा झाल्यावर संस्कृतास नवा जोम उत्पन्न झाला. या सुमारास देशभाषा उद्भूत झाल्या होत्या; तरी ग्रंथरचना संस्कृतांत होत होती, आणि विद्वानांची चर्चाही त्याच भाषेंत चाले. यामुळें संस्कृतांतील उत्तम ग्रंथरचना तेव्हांपासून तों शंकराचार्यांच्या काळीं नवव्या शतकांत आणि पुढें तेराव्या शतकापर्यंतही येऊन पोंचली आहे. तथापि या अलीकडच्या काळांतल्या उत्तम संस्कृताचें श्रेय शंकर वगैरे महान् आचार्यांच्या बुद्धिमत्तेला आहे. संस्कृताच्या जिवंतपणाला नाहीं, हें लक्षांत ठेविलें पाहिजे.

पाणिनीनंतर संस्कृताचें साधें स्वरूप बिघडत चाललें. बौद्ध धर्माचे वेळच्या प्रचलित प्राकृतास पुढें पा ली असें नांव पडलें. सर रामकृष्णपंत भांडारकर यांनीं आपल्या व्याख्यानांत पाली भाषेची संस्कृताशीं फार सुंदर रितीनें तुलना केली आहे. या तुलनेवरून असें दिसतें कीं त्या वेळच्या प्राकृतांत संस्कृतांतल्या सर्व आख्यातविभक्तींचीं रूपें होतीं. नामादिकांच्या विभक्तींचींही बहुतेक रूपें होतीं. दोन्ही प्रकारच्या रूपांत फरक मात्र होता. मूळचे संस्कृत शब्दही उच्चाराला सोपे करून घेतलेले होते. द्विवचन, संधी, वगैरे व्यवस्था प्राकृतांत नव्हत्या. तथापि त्यावेळचें संस्कृत आणि प्राकृत यांमध्यें फार फरक नव्हता. केवळ तुलनेच्या दृष्टीनें पाहिलें तर खेडाऊ मराठी आणि पुस्तकी मराठी यांमध्यें आज जितका भेद आहे, तितकाच पाली आणि संस्कृत यांमध्यें होता. यापुढें संस्कृतांत कृत्रिमपणाचे प्रकार फार शिरले. वाक्य म्हटलें म्हणजे तें संधींनीं जखडून बांधलेलें

असू लागले. आख्यातविभक्ती जाऊन त्यांचें काम धातुसाधित विशेषणानें होऊं लागलें. लांब लांब समास प्रचारात आले. या गोष्टींपैकीं धातुसाधित विशेषणाच्या योगानें क्रियापदाचे काळ दाखविण्याची रीत ज्यास्त सुलभ, यामुळें ती या काळच्या संस्कृतांत जास्त उपयोगात येऊन पुढें प्राकृतांत आणि त्यानंतर सर्व देशभाषात आली, देशभाषांतील बहुतेक सर्व आख्यातविभक्ती धातुसाधित विशेषणाच्या साह्यानें बनल्या आहेत.

संस्कृताच्या संबधानें आणखी एक असा प्रकार झाला कीं, एखादी भाषा चालू असली म्हणजे तिच्या स्वरूपांत जे फरक पडत जातात, तसले फरक पाणिनीनंतर कात्यायनापर्यंत बरेच होत होते, पण त्यानंतर भाष्यकार पतंजलीपर्यंतच्या काळात ते फारच कमी होत गेले, आणि त्यानंतर असले फरक होण्याचें मुळींच बंद होऊन संस्कृत भाषा अगदीं कायमची ठरीव होऊन बसली, पाणिनी, कात्यायन आणि भाष्यकार पतंजली यांच्या ग्रंथांत जें शब्दरूप सांगितलेलें नाहीं तें अशुद्ध असें ठरलें. अर्थात् तेव्हापासून संस्कृत ही निजलेली भाषा झाली. त्यानंतरच्या काळांत कालिदासासारख्या कवींनीं आणि शंकरासारख्या आचार्यांनीं व्याकरण बाजूला ठेऊन केलेले काहीं थोडे प्रयोग आढळतात. पण ते भाषा चालू होती म्हणून नव्हत, तर शंकरासारखे ग्रंथकार मोठे आणि 'वाचमर्थोऽनुधावति' अशी त्यांची योग्यता म्हणून.

पाणिनीपासून बौद्धधर्मसंस्थापनेपर्यंतचा संस्कृताचा काळ फार उत्कर्षाचा आहे. ज्यांना वेदामध्यें गणतात असे आरण्यकें, ब्राह्मणें, उपनिषदें वगैरे सर्व ग्रंथ या काळात पुरे झाले. शिवाय निरनिराळ्या धर्ममतांवर श्रौतसूत्रें, गृह्यसूत्रें, आणि धर्मसूत्रें, इत्यादि लिहिलीं गेलीं. हें वाङ्मयही फार विस्तृत आहे. याशिवाय महाभारत, रामायण, भागवत वगैरे ग्रंथांचा आणि पुराणांचा उपक्रम या काळातच झालेला आहे.

यानंतर बौद्धधर्माच्या योगानें उत्पन्न झालेली ओहोटी गेल्यावर तेव्हांपासून तों सुमारें तेराव्या शतकापर्यंतचा काळ 'भाषा' या दृष्टीनें संस्कृताचा उपयोग कमी होण्याचा जरी होता, आणि ती

भाषा बोलणारांची संख्या जरी संपुष्टांत आली, व प्राकृत व देशी-भाषा यांत जरी ग्रंथरचना होऊं लागली, तरी या काळांतच संस्कृतांतलें मुख्य वाङ्मय पूर्ण झालेलें आहे. पुराणें, काव्यें, नाटकें, स्मृतिग्रंथ, धर्मदर्शनांवरचीं निरनिराळ्या मतांचीं भाष्यें, कित्येक गद्यग्रंथ, वगैरे सर्व संस्कृत ग्रंथ या काळांतले आहेत; आणि त्या वेळीं संस्कृत अगदीं ठाम झाल्यामुळें या सर्व ग्रंथांची संस्कृतभाषा व्याकरणाच्या घटनेमध्यें कांहीं किरकोळ गोष्टींखेरीजकरून अगदीं एकसारखी आहे.

वरील संक्षिप्त वर्णनावरून दिसून येईल कीं, संस्कृत भाषेच्या इतकी फार जुनी आणि हयात असलेली भाषा पृथ्वीच्या पाठीवर दुसरी नाहीं. तिचें वयोमान निदान किती ठरवावें हें सांगतांही येत नाहीं. तींतील ग्रंथरचनेच्या दृष्टीनें तें पांच हजार वर्षांहून कमी तर खचीत नाहीं, असें भाषाभिज्ञ मानितात. ज्यास्त किती असेल तें असो! संस्कृत भाषेचें वयोमान इतकें मोठें असल्यामुळें आणि ती बोलणारे लोक प्रथमारंभापासूनच विद्याव्यासंगी असल्यामुळें तिची उत्तरोत्तर फार मोठी उन्नती होत गेली आहे, हें स्वाभाविकच आहे. संस्कृताची शब्दसंपत्ती अपार आहे. तिच्या एवढ्या मोठ्या आयुष्यांत पुष्कळ शब्द उत्पन्न झाले आहेत. एकेका वस्तूला अनेक शब्द आहेत. भाषेमध्यें वस्तूला नांव पडतें तें प्रथमतः तिच्या संबंधाच्या एखाद्या गुणावरून पडतें. पुढें साम्यतेनें, इतर गुणांवरून, काल्पनिक सादृश्यावरून, रूपकानें, ऐतिहासिक आणि पौराणिक गोष्टींवरून, आणि दुसऱ्याही अनेक कारणांनीं एकाच पदार्थाचीं नांवें वाढत जातात. असा प्रकार संस्कृतांत फार असून तो अगदीं प्राचीन काळापासून आहे. वेदकोश जो निघंटू, त्यामध्यें पृथ्वीचीं एकवीस, रात्रीचीं सोळा, पर्वताचीं तीस आणि पाण्याचीं शंभर नांवें आहेत. अमरकोशांत देवांचीं सव्वीस नांवें आहेत. अशीं निरनिराळ्या पदार्थांचीं नांवें घेऊन तीं कशीं झालीं याचा विचार करणें ही गोष्ट फार मनोरंजक आहे. या नांवांचा मराठी वगैरे देशी भाषांना फार उपयोग आहे. एकाच वस्तूला अशीं निरनिराळीं नांवें आहेतच; पण माहीत असलेल्या सर्व वस्तूंनाही शब्द योजिलेले आहेत. हल्लींच्या ज्ञानयुगांत पदार्थांची माहिती फार वाढली

आहे, तेव्हां प्रत्येक भाषेंत त्याचीं नांवेंही वाढलीं आहेत. इंग्लिश भाषेंत ल्याटिन आणि ग्रीक भाषांतून शब्द बनवून घेतात. शिवाय इंग्लिश भाषेंत पृथ्वीच्या पाठीवरील सर्व भाषांतून लागतील तसे शब्द घेतले आहेत. संस्कृत भाषेंत नवीन शब्द बनविण्याची सोय असल्यामुळें मराठीस नवीन शब्द तयार करण्याची आयतीच सोय आहे. ल्याटिन आणि ग्रीक भाषा आणि इंग्लिश भाषा यांचा निकट संबंध असला तरी त्या परस्परांना परक्याच आहेत. संस्कृत ही मराठीला परकी नाहीं, इतकेंच नव्हे तर संस्कृत किंवा आद्य वेदभाषा हें मराठीचें स्वतःचेंच फार जुनें स्वरूप आहे. तेव्हां संस्कृतांतून जे शब्द आयतेच असलेले किंवा नवे तयार करून घेतां येतील ते आपलेच स्वामित्वाचे आहेत, हें उघड आहे. संस्कृत भाषेंत शब्दाच्या मूळ अर्थाचे धातू असतात यांना अगोदर लावावयाचे 'उपसर्ग' म्हणून असतात. त्यांच्या जुळणीनें मूळ धातूचे निरनिराळे अर्थ होतात. तसेंच मूळ धातूच्या स्वरूपांत गुण, वृद्धी, संप्रसारण इत्यादि साधनांनीं होणारे फेरफार आहेत, त्यापासून अनेक अर्थ उत्पन्न होतात. त्याचप्रमाणें अनेक प्रत्यय आहेत, त्यांच्या जुळणीनें भिन्न भिन्न अर्थाचे शब्द बनवितां येतात. यामुळें देशी भाषांत आपणास पाहिजेत तसे शब्द बनवितां येतील. तसेंच संस्कृत ही फार वर्षांपासून ग्रंथरचनेची भाषा असल्यामुळें, सध्याच्या जनभाषास आयतेच उपयोगीं पडतील असे ग्रंथरचनेचे नानाप्रकार आपणास सुसाध्य आहेत.

संस्कृत भाषा ही कधीं बोलण्यांत होती कीं नाहीं, असा प्रश्न पुष्कळदां विचारण्यांत येतो, विशेषतः पाश्चात्य पंडितांस अशी शंका वाटते. संस्कृत भाषा ही बोलण्यांत होती किंवा नाहीं या विषयीं डॉ. सर रामकृष्णपंत भांडारकर यांनीं सांङ्ग चर्चा केली आहे, आणि संस्कृत भाषा ही एका काळीं जाग्रत भाषा होती हें सिद्ध केलें आहे. आपल्या लोकांत याविषयीं फारशी शंका नाहीं, यासाठीं येथें ज्यास्त कांहीं सांगण्याची गरज नाहीं. यासंबंधाचा एक मुद्दा आपणास उपयोगाचा आहे, तो मात्र एथें थोडक्यांत सांगितला पाहिजे. संस्कृतांत अनियमित रूपें फार, आणि एक प्रकारचींच एका अर्थाचीं म्हणजे

वैकल्पिक रूपें ही पुष्कळ. यामुळें ती भाषा बोलण्यांत असूं शकणार नाहीं, असें कित्येक म्हणतात. पण वास्तविक पाहातां हेच प्रकार कोणतीही भाषा चालू भाषा आहे किंवा होती, आणि तिचा प्रचार फार असून प्रांतही अफाट होता हें ठरविण्यास प्रमाणीभूत होतात. मराठी भाषा ही विस्तृत प्रांतभर चालू आहे आणि ती बोलणारे लोक भिन्न प्रकारचे आहेत, म्हणूनच मराठींतही एकाच अर्थाचीं निरनिराळीं रूपें आहेत. असाच प्रकार प्रत्येक चालू भाषेचा असतो. केवळ नियमित लोकांच्या व्यवहारासाठीं एखादी बनावट भाषा मुद्दाम कोणी तरी कृत्रिम बनविली तर तींत असले प्रकार पुष्कळ होत नाहींत. आतां एवढें खरें कीं, संस्कृताच्या फार दिवसांच्या आयुष्यक्रमामध्यें जे कठीण वाटणारे प्रकार उत्पन्न झाले, ते सार्वत्रिक उपयोगांत नसून केवळ ग्रंथांतूनच असले पाहिजेत. शिवाय ती भाषा फार दिवसांपासून सार्वत्रिक बोलण्यांत नाहीं, तर केवळ विद्वत्तेच्या व्यवहारांत आहे, यामुळें तिच्यामध्यें कृत्रिम प्रकार बरेच शिरलेले आहेत. पण त्यांवरून एकंदर भाषा कृत्रिम असें कधींही म्हणतां येणार नाहीं. मराठी अथवा दुसरी कोणतीही भाषा घेऊन असें दाखवितां येईल, कीं तींतले कित्येक प्रकार बोलण्यांत नसून ग्रंथांत मात्र आहेत. असे कृत्रिम प्रकार सर्वत्र आढळतातच.

इंग्लिश भाषा जी आज इतक्या मोठ्या प्रौढ दशेस पोंचली आहे, तिला तिच्या सभोंवतालच्या इतर भाषांचें मोठेंच साह्य झालें आहे. इंग्रजी भाषेंत आजकालच्या युरोपियन भाषांतले अनेक शब्द आहेत. इतकेंच नव्हे, तर तींत आशियाखंडांतल्या आणि आफ्रिकाखंडांतल्या भाषांतलेही पुष्कळ शब्द घेतलेले आहेत. संस्कृत भाषेंतही असा प्रकार आहे, पण अर्थात् इंग्रजीभाषेइतका नाहीं. संस्कृत भाषेच्या आयुष्यक्रमांत तिच्या सभोंवार मान्य अशा दुसऱ्या भाषा नव्हत्या. तरी संस्कृतांत ग्रीक, खालडीयन, मिसरी, चिनी, इत्यादि भाषांतून ज्योतिष आणि इतर शास्त्रांच्या संबंधाचे शब्द आले आहेत. तसेंच हिंदुस्थानांतले द्राविडी वगैरे अनार्य लोक यांची संस्कृती बहुतांशीं आर्यांच्या बरोबरीची होती; त्यांच्या भाषेंतूनही संस्कृतांत शब्द

आले आहेत. संस्कृत भाषेस परकी शब्द अगदीं उमगणार नाहीं असे आपलेसे करून टाकण्याची हातोटी चांगली साधलेली असल्यामुळें असले परकी शब्द अगदीं संस्कृत बनले जाऊन ते आता ओळखताही येणार नाहींत. जैमिनीच्या मीमांसासूत्रावरील शबरस्वामीच्या भाष्यात 'पिक', 'नेम', 'तामरस', 'परिमंडल' इत्यादि शब्द अगदीं वेद भाषेंत आलेले परकी म्हणून सांगितलें आहे. हे शब्द सांगताना शेवटीं 'इत्यादि' म्हटलें आहे, त्यावरून तसे शब्द आणखीही होते असें त्यावेळचें मत दिसून येतें. संस्कृत ज्योतिषग्रंथात केंद्र, होरा, इत्यादि ग्रीक भाषेंतले शब्द आहेत. आमच्या ज्योतिष्यानीं बारा राशी प्रथमत पाश्चात्याकडून घेतल्या, तेव्हा त्यांचीं नांवेंही जशींच्या तशींच घेतलीं. नंतर मेष, वृषभ, वगैरे मूळ अर्थाचीं संस्कृत नावें योजण्यात आलीं. संस्कृतातून प्राकृत वगैरे भाषात जाऊन पुन संस्कृतात नवीन रूप धारण करून आलेलेही पुष्कळ शब्द आहेत. 'मित्र' शब्द असुरी भाषेंत 'मिथ्र' 'मिहर' असा आहे. तो संस्कृतात 'मिहिर' असें नवीन रूप घेऊन आला आहे. संस्कृतातला 'पुरातन' शब्द प्राकृतात 'पुराअण' 'पुराण' असा झाला. तो 'पुराणम्' 'जुनें', असा अगदीं नवीन अर्थानें वेदभाषेंतही आहे. कित्येक संस्कृत शब्दांचीं प्राकृत रूपें संस्कृतात आहेत. 'क्षुर' याचें 'खुर' हें रूप कालिदासानें आणि मनूनें उपयोगिलें आहे. तसेंच 'गोक्षुर' 'गोखुर', 'क्षुरिका' 'छुरिका', 'ऋक्ष' 'अच्छ', 'कक्ष' 'कच्छ', 'प्रियाल' 'पियाल', 'गण्ड' 'गल्ल', 'वज्र' 'वाजिर', 'चंद्र' 'चंदिर', 'इंद्र' 'इंदिर,' (इंदिरा स्त्री), 'मार्ग' 'मारिष', 'भद्र' 'भल्ल', इत्यादि मूळचे संस्कृताचे प्राकृत झालेले शब्द पुन्हा संस्कृतात घेतले आहेत. कित्येक शब्द मूळचे प्राकृत म्हणजे लौकिक भाषेंतले शब्द संस्कृताचे प्राकृत बनाविण्याचे जे नियम आहेत, त्याप्रमाणें फिरवून घेतलेले दिसतात. जसें, तोंड, तुण्ड, गाल, गल्ल, इत्यादि.

संस्कृत भाषा आणि तिचें एवढें मोठें वाङ्मय हिंदुस्थानातील काहीं विवक्षित लोकानीं इतकें वर्षें पिढ्यान्‌पिढ्या पाठ करून जिवंत राखलें आहे. लिहिण्याचीं साधनें नसता आणि इतक्या काळात सर्वत्र

अनेक उलाढाली झाल्या असतांही संस्कृत भाषा आणि तिचें वाङ्मय हीं कशीं टिकलीं याविषयीं मोठा चमत्कार वाटतो. सांप्रत आपणास जें वाङ्मय प्राप्त झालें आहे, त्यापेक्षां आर्यलोकांत उत्पन्न झालेल्या एकंदर वाङ्मयाचा विस्तार फारच जास्त असला पाहिजे. परंतु साधनांच्या अभावीं पुष्कळसे ग्रंथ नष्ट झाले असतील. ऋग्वेद वगैरे पवित्र वाङ्मयही जितकें मूळचें होतें, तेवढें सर्व आपणास प्राप्त झालें नाहीं असें पुष्कळ विद्वानांचें मत आहे. अशा वाङ्मयाच्या खाणाखुणा विद्यमान वाङ्मयांत पुष्कळ आढळून येतात. आजपर्यंत पृथ्वीच्या पाठीवर अनेक राष्ट्रें, अनेक धर्म होऊन गेले. त्यांतल्या कित्येकांची आठवणही उरली नाहीं. कित्येकांची पुसट पुसट, आणि कित्येकांची कांहीं जास्त आठवण आहे. पण हिंदुस्थानांतील गहन तत्त्वविचारांची, धार्मिक, राजकीय, सामाजिक आणि विद्येसंबंधीं आर्यसंस्कृती फार प्राचीन काळापासून आतांपर्यंत सारखी चालू राहिली आहे. कालांतरानें तिला परिणती प्राप्त झाली असेल, तेवढाच फरक. या अद्भुत गोष्टीचें कारण वर सांगितल्याप्रमाणें केवळ पाठशक्तीनें आणि शिक्षणपरंपरेनें राखलेली संस्कृत भाषा आणि संस्कृत वाङ्मय हेंच होय.

---

## ( ३ ) प्राकृत भाषेची कहाणी

प्राकृत अथवा जनपद भाषा ही आर्यांच्या इतिहासाच्या अगदीं आरंभापासून संस्कृत भाषेच्या बरोबरीनें चालू आहे असें मागें सांगितलेंच आहे. आर्यांची जशी उन्नती आणि स्थित्यन्तरें होत गेलीं, तशींच या त्यांच्या भाषेचींही होत गेलीं. अशी परिणती होत होत, निरनिराळ्या प्रांतांत जें जनपदभाषेचें स्वरूप होतें, ते कालान्तरानें बदलत जाऊन त्यापासून सांप्रतच्या प्रांतिक भाषा बनल्या. मराठी ही मराठी प्रांतांतील जनपदभाषेचें आर्यसंस्कृतीच्या इतक्या काळांत बनलेलें परिणत स्वरूप आहे. अर्थात् मराठी ही परिणत प्राकृत भाषाच आहे.

प्राकृत भाषा एक आहे किंवा अनेक प्राकृत भाषा आहेत? देश-

परत्वें महाराष्ट्री, मागधी, शौरसेनी, पैशाची हीं प्राकृताचीं नावें सांगितलीं आहेत. परंतु वस्तुतः तीं प्राकृताचीं नुसतीं प्रांतिक स्वरूपें आहेत. मुख्य प्राकृत याला कोणी महाराष्ट्री असें नांव दिलें आहे. बाकीच्या प्राकृत भाषा ह्या त्या मुख्य प्राकृताच्या शाखा, असेंच बहुधा प्रचलित मत आहे. यामध्यें परस्पर भिन्नपणाही अगदीं थोडाच सांगितलेला आहे.

येथें असें लक्षात ठेविलें पाहिजे कीं, आर्य लोक ज्या अर्थी सर्व हिंदुस्थानभर पसरले, आणि त्यांच्या निरनिराळ्या वसाहती जर परस्परापासून दूर होत्या, तर प्रांतोप्रांतींच्या भाषामध्यें फरकही बराच मोठा असला पाहिजे. तसा फरक होता यांत शंका नाहीं. आणि ह्मणूनच सिंधी, पंजाबी, हिंदी, बंगाली, ओरिया, मराठी, गुजराथी वगैरे प्रांतिक भाषा झाल्या. परंतु प्राकृत ह्मणून जी भाषा हल्लीं काहीं ग्रंथांत आपल्या दृष्टीस पडते, ती भाषा म्हणजे एकंदर जनभाषेचें मुख्य स्वरूप, तेवढेंच टिकलें, बाकीचे प्रांतिक प्रकार पुढे आले नाहींत. मात्र काला वरानें त्यांची परिणती होत जाऊन सांप्रतच्या चालू प्रांतभाषा झाल्या. हा प्रकार अगदीं हुबेहुब संस्कृतासारखाच आहे. जी संस्कृत भाषा ग्रंथांत उपयोगांत आणिली, ती जशी टिकली, त्याप्रमाणें जें प्राकृतभाषेंतलें स्वरूप ग्रंथयोजनेंत आलें तें कायमचें टिकलें. बाकीचे प्रकार नष्ट झाले, अथवा त्यांची परिणती होऊन त्यांना सांप्रतच्या चालू भाषांचें स्वरूप प्राप्त झालें.

प्राकृत भाषेचा आरंभापासून लोकव्यवहाराशीं जसा संबंध होता, तसा धर्मव्यवहाराशीं आणि वाङ्मयव्यवहाराशींही असलाच पाहिजे. प्राचीनकाळीं प्रमुख वाङ्मय संस्कृतांत लिहीत असत. संस्कृत भाषा साधारणतः सर्वांना समजे. परंतु संस्कृत ग्रंथांतल्या गोष्टी अशिक्षित जनतेस समजून देण्यासाठीं प्राकृत भाषेचा उपयोग होत असलाच पाहिजे. हल्लीं मराठींतलाच कठीण ज्ञानेश्वरी ग्रंथ अथवा त्यापेक्षां फार सोपे पांडवप्रतापादि ग्रंथ हे साध्या भाषेंत अर्थ करून लोकांना समजून सांगत असतात, हें सर्वप्रसिद्धच आहे. तोच प्रकार त्या वेळींही होता. वेद, ब्राह्मणें, उपनिषदें, अनेक प्रकारचीं धर्मदर्शनें आणि

सूत्रें यांवर विद्वानांची चर्चा संस्कृतांत चाले; परंतु त्या ग्रंथांतील भाग आणि पुराणें वगैरे जनतेला समजूत देण्याचें काम प्राकृतांत चाले. अशा प्रकारें धार्मिक आणि व्यावहारिक घडामोडींची ही जनपदभाषा अथवा प्राकृत भाषा होती. या काळीं लिहिण्याचीं साधनें नव्हतीं; यामुळें शास्त्राचे सिद्धांत सूत्ररूपानें सांगून, त्यांची चर्चा किंवा व्याख्यान सोप्या संस्कृतांत अथवा जनपदभाषेंत–प्राकृतांत–चाले. असा प्राकृत भाषेचा उपयोग प्राचीन काळापासून होत असला पाहिजे. ही गोष्ट नीट लक्षांत येण्यासाठीं आपण हल्लींच्या काळाचेंच उदाहरण घेऊं. सांप्रत मराठी भाषा सर्वांना कळते, असें आपण मानतों. परंतु विचारपूर्वक पाहिलें तर सुशिक्षितांवांचून केवळ लिहितां वाचतां ज्यांस येतें, त्या लोकांना केसरी, ज्ञानप्रकाश, विविधज्ञानविस्तार यांतील लेख किंवा सभांतून होणारीं व्याख्यानें, यांची मराठी भाषा कितपत कळत असेल? अशिक्षितांना तर ही विद्वानांची भाषा कळणें कठीणच आहे. त्यांना एखादा विषय नीट समजून देण्यासाठीं तो विषय अगदीं सोप्या भाषेंत पुन्हां सांगावा लागेल. असाच प्रकार त्या काळीं चालू असला पाहिजे. पंडितांनीं संस्कृतांत लिहून ठेवलेलें जनतेस जनपदभाषेच्याद्वारें समजूत देण्याची चाल पूर्वीपासून असली पाहिजे.

आरंभीं कित्येक शतकें प्राकृतांत ग्रंथ झाले नाहींत; अथवा झाले असले तरी टिकले नाहींत; किंवा टिकण्यासारखे असतील, त्यांना संस्कृताचें स्वरूप देण्यांत आलें असेल. कोणत्याही भाषेचें स्वरूप स्पष्ट दृष्टीस पडण्यास एखादा ग्रंथ टिकून तो हातीं आलेला पाहिजे. तसा प्राचीन काळचा एकही प्राकृत ग्रथ आपणास उपलब्ध नाहीं ही दुर्दैवाची गोष्ट आहे. इसवीसनाच्या पूर्वींच्या सहाव्या शतकांत बौद्ध धर्माची स्थापना झाली आणि त्यानंतरच्या तीन शतकांत त्या धर्माचा ग्रंथसंग्रह तयार झाला. हा ग्रंथसंग्रह त्या वेळच्या प्राकृत भाषेंत लिहिला आहे. तो फार मोठा आहे. या ठिकाणीं प्राकृत भाषेचें स्वरूप आपणास प्रथमतःच पाहावयास मिळतें. त्यावरून लोकभाषा चांगली नांवारूपास आली होती असें उघड दिसतें. अर्थात् ही लोकभाषा म्हणजे विद्वानांच्या संस्कृत भाषेचें सोपें स्वरूप. तेव्हां तिची व्यवस्था बनणें आणि नांवारूपास येणें हें

संस्कृताच्या व्यवस्थेला शक्य तितकें धुळून चें असणार. ही प्राकृत भाषा म्हणजे त्या वेळीं पूर्वेकडे मगध देशापासून तों पश्चिमेकडे पंजाब आणि दक्षिणेकडे माळवा, वैदर्भ वगैरे प्रदेश एथपर्यंत चालणारी लोकभाषा होती. तिला मा ग धी अथवा बौद्ध मा ग धी म्हटलें आहे. तिला पुढें पा ली असें नांव पडलें. पाली हा शब्द कसा उत्पन्न झाला यांविषयीं विद्वानांनीं निरनिराळे तर्क केले आहेत. संस्कृतांत ज्याप्रमाणें वेदांतील पंक्तीला ऋचा म्हटलें आहे, त्याप्रमाणें बौद्धधर्मग्रंथांत धार्मिक वचनाला 'पालि' असें म्हटलेलें आहे. यामुळें मूळचें बुद्धाचें वेळचें जसेंच्या तसें वचन सांगणें झाल्यास पालि (म्हणजे पंक्ति, ओळ किंवा वचन) म्हणून सांगण्याची चाल पडली. ही 'पालि' प्रथम म्हणावयाची आणि नंतर तीवर व्याख्यान करावयाचें, अशा प्रकारें धर्मोपदेश होत असे. पुढें त्यावरून बौद्धधर्मभाषेचें नांव पा ली असें ठरलें. या प्राकृतांत बौद्धधर्म ग्रंथ लिहिले गेल्यावर ती त्या वेळची भाषा संस्कृताप्रमाणेंच कायम ठरविली गेली, आणि तिची व्याकरण, कोश वगैरे सामुग्री ठाम झाली. अर्थात् त्या काळच्या लोकभाषेची जरी पुढें परिणती होत गेली, तरी ही पाली भाषा तेथेंच कायमची, आणि निद्रित परंतु बौ द्ध ध र्मा ची आ णि वा ङ्म या ची भा षा ब न ली. त्यानंतर केव्हांही, किंवा आतांही, बौद्धधर्मसंबंधानें लिहिणें झाल्यास त्या वेळच्या ठरीव पालीभाषेंत लिहितां येतें. वेदधर्माची भाषा जी संस्कृत, तिची यासंबंधानें जी स्थिती होती, तीच स्थिती यापुढें बौद्धधर्माची भाषा जी पाली तिचीही झाली. अशोकानें इसवी सनापूर्वी तिसऱ्या शतकांत आपल्या साम्राज्याच्या सीमेवर ठिकठिकाणीं ज्या आज्ञा कोरून ठेविल्या आहेत, त्या पाली भाषेंत आहेत. निरनिराळ्या प्रांतांतील आज्ञांच्या भाषेंत प्रांतिक फरक आहेत, पण ते अगदीं थोडे आहेत. येथें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं पाली भाषेला 'प्राकृत' म्हणत नाहींत. तर ती संस्कृतासारखीच बौद्ध धर्माची स्वतंत्र भाषा असें मानितात. तिला प्रथमतः बौद्धमागधी असें नांव होतें, परंतु पुढें तिचें पाली असें नांव कायम झालें.

आपणास इसवी सनाच्या पूर्वींच्या सहाव्या शतकांतलें हें प्राकृत

भाषेचें पालीनामक स्वरूप सांपडतें, त्याची आणि संस्कृताची येथें तुलना करूं. पालीभाषेच्या संबंधाच्या विशेष गोष्टी अशा आहेतः—

( १ ) ऋ, ॠ, ऌ, ऐ, औ हे स्वर नाहींत आणि विसर्ग नाहीं.

( २ ) श, ष, स, यांबद्दल एकच स होतो.

( ३ ) द्विवचन नाहीं.

( ४ ) 'य' प्रत्ययान्त चतुर्थी विभक्ति अकारान्त पुल्लिंगी व नपुंसकलिंगी स्थलवाचक नामांना मात्र आहे. बाकी तिच्या जागीं षष्ठी येते. पंचमीचा तृतीयेंत समावेश होतो.

( ५ ) संस्कृतांतील दहा लकारांपैकीं प्रथम भविष्य आणि आशीर्लिङ् नाहींत. बाकीचे आठ आहेत. या आठांपैकींसुद्धां लिट् व लङ् हे लकार फारच थोड्या धातूंना लागतात; व तीं रूपें जवळ जवळ अपवाद ह्मणून समजण्याची पद्धत आहे.

( ६ ) आत्मनेपदाचा थोडासा उपयोग आढळतो. वास्तविक पाहातां आत्मनेपद असा भिन्न प्रकार नाहीं. आत्मनेपदाचीं कांहीं रूपें मात्र उपयोगांत आहेत.

( ७ ) व्यंजनान्त शब्द नाहींत. अशा संस्कृत शब्दांचें व्यंजन काढून टाकतात अथवा त्यांत ' अ ' मिळवितात.

( ८ ) शब्दांचा उच्चार करण्यास सोपें व्हावें ह्मणून स्वरांत फेरफार होतो, संयुक्त व्यंजनांचें समीकरण, पूर्वरूप, किंवा पररूप, करितात. कित्येक ठिकाणीं उच्चारला कठीण अशीं व्यंजनें काढून टाकणें वगैरे प्रकार होतात. पुढील प्राकृतांत ग, द, ह, य, क, वगैरे कित्येक व्यंजनांच्या ठिकाणीं ' अ ' घालण्याची चाल फार आहे. परंतु हा प्रकार पालींत बहुतेक नाहींच.

( ९ ) जोडाक्षराच्या व्यंजनांमध्यें स्वर घालून तीं निराळीं करतात. उदा०—सिलोक ( श्लोक ), सुखुम ( सूक्ष्म ), वरीस ( वर्ष ), सिरी ( श्री ), ओसुमिक ( औष्मिक ) सुमरति ( स्मरति ), इत्यादि. हा प्रकार मराठी बोलणारांस चांगला माहीत आहे.

( १० ) शब्दाच्या आरंभींचें जोडाक्षर जाऊन एकच अक्षर राहातें; प्रबुद्धः–पबुद्धो; प्राप्नोति–पापुणाति; शृणोति–सुणाति, इ०

हे फेरफार होण्याचे जास्त नियम आणि त्यांचीं उदाहरणें येथें सांगू लागल्यानें तें कंटाळवाणें होईल. संस्कृत–पाली–प्राकृत–मराठी, या शब्दपरंपरेंत फेरफार कसे होतात, त्याचे मुख्य मुख्य नियम आणि उदाहरणें व्याकरणाच्या आणि शब्दसिद्धीच्या पुस्तकांत विस्तारेंकरून सांगितलीं आहेत. येथें त्यांचा उल्लेख विषयप्रतिपादनास पुरेसा मात्र करावयाचा आहे. तथापि या भागाच्या परिशिष्टांत यासंबंधाचे मुख्य मुख्य नियम उदाहरणासह सांगितले आहेत.

या सर्व विवरणावरून दिसून येईल कीं, हे फेरफार संस्कृत शब्द, उच्चारास सोपे करण्याकरितां आणि भाषा साधारणतः शक्य तितकी सुलभ बनविण्यासाठीं होतात. सांप्रत आपण मराठीमध्यें लिहितांना अथवा व्याख्यान करितांना शब्द आणि वाक्यें ठरीव अशा व्यवस्थित आणि छापडिपीच्या पद्धतीनें घालितों, परंतु बोलण्यांत यासंबंधीं फारशी सावधगिरी ठेवीत नाहीं, तसाच प्रकार मागीलपासून आहे. प्राकृत ही साध्या व्यवहाराची भाषा, म्हणून तींतून कठीण प्रकार काढले आहेत. हा प्रकार प्राकृताच्या पहिल्या स्थितींत म्हणजे पालींत फारच कमी होता. फेरफाराचे कांहीं विशेष नियम लक्षांत ठेविले, कीं संस्कृताची पाली होते. विद्वान् लोकांच्या व्यवहारांत संस्कृत आणि लोकव्यवहारांत पालीसारखी प्राकृत अशा भाषा जेव्हां उपयोगांत होत्या, तेव्हां एका भाषेंतून दुसरींत बोलण्यास पुढारी लोकांस कठीण जात नसे, आणि एकंदर जनसमूहास दोन्ही भाषा कळण्यास पचाईत पडत नसे.

पालीमध्यें आणखी एक आपणास भाषाशास्त्राच्या संबंधानें विशेष लक्षांत ठेवण्याजोगी गोष्ट सांपडते. ती ही कीं, त्या भाषेंत त्या वेळच्या संस्कृतांत नाहींत परंतु फार जुन्या संस्कृतांत म्हणजे वेदभाषेंत आहेत अशा अनेक गोष्टी दृष्टीस पडतात —'ळ' हें वैदिक भाषेतलें अक्षर पालींत आहे. अर्वाचीन संस्कृतांत प्रयोजक प्रत्यय 'आय' असा आहे. प्राचीन प्रत्यय 'प' असा आहे. पालीमध्यें हे दोन्ही प्रत्यय असून 'प'चा उपयोग विशेष आहे. मराठींत या 'प' वरूनच 'व' झाला आहे. वेदांतला तृतीयेच्या बहुवचनाचा प्रत्यय ' भि ' हा पालींत ' एभि ' अथवा ' एहि ' असा होऊन मेतो हा मराठींत आला आहे. उदा०

रामांहीं. जुनीं संस्कृत कृदन्त रूपें 'कातवे' ( मराठी--करावयास ), 'कत्वान' ( मराठी--करून, करोनी, ), अशीं पालींत आहेत. भाववाचक नामें करण्याचा जुना प्रत्यय 'त्तण' हा पालींत असून त्यावरून मराठी प्रत्यय 'पण' झाला. याशिवाय 'इदम्' सर्वनामाचें जुनें रूप 'इमस्य' यावरून झालेले 'इमस्स', 'गोनाम' याचें 'गोनं', 'त्रि' ( तीन ) याचें षष्ठीचें बहुवचन 'तिन्नम्' ( मराठी--'तीन' शब्द ), आज्ञार्थाचा प्रथमपुरुष बहुवचनी प्रत्यय 'आमसे' वेदांतील 'अकर्' पासून 'अका' .( कृचा भूतकाळ ), इत्यादि बरींच जुनीं रूपें पालींत आलीं आहेत. विद्वत्तेच्या आणि सुशिक्षितांच्या भाषेच्या बरोबरीनें जनपदभाषा किंवा लोकभाषा मूळपासूनच चालू होती, या गोष्टीचें हें उत्तम प्रमाण आहे. जुन्या काळचीं रूपें वगैरे प्रकार प्रौढ संस्कृत भाषेंत जरी फिरले, तरी ते जनपदभाषेंत चालू राहिले. अशी तऱ्हा मराठी भाषेंत असलेलीही पुढें दाखविण्यांत येईल.

आतां या वेळापर्यंत सर्व विद्वत्तेच्या व धर्माच्या व्यवहाराची भाषा जर संस्कृत होती, तर येथून पुढें लोकव्यवहाराची प्राकृत भाषा धर्मव्यवहारास कां घेतली ? याचें उत्तर उघडच आहे. या वेळापर्यंत सर्व व्यवहार संस्कृतांत असे. ती भाषा लोकांना हळू हळू बहुतेक कळेनाशी झाली होती. धर्मग्रंथ आणि तद्विषयक चर्चा हीं तर जनसमाजास अगदींच पारखीं होऊन गेलीं होतीं. ब्राह्मण वगैरे सांगतील तो त्यांचा अर्थ. यामुळें जनतेचें धर्मासंबंधीं समाधान होईना. तेव्हां त्यांच्या बोलीमध्येंच जनतेला धर्म शिकविण्याचा प्रघात बौद्धधर्मानें घातला. यामुळें जनपदभाषाही धर्मभाषा झाली.

बौद्धधर्माच्या स्थापनेच्या अगोदरचा आणि त्यानंतरचा काळ हा धार्मिक आणि सामाजिक उलाढालींचा व चळवळीचा काळ होता. धर्मविचारांचीं प्रख्यात 'दर्शनें' याच सुमारास उत्पन्न झालीं. याच धार्मिक चळवळीच्या कारणानें बौद्धधर्माची आणि जैनधर्माची चळवळ उत्पन्न झाली. सर्व धर्मविचार व तत्संबंधाची ग्रंथरचना संस्कृतांत चालते हें बरोबर नाहीं, असें वाटूनच बौद्ध-धर्म-प्रवर्तन प्राकृतांत झालें. तोच प्रकार प्रथमारंभीं जैनधर्माच्या चळवळीचाही होता. अर्थात्

प्राकृतभाषा पुढें आली. यावरून संस्कृत अगदीं मागें पडलें असें मात्र समजू नये. संस्कृत भाषा पूर्वीप्रमाणें चालू राहिली नव्हती, तथापि ती विद्वत्तेची भाषा होती आणि तींत ग्रंथरचनाही चालू होती. वेदधर्माचा ऱ्हास कधींच झाला नव्हता. यामुळे संस्कृताचा व्यवहार चांगलाच चालू होता. बौद्धधर्म आणि जैनधर्म यासारख्या बलवान् चळवळींना तोंड देण्याचा वेदधर्मीयांनीं प्रयत्न केला. त्या काळीं धर्मपंथावर अनेक ग्रंथ झाले आणि या दोन चळवळी लोकांना समजेशा भाषेंत झाल्या, यामुळें त्यांचा जनतेवर मोठाच पगडा पडला. याप्रमाणें प्राकृत भाषा देखील धर्माची व विद्वत्तेची भाषा होऊन ती बळावत चालली. इसवी सनाच्या पूर्वीच्या सहाव्या शतकापासून तों बौद्धधर्माचा ऱ्हास होऊं लागेपर्यंत म्हणजे इसवी सनाच्या पांचव्या शतकापर्यंत प्राकृताचा प्रघात फार झाला, आणि त्या भाषेंत बौद्धधर्मग्रंथांशिवाय इतर प्रकार चीही ग्रंथरचना झाली. बौद्धधर्माबरोबर किंवा त्याच्या अगोदर थोडे दिवस जैनधर्माची स्थापना झाली. या धर्माची चळवळ जरी बौद्ध धर्माइतकी नव्हती, तरी त्या धर्माचाही प्रसार पुष्कळ झाला, आणि हा धर्म आजमितीस आपल्या देशांत जागता असून त्याचे अनुयायी पुष्कळ आहेत. या धर्माचें वाङ्मय प्रथमारंभीं प्राकृतांतच सुरू झालें. जैनांची प्राकृत भाषा हिला कोणी अ र्ध मा ग धी म्हणतात अथवा कोणी म हा रा ष्ट्री म्हणतात. त्यांची धर्मभाषा अद्यापि प्राकृतच आहे. परंतु त्यांच्या धर्मग्रंथांपैकीं बरेचसे ग्रंथ संस्कृतांत आहेत, आणि जैन लोकांत संस्कृत पंडितही पुष्कळ होऊन गेले आहेत. संस्कृत वाङ्मय आणि संस्कृत ग्रंथ राखण्यांत जैन पंडितांचें फार मोठें साह्य झालें आहे.

या सर्व काळांत संस्कृत भाषाही ग्रंथाची आणि विद्वत्तेची म्हणून जागती होतीच. त्या वेळीं सर्व हिंदुस्थानभर समजेल अशी भाषा संस्कृत होती. पांचव्या आणि सहाव्या शतकांत हिंदुस्थानांत आलेले बौद्धधर्मी चिनी प्रवाशी यांनीं आपल्या ग्रंथांत असें लिहिलें आहे कीं, हिंदुस्थानांत सर्वत्र निरनिराळ्या लोकभाषा चालतात, यामुळें दळण वळणास कठीण पडतें. यासाठीं त्या देशांत ज्यास प्रवास करावयाचा असेल, त्यानें प्रथमतः संस्कृत शिकून घ्यावें म्हणजे कांहीं एक अडचण

पडणार नाहीं. मात्र हें म्हणणें विद्वान् प्रवाशांचें आहे, हें लक्ष्यांत ठेवावें. अशा रीतीनें संस्कृत ही सर्वत्र समजण्याजोगी भाषा म्हणून अगदीं अलीकडील काळापर्यंत चालू आहेच. एकाद्या विद्वानास देशांत कोठेंही गेलें तरी सर्वांना समजेल असें व्याख्यान द्यावयाचें झालें अथवा सर्वांना समजेल असा ग्रंथ कोणास लिहावयाचा झाला तर तो संस्कृतांत लिहावा अशी पद्धत चालत आलेली आहे. आतां मात्र इंग्रजी ही सर्व देशभर समजेल अशी भाषा नवीन उपयोगांत आल्यामुळें असला व्यवहार इंग्रजी भाषेंत होऊं लागला, आणि संस्कृत भाषा या संबंधानें कायमची मागें पडली.

प्राकृत भाषेचे प्रथमारंभीं महाराष्ट्री, मागधी, शौरसेनी आणि पैशाची असे चार प्रकार सांगितले आहेत. त्यानंतरचे आणखीही दोन तीन प्रकार सांगितले आहेत, परंतु मुख्य प्रकार चारच मानितात. हे प्रकार देशांवरून झाले आहेत असें समजतात. मगध देशांतली ती मागधी, शूरसेनांचा देश म्हणजे मथुरेच्या भोंवतालचा प्रदेश, येथील भाषा शौरसेनी, पिशाच लोकांचा म्हणजे वायव्यकोणांतला प्रदेश, तेथची भाषा पैशाची; आणि महाराष्ट्र देशांतली ती महाराष्ट्री. ही महाराष्ट्री भाषा म्हणजे मुख्य प्राकृत भाषा आणि दुसऱ्या भाषा या तिच्या शाखा असें कोणी समजतात. मुख्य प्राकृतास महाराष्ट्री असें नांव वररुचीनें दिलें आहे. त्याच्या नंतरचा आणि अगदीं अलीकडला प्राकृत व्याकरणकार हेमचन्द्र हा 'महाराष्ट्री' असें नांव न देतां, एक मुख्य प्राकृत समजतो, आणि दुसऱ्या देशपरत्वें झालेल्या तिच्या शाखा असें मानितो.

हा महाराष्ट्र देश कोणता ? सांप्रत लोकांचें नांव मराठे, आणि त्यांच्या भाषेचें नांव मराठी असें आहे. हे शब्द महाराष्ट्र शब्दावरून झाले असें समजतात. यासंबंधाची विशेष चर्चा पुढील प्रकरणांत आली आहे. मूळचें लोकांचें नांव 'मराठे' त्यावरून संस्कृत 'महाराष्ट्र' असें करण्यांत आलें. वैदर्भ (म्हणजे सांप्रतचा वऱ्हाड, नागपूरचा बराच भाग आणि खानदेशाचा बराच भाग, त्याचप्रमाणें जबलपूर, सागर वगैरे प्रदेश), आणि सांप्रतच्या दक्षिणमधला पैठणच्या व

देवगिरीच्या भोंवतालचा प्रदेश याना महाराष्ट्र म्हणत. कोणी कृष्णा नदीच्या उत्तरेच्या कुतल देशाचाही समावेश महाराष्ट्रात करीत. हा सर्व प्रदेश कांहीं फारसा मोठा नव्हता आणि प्रख्यातही नव्हता. वास्तविक पाहाता या प्रदेशात राहाणारे मुख्य लोक 'मराठे' या नावानें प्रख्यात होते. देशाला 'महाराष्ट्र' असें नाव कधींच मिळालेलें नव्हतें. परतु त्या प्रदेशात इसवी सनाच्या आरभाच्या सुमारास शातवाहन किंवा शालिवाहन वशाचे पराक्रमी राजे होऊन गेल्यामुळें आणि ते 'रट्ट' जातीचे किंवा 'मराठे' असल्यामुळें त्यानीं जिंकलेल्या प्रदेशास 'म हा रा ष्ट्र' असें सस्कृत नांव देण्यात आलें, आणि त्याची जी प्राकृत भाषा, तिला म हा रा ष्ट्री असें अभिमानाचें नाव प्राप्त झालें. वास्तविक ही प्राकृत भाषा महाराष्ट्राच्या बाहेर आर्यावर्तांभर चालू होती. ती मुख्य लोकभाषाच होती. तेव्हा वास्तविक पाहाता म हा रा ष्ट्री प्रा कृ त याचा अर्थ रा ष्ट्रा ती ल मु ख्य प्रा कृ त भा षा, असा दिसतो. पुढें 'महाराष्ट्री' आणि 'मराठी' या दोन शब्दाचा मेळ घालण्यात येऊन या दोन शब्दाचा आपण सांप्रत समजतो तसा सबध मानण्यात आला. वररुचि हा या मराठ्याचा आश्रित दिसतो. या शालिवाहन वशाच्या मराठी राजाच्या उत्तेजनानें महाराष्ट्री प्राकृतात रचना करणारे अनेक कवी झाले, व ग्रथही पुष्कळ झाले. शालिवाहन वशातील एका राजानें निरनिराळ्या कवींच्या ग्रथातील सुभाषितें घेऊन *गा था स प्त श ती* म्हणून एक ग्रथ तयार केला. हा ग्रथ त्या वेळच्या प्राकृत भाषेचा उत्तम मासला आहे. या सप्तशतींत अठ्ठेचाळीस पुरुष कवी आणि सहा स्त्री कवी याच्या ग्रथातले वेंचे आहेत. यावरून त्या वेळच्या प्राकृत वाङ्मयसपदेचें अनुमान करिता येतें. से तु ब ध आणि गौ ड व हो अशीं दोन बरींच मोठीं महाराष्ट्री काव्यें प्रसिद्ध आहेत. याखेरीज कित्येक किरकोळ ग्रथाचा नामनिर्देश आहे. दडीनें महाराष्ट्री प्राकृत भाषा आणि त्या भाषेंतील कित्येक ग्रथ याचा मोठ्या आदरानें उल्लेख केला आहे. यावरून त्याच्या वेळीं प्राकृत ग्रथ फार असावे असें दिसतें. मागधी आणि जुनी महाराष्ट्री यामध्यें जैनधर्मी ग्रथ आहेत. शौरसेनी भाषेचा ग्रथ उपलब्ध नाहीं.

पैशाची भाषेंत गुणाढ्य कवीचा बृहत्कथा या नांवाचा फार मोठा ग्रंथ होता असें म्हणतात; त्यापैकीं सुमारें सहा भाग फ्रान्समध्यें छापिले आहेत, असें समजतें. त्यावरून केलेले लहानसे दोन संस्कृत ग्रंथही उपलब्ध आहेत. या सर्व हकीगतीकडे लक्ष दिलें तर महाराष्ट्री या नांवाचा मूळचा अर्थ सर्व राष्ट्रांची म्हणजे मुख्य प्राकृत, आणि बाकीच्या तिच्या शाखा असेंच दिसून येतें. महाराष्ट्री भाषेचा महाराष्ट्र देशाची भाषा असा निकट संबंध केवळ अभिमानानें लावला गेला. मराठी भाषेचा केवळ महाराष्ट्री भाषेशीं निकट संबंध नाहीं; आणि मराठी भाषा ही महाराष्ट्री प्राकृत भाषेपासून झाली, हें म्हणणेंही पूर्णपणें खरें नाहीं. इसवी सनाच्या आरंभापासून पुढील पांच-सहा शतकें या प्रदेशांत जी प्राकृत भाषा चालू होती, तिचें परिणत रूप मराठी भाषा हें आहे; आणि तें प्राकृत मुख्य प्राकृत असून, त्याला महाराष्ट्री असें नांव देण्यांत आलें होतें. शौरसेनी वगैरे त्या प्राकृताच्या शाखा होत्या. त्याचप्रमाणें पुढें असें दाखविण्यांत येईल कीं, जे पाली आणि शौरसेनी यांतच विशेषतः आहेत असे अनेक प्रकार मराठींत आहेत. यासंबंधानें मुख्यतः लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, प्राकृत म्हणजे जी जनभाषा ती वास्तविक एकच. पाली, शौरसेनी, मागधी, पैशाची हे केवळ प्रांतिक प्रकार असून सीं नांवें विशेष कारणानें पडलीं. पाली म्हणजे इसवी सनाच्या पूर्वींच्या पांचव्या सहाव्या शतकांतलें प्राकृत; जैनग्रंथांचें प्राकृत याला अर्धमागधी असें म्हटलें आहे, तें पालीनंतरचें प्राकृत, किंवा महाराष्ट्रीचें आद्य स्वरूप; हें इसवी सनाच्या आरंभाच्या सुमाराचें प्राकृत.

यावरून दिसून येईल कीं, आपल्या भाषेला 'मराठी' असें नांव प्राप्त होण्यापूर्वी, सांप्रत ज्या प्राकृत भाषा म्हणून गणल्या जात आहेत त्यांच्यापैकीं मराठीचें स्वरूप कोणतें होतें हें पाहूं लागलें असतां 'महाराष्ट्री' म्हणून जी प्राकृत गणली जाते, तीपासून 'मराठी' उद्भवली असें म्हणतां येत नाहीं. महाराष्ट्रीचें लोकांच्या बोलण्यांत जें स्वरूप होतें, तें आपणास सांपडणार नाहींच; तेव्हां ती लोकांची 'बोली' परिणति पावून तिची 'मराठी' बनली असें कदाचित् असेल.

पण गाथासप्तशती, सेतुबंध काव्य इत्यादि ग्रंथाच्या महाराष्ट्रीपासून मराठी झाल्याचा समज मुळींच दिसत नाहीं. या महाराष्ट्री मधून मराठींत पुष्कळ शब्द आलेले दिसतात. तसे इतर देशी भाषातही आलेले दिसतात, हे डॉ.भांडारकर यांच्या ग्रंथावरून दिसून येतें. परंतु महाराष्ट्रीवरून चालू मराठींत व्याकरणसंबंधीं आणि भाषेच्या स्वभावाच्या संबंधीं गोष्टी फारशा आलेल्या आढळत नाहींत. प्राकृत भाषेच्या ज्या स्वरूपास अपभ्रंश असें नांव मिळालें त्यातले पुष्कळ प्रकार मराठींत आणि देशी भाषांत आढळतात असेंही डॉ. भांडारकर यांच्या ग्रंथावरून दिसून येतें. यावरून कदाचित् असेंही अनुमान करितां येईल कीं अपभ्रंश हें प्राकृताचें किंवा लोकांतल्या बोलीचें सर्वसाधारण स्वरूप आणि महाराष्ट्री, मागधी, शौरसेनी, ह्या भाषा म्हणजे प्राकृताचीं प्रांतिक स्वरूपें. महाराष्ट्री आणि मागधी यामध्यें कित्येक ग्रंथ झाले म्हणून त्या विशेष नावाजल्या, आणि शौरसेनी ही नाटकांतली प्राकृत ठरली गेली तेव्हां मराठीच्या अगोदरची प्राकृत 'पाली भाषा' होय. मराठी व्याकरणसंबंधीं आणि स्वभावसंबंधीं अनेक गोष्टी मराठींत आणि पालींत अगदीं एकसारख्या आढळतात. याची याद पुढें दिली आहे. यांतल्या कांहीं गोष्टी इतर प्राकृतांतही आढळतात, परंतु पाली आणि मराठी यामध्यें जें अत्यंत साम्य दिसून येतें, त्याला अन्य कारण मानतां येणार नाहीं.

पाली भाषेचें व्याकरण कात्यायन (कच्चायन) यानें लिहिलेलें आहे. हें व्याकरण संस्कृत व्याकरणाच्या धर्तीवर सूत्रमय रचलें असून त्यांत तो व्याकरणकार पाली ही स्वतंत्र भाषा मानितो. डॉ॰ सर रामकृष्णपंत भांडारकर पालीला मध्यम संस्कृत असें नांव देतात. वररुची हा खिस्ती शकाच्या सुमारेंपाचव्या शतकांत झाला असावा. याच्या व्याकरणाचें नांव प्राकृतप्रकाश. वररुचीला कात्यायन असेंही कोणी म्हणतात. पाणिनीच्या व्याकरणाची पुरवणी वार्तिकाच्या द्वारें करणार ग्रंथकार कात्यायन, पालीचें व्याकरण रचणारा कात्यायनच, आणि वररुचीला ही कात्यायनच म्हणतात. हे तिघे एकच असें कधींही म्हणतां येणार नाहीं. तेव्हां कात्यायन हें 'व्याकरणकार' या अर्थी सामान्यनाम झालें होतें

कीं काय कोण जाणें! वररुचीनें आपलें प्राकृत व्याकरण संस्कृत भाषेच्या व्याकरणाची पुरवणी ह्मणून लिहिलें आहे. प्राकृतांत काय निराळें आहे, हें सांगून बाकीचे नियम संस्कृताप्रमाणें असें तो शेवटीं सांगतो. तसेंच नऊ प्रकरणांत प्राकृत भाषेचे मुख्य नियम सांगून पुढें एकेका प्रकरणांत शौरसेनी व पैशाची यांचे विशेष नियम सांगतो. अखेरीस "बाकीचें सर्व महाराष्ट्रीप्रमाणें" असें म्हणतो.

हेमचन्द्र हा बाराव्या शतकांत गुजराथेमध्यें झाला. हा मोठा विद्वान् जैन पंडित होता. यानें एक संस्कृत व्याकरण लिहिलें आहे, आणि प्राकृत व्याकरण त्याचाच भाग किंवा पुरवणी ह्मणून लिहिलें आहे. हें प्राकृतप्रकाशापेक्षां ज्यास्त परिपूर्ण आहे. यामध्यें हेमचन्द्रानें प्राकृत ग्रंथांतून अनेक उदाहरणें दिलीं आहेत, त्यावरून त्याचे वेळीं विस्तृत असें प्राकृत वाङ्मय उपलब्ध असावें. हेमचन्द्रानें सरते शेवटीं अपभ्रंश ह्मणून प्राकृताचा एक प्रकार सांगितला आहे. अपभ्रंश ह्मणजे मराठी भाषेचा (किंवा देशभाषांचा) उद्भव होऊं लागला त्यावेळचें प्राकृत असें झटलें पाहिजे. याचें विशेष विवरण पुढें येईल.

संस्कृत भाषा म्हणजे विद्वानांची आणि ग्रंथांची भाषा आणि प्राकृत भाषा म्हणजे जनतेची भाषा; पहिलींतले शब्द आणि रूपें जास्त व्यवस्थित पण कठीण आणि प्राकृतांतलीं जरा ओबडधोबड पण सोपीं. असा भेद होण्याचीं मुख्य कारणें दोन आहेत. एक उच्चारसौकर्य आणि दुसरें व्यवहारसौकर्य. उच्चारसौकर्य साधण्याचें कारण, साधारण लोकांच्या अशिक्षितपणामुळें अथवा कमी योग्यतेमुळें त्यांना कित्येक अक्षरांचा नीट उच्चार करितां येत नाहीं, हेंच केवळ नव्हे. मनुष्य सुधारलेला शिक्षित असो वा रानटी अशिक्षित असो, त्याच्या तोंडाला एका भाषेची संवय लागली कीं, दुसऱ्या भाषेचे निराळे उच्चार करण्यास प्रयास पडतात. त्याचप्रमाणें स्वतःच्या भाषेचे उच्चार कठीण ह्मणून किंवा अन्य कारणानेंही फिरवावेसे वाटतात. आमच्या देशांतील निरनिराळ्या प्रांतांतल्या लोकांची तऱ्हा पाहा. सिंधी लोकांना 'क्ष' चा उच्चार कांहीं केल्या साधत नाहीं. ते ख्स, क्स्य, ख्य, असा कांहींतरी

उच्चार करितात. गुजराथ्याना 'ऐ', 'औ' साधत नाहींत; तसेंच 'प्रसन्न' याबद्दल ते 'परसन्न' 'श्रुति'बद्दल 'सुरती' असें ह्मणू पाहातात. मध्यहिंदुस्थान, बहार वगैरे प्रांतातील विद्वान् संस्कृत पंडितानाही श, ष, स, याच्या उच्चारांतला फरक समजत नाहीं, असें आपण पाहातों. बंगाल्याना 'अ'चा 'ओ'सारखा आणि 'व'चा 'ब'सारखा उच्चार करावा असें वाटून ते 'नवीनचंद्र' याबद्दल 'नोबीनचोन्द्रो' म्हणतात. आह्मा मराठ्यांतल्या उच्च लोकाना मात्र सर्व उच्चार येतात! संस्कृतमधले स्वर, व्यंजनें, जोडाक्षरें, रेफ, विसर्ग, यातलें काहीं एक मराठीनें उच्चारास कठीण ह्मणून सोडलेलें नाहीं.

इंग्रजी शब्दाच्या उच्चारामध्यें ही गोष्ट नीट कळून येईल. बंगाल, मद्रास इकडील मोठाले वक्तेही इस्टेशन, इस्कूल, असे उचार करितात. हिंदी भाषेंत संयुक्त व्यंजन शब्दारंभीं आल्यास त्याच्या आरंभीं स्वरोच्चार करण्याची पद्धत आहेः—स्त्री—इस्त्री, तसेंच स्कूल—इस्कूल, इत्यादि. श,ई, ओ याचे पुढें 'स' आल्यास त्याचा उच्चार आपणास साधत नाहीं. त्याचा आपण 'ष' करितों. यामुळें Post, Estate, याचे उच्चार आपण पोस्ट, ईस्टेट असे न करिता पोष्ट, इष्टेट, असें करितों. Rचे पुढें N आला तर न चा ण करणें आवडतें. ह्मणून आमचा उच्चार 'गव्हर्णमेंट' असा होतो. Appearance, Experience या शब्दातील पुढील भागाचा खरा इंग्रजी उच्चार आपणास कधींच साधत नाहीं. इंग्रजींतील t, d, th, याचा उच्चार आमच्या लोकास यावयाचा नाहीं असें इंग्रज ह्मणतात. उच्चारसौकर्याचा प्रकार युरोपियन भाषातूनही आहे. युरोपातील निरनिराळ्या भाषा जरी आपणास येत नाहींत, तरी इंग्लिश भाषेंतल्या भाषाशास्त्रावरील पुस्तकातून फ्रेंच, जर्मन, इतालियन या भाषाची तुलना केलेली असते. त्यावरून हें आपणास कळून येतें. I laede, 'मी नेतों' आणि I laedde, 'मी नेता झालों' यामध्यें स्वर एकच आहे. परंतु भूतकाळीं d व्यंजन दोनदा आहे. जुन्या इंग्रजींत पहिला 'लीड' आणि दुसरा 'लीड्ड' असा काहीं उच्चार असेल. चालू इंग्रजींत उच्चारसौकर्य उत्पन्न होऊन वर्तमान lead आणि भूत led असे शब्द बनले.

शब्दांमध्यें एकाहून अधिक ( Syllables ) अक्षरसंयोग असले कीं, त्यांचे शेवटचे संयोग उच्चारांत गाळावयाचे, असा फ्रेंच भाषेचा स्वभाव आहे. इंग्रजी भाषेमध्येंही शब्दाचे शेवटीं ऱ्हस्व स्वर असल्यास गाळावयाचा असें वारंवार झालें आहे. अशा रीतीनें पुष्कळ द्यउरी शब्द एकाक्षरी बनले आहेत. प्राकृतांतून मराठींत शब्द येतांना शेवटचे अ, इ, उ, हे स्वर शेंकडों शब्दांमध्यें नष्ट झालेले आहेत.

जुन्या इंग्रजींत scip (ship) जहाज, याचें अनेकवचन u प्रत्यय लागून scipu असें होतें. यांत शेवटचा u मागें सौम्य उच्चार असल्यामुळें कायम राहातो. परंतु hus (house) याला अनेकवचनी प्रत्यय u लागला असतां hus (हाऊस) या जोरदार उच्चारापुढें बिचाऱ्या u चा टिकाव न लागतां तो u नष्ट झाला, आणि अनेकवचन एकवचनासारखेंच झालें. अशा रीतीनें जुन्या इंग्रजींत अनेक नामांचीं दोन्ही वचनें सारखीं झालीं आहेत. प्राकृतांत आणि मराठींतही असा प्रकार झालेला आहे. उपान्त्यावर जोर देऊन अन्त्य अ, इ, उ यांचा लोप करावयाचा असा प्राकृताचा व मराठीचा स्वभाव. यामुळें बहुतेक सर्व आ, इ, ई, उ, ऊ, या अन्तांचे स्त्रीलिंगी शब्द मराठींत ते अन्त जाऊन सरसाघ अकारान्त बनले. परंतु त्यांचें सामान्यरूप कांहींचें आकारान्त आणि कांहींचें एकारान्त, ही भानगड मूळच्या अन्तांची आठवण न बुजल्यामुळें अजूनपर्यंत तशीच राहिली आहे. तसेंच राम+अस् ( जुना अनेकवचनी प्रत्यय ) याचें 'रामाः' असें व्हावयाचें. त्यांतला विसर्ग प्रथमतः गेला. मग रामा याच्या उच्चारांत उपान्त्याच्या जोरदार उच्चारामुळें अन्तींचा 'आ' जाऊन 'अ' झाला. अशा प्रकारें एकवचन 'राम' आणि अनेकवचनही 'राम'. मराठींत कांहीं थोड्या अकारान्त पुल्लिंगी शब्दांशिवाय सर्व अकारान्त शब्दांची हीच स्थिती झालेली आहे.

बोलणारांना कांहीं उच्चार कठीण वाटतात आणि कांहीं प्रकार गैरसोयीचे वाटतात म्हणून ते सोपे होतात. अथवा कित्येक गोष्टींचा कंटाळा येतो, किंवा कांहीं विशेष कारणांनीं जुनी गोष्ट जाते; ती गेली कीं, तिचें काम करण्यासाठीं नवीन प्रकार सजवावा लागतो;

अथवा त्यावाचून निर्वाह करावा लागतो. उच्चारसौकर्य हें पुष्कळदा केवळ मानीव असतें. अमुक उच्चार सोपा आणि अमुक कठीण असें का वाटावें हें सांगता येत नाहीं.

व्यवहारसौकर्य म्हणजे भाषेच्या व्यवहारामध्यें कित्येक गोष्टी अडचणीच्या वाटतात, त्या फिरविणें. व्याकरण हें भाषेच्या व्यवहाराचें शास्त्र, तेव्हा व्यवहारसौकर्य म्हणजे व्याकरणसंबंधीं सुधारणा. यात केव्हा उच्चारसौकर्यही येतें, पण व्यवहारसौकर्य प्रमुख असतें. विसर्ग नाहींसा करण्यामध्यें हीं दोन्हीं साधलीं. द्विवचन आणि आत्मनेपद नाहींसें करण्यात अथवा रूपें होण्याचे भिन्न अथवा वैकल्पिक प्रकार एकवटण्यात व्यवहारसौकर्य पुष्कळ साधतें.

भाषेमध्यें फेरफार होऊन जुनें जाऊन नवें येण्यास अन्य भाषा आणि अन्य लोक याचा निकट संबंधही पुष्कळदा कारणीभूत होतो. इंग्रजी भाषेमध्यें फरक होण्यास जवळच्या इतर भाषा आणि शेजाऱ्यांजवळचा व्यवहार, तसेंच ब्रिटन देशावर रोमन्स, सॅक्सन, डेन्स, नार्मन याच्या स्वाऱ्या आणि त्यामुळें झालेल्या राजक्रान्त्या कारणीभूत झाल्या आहेत.

इंग्लड देश बेटामध्यें एकीकडे असल्यामुळें इंग्रजी भाषेवर इतर युरोपियन भाषाहून अगदीं निराळ्याच प्रकारचे आणि हितकारक परिणाम झाले आहेत. सर्व युरोपीय भाषामध्यें संस्कृत आणि प्राकृत आणि नव्या आर्यभाषा याप्रमाणेंच नामें आणि क्रियापदें याचे भरपूर प्रत्यय आणि अचेतन पदार्थांचा लिंगभेद वगैरे प्रकार आहेत, परंतु इंग्रजी भाषेनें ते प्रकार पाचशें वर्षांचे अवधींत पार उडवून दिले, आणि यामुळें ती साधी, सोपी झाली. पुढें त्या भाषेंत भोंवताल्च्या सर्व भाषातून निवडक शब्द, वाक्यें वगैरे उपयुक्त प्रकार येऊन, ती भाषा आजला जगातील सर्व भाषात उत्तम बनली आहे.

आमच्या भाषावर इतर भाषा आणि इतर लोकाशीं संघट्टण याचे फारसे परिणाम झाले नाहीत. याचें कारण संस्कृत भाषेच्या प्राताच्या जवळपास महत्त्वाच्या अशा दुसऱ्या भाषाचे प्रांत नव्हते. द्राविडी लोकाची संस्कृती दक्षिणेंत फार दूर होती. आर्यानंतर ग्रीक, हूण,

शक, आभीर, गुर्जर वगैरे अनेक लोकांनीं हिंदुस्थानावर स्वाऱ्या करून इकडे राज्येंही स्थापिलीं. परंतु हे लोक संख्येनें थोडे असत आणि त्यांची भाषा आणि धर्म हीं आर्य लोकांच्या भाषेपेक्षां आणि धर्मापेक्षां कनिष्ट होतीं, यामुळें त्यांनीं इकडे आल्यानंतर लौकरच आर्यधर्म आणि आर्यभाषा यांचा स्वीकार केला; तेव्हां अर्थात् त्यांच्या स्वतांच्या गोष्टी नष्ट होऊन हे लोक आर्यांतच मिसळून गेले, आणि त्यांच्या भाषेचा आर्यभाषांवर फारसा परिणाम झाला नाहीं. थोडाबहुत झाला असला, तरी संस्कृत भाषा फार श्रेष्ठ यामुळें, आणि तिच्या आंगीं अन्य भाषेंतील प्रकार अगदीं बेमालूम आपलेसे करून घेण्याचें सामर्थ्य असल्यामुळें या गोष्टी आतां निवडून काढणें अशक्य आहे. आर्यांचेच निरनिराळे संघ आणि निरनिराळ्या भाषा यांचे परिणाम एकमेकांवर झाले आहेत. त्यांचें अस्तित्व भाषेमधून आढळून येतें, परंतु तेही प्रकार फारसे निराळे दाखवितां येत नाहींत.

उच्चारसौकर्य मुख्यतः दोन प्रकारचें असतें. एक निरनिराळे वर्ण उच्चाराला सारखे करून घेऊन अथवा एखाद्याचा लोप करून त्यांचे उच्चार एकवटून टाकणें, म्हणजे समीकरण. दुसरी गोष्ट कठीण वाटलेला वर्ण काढून त्याच्या जागीं सोपा वर्ण घालणें, म्हणजे वर्णान्तर. संस्कृतचे प्राकृत शब्द करून घेण्यामध्यें हे दोन्ही प्रकार घडले आहेत. 'प्रभात' यांत 'प्र'चा उच्चार 'र'मुळें कठीण वाटतो. ऐकण्यामध्येंही रेफाचा उच्चार ऐकूं येत नाहीं. तेव्हां त्याचें 'पभात' झालें. स, श, ष, यांतला एकटा 'स' असला तरी काम भागतें. उच्चारास कठीण श, ष, यांची भानगड कशाला? त्र, क्त, प्त यांचें फक्त 'त्त' होतें. (उदा०–पुत्र, पुत्त; भक्त, भत्त; प्राप्त, पत्त; इ०). कठीण जोडाक्षरें सोपीं होतात; (उदा०–धर्म, धम्म; शब्द, सद्द; स्कन्ध, खन्ध; पुष्प, पुप्फ; उष्ण, उण्ह; कार्य, काज; इ०) कित्येक स्थलविशेषीं उच्चाराला कठीण अशीं अक्षरें जाऊन त्यांचे जागीं दुसरीं येतात; उदाहरणार्थ क, द, ग, यांबद्दल अ होणें; द, ड, त, यांबद्दल ल होणें; य बद्दल ज, आणि य, व, यांबद्दल इ, उ, इत्यादि. असे फेरफार होण्याचे अनेक प्रकार होतात.

भाषा बदलण्याची याच्या पुढची पायरी म्हटली म्हणजे भाषेंत प्रत्ययांनीं संबंध दाखविण्याची जी तऱ्हा असते, ती जाऊन, निरनिराळ्या पूर्ण शब्दांनीं आणि केवळ वाक्यरचनेनें संबंध दाखविला जाणें. या योगानें भाषा साधी, सोपी आणि वाढती होते. इंग्रजी भाषा आजला या तऱ्हेला पूर्णपणें येऊन पोंचली आहे. संस्कृताला प्राकृताचें स्वरूप येतांना प्रत्ययरचना सोपी झाली आहे; पण त्यांची संख्या फारशी कमी झाली नाहीं. तथापि प्राकृतांत क्रियापदरूपें कमी होऊन त्यांचें काम कृदन्त आणि साह्य क्रियापद यांच्या जुळणीनें झालेल्या नवीन क्रियापदरूपानें होऊ लागलें. अपभ्रंशामध्यें प्रत्ययानें विभक्तिरूप होण्याचें कमी होऊन प्रत्ययांचें काम अव्ययांनीं होऊ लागलें. फक्त एक चतुर्थीचा 'त्याकारणें' हा अर्थ दाखविणारीं केहिं, तेहिं, पुणु, पुणु, तणणु रेसि, रेसिं, इतकीं अव्ययें सांगितलेलीं आहेत. त्यापैकीं केहिंपासून हिंदींत ' के ' झाला, आणि ' तेहिं ' पासून बंगालींत ' ते ' आणि मराठींत ' तें ' हा प्रत्यय झाला आहे. मराठी भाषेंत प्रथमा आणि द्वितीया केवळ वाक्यातल्या संदर्भावरून ओळखावयाच्या. तसेंच पुढील विभक्तींच्या रूपात प्रत्ययानीं करावयाचीं रूपें अगदीं थोडीं असून पुष्कळ रूपें शब्दयोगी किंवा शब्दापासून झालेले नवीन प्रत्यय नामाच्या सामान्यरूपाला लागून होतात. अर्थात् नामाचें सामान्यरूप हेंच खरें विभक्तिरूप बनलें. हिंदी आणि बंगाली भाषेंत तर हा प्रकार अगदीं पूर्णतेस गेला आहे. मराठींत थोडे प्रत्यय आणि प्रत्ययांचे अवशेष राहिले आहेत. त्याच्या सादृश्यानें आणि मराठीवर संस्कृताचा पगडा बराच असल्यानें मराठींत सामान्यरूपापुढें विभक्तिरूप दाखविण्यासाठीं जे शब्द योजिले गेले, त्यांचा संक्षेप होऊन ते नवीन प्रत्ययच बनले; हें पुढें दाखविण्यात येईल. मराठींत पुष्कळ क्रियापदरूपेंही शब्दाच्या जुळणीनें होतात. 'बोलत असतो', 'करावयास येतें', 'केलें पाहिजे', ' करूं सांगितलें' , ' देऊन टाकू', ' यावयाचे आहेत ', असलीं जोडक्रियापदें मराठींत पुष्कळ आहेत. त्यावरून नानाप्रकारचे अर्थ सुलभतेनें उत्पन्न होतात.

महाराष्ट्री वगैरे प्राकृतांचें विशेष स्वरूप कसें आहे, हें आतां आपण थोडक्यांत पाहूं. पालीचें स्वरूप मागें सांगितलें आहे. अक्षरें म्हणजे स्वर आणि व्यंजनें पालीमध्यें जितकीं आहेत, तितकींच पुढील प्राकृतांत आहेत. खेरीज अ, आ, ए, ओ, यांचे ऱ्हस्व आणि दीर्घ असे प्रकार झाले आहेत. मराठींत असाच प्रकार आहे, हें व्याकरणावरून दिसून येईल. पालींतला 'ळ' प्राकृतांत नाहीं. पालीमधले नामांचे विभक्तिप्रत्यय प्राकृतांत कमी होत गेले आहेत. सरतेशेवटीं अपभ्रंशांत तर प्रथमा व द्वितीया अगदीं एक झाल्या, आणि आणखी पुष्कळ प्रत्यय नष्ट झाले. पंचमीमध्यें बहुधा शब्दांपासून झालेले 'सुतो' 'हिंतो' असे प्रत्यय आले. हेही मराठीपर्यंत येऊन पोंचले नाहींत. मराठीमध्यें पंचमी विभक्ती अगदीं नवीन बनली. तिचा 'हून' हा प्रत्यय 'होऊन' या धातुसाधितावरून म्हणजे निराळ्याच शब्दावरून तयार झाला. क्रियापदांमध्यें आत्मनेपद मुळींच गेलें. पालींत सहा लकार होते, त्यांतले फक्त दोन प्राकृतांत आले; आणि बाकीच्या लकारांचा अर्थ दाखविण्यास कृदन्त विशेषणांचा उपयोग होऊं लागला. पाणिनीच्या वेळीं संस्कृतांत लकारांचा उपयोग सार्वत्रिक होता. परंतु पुढील काळांत काळांचीं पूर्ण रूपें जाऊन कृदन्तें आणि त्यापुढें 'अस' धातूचें रूप, यांनीं काम होऊं लागलें. हाच प्रकार पुढल्या प्राकृतांत आला. सांप्रतच्या देशी भाषांतले काळ मुख्यतः अशा रितीनें झाले आहेत, याकरितां ही गोष्ट विशेष लक्षांत घेतली पाहिजे. कित्येक लकार तर एकाच मुख्य लकारावरून दर्शित होऊं लागले. जसें, वर्तमानाचें रूप घालून अर्थावरून त्या रूपानें भूत आणि भविष्य यांचाही बोध होई. हा प्रकार मराठींत आहे. याप्रमाणें पालीनंतर जनपदभाषेची परिणती होत गेलेली आढळते. हे सर्व प्रकार बोलण्याच्या सुलभतेसाठीं होत गेले, हें उघडच आहे. विशेषतः असें होत असतें कीं, नामांचे विभक्तिप्रत्यय जाऊन त्यांचें कार्य मूळ नामास विभक्त्यर्थ दर्शविणारे शब्द किंवा त्यांचीं संक्षित रूपें लावून होऊं लागतें. याचें कारण जुने प्रत्यय समजत नाहींसे होतात, नवीन शब्द समजत असतात ते त्यांचे जागीं येऊं लागतात. समजुतीकरितां आपण मराठींतली

एकदोन उदाहरणें घेऊं. 'रामास' असें चतुर्थीचें रूप. यातल्या 'स' या प्रत्ययाचा अर्थ सामान्य लोकास काय कळणार ? यासाठीं ज्याचा अर्थ ठाऊक आहे असे जे 'साठीं' किंवा 'कारणें', 'करितां' हे सक्षिप्त शब्द, त्याचा उपयोग त्या प्रत्ययाच्या बद्दल होऊं लागून रामासाठीं, रामाकारणें, रामाकरितां, अशीं रूपें होतात. 'रामास पेरू आण', या वाक्यापेक्षा 'रामासाठीं किंवा रामाकरितां पेरू आण', हें अधिक सोपें, हें उघडच आहे. अशाच रीतीनें 'पायीं' हें जुन्याकाळचें रूप जाऊन पायावर, पायाठायीं, असें होऊं लागतें.

पाली आणि प्राकृत यातील मुख्य स्वरूपभेद मूळचे संस्कृत शब्द उच्चारसौकर्यासाठीं बदलून जाणें हा होय. पालीमध्यें हा फेरफार अगदीं कमी होता. मूळच्या व्यंजनामध्यें थोडासा फेरफार करून शब्द उच्चारास सोपा झाला कीं तो उपयोगात येत असे. पुष्कळ शब्द अगदीं जसेच्या तसेच—हल्लीं मराठींत आपण करितों त्याप्रमाणें—उपयोगात येत असत परंतु पुढील प्राकृतात केवळ संस्कृत शब्द म्हणजे तत्सम शब्द उपयोगात बहुतेक येतच नाहींत त्यामध्यें उच्चारात फेरफार झालाच पाहिजे. हे फेरफार कसे होतात याविषयींचे नियम व्याकरणाच्या शब्दसिद्धीच्या भागामध्यें सांगितले आहेत, आणि त्यांचीं उदाहरणेंही दिलीं आहेत. तसेंच या भागाच्या परिशिष्टातही मुख्य मुख्य नियम सांगितले आहेत. येथें त्या नियमाचें स्वरूप सांगण्यापुरती चर्चा करावयाची आहे. यासाठीं पुढें थोडेसे संस्कृत, प्राकृत आणि मराठी शब्द दिले आहेत, त्यावरून ही गोष्ट स्पष्ट होईल.

| संस्कृत. | प्राकृत. | मराठी. |
|---|---|---|
| हृदय | हिअअ | हिय्या |
| कीलक | कीलओ | खिळा |
| पार्श्व | पास | पाशीं |
| विष्किर | विक्खिर | विखरणें |
| म्रक्षण | मक्खण | माखणें |
| परीक्षा | परिक्खा | पारख |

| | | |
|---|---|---|
| बुभुक्षा | बहुक्खा | भूक |
| भगिनी | भइणी | बहीण |
| शून्य | सुण्ण | सुनें |
| पुनः | पुणो | पण |
| पर्याय | पल्लाअ | पाळी |
| यज्ञोपवीत | जन्नोवईय | जानवें |
| युगं | जुअं | जूं |
| अवलंबन | ओलम्बन | ओळंबणें |
| उपविश | उवैस | बसणें |
| तादृश | तारिस | तैसा |
| शत | सअ | सॉं |
| बधिरक | बहिरअ | बहिरा |
| नवशिक्षित | नवाशिकिअ | नौशिक्या |
| आर्द्रक | अल्लक | ओला |
| कपर्दिका | कवड्डिआ | कवडी |
| भ्रमर | भवंर | भॉवरा |
| पादोन | पाओन | पाऊण |
| उपलक्ष | उपलक्ख | ओळख |
| म.तृष्पसृका | मातुसिआ | मावशी |
| वाटिका | वाडिआ | वाडी |
| कथानिका | कहाणिआ | कहाणी |
| स्थापन | ठावण | ठेवणें |
| शिथिल | सढिल | सढळ |
| सदृश | सरिक्लो | सारखा |
| दृष्टि | दिट्ठी | दीट |
| मौक्तिकं | मोत्तिअं | मोती |
| विभीतक | बेहेडअ | बेहेडा |
| वृश्चिक | विञ्छिओ–उ | विंचू |
| आम्रातक | अम्बाडअ | अंबाडा |

हे शब्द पाहिले असता संस्कृत शब्दांचीं प्राकृत रूपें याप्रमाणें होतील, असें दिसून येईल. परंतु हीं सर्व रूपें उपयोगात होतीं काय? असा प्रश्न उभा राहातो. अशिक्षित लोक आणि गावढळ लोक बोलू लागले असता सांप्रत मराठी शब्दांचीं देखील अशीं चमत्कारिक रूपें करितात. त्यांवरून व्यवस्थित नवीन शब्द निष्पन्न होऊन तो चांगल्या मराठींत येतो, मधलें गावढळ रूप ग्रंथात येतेंच असें नाहीं.

चालू मराठींत अशा प्रकारचीं उदाहरणें सापडतात. 'ज्योतिषी' याचें गावढळ लोकांनीं 'जोइसी' असें केलें, व ते लोक नेहमीं तसा उच्चार करितात. पण त्याचें नीट दिसणारें रूप 'जोशी' हेंच उपयोगात आहे. 'भगिनीसम (बहिण-सी)' याचें 'वइन्से' असें रूप कुळवी स्त्रिया वापरतात, पण चांगल्या भाषेंत 'बन्स' असें रूप येतें. 'विवाही' याचें 'वियाही' असें रूप साध्या लोकांच्या बोलण्यात येतें. पण उपयोगात 'व्याही' असें येतें. तसेंच इस्नू, इठोबा, सरसती, महारौती, ग्यानबा, बामण; असले अडाणी शब्द चांगल्या बोलण्यात व लिहिण्यात येत नाहींत. अशिक्षित आणि अर्धशिक्षित वारकरी तुकारामाचे अभंग आपल्या भाषेंत म्हणतात, आणि तशा रितीनें लिहिलेले अभंग कित्येक जुन्या बाडातून आढळतातही. पण चांगल्या गाथामध्यें तसें कोणीं लिहिलेले नाहींत.

परंतु ग्रंथकारानीं जर नियमच केला कीं संस्कृत शब्द म्हणून घ्यावयाचाच नाहीं, तर गावढळ रूप असेल तेंच घालावयाचें, इतकेंच नव्हे, तर एकादहुसऱ्या शब्दाच्या सादृश्यावरून आणखी तशीं गावढळ रूपें बनविण्याचे नियम ठरवावयाचे आणि तशीं रूपें मुद्दाम करून ग्रंथात घालावयाचीं, तर मग प्राकृत भाषेंत सर्व शब्द तसे आले म्हणून नवल नाहीं. असें करण्याचें कारण काय, तर "आपली भाषा ही जर लोक बोलतात तशी भाषा, तर तींत मोठाले संस्कृत शब्द कशाला?" असा अभिमान असा अभिमान धरणें चांगलें होतें कीं नाहीं, याचा निर्णय येथें करण्याचें कारण नाहीं. यावरून एवढेंच ठरवावयाचें कीं यामुळें प्राकृत भाषा कृत्रिम झाली. सुमारें इसवी सनाच्या अगोदरच्या दुसऱ्या शतकापासून तों मराठीचा उद्भव स्पष्ट

दिसूं लागेपर्यंतची त्यावेळच्या ग्रंथांतून आणि संस्कृत नाटकांतून आलेली प्राकृत भाषा विशेषतः शब्द बनविण्याचे संबंधानें सर्व नसली तरी बहुतांशीं अशा रीतीनें कृत्रिम झालेली आहे. नामांच्या विभक्तींचीं, क्रियापदांची आणि अशा प्रकारचीं व्याकरणाचा संबंध येणारीं रूपें संस्कृतांतून परिणत होऊन यावयाचीं तशीं आलेलीं दिसतात. पण शब्द अशा रीतीनें एकमेकांच्या सादृश्यावरून मुद्दाम बनविले, आणि जाणून बुजून अभिमानानें त्यांचाच उपयोग केला. कारण तत्सम संस्कृत शब्द घालावयाचेच नाहींत असा ग्रंथकारांचा पूर्ण अभिमानाचा निश्चय.

भाषा कृत्रिम झाली या म्हणण्याचा येथें थोडासा खुलासा केला पाहिजे. कृत्रिम झाली याचा अर्थ जे शब्द नव्हते ते मुद्दाम बनवून घातले असा नव्हे; तर मूळ संस्कृत शब्दांचा गांवढळ लोक थोडा बहुत किंवा बराच विकृत उच्चार करीत असले, तरी ते शब्द ग्रंथांत घालण्याची वेळ आली असतां जसेच्या तसेच अथवा जरा किंचित् सोपा उच्चार होत असेल तशा रूपानें वाङ्मयांत न घालितां त्यांचीं अगदीं गांवढळ रूपें घालावयाचीं. इतकेंच नव्हे तर जो जो संस्कृत शब्द ग्रंथांत घालण्याची जरूर पडेल, त्याचें रूप तसेंच सादृश्या-वरून बदलून घालावयाचें; मग तसें रूप खरोखरी लोकांच्या उपयोगांत नसलें तरी चिंता नाहीं. अशा तऱ्हेनें कृत्रिम शब्द बनविण्यांत आले.

चालुक्य वंशांतील प्रख्यात राजा तैलप (आठवें शतक) त्याच्या पदरचा कवी रन्न (रत्न) हा गदायुद्ध नामक आपल्या कानडी ग्रंथाच्या आरंभींच प्रतिज्ञा करितो कीं, देशी ग्रंथ रचावयाचा, त्यांत मूळचे संस्कृत म्हणजे तत्सम शब्द मुळींच घालतां उपयोगाचे नाहींत. आपण तद्भव शब्दच घालणार. अशी प्रतिज्ञा करून या कवीनें आपल्या कानडी ग्रंथांत संस्कृत शब्द घालण्याची जेथें वेळ आली, तेथें ते शब्द मूळरूपांत न घालतां त्यांचीं त्यानें ठरींव नियमानें बनणारीं प्राकृत ( तद्भव ) रूपें करून घातलीं आहेत.

संस्कृत नाटकांत मध्यम आणि हलक्या पात्रांनीं प्राकृत भाषा बोलावी, आणि अमुक प्राकृत अमक्यानें बोलावें असे नियम आहेत.

महाराष्ट्री मुख्य प्राकृत म्हणून मानतात. परंतु श्रेष्ठ पात्राचे बोलण्यात शौरसेनी योजितात. दुसऱ्या कित्येक पात्राचे तोंडीं मागधीचे विशेष प्रकार असतात. पद्यें, गाणीं वगैरे महाराष्ट्रींत असतात. हा प्रकार अगदीं ठराविक व कृत्रिम होय, स्वाभाविक अगदीं नव्हे, हें उघड आहे.

वर सांगितलेल्या काळातील प्राकृत भाषा अशी कृत्रिम होती याचें एक चांगलें प्रमाण आहे. पाली भाषेंत दोनपंचमांश शब्द निव्वळ संस्कृत आहेत. बाकीचे अगदीं थोड्या फरकानें संस्कृतच आहेत, असें पालीचे कोशकार डॉ॰ चिल्डर्स हे प्रस्तावनेंत म्हणतात. आमचे मित्र प्रो॰ कोसंबी यांच्या मतें पालींत संस्कृत शब्दांची संख्या या पेक्षाही पुष्कळ जास्त आहे. मराठी भाषेंतला पहिला ग्रंथ ज्ञानेश्वरी. ज्ञानेश्वरींत निम्मेपेक्षा अधिक संस्कृत (तत्सम) शब्द आहेत. ज्ञानेश्वरीच्या पूर्वीचे अगदीं थोडे शिलालेख आढळतात. आणि पचतनाचें भाषांतर अद्यापि सांपडलें आहे तें व तसेच असतात. सांपडलेला श्रीपति कृत रत्नमाला नावाचा ज्योतिषग्रंथ हे मराठीचे मासले ज्ञानेश्वरीच्या अगोदरचे आहेत. त्यामध्येंही निव्वळ संस्कृत शब्द निम्मेपेक्षा जास्त आहेत. मानभावी लोकांच्या जुन्या मराठीचे जे मासले पाहावयास मिळाले आहेत, त्यातही हाच प्रकार आहे. परळ येथील बाराव्या शतकातील शिलालेखांत जें मराठी वाक्य आहे, त्याचे बारा शब्द असून त्यातले पांच शुद्ध संस्कृत आहेत. तसेंच या आरंभींच्या मराठींत प्राकृतासारखे विकृत केलेले शब्द नाहींत. विकार असला तरी तो अल्पस्वल्प आहे. तेव्हां यावरून काय दिसतें ? पालीमध्यें शुद्धसंस्कृत शब्द दोन पंचमांश होते. मराठीच्या आरंभापासूनही ते तितक्याच प्रमाणानें आहेत तर मधल्या अठरा शतकांत ते एकदम कोठें नाहींसे झाले होते, आणि ज्ञानदेवाच्या वेळीं मराठीमध्यें ते एकदम पूर्वी सारखेच येऊं लागले असें होण्याचें कारण काय ?

असला प्रकार भाषेंत एकाएकीं बंद किंवा सुरू होत नसतो. माझें असें ठाम मत आहे कीं, सोपे सोपे संस्कृत शब्द जसेच्या तसेच वापरावे, कठीण शब्द किंचित् फेरफार करून घ्यावे, हा प्रकार या सर्व काळात जनपदभाषेंत चालूच होता, आणि यामुळेंच पालीमध्यें जी स्थिती

होती, ती पालीच्यानंतर सुमारें अठराशें वर्षांनीं मराठीपर्यंत येऊन पोंचली आहे. मध्यंतरीं प्राकृत ग्रंथांत संस्कृत शब्द इतके विकृत करून घालण्यांत आले, हे मुद्दाम तसे घालण्यांत आले. अर्थात् प्राकृत ग्रंथांत आणि संस्कृत नाटकांत जी प्राकृत भाषा आढळते ती बहुतांशीं कृत्रिम आहे. मराठी भाषा ही प्राकृतच आहे. पाली नांव पावलेली प्राकृत पुढें लोकांत बदलत राहून, तिच्या प्रांतोप्रांतींच्या प्राकृत झाल्या आणि त्यांपैकीं एकीचेंच मराठी हें स्वरूप आहे, तेव्हां संस्कृत असें आणि इतकें विकृत करण्याची चाल जर इतकी प्रसृत आणि स्वाभाविक असती, तर ती लोकव्यवहारांत राहून मराठीपर्यंत आली असती. तसें न होतां संस्कृत शब्दांचा उपयोग करण्याची इसवी सनापूर्वीच्या सहाव्या शतकांतली पालीचीच तऱ्हा इसवी सनाच्या तेराव्या शतकांत मराठींत आली आहे. यावरून मध्यंतरींचा प्रकार लोकव्यवहारांतला नसून ग्रंथकारांनीं निव्वळ मुद्दाम बनविलेला ठरतो.

हेमचंद्र आणि अलीकडील प्राकृत व्याकरणकार यांनीं अपभ्रंश म्हणून प्राकृताचा एक प्रकार सांगितला आहे. अपभ्रंश याचा अर्थ बिघडलेलें. भाषा कालान्तरानें उत्तरोत्तर बदलत जाते. ती वाईट होत नाहीं. तर तिची परिणती होते. कठीण असेल तें आपल्या परिस्थितीला सुलेसें सोपें करून घेणें हा मनुष्यस्वभावच आहे. संस्कृताचा प्राकृतांत आणि मराठींत झालेला फेरफार, याला अपभ्रंश असें म्हणणें योग्य नाहीं. ती परिणती किंवा एक प्रकारची सुधारणाच होय. पारिभाषिक रीतीनें अपभ्रंश म्हणजे बदललेलें, फिरलेलें, असें घ्यावें तर समजावें. अपभ्रंश भाषा म्हणजे मराठी वगैरे देशभाषांचा ज्येव्हां उद्भव झाला, म्हणजे त्यांना मराठी, हिंदी, गुजराथी, वगैरे नांवें देण्याजोगें स्वरूप जेव्हां आलें, त्या वेळचें किंवा थोडें अगोदरचें प्राकृताचें स्वरूप. अपभ्रंशाचा आणि देशी भाषांचा निकट संबंध दिसून येतो. याकरितां त्याचें भाषेच्या संबंधानें थोडें विवरण करूं. वररुचीच्या वेळीं अपभ्रंश भाषा नव्हती. त्याच्या वेळीं फक्त चार प्रकारच्या प्राकृत भाषा होत्या. हेमचंद्रानें अपभ्रंशाचें विवरण करितांना विपुल उदाहरणें

दिलीं आहेत. यावरून त्यावेळीं अपभ्रंशाचें वाङ्मय असावें. हेमचंद्रानें दिलेलीं उदाहरणें हिंदी भाषेत विशेष असणाऱ्या दोहा छंदात आहेत.

अपभ्रंशात शब्दांचीं रूपें उच्चारास अधिक मृदु करण्यात आलीं आहेत. सर्वनामांचीं रूपें फिरून बहुतेक सध्याच्या देशी भाषातील रूपासारखीं झालीं आहेत. "आम्ही दिवे लागताना जेमतेम (कसें तरी) घर गाठलें" यातलीं 'जेम–तेम' हीं जोड सर्वनामरूपें अपभ्रंशातलीं आहेत. अपभ्रंशातल्या 'पुणु' व 'विणु' यापासून 'पुन्हा' आणि 'वीण' हे शब्द झाले. या भाषेत प्राकृतातला प्रथमैकवचनाचा प्रत्यय जो 'ओ' त्याचा 'उ' झाला, आणि तो नामें, विशेषणें, क्रियापदें आणि अव्ययें यातील शब्दांच्या अंतीं येऊ लागला. म्हणजे हा उकार कोणत्याही अकारान्त शब्दाला लावावयाची एक अंतीची खूणच होऊन बसला. हा प्रकार पुढें जुन्या मराठी कवितेंत आला. पंधराव्या गद्यभाषेंत व सतराव्या शतकातला ग्रंथ खिस्तपुराण याच्या गद्यरूप प्रस्तावनेंत, तसेंच या काळातल्या सर्व पत्रव्यवहारात हा उकार व क्वचित् इकारही पुष्कळ आहे. ज्ञानेश्वरींतला उकार सर्व प्रसिद्ध आहे कोंकणच्या मराठी भाषात प्रथमेचा एकवचनी प्रत्यय 'ओ' आहे. यावरून कोंकणातल्या मराठी वसाहती अपभ्रंश उत्पन्न होण्याच्या पूर्वीच्या असतील असें वाटतें.

हा जो शब्दाच्या शेवटीं येणारा उकार याविषयीं जास्त विचार करण्याची जरूर आहे. हा उकार केवळ नामरूपानाच लागे असं नाहीं, तर क्रियापदाच्या, धातुसाधिताच्या आणि अव्ययाच्या रूपानाही लागलेला आहे. याचें मूळ प्रथमेच्या एकवचनाचा प्रत्यय 'ओ' हें होय. त्याचा आखूड उच्चार 'उ'. अगदीं आरंभीं हा उकार नामरूपाना लागू लागला. पुढें सादृश्यानें कित्येक क्रियापदरूपाना आणि धातुसाधिताना व अव्ययानाही लागू लागला. नंतर इतर शब्दातला उकार जाऊन नामाना मात्र राहिला पुढें तोही बंद पडला. अठराव्या शतकाच्या आरंभापर्यंत उकार लावण्याची चाल होती, पुढें ती बंद पडली संस्कृत शब्दामध्यें शेवटीं 'क' असें एक अक्षर घालण्याची चाल आहे. हा उच्चार-सौकर्याचा प्रकार दिसतो. पाणिनीनें हा 'क' प्रत्यय विकल्पेंकरून पुष्कळ

ठिकाणीं होतो असें सांगितलें आहे. कित्येक ठिकाणीं हा स्वार्थी प्रत्यय आहे, म्हणजे त्यानें मूळ अर्थ फिरत नाहीं. कित्येक ठिकाणीं अर्थ फिरतो, आणि मराठींत त्याचें नवीन अर्थ उत्पन्न होण्यास साह्य होतें. संस्कृताच्या पुढील काळांत हा 'क' फार उपयोगांत आला. या 'क' ची विशेष माहिती व्याकरणामध्यें शब्दसिद्धीच्या प्रकरणांत आहे. या पुस्तकाच्या शब्दघटनेच्या भागांतही त्याचा पुन्हां उल्लेख येईल. येथें त्याची थोडी ऐतिहासिक चर्चाच पुरे आहे. प्राकृतांत या कचा 'अ' होतो. (सं० मौक्तिक, प्रा० मोत्तिअ, म० मोतीं; सं० ताम्बूलिक, प्रा० ताम्बूलिअ, म० तांबोळी.) त्याचप्रमाणें प्राकृतांत अन्तीं येणारीं द, य, व इत्यादि आणि दुसरीं अनेक अक्षरें यांचाही 'अ' होतो.

प्राकृतांत आणखी एक शब्दाच्या अन्त्याक्षराच्या उच्चाराचा प्रकार असा आहे कीं, शब्दाचा उपान्त्य उच्चार जोरदार होतो, आणि मग अन्तीं 'अ' असल्यास त्याचा लोप होतो. अन्तीं अकारान्त व्यंजन असेल, तर त्यांतील अचा हलू उच्चार होऊन त्या अक्षराचा लोप होण्याचा संभव असतो. पुष्कळ ठिकाणीं असा लोप झाला आहे. य, व, या अर्धस्वरांचा लोप तर नेहमींच होतो. हा प्रकार मराठींतही आला आहे. मराठींत अन्तींच्या अकाराचा थोडा उच्चार, आणि उपान्त्याचा दीर्घ उच्चार हा गोष्टी अगदीं स्वभावसिद्ध होऊन बसल्या आहेत. हा जो अन्तींचा अकार तो लुप्त होऊं नये म्हणून हा उकार अंतीं लावण्याची चाल अपभ्रंश प्राकृताच्या काळीं पडली, आणि ती मराठीमध्यें आली. अपभ्रंशाच्या काळीं नुसता अकारच जाण्याची भीती वाटत होती असें नाहीं, तर इतर स्वरही जाण्याची भीती वाटत असावी. त्यासाठीं आणखी हकार घालण्याची चालही त्याच वेळीं पडली. अपभ्रंशांत पुष्कळ सकारांचा हकार झालेला आहे, आणि स्वरादि प्रत्ययांमध्यें पुष्कळ ठिकाणीं हकार शिरला आहे. तेव्हां संस्कृतांतील ककार अथवा अपभ्रंशांतील हकार यासारखा हा प्राचीन मराठींतला उकार असावा असें दिसतें. 'मराठींत ज्ञानेश्वरीच्या काळीं आणि त्यानंतर कित्येक वर्षें हा उकार होता. पुढें भाषेला स्थिरता

येऊन अतींची अक्षरें कायम झाल्यावर हा उकार नष्ट होत गेला. चालू मराठीमध्यें तो कित्येक विशेष नामाच्या अतीं (रामू, धोंडू, विठू, बनू, गोदू, नानू, पाडू, विसू, विनू, इत्यादि) राहिला आहे. ज्ञानेश्वरीचे साम्प्रदायी या उकारास पवित्र मानून तो जाऊ नये ह्मणून फार जपतात. या उकाराच्या साहश्यानें मराठींत शब्दाच्या शेवटीं इकारही आला आहे. (त्यास, त्यासि, येऊन येउनी, येनोनी, करून, करुनी, इ०). हे अन्तींचे उकार आणि इकार ऱ्हस्व आणि दीर्घ, जशी उच्चारास जरूर असेल तसे असतात, आणि याचा कवितेच्या भाषेला मोठा उपयोग असतो.

अपभ्रंशात प्रथमा आणि द्वितीया एक झाल्या, या दोन्ही विभक्तींचीं सर्व रूपें एकसारखींच बनलीं, आणि संस्कृतातून जें नामाचें रूप बनून यावयाचें, तें या विभक्तीचें एकवचनीं रूप बनलें. याला मराठींत 'नामाचें मूळरूप' असें ह्मणण्याची चाल पडली आहे. तृतीयेचा एकवचनीं 'एँ' आणि अनेकवचनीं 'हीं' हे प्रत्यय जुनेच आहेत, शिवाय क्वचित् 'इण' प्रत्यय येतो. पचमीच्या 'सुतो' आणि 'हुतो' या-पासून होणाऱ्या रूपाचा संक्षेप होऊन त्या विभक्तीचा तृतीयेमध्येंच समावेश झाला. चतुर्थीचे जुने प्रत्यय जाऊन तिच्या जागीं षष्ठी आली. सप्तमीचा 'इँ' प्रत्यय आहे. हा कदाचित् संस्कृतातील 'स्मिन्' वरून किंवा पालीतील 'स्मि–म्हि' वरून झाला असेल अथवा जुन्या प्राकृतातला 'इँ' असेल. अपभ्रंशात आणखी सप्तमीचे प्रत्यय 'ए' आणि 'हिं' असेही सांगितले आहेत. अपभ्रंशात विभक्तीच्या प्रत्ययाचा बहुतेक सर्वत्र लोप होत जाऊन निरनिराळ्या विभक्तींचीं बहुतेक रूपें एकसारखींच होऊन राहिलीं आहेत, आणि तीं चालू मराठींतील रूपाना फार जवळ आहेत. 'मी' याचें प्रथमेचे एकवचन 'हउ' आहे. मालवणी आणि गोमांतकी मराठींत 'हाव' असें रूप आहे. अपभ्रंशामध्यें प्रत्ययांत जेथें 'स' असेल तेथें 'ह' झाला आहे. तसेंच स्वरप्रत्ययामध्यें उच्चारासाठीं अगोदर 'ह' यावयाचा अशी रीत दिसते. हा प्रकार नामाच्या आणि क्रियापदाच्या रूपांतही आहे जुन्या षष्ठीचें एकवचन 'रामह' आणि अनेकवचन 'रामहं'. पुढें मराठींत (आणि

इतर देशी भाषांतही ) एकवचनीं 'रामा–' आणि अनेकवचनीं 'रामां–' अशीं रूपें होऊन त्यांना सामान्यरूप असें नांव पडलें. हें सामान्य-रूप मराठींतल्या सर्व विभक्तिरूपांचा पाया आहे. वास्तविक पाहिलें तर या वेळीं बहुतेक सर्व विभक्तिप्रत्ययांचा लोप होऊन, एक प्रथमा विभक्ती राहिली, आणि बाकीच्या विभक्तिरूपांचे जागीं हें सामान्यरूप अथवा त्याच्यापुढें कित्येक ठरलेले नवीन शब्द येऊन विभक्तिरूपें होऊं लागलीं. याविषयींची जास्त चर्चा पुढें योग्य स्थानीं होईल.

या अपभ्रंश भाषेंत प्रत्ययांचा वगैरे कसा लोप होत गेला आणि विशेषतः शब्दांच्या अन्ताला निरनिराळीं स्वरूपें कशीं आलीं या-संबंधानें आणखी किरकोळ गोष्टी बऱ्याच आहेत; परंतु त्यांचा आपणास तादृश उपयोग नाहीं. शब्दांच्या शेवटीं येणारे भिन्न अर्थ दाखविणारे प्रत्यय तर बहुतेक नष्ट झाले. त्यांच्या जागीं नवीन प्रत्यय कोणते आणावे, याविषयीं भाषेला जणूं काय पंचाईत पडून राहिली. अशा प्रकारें चलबिचल उत्पन्न होऊन पुढें शब्दयोगी आणि दुसरे कित्येक शब्द अथवा शब्दांचे भाग यांच्या साह्यानें नवेच प्रत्यय बनून विभक्तिरूपें बनूं लागलीं, आणि एक दोन शतकांत तशीं रूपें पक्कीं बनलीं; व देशी भाषाही बनल्या. या रूपें बनण्याचे काळांत चलबिचल कशी होऊन गेली होती, हें आपल्यास ज्ञानेश्वरी ग्रंथावरून दिसून येईल. ज्ञानेश्वरीची भाषा स्थिरावलेली नाहीं. तींत सर्व प्रकारच्या रूपांची अत्यंत चलबिचल असलेली दृष्टीस पडते. याचें कारण त्या वेळीं भाषा ठरलेली नव्हती. ज्ञानदेवाला स्वभाषेंत नवीनच ग्रंथरचना करावयाची होती, आणि ती नीट करितां येईल कीं नाहीं याविषयीं त्यास शंका वाटत होती. ग्रंथ तयार झाल्यावर खुद्द ज्ञानदेवालाच मोठा डौल वाटून या नवीन ग्रंथाची त्यानें विश्वामित्राच्या नवीन सृष्टीशीं तुलना केली आहे. भाषेंत एकदां एकादा नामांकित ग्रंथ झाला, कीं मग त्याच्या उदाहरणानें भाषेंतली चलबिचल थांबून भाषेला कायमपणा येण्यास आरंभ होतो. तसा मराठीचा आरंभ म्हणजे ज्ञानेश्वरी ग्रंथ होय.

येथें अशी एक शंका उत्पन्न होते कीं, संस्कृताच्या मूळारभापासून पालीच्या काळापर्यंत कित्येक हजार वर्षें गेलीं, असें असून संस्कृत आणि पाली यामध्यें फार मोठा फरक नाहीं. पालीला मध्यम संस्कृत अथवा सोपें संस्कृत असें नाव शोभत आहे. असें असता पालीपासून मराठीच्या उद्भवापर्यंत म्हणजे केवळ हजार वर्षांत एवढा मोठा फेर फार कसा झाला ? याचे कारण असें दिसतें कीं, जनभाषेंत ग्रथरचना होऊन तिला पाली असें नाव प्राप्त होईपर्यंत तिच्यामध्यें वाङ्मय व्यवहार नव्हता. ती केवळ चालचलाऊ व्यवहाराची भाषा होती. वाङ्मयव्यवहार सर्व संस्कृतात चाले. आणि लोकाची भाषा म्हणजे बोली, ही तिच्या अनुरोधानें म्हणजे तिला धरून चाले. पण पुढें लोकाच्या भाषेंतही वाङ्मयव्यवहार चालू झाल्यावर पुढील प्राकृतात अनेक ग्रथ होत गेले आणि प्राकृताचा उपयोग फार वाढला. संस्कृत तर केवळ विद्वानाची भाषा होऊन राहिली. वास्तविक हा काळ ग्रथ रचनेच्या सबधानें संस्कृत भाषेच्या उन्नतीचा व चलतीचा होता. पण या वेळीं संस्कृताचें स्वरूप अगदीं ठाम आणि कृत्रिम बनून गेलें होतें, आणि त्या भाषेची चलती केवळ विद्वान् लोकामध्येंच होती संस्कृता प्रमाणें या वेळीं जनपदभाषेला उत्तेजन मिळून तिचीही भरभराट होत होती, आणि प्राकृतातही पुष्कळ ग्रथरचना होत होती या काळात सर्व हिंदुस्थानात धार्मिक उलाढालींप्रमाणे राजकीय उलाढालीही फार झालेल्या आहेत. वायव्येकडे ग्रीक लोक, हूण लोक आणि शक लोक याच्या स्वाऱ्या होऊन ते अगदीं दक्षिणेकडेही येऊन पोंचले इकडे दक्षिणेंतील राष्ट्रकूट, चालुक्य वगैरे राजानीं उत्तरेकडे जाऊनही राज्य स्थापिलीं. साराश, या हजार वर्षांत सर्व देशातला लोकसमूह उच्च थळलेला होता आणि सर्व प्रकारचे लोकव्यवहार फार झाले असं दिसतें यामुळें एवढ्या काळात प्राकृत भाषेमध्यें फार मोठाले फरक होऊन गेले, आणि तिच्यापासून पुढ देशी भाषा बनल्या.

प्राचीन ग्रथकारानीं देशी शब्द म्हणून काढले आहेत. ते शब्दाचे तीन वर्ग करितात, तत्सम, तद्भव आणि देशी. देशी शब्द म्हणजे ज्याचें मूळ संस्कृतात सापडत नाहीं किंवा जे संस्कृताशीं जुळविता येत

नाहींत ते. अशा शब्दांचा देशी नाममाला या नांवाचा एक कोश हेमचंद्रानें रचिला आहे. हे शब्द अनार्यांचे असें समजतात. परंतु तसें समजण्याचें कारण नाहीं. यांतले कांहीं शब्द अनार्य असतील. कानडी वगैरे द्राविड भाषांमध्येंही जर अनेक संस्कृत आणि प्राकृत शब्द गेले आहेत, तर त्या भाषांतले शब्द प्राकृत आणि संस्कृत भाषांत आलेले असावयाचेच. असे शब्द संस्कृतांत आले आहेत याची जाणीव जुन्या संस्कृत ग्रंथकारांस होती, हें मागें सांगितलेंच आहे. मात्र ते निवडून काढण्याचा उद्योग झालेला नाहीं. या देशी शब्दांतले कित्येक शब्द आर्य भाषांतले असूनही तितके चांगलेसे नाहींत म्हणून संस्कृतांत मान्य झालेले नाहींत. आजमितीस मराठी भाषेंतही कित्येक गांवढळ शब्द असे आहेत कीं, ते प्रौढ मराठीमध्यें कोणी योजीत नाहीं. असले शब्द जुन्या बखरी व जुनीं पत्रें यांत आढळतात. यावरून ते शब्द मराठी नव्हत असें म्हणतां येणार नाहीं. तोच प्रकार या देशी शब्दांचा आहे. तसेंच कित्येक शब्द संस्कृतांतून लोकभाषेंत शब्द बनविण्याच्या संबंधाचे जे ठराविक नियम दिलेले आहेत, त्या नियमांच्या मर्यादेंत येत नाहींत; आणि जुनी समजूत अशी कीं, प्रत्येक शब्द अमुक तऱ्हेनें अपभ्रष्ट होऊनच आला पाहिजे. या समजुतीनें शब्दाचें स्वाभाविक स्वरूप मान्य नाहीं, तर कृत्रिम स्वरूप मान्य आहे. तशी मूळपीठिका ज्यांची लागत नाहीं, ते शब्द देशी या नांवाखालीं ढकलून देण्यांत आले आहेत.

---

## (४) मराठी भाषेचा उद्भव

वेदकालीन आर्यभाषेची परिणती होऊन ती प्राकृत झाली आणि प्राकृताची परिणति होऊन जिला आपण सांप्रत मराठी भाषा असें म्हणतों, ती बनली. मराठीला प्राकृत असें नांव अजूनही चालू आहे. जुन्या पंडितांना 'संस्कृत' आणि 'प्राकृत' अशाच भाषा ठाऊक आहेत. संस्कृत, प्राकृत आणि देशी भाषा म्हणजे मराठी हा नांवें देण्याचा प्रकार आम्हीं नवीन सुशिक्षितांनीं ठरविला. तेव्हां अशा

तऱ्हेनें पाहिलें असतां मराठीचा उद्गम अमुक एका वेळीं झाला असें म्हणतां यावयाचें नाहीं. प्राकृताच्या ज्या स्वरूपाला अपभ्रंश हें नांव दिलेलें आहे, त्या स्थितीस भाषा येऊन पोंचल्यावर तींतील चलविचल मंदावून तिला थोडें स्थिर स्वरूप आलें, आणि तिचा समाजांतील प्रमुख लोक प्रथमतः बोलण्यांत आणि मग लिहिण्यांतही उपयोग करूं लागले, तेव्हां ती नवीन नांव मिळण्यास तयार झाली असें म्हटलें पाहिजे. भाषेमध्यें एकादा नामांकित ग्रंथ होतो, तेव्हां तिचें नांव ठेवण्यासारखें कायमचें स्वरूप ठरलें असें समजावयाचें. मराठीचा तसा ग्रंथ भगवद्गीतेची ज्ञानदेवकृत भा वा र्थ दी पि का नामक टीका, जिला आपण ज्ञा ने श्व री म्हणतों, ती होय. हा ग्रंथ म्हणजे भगवद्गीतेच्या अर्थांचें आणि सिद्धान्तांचें उपमा, दृष्टान्त, उदाहरणें इत्यादिकांनीं युक्त आणि फार विस्तृत असें विवरण आहे. उपलब्ध ग्रंथांत हा अगदीं प हि ला म रा ठी ग्रं थ असून शब्दांचीं रूपें, त्यांच्या परस्परसंबंधाची व्यवस्था आणि वाक्यांची मांडणी या गोष्टींचे संबंधानें व्यवस्थित व ठापटिपीचा आहे. अर्थात् त्या वेळीं मराठी भाषा बरीच नांवारूपास आलेली होती आणि तसें होण्यास, तो ग्रंथ रचला त्यावेळेच्या पूर्वी बराच–निदान चार शतकें तरी–काळ गेलेला असला पाहिजे.

येथें असें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं ज्ञानेश्वरी ग्रंथ स्वतः ज्ञानदेवानें लिहिला तसा आपणास मिळालेला नाहीं. ज्ञानदेवानंतर तीनशें वर्षांनीं एकनाथ म्हणून प्रख्यात मराठी ग्रंथकार झाला. त्यानें सन १५८४ सालीं हा ग्रंथ शुद्ध केला आणि त्याची नवीन आवृत्ति तयार केली, असा या ग्रंथाच्या ज्या लेखी प्रती हल्लीं आढळतात त्यांच्या शेवटीं शेरा आहे. यामध्यें एकनाथ म्हणतोः—

" ग्रंथ पूर्वीच अतिशुद्ध । परी पाठांतरीं शुद्धाबद्ध ।
तो शोधोनी एवंविध । प्रतिशुद्ध सिद्ध ज्ञानेश्वरी । "

एकनाथ हा स्वतः विद्वान होता आणि कवीही होता. त्याच्या ग्रंथांवरून त्याच्या आंगीं ज्ञानेश्वरीसारख्या ग्रंथाचें परिशोधन करून शुद्ध प्रत तयार करण्याची पूर्ण योग्यता होती असें दिसून येतें. ' ग्रंथ

पूर्वीच अतिशुद्ध' असून त्याच्या वेळीं त्यांत अपपाठ शिरून अशुद्ध झाला होता, याचा अर्थ एकनाथ आणि तत्कालीन विद्वान लोक यांच्या मतें तो ग्रंथ ज्ञानदेवानें जसा मूळचा लिहिला होता तसा त्यावेळीं नव्हता. आतां ज्ञानदेवाच्या काळापासून एकनाथाच्या काळापर्यंतच्या तीनशें वर्षांत ज्ञानेश्वरी कशी अशुद्ध झाली असेल याचा थोडा तर्क आपणास करितां येईल. विद्वानांनीं वाङ्मयाची ठरविलेली भाषा आणि साधारण लोकांची व्यवहाराची भाषा यांमध्यें नेहमींच मोठा फरक असतो. ज्ञानदेव चांगला विद्वान ग्रंथकार होता. गीतेसारखा ग्रंथ लोकांना समजण्यासारखा त्यांच्या भाषेंत लिहिण्याचा त्याचा उद्देश. तेव्हां त्यानें त्याच्या वेळची लोकभाषा ग्रंथास साजेल अशी सजवून, परंतु लोकांना नीट कळेल असें तिचें स्वरूप कायम ठेवून आपला ग्रंथ लिहिला; तो ग्रंथ त्या वेळीं अपूर्वच होता. त्या वेळापर्यंत सर्व ज्ञान संस्कृतांत असावयाचें; असें असून ज्ञानदेवानें गीतेसारखा लोकप्रिय ग्रंथ आपल्या घरगुती भाषेंत आणिला हें पाहून अनेक भाविक लोक त्याच्या प्रती करूं लागले आणि वाचूं लागले. असा त्याचा अत्यंत प्रसार झाल्यामुळें साधारण लोकांनीं आपल्या बोलण्याच्या भाषेंतले अनेक प्रकार त्यांत घालून मूळ ग्रंथ बिघडविला. तो ज्ञानदेवांनीं जसा लिहिला होता तसा पुन्हा बनवावा असें एकनाथाच्या वेळच्या विद्वानांस वाटून, तें काम एकनाथाकडे आलें. तेव्हां एकनाथानें तो ग्रंथ पूर्वींचा जसा 'अतिशुद्ध' होता तसा करण्याचा प्रयत्न केला, असा त्याच्या लिहिण्याचा अर्थ उघड दिसतो. तो प्रयत्न एकनाथाची योग्यता लक्षांत आणली असतां, सफळ झाला असेल असें मानण्यास चिंता नाहीं. मात्र अगदीं तंतोतंत सफळ झाला असें म्हणतां येणार नाहीं, हें उघडच आहे. एकनाथाच्या वेळीं भाषाशास्त्रादि आधुनिक विचार नव्हते. यासाठीं ज्ञानदेवकालीन शब्दरूपें व वाक्यप्रयोग कोणते, याचा विचार एकनाथानें केला असेल असें संभवत नाहीं. त्यानें ज्ञानेश्वरी शुद्ध केली, याचा अर्थ ज्ञानदेवाचे जे विचार असले पाहिजेत असें एकनाथास वाटलें, ते बिघडले असल्यास नीट करण्याचें काम त्यानें केलें.एकनाथाच्या शुद्धीकरणाचें भाषाशास्त्र आणि भाषावलन यांच्या

दृष्टीनें फार मोठें महत्त्व आहे असें वाटत नाहीं. ज्ञानेश्वरी या ग्रंथाच्या अनेक आवृत्त्या आजपर्यंत प्रसिद्ध झाल्या आहेत. त्यांतील माडगावकर यांनीं अनेक जुन्या प्रतींच्या आधारें मोठ्या श्रमानें तयार केलेली सन १९०७ सालांत छापलेली आवृत्ती विश्वसनीय मानली पाहिजे.

ज्ञानेश्वरीच्या अगोदरचा ग्रंथ ह्मटला तर पंचतंत्राचें मराठी रूपांतर हा होय. हा संपूर्ण सांपडला नाहीं. याचीं सत्तर पृष्ठें ठाणें येथील 'महाराष्ट्र पंची' या मासिक पुस्तकांत सन १९०६ सालीं प्रसिद्ध झालीं आहेत. यांत संस्कृत पंचतंत्रांतील गद्याचें मराठी रूपांतर असून पद्यें संस्कृतांतच ठेविलीं आहेत. या ग्रंथाची भाषा ज्ञानेश्वरीच्या भाषेपेक्षां थोडीशी जुनी भासते. हें पंचतंत्राचें भाषांतर आणि ज्ञानेश्वरी यांच्या भाषेचा विचार केला असतां, ज्ञानेश्वरी जितकी लोकांच्या वाचनांत असेल, तितका पंचतंत्र हा ग्रंथ असण्याचा संभव दिसत नाहीं. पंचतंत्र हें ज्ञानेश्वरीच्या जरासें अगोदरचें असें वाटतें, आणि या दोन ग्रंथांतील जुनीं शब्दरूपें वगैरे पुष्कळशीं भिन्न नाहींत. कित्येक प्रकार तर अगदीं एकच आहेत. अशी तुलना माडगांवकर यांच्या ज्ञानेश्वरीशीं करून पाहिली असतां शब्दांच्या रूपांच्या दृष्टीनें एकनाथापर्यंतच्या तीनशें वर्षांत चंचल स्वरूपाचीं रूपें ठाम होण्यापेक्षां जास्त फरक झालेला दिसत नाहीं. तसेंच दुसरी गोष्ट अशी लक्षांत ठेविली पाहिजे कीं, ग्रंथाची प्रत करणारे ग्रंथाच्या शब्दरचनेंत हवे तसे फेरफार करीत. यामुळें अमकींच शब्दरूपें अगदीं बरोबर ज्ञानदेवाच्या वेळचीं आणि अमकीं तशीं नव्हत, हें सांगता येणें फार कठीण आहे. यासाठीं अगदीं त्या काळचेच असे अस्सल ग्रंथ उपलब्ध झाले पाहिजेत. याविषयीं उगाच कल्पना करीत बसण्यांत अर्थ नाहीं.

श्रीपतिकृत रत्नमाला ह्मणून एक त्रुटित ज्योतिष ग्रंथ इतिहास, संशोधक मंडळीच्या द्वितीय संमेलनाच्या वृत्तान्ताच्या पुस्तकांत छापला आहे. या ग्रंथाच्या श्लोकाचा अर्थ मराठींत आहे. मूळ ग्रंथ शके ९६१ सालांतला आणि मराठी टीका ग्रंथकाराचीच, असें त्या वृत्तांतांत ह्मटलें आहे. या मराठी टीकेची भाषा पंचतंत्राच्या भाषेसारखी दिसते.

महानुभावी किंवा मानभावी लोकांचा जो धर्मपंथ आहे, त्यांच्या ग्रंथांची भाषा मराठी आहे. आमची मराठी भाषा ज्ञानेश्वरीच्या भाषेपेक्षां बरीच जुनी असें मानभावी लोक ह्मणतात. परंतु त्या लोकांचे ग्रंथ फारसे प्रसिद्ध झालेले नाहींत. तसेंच हे लोक आपले ग्रंथ इतरांना कळूं नयेत ह्मणून अक्षरें बदलण्याची कांहीं पद्धत ठरवून त्याप्रमाणें लिहितात. यामुळें ते ग्रंथ हवे तसे बदललेले आहेत; ते कृत्रिम होत, आणि यासाठीं त्यांच्यावर विश्वास ठेवितां येत नाहीं. मानभावांच्या ग्रंथांतले ह्मणून जे कांहीं थोडे उतारे प्रसिद्ध झाले आहेत, त्यांवरून त्यांचे ग्रंथ ज्ञानेश्वरीच्या मागून बऱ्याच वर्षांनीं झालेले दिसतात.

ज्ञानेश्वरीच्या अगोदरच्या कित्येक शतकांतले संस्कृत शिलालेख आणि ताम्रपट आढळले आहेत. यांमधून सामान्य लोकांना समजण्यासाठीं म्हणून लिहिलेला असा शेवटचा थोडा भाग मराठींत असतो. थोडे शिलालेख केवळ मराठीही आढळले आहेत. परंतु यासंबंधाची स्पष्ट आणि विश्वसनीय माहिती अद्याप उपलब्ध नाहीं. कर्नाटकांत एका देवळावर दोन मराठी वाक्यें आढळलीं आहेत, तीं अशीं:—

" श्रीचामुंडराजें करवियलें "—शके ९०५.

" श्रीगंगराजें सुत्तालें निरमियलें "—शके १००५.

हें देऊळ चामुंडराजानें ९०५ शकांत बांधलें आणि त्याच्या भोंवतालचा प्राकार त्यानंतर शंभर वर्षांनीं गंगराजानें बांधिला. हे दोन पुरुष क्षत्रिय सरदार होते. अन्य प्रमाणांच्या जुळणीवरून हीं दोन वाक्यें आणि त्यांचे शक विश्वसनीय ठरले आहेत. कदाचित् हीं दोन्हीं वाक्यें शके १००५ त खोदलीं असतील, असें अनुमान निघतें. तरी पण या दोनच लहानशा वाक्यांवरून भाषेच्या रूपाचा अंदाज फारसा करितां येणार नाहीं. तथापि त्यांतील 'राजें' हें तृतीयेचें रूप, 'सुत्तालें' हें प्रथमेच्या एकवचनाचें रूप आणि 'करवियलें' व 'निरमियलें' हीं दोन कर्मणिरूपें यांवरून तेव्हांची मराठी भाषा बरीच जुळलेली होती असें अनुमान करितां येतें. अपभ्रंशाचे स्वरूपांत फार चलविचल आहे, त्यापेक्षां हीं रूपें अधिक निर्णीत दिसतात. मुंबईतील परळ येथील एका देवळाच्या संस्कृत लेखाच्या शेवटीं पुढील मराठी वाक्य आहे:—

" जो कोण दुवि ए शासन लोपी, तेच्या वैद्यनाथ
देवाची भाल सकुटुबी आपडे "

या लेखाचें वर्ष ११८६ आहे. चाळीसगावाजवळ पाटण म्हणून जुनें गाव आहे. तेथें सन १२०७ सालातला एक शिलालेख आढळला आहे. यामध्यें सरतेशेवटीं बराच मजकूर मराठी आहे. याची भाषा कोणती हें आरंभीं न समजल्यामुळें हा शिलालेख नीट वाचला गेला नाहीं. शिवाय त्याची भाषाही थोडी जास्त प्रांतिक किंवा खेडाऊ आहे. यातील कित्येक रूपें ध्यानात आणण्यासारखीं आहेत. तीं पुढें तुलनेमध्यें घेतलीं आहेत.

बाराव्या शतकाच्या आरंभींचा अभिलषित चिंतामणि या नावाचा एक संस्कृत ग्रंथ आहे. हा चालुक्य वंशातील भूलोकमल्ल नामक राजानें लिहिला आहे. यात विशेषत सामाजिक राजनीतीचें विवरण आहे. या ग्रंथात कित्येक कानडी आणि गुजराथी पद्यें आहेत, त्यात एकच मराठी ओळ आढळते, ती अशी —

" जेणें रसातलउणु मत्स्यरूपें वेद आणियले, मनुशिवक
वणियले तो ससारसागर तारण माह्र तो रायोनारायणु "

'रसातलउणु' रसातलाहून. 'करवियलें', 'निरामियलें', 'आणियलें', या रूपावरून ल प्रत्ययान्त भूतकाळीं लकाराच्या पूर्वी कर्मणीचा 'य' येत असे असें दिसतें. अगदीं अलीकडील वर्तितही अशीं रूपें आढळतात. या वेळीं 'एं' हा तृतीयेचा प्रत्यय कायम झालेला दिसतो 'जेणें' यामध्यें पुढील काळातल्या 'नें' प्रत्ययाचें मूळ आहे. 'रसातलउणु' यातील 'उणु' या प्रत्ययामध्यें सांप्रतच्या 'हून' व 'ऊन' या प्रत्ययाचें मूळ आहे कीं काय, अशी शंका येते. बाकी हे प्रत्यय 'होऊन'पासून झाले याविषयींचीं स्पष्ट प्रमाणें पुढें दिलीं आहेत.

आता ज्योतिषग्रंथ रत्नमाला, पंचतंत्र आणि ज्ञानेश्वरी या ग्रंथाच्या भाषेची या वेळचे अल्प शिलालेख याच्या भाषेशीं थोडक्यात तुलना करू. मराठी भाषेतील भविष्यकाळ हा संस्कृतातील दोहोंपैकीं कोणत्याही भविष्यत् लकारापासून झाला नाहीं. मराठी भाषेचा उद्भव झाला

तेव्हां वर्तमान काळापासूनच भविष्याचा बोध होई. अशा रीतीनें क्वचित् भूतकाळाचाही बोध होत असे. या विषयीं व्याकरणघटनेमध्यें जास्त चर्चा येईल. पुढें जुन्या वर्तमान काळाच्या रूपांपुढें 'ल' हें अक्षर जोडून भविष्यकाळ करण्याची चाल पडली (उदा०—येई-ल, जाशी-ल, करिती-ल, इ०). ज्ञानेश्वरीमध्यें ल-भविष्य बहुतेक सर्वत्र आहे. वर्तमानावरून भविष्य दाखविलेला अगदीं क्वचित्. यावरून त्या वेळीं हल्लींच्या मराठींतला भविष्य पक्का झाला होता. पंचतंत्रामध्यें ल-भविष्य आहे. परंतु पुष्कळ ठिकाणीं वर्तमानावरून भविष्य दाखविलेला आहे. रत्नमाला ग्रंथांत ल-भविष्य नाहीं. थोड्या ठिकाणीं भविष्याचें कारण पडलें आहे, तेथें वर्तमानावरूनच बोध होतो. मानभावी भाषेंत ल-भविष्य आहे. पाटण आणि परळ येथील शिलालेखांत ल-भविष्य नाहीं. परळच्या लेखामध्यें 'लोपी' आणि 'आपडे' यांवरून भविष्य-काळाचा बोध होत असून तीं रूपें वर्तमानाचींच आहेत. यावरून ज्ञानेश्वरीच्या काळापासून ल-भविष्य कायमचा उद्भवला. त्याच्यापूर्वीं धरसोड होती. पंचतंत्रांत भविष्याच्या लकाराला पुढें इकार आहे (जसें—असेलि, करीलि, इ०), तो ज्ञानेश्वरींत नाहीं. यासंबंधानें इतकें मात्र म्हणतां येईल कीं, या सुमारास भविष्याचा 'ल' उपयोगांत आला असावा. ज्ञानेश्वरीची भाषा विशेष व्यवस्थित असल्यामुळें तींत त्याचा उपयोग ठिकठिकाणीं नीटपणे केला आहे. शिलालेखांची भाषा केवळ लौकिकांतली असल्यामुळें तींत धरसोड आहे. ज्ञानेश्वरीनें भविष्यकाळ बनविण्याची ही तऱ्हा पक्की करून टाकली.

या तिन्ही ग्रंथांत उकार भरपूर आहेत. दोन्ही शिलालेखांत एकही उकार नाहीं. उकार घालितां आला असता अशीं तीन चार ठिकाणें आहेत, असें असून उकार घातलेला नाहीं. गद्यभाषा ह्मणून उकार नाहीं ह्मणावें तर पंचतंत्राची गद्यभाषा असून तींत उकार आणि इकार दोन्हीही विपुल आहेत. तसेच ते खिस्त पुराणाच्या प्रस्तावनेंत आणि पुढील शतकांमधील पत्रव्यवहारांतही आहेत. यावरून 'बोली'मध्यें उकार येत नसत, वाङ्मयमार्गांत अथवा उच्च, महत्त्वाच्या भाषेंत ते येत असें दिसतें.

पचतंत्रात आणि ज्ञानेश्वरींत फिटैल, बसैल, असौनि, निघौनि, म्हणौनि, अशा प्रकारचीं ऐ–औकाराचीं रूपें पुष्कळ आहेत. रत्नमाला आणि पचतंत्र यांत 'मी', 'तू', 'आम्ही', 'तुम्ही' हीं सर्वनामें 'मिं' 'तु', आम्हिं, तुम्हिं अशीं ऱ्हस्व आढळतात. ज्ञानेश्वरींत तसें आढळत नाहीं. 'मिं', 'आम्हिं', 'तुम्हिं' याचे अन्तीं अनुस्वार जुन्या मराठींत होता.

पचतंत्रात अप्राणिवाचक नामाची सप्रत्यय द्वितीया आढळते ('तो वाघर मृत्यातें पावला'). ज्ञानेश्वरींत 'आता' हें अव्यय येतें. पचतंत्रात त्याबद्दल 'दाणिं' असें आहे. 'दाणिं' हें 'आता' यापेक्षा जुनें. 'अस' धातूचें रूप या काळीं सर्वत्र 'बैस' असें येतें.

पचतंत्रात आणि रत्नावलींत 'येती असे', 'जाती असे', 'जाती होतीस', 'होतियें', 'होए', 'होएती' अशीं रूपें आहेत. हीं जुळून पुढें येतसे, जातसे, जात्सेस, होत्सेत, होतात, अशीं रूपें मराठींत आलीं. ज्ञानेश्वरींत असलीं रूपें बहुधा जुळलेलींच, म्हणजे सध्या मराठींत असतात तशींच आहेत. या ग्रंथामध्यें चतुर्थीचा 'ला' प्रत्यय आणि तृतीयेचा 'नें–' हे प्रत्यय सर्वनामांना आहेत, ज्ञानेश्वरींत नामानाही क्वचित् आहेत. पचतंत्र आणि ज्ञानेश्वरी यामध्ये केवळ सामान्यरूपानें दाखविलेलीं सर्व विभक्तींचीं रूपें पुष्कळ आहेत पचतंत्र आणि ज्ञानेश्वरी यामध्यें केवळ घरगुती आणि व्यवहारभाषेंतले असे पुष्कळ शब्द आहेत. यातले बरेचसे साम्प्रतच्या प्रौढ भाषेंत घालण्याला अयोग्य असे मानले जातील. तसेच हल्लीं ज्याचा अर्थ फिरला आहे, अथवा जे हल्लीं अगदींच उपयोगातून गेले आहेत, असेही शब्द पुष्कळ आहेत. शुद्ध संस्कृत अशा शब्दांचा भरणा अर्ध्याहून अधिक आहे. पचतंत्रात कित्येक अगदीं घरगुती शब्द असे आढळतात कीं, ते इतके वर्षे भाषेंत जसेच्या तसे आहेत याचें आश्चर्य वाटतें. उदा०—साडणें (हरवणें), उकिडवें बसणें, आवतणें (जेवणाचें), केरसुणी, आड (विहीर), देशावर (परदेश), पैलाडी (पलीकडील बाजू), पाळ (देवळाची), वेळणी (एक प्रकारचें भांडें), वऱ्हाड (लग्न, हा शब्द वऱ्हाडिका असा स्त्रीलिंगीही आढळतो)

शिंकें, फटवणें, वारीक (न्हावी), थड (पाण्याची), थोंब, याढवेल (पुष्कळ वेळ) इ०. ज्योतिष ग्रंथांत 'देवें', 'आचार्यें' अशीं तृतीयेचीं वहुवचनें आलेलीं आहेत. संस्कृत शब्दांतील 'प' चा प्राकृतांत आणि मराठींत अनेक ठिकाणीं 'ख' झालेला प्रसिद्धच आहे. याच्या उलट संस्कृतांतील 'ख'बद्दल मराठींत 'प' घातलेला आढळतो. अशीं उदाहरणें जुन्या ज्योतिषग्रंथांत, शिलालेखांत, ताम्रपटांत आणि जुन्या पत्रांतून पुष्कळ आहेत. असा प्रघात सोळाव्या शतकाच्या अखेरपर्यंत होता असें दिसतें. पंचतंत्र ज्ञानेश्वरीच्या अगोदरचें आहे. रत्नमाला अगदींच त्रुटित असल्यामुळें तिला ग्रंथ असें म्हणतां येत नाहीं. परंतु तिची भाषा या दोहोंच्या अगोदरची आहे. तिहींची भाषा सरासरी पन्नास पाऊणशें वर्षांपेक्षां जास्त काळांतली असेलसें वाटत नाहीं.

मराठी भाषेचा आरंभ केव्हां पासून, या प्रश्नाचें उत्तर असें आहे कीं आपल्या देशभाषा प्रांतोप्रांतींच्या एकेका व्यावहारिक आर्यभाषेची परिणती इतके वर्षे होत जाऊन हळूहळू बनल्या असें जर आहे, तर मराठी भाषा अमक्याच विवक्षित काळीं बनली असें सांगतां येणार नाहीं. तसेंच अमुक वेळेपासूनचें जें भाषेचें स्वरूप तीच मराठी भाषा आणि अमुकच तिचा आरंभ हेंही ठरविणें अशक्य आहे. आज मराठी भाषेंतील विभक्तींचे आणि क्रियापद-रूपांचे, तसेंच साधित शब्द वगैरे दुसऱ्या कित्येक रूपांचे जे मुख्य मुख्य प्रत्यय, त्यांच्या योगानें उत्पन्न होणारीं जीं रूपें, तीं ज्या वेळीं स्थिर झालीं ती मराठी भाषेच्या उद्भवाची वेळ होय. तशी वेळ मात्र आपल्यास अजमासानें ठरवितां येईल. मागें सांगितलेलीं भाषेंत आजमितीस चालू असलेलीं जीं मुख्य मुख्य शब्दरूपें तीं ज्योतिषरत्नमाला, दोन शिलालेख, पंचतंत्र हा त्रुटित ग्रंथ आणि ज्ञानदेवी हा पूर्ण ग्रंथ यांमध्यें जशींच्या तशींच अथवा किंचित् फरकानें दाखवितां येत आहेत; आणि हे सर्व ग्रंथ सरासरी दोनशें वर्षांतले आहेत. तसेंच गद्यामधील वाक्याच्या रचनेच्या धोरणानें देखील हें ठरवितां येईल. इंग्रजी राज्यस्थापनेच्या आरंभाच्या वेळीं मराठी वाक्याचें जें स्वरूप होतें, त्यामध्यें आणि पंचतंत्र या गद्यग्रंथाच्या वाक्याचें जें स्वरूप दृष्टीस पडतें त्यामध्यें मोठासा फरक

नाही. कर्नाटकातील देवळाच्या शिलालेखाचीं दोनच मराठी वाक्यें शब्दाच्या रूपाच्या सबधानें चागला व्यवस्थित इतिहास सागत आहेत. तीं दोन्ही वाक्यें जरी सन १०८३ मधलीं धरलीं, तरी त्यावेळीं मराठी भाषेचें स्वरूप हल्लींसारखें बहुतेक बनलें होतें असें मानण्यास चिंता नाहीं. तसें स्वरूप बनण्यास सरासरी दोनशें वर्षे धरिलीं तर हल्लींच्या मराठीभाषेचा उद्भव दहाव्या शतकात झाला, असें ठरतें. याच्या अगोदर जर मऱ्हाटे लोक दुसऱ्या शतकापासून होते, तर मराठी भाषाही असली पाहिजे. पण ती 'बोली' म्हणून असेल पहिला ग्रथ ज्योतिषरत्नमाला हा जर १०३९ सनातला आहे, तर वर ठरविलेला आरभ हाच व्यवस्थित भाषेचा आरभ पत्करावा लागतो.

कोणत्याही भाषेत एकादा सर्वमान्य ग्रथ जेव्हा होतो, तेव्हापासून तिचा आरभ समजावा लागतो. कारण नुसती बोली कशी होती हें समजण्यास मार्ग नसतो. भाषेत ग्रथ लिहिण्याचा परिपाठ असला म्हणजे लोकाच्या बोलीमध्यें भाषा बनल्यावर ती ग्रथामध्यें प्रविष्ट होण्यास वेळ लागत नाहीं. पण आपल्या देशभाषाना हा सर्वसाधारण सिद्धात लागू नाहीं. कारण आमच्या लोकभाषा पुष्कळ दिवस जरी बोलण्यात चालू होत्या तरी ग्रथरचनेला योग्य अशा मानल्या जात नव्हत्या. तेव्हा मराठी बोली चागली नावारूपास आल्यावरही तींत ग्रथरचना झाली नसेल. ज्योतिषग्रथ अगदीं लहान आहे पचतत्र जरी त्रुटित आहे, तरी पाऊणशें पृष्ठाचें गद्य लक्षात घेण्यासारखें आहे. ज्ञानदेवी तर चागलाच मोठा आणि इतर प्रकारेंही योग्य असा ग्रथ आहे. तेव्हा आमच्या मराठी गद्याचा पाया पचतत्र आणि पद्याचा ज्ञानेश्वरी मानण्यास चिंता नाहीं. या दोन्ही ग्रथातली मराठी भाषा अगदीं अल्पवयी नसून चागलीच प्रौढ झालेली दिसते. तेव्हा ती या दोन्ही ग्रथाच्या अगोदर निदान चारशें वर्षे तरी ग्रथभाषा म्हणून नसली तरी बोली म्हणून चालू असली पाहिजे, आणि या काळातल्या लहान ज्योतिष ग्रथावरून आणि शिलालेखावरून हें अनुमान चुकीचें ठरेल असें वाटत नाहीं. तेव्हा साप्रतच्या मराठीचा आरभ वाङ्मयाची भाषा म्हणून दहाव्या शतकात झाला आणि सुव्यस्थित ग्रथ

रचनेचा आरंभ म्हणून तेराव्या शतकांत झाला असें ठरतें; आणि ती मराठे लोकांची बोली म्हणून अगोदरपासूनच चालू होती.

पहिला मराठी गद्यग्रंथ पंचतंत्र आणि पहिला पद्यग्रंथ ज्ञानेश्वरी यांच्याही स्वरूपाचें वर्णन केलें पाहिजे. कारण त्यावांचून तेव्हांपासून भाषेची घटना कशी होत गेली हें नीट समजणार नाहीं. ज्ञानेश्वरी ग्रंथ विस्तृत, विषय गहन, आणि ज्या मूळ ग्रंथाच्या आधारें तो लिहिला तोही प्रख्यात यामुळें ही उत्तम ग्रंथाची जोड प्रथमारंभींच मराठी वाङ्मयाला मिळाली आहे; परंतु त्याचें एकंदर बाह्यस्वरूप कसें विकृत झालेलें आहे, हें सांगण्यांत आलेंच आहे. पंचतंत्र हा तितका लोकप्रिय होण्यासारखा ग्रंथ नव्हे. यामुळें तो वाचणारे आणि प्रती करणारे यांच्या हातीं सांपडून बिघडलेला नाहीं. तो बहुधा जसा रचला गेला तसा आपणांस मिळाला आहे. यामुळें त्यावेळच्या मराठी भाषेचें स्वरूप त्यावरून चांगल्या रीतीनें दिसून येतें. इतकेंच कीं त्याचा उपलब्ध झालेला भाग थोडा आणि त्यांत विषयाच्या मानानें शब्द आणि वाङ्मयासंबंधीं इतर गोष्टी यांचा भरणा कमी, यामुळें यासंबंधानें त्याची योग्यता ज्ञानेश्वरीपेक्षां कमी आहे. खुद्द ज्ञानदेवांची ज्ञानेश्वरी भाषेच्या संबंधानें कशी होती, हें हल्लींच्या पाश्चात्यपद्धतीनें शिकलेल्या चिकित्सक विद्वानांस पंचतंत्राच्या भाषेच्या आधारें ठरवितां येईल.

मराठी भाषा असें नांव आपण मराठे लोक हें नांव आढळेल तेव्हांपासून देऊं लागलों असें समजलें पाहिजे. अशोकाच्या आज्ञालेखांत रट्ट नांवाचे लोक सांगितले आहेत. हे दक्षिणेंत राहात होते. हेच मराठ्यांचे पूर्वज होत. हे आपणास महारट्ट (याचें संस्कृत महारथी) म्हणवीत. रजपुतांतले राठोर कदाचित् यांची शाखा असेल. तसेंच रट्टपासून 'राष्ट्र' होऊन पुढें दक्षिणेंतील राष्ट्रकूट हा राजवंश त्यांच्यातलाच असेल. कारलें, भाजें आणि बडेसा येथील लेण्यांतल्या दुसऱ्या शतकांतल्या शिलालेखांत 'मऱ्हाटा' सरदार आणि त्याची स्त्री 'मऱ्हाटिणी' (मराठीण) असा उल्लेख आहे. तेव्हां पुरुष किंवा लोक 'मऱ्हाटी', बायका 'मऱ्हाटिणी' आणि भाषा 'मऱ्हाटी', ही त्रयी इसवी सनाच्या दुसऱ्या शतकापासून जाग्रत आहे असें उघड

होत आहे. राजशेखराच्या कर्पूरमंजरीमध्यें मराठी स्त्री याबद्दल 'मरठी' असा शब्द आला आहे. हा कवी सन ८८४ ते ९५९ यावेळीं होता. सांप्रत मराठे लोकांना 'जात कोण?' असें विचारलें असतां ते 'मराठी' असें उत्तर देतात. 'मराठा' अथवा 'मराठे' असें ते आपणास म्हणवीत नाहींत. तथापि यासंबंधानें असें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, मराठी भाषा किंवा महाराष्ट्र भाषा असें नांव सार्वत्रिक नव्हतें. कांहीं कवींनीं 'मराठी' असा उपयोग केला आहे. पण सार्वत्रिक उपयोग संस्कृत आणि प्राकृत असा होत असे.

महाराष्ट्र हा देशाचा वाचक, 'महाराष्ट्री' हा भाषेचा वाचक शब्द आणि 'मराठे' व 'मराठी' हीं त्याचीं देशी रूपें, अशी जी समजूत ती चुकीची आहे. महाराष्ट्र असा ठरींव देश, प्रांत किंवा प्रदेश कधींही नव्हता. प्राचीन ग्रंथांत नर्मदेच्या दक्षिणेकडील प्रदेशास दक्षिण, दक्षिणापथ, दंडकारण्य, अपरान्त, वगैरे नांवें आहेत, परंतु महाराष्ट्र असें नांव नाहीं. मऱ्हाठे असें लोकांचें नांव मात्र आहे. दक्षिणेकडील भाषेचीं दाक्षिणात्या, वैदर्भिका अशीं नांवें साहित्यदर्पण वगैरे ग्रंथांतून आलेलीं आहेत मृच्छकटिकाचा सूत्रधार म्हणतो कीं, 'आम्हां दाक्षिणात्यांस सर्व भाषा येत असतात.' हें वाक्य पाहिलें तर मात्र शौरसेनींत आहे, महाराष्ट्रींत नाहीं शातवाहन कुळांतले राजे हे मऱ्हाठे क्षत्रिय होते त्यांची सुमारें तीनशें वर्षें भरभराट होती. त्यांनीं आपल्या भाषेला महाराष्ट्री असें नांव देण्याचा प्रयत्न केला, परंतु तें नांव पक्कें झालें नाहीं. कारण मऱ्हाटी लोकांतला वररुची मात्र तिला महाराष्ट्री म्हणतो. हेमचंद्र नुस्तें प्राकृत म्हणतो. त्याच प्रमाणें या मऱ्हाठ्यांचें राज्य ज्या प्रदेशावर दोन तीन वेळां पसरलें, त्या प्रदेशास महाराष्ट्र असें नांव देण्याचे प्रयत्न झाले, असें दिसतें. परंतु राज्यच फार दिवस टिकलें नाहीं, यामुळें हे प्रयत्न निष्फळ झाले आणि कोणत्याही प्रदेशास महाराष्ट्र हें नांव कायमचें मिळालें नाहीं. इकडला प्रख्यात संस्कृत आणि प्राकृत कवी राजशेखर हा आपणास महाराष्ट्रचूडामणि म्हणवितो याचा अर्थ महाराष्ट्री भाषेचा चूडामणि असा असेल महाराष्ट्र असा देशाच्या नांवाचा उल्लेख

कित्येक ठिकाणीं आहे. प्रसिद्ध बौद्ध ग्रंथ म हा वं श यांत महाराष्ट्र असा उल्लेख आहे. त्यावरून त्या वेळीं उज्जयिनीच्या सभोंवतालच्या बऱ्याच मोठ्या प्रदेशास अथवा ज्याला आपण सांप्रत मध्यहिंदुस्थान म्हणतों, त्याला महाराष्ट्र असें म्हणत असें दिसतें. दक्षिणेमध्यें बुद्धानें विशेषतः उत्तर आणि दक्षिण कोंकणांत आणि त्याला लागून असणाऱ्या प्रदेशांत उपदेशक पाठविले होते. या प्रदेशास त्या ग्रंथांत अ प र न्त म्हटलें आहे. मध्यहिंदुस्थानांत आम्हां मराठ्यांचे पूर्वज त्या वेळीं खास राहात असावे. कारण तुळशीदासाच्या हिंदीमध्यें असे बरेच शब्द आढळतात कीं ते सांप्रतच्या मराठी शब्दांना जवळ आहेत, पण सांप्रतच्या हिंदी शब्दांना जवळ नाहींत.

व रा ह मि हि र (इ० स० ६ वें शतक) आपल्या ग्रंथांत महाराष्ट्राचा उल्लेख करितो. हु ए न सं ग (इ० स० ६ वें शतक) हा चिनी प्रवासीही महाराष्ट्र (मोहोलोच) असें नांव देतो. अहोळ येथील एका लेखांत (शक ५५६) 'तीन महाराष्ट्रें जिंकिलीं' असा उल्लेख आहे. तीन महाराष्ट्रें म्हणजे काय? महाराष्ट्र असें ज्यास नांव द्यावयाचें तो एकच देश अफाट असावयास पाहिजे. मग आणखी तीन महाराष्ट्रें असें कां म्हटलें, याचा विचार केला तर तीन महाराष्ट्रें म्हणजे मराठे लोकांचीं तीन मोठालीं राज्यें, असा अर्थ दिसतो. या उल्लेखांवरून मराठे लोकांवरून 'महाराष्ट्र' असें देशाचें नांव उत्पन्न झालेलें दिसतें, आणि तें विवक्षित प्रदेशास लावण्याचा यत्नही वारंवार झालेला दिसतो, पण तें कोणत्याही देशास कायमचें मिळालें नाहीं. मऱ्हाटे लोकांचें राज्य, तो महाराष्ट्र देश, अशी समजूत वेळोवेळीं होत गेली. परंतु मऱ्हाटी राज्य टिकलें नाहीं, त्याचप्रमाणें कोणत्याही नियमित प्रांतास महाराष्ट्र हें नियमित नांवही मिळालें नाहीं. राष्ट्रकूट राजवंश 'मराठा' जातीचा होता. त्यांची घरची भाषा कदाचित् मराठी असेल. परंतु त्यांनीं आपल्या शिलालेखांमध्यें देशभाषेची जरूर पडली असतां कानडीचा आश्रय केला आहे.

शिवाजी हा प्रख्यात म ऱ्हा ठा राज्यसंस्थापक झाला. परंतु त्याचे वेळींही महाराष्ट्र नांवाचा देश नव्हता. नर्मदेच्या दक्षिणेचे निरनिराळे

प्रदेश, याना प्रातांची निरनिराळीं नावें होतीं. महाराष्ट्र देश झाला तर तेथील लोकाना तसेंच काहीं नाव पाहिजे पण तसें नाव नाहीं. मऱ्हाटे, हें 'महाराष्ट्र' किंवा 'महाराष्ट्रीय' याचें रूप म्हणता यावयाचें नाहीं. राष्ट्र याचें रट्ट होणार नाहीं. तेव्हा मऱ्हाठे लोक होते, मऱ्हाठी भाषा होती, पण 'मऱ्हाठा' मुलुख, देश, नव्हता, निदान कायमचा तरी कधीं ठरला नाहीं.

भाषेच्या संबधानें पाहिलें तर मराठी भाषा जेथें चालत होती असे वैदर्भ, खानदेश, पैठण, कुंतल, कोंकण, वगैरे भिन्न भिन्न देश होते. तेव्हा मराठी हे नाव ही भाषा बोलणाऱ्या प्रमुख अशा मऱ्हाठे लोकावरून पडलें, देशावरून पडलें नाहीं. तसेंच ते लोक आणि त्याची भाषा ही जोडी इसवीसनाच्या आरंभापासून तरी खास आहे. त्याचें वाङ्मय प्रथमत महाराष्ट्री प्राकृतात होतें. मागें सांगितलेंच आहे कीं, मऱ्हाटे लोक जर निदान दुसऱ्या शतकापासून होते, तर त्यांची भाषाही त्या वेळेपासून असलीच पाहिजे. पण मराठी प्राकृतात ज्ञानेश्वरीच्या अगोदरचें वाङ्मय मिळत नाहीं, तेथें उपाय नाहीं.

मराठी कवी देखील महाराष्ट्री असा उल्लेख भाषेच्यासंबधानें कोठेंच करीत नाहींत. ज्ञानदेव मऱ्हाठी भाषा म्हणतो. इतर सर्व कवी आपल्या भाषेला प्राकृत असेंच नाव देतात. मोरोपतानें एके ठिकाणीं जनपद भाषा असेही म्हटलें आहे. ज्ञानदेवाने देश आणि राज्य यासंबधानें महाराष्ट्रमंडळ असें म्हटलं आहे. तसेंच त्याने आणि इतर काहीं कवींनीं आपल्या धार्मिक आणि सामाजिक संस्कृतीस महाराष्ट्रधर्म असें म्हटलें आहे. हाच शब्द मराठी अमदानींतल्या कित्येक लेखातही आला आहे. परंतु महाराष्ट्र असें अमक्या एका प्रदेशाचें नाव, असें कोठेंही आढळत नाहीं

'मराठी' हें 'महाराष्ट्री' प्राकृताचें स्वरूप असें समजतात. महाराष्ट्री म्हणजे काय हें मागें सांगण्यात आलेंच आहे. ते मुख्य प्राकृताचें नाव, उत्तरेकडे जशा शौरसेनी, मागधी, पैशाची वगैरे प्रांतिक प्राकृत झाल्या, तशी आमचेकडे एखादी प्राकृत झाली नाहीं. इकडे मुख्य प्राकृतच होती. तिचेंच हल्लींचें स्वरूप मराठी. तथापि मराठी

भाषेंत अगदीं प्राचीन प्राकृत जी पाली तिच्याच विशेष अशा अनेक गोष्टी आहेत. तूर्त त्यापणास ज्ञानेश्वरीच्या मराठीचाच इतिहास पाहावयाचा आहे. ज्ञानेश्वरीच्या मराठींत शेंकडा तीस शब्द शुद्ध संस्कृत आहेत. ह्याच प्रकार पालीचाही आहे. तसेंच पालीमध्यें असलेले अनेक तद्भव शब्द जसेच्या तसेच अथवा अगदींच थोड्या फरकानें मराठींत आहेत. हे शब्द संस्कृत शब्दांचे प्राकृत शब्द करून घेण्याचे जे नियम पुढें ठरले, त्यांप्रमाणें झालेले नव्हत. उदाहरणार्थ पुढील शब्द पाहा. यांतले कंसांतील शब्द पाली आहेत. मराठी आणि पाली शब्द अगदीं एकरूप असतांना कंसांत शब्द दिला नाहीं.—आग (अग्गि). अंतर. आज (अज्ज). आंख (अक्खि). आहार (आहर). आण (आणा). ऊन (उण्ह). उतरतो (ओतरति). ओळखतो (ओलोकेति). औषध (ओसध). अवकाश (ओकास). ओंठ (ओट्ठ). कापूर (कप्पुर). कापूस (कप्पास). कांसे (धातु–कंस). करितो (करोति). काढणें (कड्ढण). खणतो (खनाति). खेत (खेत्त). खंति, आवड, प्यास, खीर. घर. चोर. चाक (चक्क). जाल (जाला). जप. ठाण (ठान). तहान (तण्हा). तथापि. तेल. थान (थन). दूर. दाढ (दाढा). दूध (दुद्ध). देतो. दिसतो (दिस्सति). धावतो. नेतो. नासतो. नवा. नातू (नत्ता). नहाण (नहान=स्नान). नऊ (नव). पण (पन). पार. पोथी (पोत्थक). पूत (पुत्तो). पान (पण्ण). पाहुणा (पाहुना). बहूत (पहूत). फुरफुरणें (फुर). बाहेर (बाहिर). भात (भत्त). ओरी (ओरक). माजघर (मज्झघर). माणूस (मनुस्स). मरतो (मराति). मारतो (मारेति). माति (मत्तिका). माग (मग्ग). मिसळ (मिस्स). मोर. राजा. लाख (लक्ख–सख्या). वसा (वस्स). वेळू. विणा (वीणा). वीज (विज्जु). वाणी (वाणिज). वाढतो (वड्ढति). शिकतो (सिक्खति). शिष्य (सिस्स). शेठ्या (सेट्ठी). साच (सच्च). साखर (सक्खरा). सूत (सुत्त). सून (सुनिसा). सुका, सुखा (सुक्खा). सासू (सुस्सु). सासरा (ससुर). शिंप. शिंपी

( खिप्पी ). सारखा ( सरिक्ख ). हत्ती ( हत्थि ). हात ( हत्थ ). होतो ( होति ). हाणतो ( हनति ).

अशा प्रकारचे आणखी पुष्कळ शब्द सांगतां येतील. याशिवाय आणखी प्रकार आहेत, ते असेः—

( १ ) ' ळ ' हें अक्षर पालीमध्यें आहे तसेंच मराठीमध्यें आहे. अन्य प्राकृतांत 'ळ' नाहीं. पालींत ड्चा ळ होतो. तोही मराठीमध्यें सर्वत्र आला आहे.

( २ ) वत् मत् यांचें वन्त आणि मन्त असे अनेकवचनीं होतें. पालींत तींच एकवचनीं विशेषणें होतात; तशींच मराठींतही होतात; जसें–गुणवन्त, भाग्यवन्त, श्रीमन्त, इ०.

( ३ ) जोडाक्षरांमधील व्यजनांत एक स्वर शिरून शब्द होतात; जसें–शिलोक, वरीस, क्षिरी, किलेश ( म० किळस ), इ०. हा प्रकार मराठींत फारच आढळ आहे. घोड्यास, घोडियास; त्याचा, तयाचा; त्याच्यास, त्याचियास; इ०.

( ४ ) मराठींतले संख्यावाचक शब्द पालीमधील शब्दांची परिणती आहे.

( ५ ) पालींतले पूर्वरूप आणि पररूप सवी मराठींत बहुधा जसेच्या तसेच आले आहेत.

( ६ ) व्यजनान्त नामाचें अन्तींचें व्यजन जाऊन अथवा त्यांत 'अ' मिळून ता स्वरान्त होतात; जसें–जग, दुर्वास, यश, कर्म, भगवान, शक्तिमान, विद्वान, इ०.

( ७ ) मराठी विभक्तींची रचना बहुतेक पालींतील विभक्तिरचनेची परिणती आहे.

( ८ ) पालींतील ओकारान्त प्रथमैकवचन कोंकणांतील सर्व प्रांतिय मराठींत आहे. या 'ओ'चा पुढें 'उ' होऊन तो उकार मराठी अकारान्त शब्दाना जोडण्याची सार्वत्रिक चाल पडली.

( ९ ) सर्वनामें तुम्ही, आम्ही, हीं पालीमधील होत.

( १० ) प्रयोजक प्रत्यय पालींत 'प' आणि 'अय' दोन्ही आहेत. परंतु 'प'चा प्रचार फार. इतर प्राकृतांत 'अय' आहे. पण मराठींत 'प'चा झालेला 'व' आहे.

( ११ ) कर्मणीचा संस्कृतांतील 'य' पालींत आहे, तो मराठींतही आला आहे. जुन्या मराठींत 'य' पुष्कळदां येतो. शिवाय मराठींत इतर प्राकृतांप्रमाणें 'ज' ही आहे.

( १२ ) धातुसाधिताचा प्रत्यय 'ऊन' हा वैदिक त्वा, त्वीन यांपासून पालीचे द्वारें आलेला आहे.

( १३ ) संस्कृत भूतकालवाचक कर्मणि विशेषण याचें महाराष्ट्रींत 'कअ', 'कय' होतें. मागधींत 'कड' होतें. शौरसेनींत 'कद' होतें. पाली 'कत' होतें. मराठीमध्यें त, द, ड, यांबद्दल 'ल' होतो. अथवा मराठी प्राकृताचा हा प्रत्यय 'ल' आहे, असेंही पाहिजे तर म्हणावें. अर्थात् तें रूप महाराष्ट्रीप्रमाणें न होतां, पालीप्रमाणेंच होतें. कृ, मर, आणि गम् यांचें मात्र महाराष्ट्रीप्रमाणें होतें. इतर गोष्टींत 'कृ' धातु महाराष्ट्रीप्रमाणें न चालतां, त्याचें पाली किंवा शौरसेनी यांप्रमाणें मराठींत 'कर' असें रूप होतें. असाच प्रकार 'मर' आणि 'दे' या धातूंच्या संबंधानें आहे. 'भू' धातूचें पालींतलें 'हू' हें रूप मराठींत आहे.

( १४ ) वस्तु संस्कृत नपुंसकलिंगी, मराठी स्त्रीलिंगी; स्वप्न संस्कृत पुल्लिंगी, मराठी नपुंसकलिंगी, मित्र संस्कृत नपुंसकलिंगी, मराठी पुल्लिंगी, धातु संस्कृतांत पुल्लिंगी, मराठी स्त्रीलिंगी, इत्यादि लिंगाचे फेरफार जे सांप्रत मराठींत आहेत, ते मूळ पालींतून मराठींत आले आहेत.

( १५ ) विशेष्यास विभक्ती लागली असतां विशेषणाचें सामान्यरूप करण्याची पद्धत चालू मराठींत बऱ्याच विशेषणांसंबंधानें आहे. कवितेंत आणि जुन्या मराठींत जास्त आहे. ही पद्धत पालीमधून आली.

( १६ ) महायानपंथाच्या बौद्ध ग्रंथांत ज्ञानेश्वरी आणि तत्कालीन मराठी ग्रंथांप्रमाणेंच अकारान्त शब्दांना उकार आहेत. यावरून हा उकार पालीच्या द्वारें आलेला दिसतो.

( १७ ) 'दा' धातूचें शौरसेनींत 'दे' होतें, तें रूप मराठींत आहे. याचें पालींतलें भूतकालवाचक विशेषण 'दिन्न' यापासून मराठींत दिण्णलें, दिल्हें अशीं रूपें होतात. भूतकालिक विशेषणाचे प्रत्यय जे द, ड, न, त्यांचें मराठींत 'ल' होऊन, शिवाय आणखी 'ल' लागून विशेषणें होतात. जसें—केलेलें, दिलेलें, घेतलेलें इ०.

( १८ ) मराठींत ज्यास षष्ठी म्हणतात, तें 'च'-प्रत्ययान्त विशेषण (देवाचा) हें संस्कृत 'त्य' प्रत्ययान्त विशेषणावरून पालीच्या द्वारें आलें. पालींत 'त्य'च्या जागीं सर्वत्र 'च' होतो.

अशा प्रकारें मराठीचा संबंध सर्व प्राकृत भाषांचें आद्य स्वरूप जें पाली, त्याच्याशीं फार आहे. आपल्या दक्षिण प्रांतांत बौद्ध धर्माचा प्रसार पुष्कळ झाला होता. खुद्द गौतमबुद्धाच्या वेळींच उत्तर कोंकणांत बौद्धधर्म होता. त्या धर्माचे विहार आणि कोरींव लेणीं आमचे इकडे देशावर आणि कोंकणांत सर्वत्र पुष्कळ आहेत, आणि त्यांमधून पाली लेखही आहेत. या सर्व ठिकाणीं बौद्ध भिक्षू राहून लोकांना पाली भाषेंत अथवा पालीचें त्यावेळचें जें स्वरूप असेल त्यामध्यें धर्मोपदेश करीत होते. तेव्हां म रा ठी चें अ गो द र चें स्व रू प पा ली हो य, असें म्हणणें युक्त दिसतें. पालीनंतर सर्व देशांतल्या प्राकृत भाषेंत जसा फरक होत गेला, तसा मराठी देशांतील प्राकृतांतही होत गेला. महाराष्ट्री-पासून मराठी झाली, हें केवळ कल्पित किंवा मुद्दाम ठरविलेल्या शब्दसाम्यावरून म्हणावयाचें, दुसरें कांहीं नाहीं.

बौद्ध धर्माप्रमाणेंच मराठी प्रदेशांत जैन धर्माचाही प्रसार झाला होता. जैन धर्माची भाषा प्रथमतः अर्धमागधी होती. ही पालीला फार जवळची होती. शिवाय जैन लोक केवळ अर्धमागधीचाच उपयोग करीत असें नाहीं, तर संस्कृताचा आणि त्या त्या प्रांतांतील प्राकृताचाही ते उपयोग करीत. आणि पुढें तर त्यांनीं आ प ले ही पुष्कळ धर्मग्रंथ संस्कृतांतच लिहिले, आणि प्रथमतः प्राकृतांत असलेलेही संस्कृतांत नेले. या कारणानें या प्रांतांतील भाषेवर अर्धमागधीचा पगडा फारसा पडला नाहीं. मराठी अकारान्त शब्दांना 'ओ'वरून जसा उ-ऊकार

आला आहे, तसाच अर्धमागधींतल्या प्रथमेकवचनाच्या अन्त्य एकारा-वरून इ-ईकार आला आहे, असें जें कित्येकांचें म्हणणें आहे, तें विचारणीय आहे. या वेळीं म्हणजे इसवी सनाच्या आरंभापासून तों सुमारें सातव्या आठव्या शतकापर्यंत ज्याप्रमाणें मऱ्हाठे, मऱ्हाठिणी, वगैरे शब्द आढळतात त्याप्रमाणें या प्रांताच्या मऱ्हाठी भाषेंत वाङ्मयही वास्तविक आढळलें पाहिजे. परंतु पुढें लौकरच संस्कृत भाषेचा पुन्हा पगडा पडल्यामुळें प्रांतिक भाषेंत महत्वाचें वाङ्मय असल्यास त्याला संस्कृत स्वरूप मिळालें, आणि किरकोळ वाङ्मय असल्यास तें नष्ट झालें असें दिसतें.

**मराठीचा प्रदेश**—हल्लींच्या मराठीचा प्रदेश कोणता हें सांगावयास नको. मराठी भाषा जी विजापूर, बेळगांव, धारवाड इकडे गेली आहे ती प्रथम पाहुणीच गेली; पण त्या प्रांतांचा मूळ मराठी प्रांताशीं संबंध असल्यामुळें आतां ती त्या प्रांतांत पाहुणी नाहीं. इंदूर, ग्वालेर, बडोदा, मद्रासकडे तंजावर, येथें ती राजकीय संबंधानें गेली. पण त्या त्या देशी राज्यांत तिनें कायमचें स्थान केलें आहे. ती दक्षिणेमधील आर्यभाषांमध्ये मुख्य म्हणून तिला दाक्षिणात्या असें नांव आहे. तसेंच तिला वैदर्भी असेंही म्हटलेलें आहे. वैदर्भ देश बहुतेक नर्मदेच्या दक्षिणेसच आहे; असें आहे, तरी प्राचीन मराठीची मर्यादा दक्षिणेमध्ये देशावर पैठणाच्या खालीं फारशी नव्हती. मराठ्या राजांनीं कर्नाटकावर राज्य केलें तेव्हां ती मधून मधून तिकडे गेली. यामुळें दक्षिणेकडे तिचा प्रदेश वाढला. पुढें अर्वाचीन मराठ्यांचें राज्य कर्नाटकांत झाल्यावर मराठीचा प्रदेश तेथपर्यंत पोंचला. उत्तरेकडे तिचा प्रदेश बहुतेक मध्य हिंदुस्थानांत होता. मध्य हिंदुस्थान आणि जुना वैदर्भ देश हेंच मराठीचें आणि मराठ्यांचें मूळ स्थान होय. हे लोक फार अस्थिर होते असें दिसतें. यामुळें त्यांची कायम वस्ती आणि कायम राज्य फार दिवस कोठें झालें नाहीं; यामुळें 'महाराष्ट्र देश' कोठेंही बनला नाहीं. मराठीचा आरंभ जरी नर्मदेच्या उत्तरेकडचा आहे, तरी पुढील परिणती नर्मदेच्या दक्षिणेकडील आहे. पश्चिम किनाऱ्यावर कोंकणांत मराठ्यांच्या वसाहती आणि त्यांच्या

भाषेच्या निरनिराळ्या शाखा आहेत. कारवारी, गोमतकी, सावतवाडी, कुडाळी, मालवणी, चित्तपावनी, कऱ्हाडे लोकाची, इतके मराठीचे कोंकणचे प्रकार आहेत. याचा परस्पराशीं निकट सबध आहे, परतु मुख्य मराठीशीं त्याचा सबध दूरचा आहे. या प्रातात मराठी भाषा बोलणारे लोक फार प्राचीन काळीं येऊन राहिले. हे ब्राह्मण वगैरे श्रेष्ठ जातीचे होते. सारस्वत किंवा गौड ब्राह्मण, चित्तपावन, कऱ्हाडे, देवरुखे, ग्नोत किंवा जवळ, हे मुख्य होत हे लोक केवळ वसाहतीसाठीं आले प्रथमारभीं राजकारण वगैरे काहीं एक चळवळ त्यानीं केली नाहीं. याच्या या निरनिराळ्या भाषा साररूपानें जुन्या मराठीशीं जुळतात. त्यातील रूपें प्राकृताचें शेवटचें रूप जें अपभ्रश त्याला समकालीन किंवा त्याच्या जरा अगोदरचीं भासतात. हे लोक मराठीच जें मूलस्थान मध्यहिंदुस्थान तेथून कोंकणात गेले. परशुराम नामक कोणी त्याचा पुढारी होता अशी दतकथा आहे. या सर्व वसाहती समकालीन होत्या कीं काय, हा मोठा प्रश्न आहे. भाषेवरून त्या समकालीन होत्यासें वाटतें. कोंकण प्रात फार जुना दिसतो. पण रघुवशात रघुदिग्विजयामध्यें त्याचें कोंकण असें नाव नाहीं कोंकणात कुणबी वगैरे लोकाची मराठी भाषा देशावरून सह्याद्री उतरून आलेली दिसते. तिचा वर सागितलेल्या कोंकणी भाषाशीं सबध नाहीं. तसेंच विशेषतः उत्तर कोंकणात परभू किंवा कायस्थ नावाचे क्षत्रिय आले. याची भाषाही घाटावरून गेलेली मराठी. कोंकणातल्या भाषाशीं तिचा सबध दिसत नाहीं.

अलीकडे असें मत निघालें आहे कीं, आर्य लोक दोन स्वाऱ्यानीं हिंदुस्थानात आले. दुसऱ्या स्वारीचे लोक पहिल्या स्वारीच्या लोकामध्यें घुसून त्यानीं पूर्वीच्याना बाहेर ढकललें. सिंध, गुजराथ, मराठा देश, यातले लोक पूर्वीचे. अर्थात् परिणतीच्या दृष्टीनें मराठी भाषा ही जुनी, आणि हिंदी ही मागूनची. देशी भाषाचें स्वरूप पाहाता हा उगाच तर्क आहे असें तेव्हाच दिसून येतें. असा तर्क उत्पन्न झाला आणि तो एकदा डोक्यात शिरला कीं, मग हिंदी ही मागूनची, आणि मराठी अगोदरची असा तर्कही खरा वाटतो. पण त्या दोन्ही

भाषांच्या स्वरूपावरून तसें वाटत नाहीं. पहिला महत्त्वाचा प्रश्न हा आहे कीं, हा अगोदरचा आणि मागूनचा फरक चालू भाषांत कां आला ! तो प्राकृतांत आणि त्याचे अगोदर संस्कृतांत कां नव्हता ! खरोखरी पाहातां असा फरक मुळींच नाहीं. उलट हिंदीचीच परिणती मराठीपेक्षां फार जुनी आहे. मराठींत अजून कित्येक प्रकारचे संधी किंवा शब्दांची जुळणी आणि शब्दांमध्यें मिळून जाणारे जुने स्वरघटित प्रत्यय वगैरे जुन्या काळचे संस्कृताचे अवशेष फार आहेत. हिंदी भाषा या गोष्टींचा कधींच त्याग करून जास्त स्वतंत्र झाली आहे. भाषेची परिणती म्हणजे ती प्रत्ययादिकांतून मुक्त होऊन तिचा व्यवहार स्वतंत्र शब्दांच्या साह्यानें होऊं लागणें. ही गोष्ट हिंदीमध्यें बहुतेक पूर्ण आहे. मराठींत तसें नाहीं. या गोष्टी होण्यास वेळही पुष्कळ हवा असतो. हिंदींत चांगले बनलेले असे तद्भव शब्द विपुल आहेत. मराठींत कमी आहेत, म्हणून ती मूळचे संस्कृत शब्द जसेच्या तसेच फार घेते. या कारणावरून बाहेरच्या भाषा आणि अंतर्वर्ती भाषा ही केवळ भ्रमाची कल्पना आहे असेंच म्हणणें भाग आहे.

या सर्व विवरणावरून असें दिसून येईल कीं, एवढ्या मोठ्या काळांत जुनें, मध्यम, नवीन असें निरनिराळें संस्कृत, निरनिराळ्या प्राकृत यांचीं अनेक स्थित्यंतरें आणि फेरफार झाले आहेत. परंतु ते सर्व एका परंपरेनेंच होत गेले आहेत; आणि संस्कृत आणि प्राकृत भाषा वाङ्मयरूपानें कायम असल्यामुळें ती परंपरा अखंड असून स्पष्ट सांगतां येते. त्यांमधलें कांहीं एक नष्ट झालेलें नाहीं. अगदीं वेदभाषेपासून तों आजच्या मराठीपर्यंत भाषेच्या सर्व पायऱ्या कायम आहेत. अनेक शब्द आणि अनेक रूपें वेदभाषेपासून आतांपर्यंत जशींच्या तशींच किंवा थोड्या फार फरकानें दाखवितां येतात. सारांश आमच्या आर्यभाषेमधलें कांहीं एक नष्ट झालेंच नाहीं. कालांतरानें त्याची परिणती मात्र झाली आहे.

# पहिल्या भागाचें परिशिष्ट

या परिशिष्टात संस्कृत भाषेची परिणती होत असताना तिच्यात कसे कसे फरक होत गेले, हें कळण्यासाठीं काहीं नियम दिले आहेत, व या परिणत्यवस्थेचे मधील दुवे कळण्यासाठीं पाली व प्राकृत या दोन भाषाना साधारण असलेले नियम प्रथम दिले असून केवळ प्राकृतालाच लागू असणारे नियम पुढे दिले आहेत. प्राकृत शब्दानें निरनिराळ्या पुष्कळ भाषाचा–मागधी, अर्धमागधी, महाराष्ट्री, शौरसेनी वगैरेंचा–बोध होतो, परतु खरी प्राकृत म्हणजे एकच, व बाकीचे भेद देशभेदानेंच झालेले आहेत, म्हणून सर्वसाधारण प्राकृताला लागणारे नियमच येथें घेतले आहेत.

संस्कृत भाषेपासून निघालेल्या भाषापैकीं संस्कृताशीं–विशेषत वैदिक संस्कृताशीं–अत्यत सदृश असलेली भाषा म्हणजे पाली हीं होय. हिला बौद्ध मागधी असेंही म्हणतात, व बौद्धधर्माचे मूळ ग्रथ या भाषेंत आहेत. ज्याप्रमाणें वैदिकधर्माची संस्कृत व बौद्धधर्माची पाली, त्याचप्रमाणें मागधी प्राकृत ही जैनधर्माची भाषा समजली जाते. आपल्या भाषेंत काहीं विशेष असावा, अशा बुद्धीनें आग्रही पडितानीं प्राकृताला अत्यत कृत्रिमता आणली आहे, ही गोष्ट पुढील नियमावरून स्पष्ट होईल. पण या भाषेला इतकी कृत्रिमता येण्यापूर्वी इच्यात माधुर्य हा प्रधान गूण असावा, शब्दोच्चारणात सौकर्य असावें, असें वाटतें, म्हणूनच बाणादि कवींनीं प्राकृत भाषेची व तींतील ग्रथाची प्रशसा केली आहे. 'मधुरकोमलकातपदावली' रचणारे जगन्नाथ पण्डितासारखे कवी संस्कृतात नाहींत असें नाहीं, तरी पण प्राकृताचे माधुर्य अगदीं निराळेंच! अर्थातच ही गोष्ट कृत्रिम प्राकृताला लागू नाहीं. कृत्रिम प्राकृतात माधुर्य गुणाचा लोप होऊ लागल्यामुळेंच देशी भाषाचा–बगाली, हिंदी, गुजराथी, मराठी याचा–उदय झाला आहे, व हल्लीं तर या कृत्रिम प्राकृतापेक्षा तद्भव देशी भाषाच मधुरतर आहेत, अशी खात्री पटते.

" फरुसा सक्कअबन्धा पाउअबन्धो वि होइ सुउमारो,
पुरुसमाहिलाणं जेत्तिअमिहन्तरं तेत्तिआमिमाणं."

——कर्पूरमंजरी—

या प्राकृत भाषेची थोरवी गाणाऱ्या श्लोकांतच 'सक्कअ' 'जेत्तिअ' व 'तेत्तिअ' या शब्दोच्चारांनीं धक्का बसल्यासारखें होतें!

गरुडपुराणांत,

'लोकायतं कुतर्कं च प्राकृतं म्लेच्छभाषितम्,
न श्रोतव्यं द्विजेनैतदधो नयति तद् द्विजम्'.

या श्लोकांत प्राकृताच्या अध्ययनाचा निषेध केला आहे. संस्कृत पंडितांचा जैनादिकांविषयींचा द्वेषच या निषेधाचें मूळ दिसतें. प्राकृत भाषेत जरी कृत्रिमता आहे, तरी तिच्या अध्ययनाचा निषेध झाला, ही गोष्ट मात्र बरी झाली नाहीं. तिच्यांतील मधुरता जरी नाहींशी झालेली दिसली, तरी देशी भाषांत ती लोकांनीं आणलीच, व ती आणतांना त्यांनीं युक्तायुक्ततेचा विचार केला; तरी शुद्ध संस्कृत भाषेवरून किंवा पालीवरून देशी भाषावर उडी मारतां येत नाहीं, मधील पायरीची जरूर आहे, ही गोष्ट विसरतां कामा नये. येवढ्यासाठींच कृत्रिम असतांनाही प्राकृत भाषेला मान देणें उचित आहे.

मागें सांगण्यांत आलेंच आहे कीं, संस्कृत शब्दांची परिणती होण्याचीं मुख्य कारणें दोन; एक उच्चारसौकर्य व दुसरें मधुरता आणणें. उच्चारसौकर्य हा गुण येण्यास वर्णांमध्यें प्रायः मृदुता असावी लागते. कठोरवर्ण नेहमीं उच्चारास जड जातात. तरी मधुरता केवळ मृदु वर्णांनींच साध्य होणारा गुण नव्हे; मृदु किंवा कठोर वर्णांच्या यथोचित संनिवेशानेंही माधुर्य येतें. केवळ मृदु वर्ण किंवा केवळ कठोर वर्ण वापरतांही येणार नाहींत.

उच्चारसौकर्य कशामुळें येतें, ही गोष्ट कळण्यास प्रथम वर्णांचा विभाग नीट समजला पाहिजे. व्यक्तिमात्राच्या इच्छेनें कंठनाड्यांपैकीं स्वरजनक नाड्यांवर आघात झाले असतां वर्णोत्पत्ती होते. हे आघात जसजसे कमजास्त असतील, त्या त्या मानानें वर्णोच्चार मृदु किंवा कठोर

होतो. सर्व वर्णांत 'अ' या वर्णाच्या उच्चारास कमी प्रयत्न लागतो. त्या प्रयत्नात थोडा फरक केला कीं, आ, इ, ई, उ, ऊ, ए, ऐ, ओ, औ, ह, य, व, हे वर्ण उत्पन्न होतात. अनुनासिकाच्या उच्चाराला यापेक्षा जास्त प्रयत्न लागतो. मूळचा अनुनासिक एकच, पण पुढें येणाऱ्या वर्णामुळें त्यात जो उच्चाराचा फरक होतो तो स्पष्ट समजावा म्हणून पाच निरनिराळे अनुनासिक वर्ण मानिले आहेत. ग, ज, ड, द, ब याच्यात मृदुता अनुनासिकापेक्षाही कमी आहे क, च, ट, त, प यात वरील वर्णांपेक्षाही कमी आहे, 'र' आणि 'ल' हे वर्ण जवळजवळ एकच, व त्यांचें एकत्व प्रसिद्धही आहे, (रलयोरभेद'). श, ष, स या तीन वर्णांत उत्तरोत्तर कठोरता जास्त आहे आणि त्यांपैकीच 'स'-चा दन्त्य उच्चार 'श' आणि मूर्धन्य उच्चार 'ष' असा भेद आहे ख, छ, ठ थ, फ आणि घ, झ, ढ, ध, भ हे स्वतंत्र वर्ण न मानता त्यांना जोडाक्षरें मानणेंच योग्य आहे 'क मध्ये 'ह' मिळविला, कीं 'ख' होतो, 'ग' मध्ये 'ह' मिळविला कीं 'घ' होतो पाली व प्राकृत यामध्यें 'ख' वगैरे वर्णांना जोडाक्षर मानल्याचें दिसून येत पालीमध्ये आणि ऋग्वेदात 'ड' या वर्णाबद्दल 'ळ' येतो, व 'ढ' याबद्दल 'ळ्ह' येतो, याचें कारण हेंच. 'मुख' या शब्दातील 'ख' जोडाक्षर 'क' आणि 'ह' यापासून झालेलें आहे. प्राकृतात जोडाक्षरापैकीं प्रथमवर्णाचा पुष्कळ वेळा लोप होतो तेव्हा 'मुख' शब्दाबद्दल 'मुह' शब्द वापरण्याच बीज तरी हेच आहे. पालीमध्ये 'प्रभूत' शब्दाबद्दल 'पहूत' शब्द वापरतात, त्याचेंही हेच कारण आहे. तेव्हा मराठीत अगदीं मूळचे वर्ण पाहू गेलें असता अ, अनुनासिक, ग, ज, ड, द, ब, क, च, ट, त, प, र आणि स इतके चौदाच असावे, असें दिसतें. यातील प्रथम वर्ण सर्वांत मृदु असून शेवटचा सर्वांत कठोर आहे.

प्राकृत भाषांना देशभेदाने पुष्कळ नांवें आहेत. त्यांपैकीं एकऱ्या मगध देशातच तद्देशीय प्राकृत भाषेच्या तीन तऱ्हा झालेल्या दृष्टीस पडतात. त्यांपैकीं बौद्धमागधी किंवा पाली भाषा ही वैदिक व लौकिक संस्कृताशीं पुष्कळ अंशानीं सदृश आहे. दुसरी मागधी, विशुद्ध मागधी किंवा प्राकृत मागधी, ही त्या वेळच्या पंडितांची भाषा असावी, व

तिचा राजदरबारीं प्रभाव असावा, असें मानण्यास जागा आहे. तिसरी अर्ध-मागधी; ही मगध देशाच्या सरहद्दीवरील प्रदेशांत उपयोगांत येत असावी, असें वाटतें. मागधीच्या या तीनही प्रकारांत कसे फरक होतात हें, व यांचा संस्कृताशीं कसा संबंध आहे हें कळण्यासाठीं आपण एक गाथा घेऊन तिचीं या तीन भाषांत कसकशीं रूपांतरें होतात तें पाहूं:—

संस्कृतः—

रभसवशनम्रसुरशिरोविगलितमन्दारराजितांघ्रियुगः ।
वीरजिनः प्रक्षालयतु मम सकलमवद्यजम्बालम् ॥

बौद्धमागधीः—

रभसवसनम्मसुरसिरविगलितमन्दारराजितंघियुगो ।
वीरजिनो पक्खालेतु मम सकलमवज्जजम्बालं ॥

अर्धमागधीः—

लभशवशनमिलशुलशिलविअलिदमन्दाललाजिदंहियुगे ।
वीलजिने पक्खालदु मम शयलमवज्जजम्बालं ॥

प्राकृतमागधीः—

लहशवशनमिलशुलशिलविअलिदमन्दाललायिदंहियुगे ।
वीलयिने पक्खालदु मम शयलमवय्ययम्बालं ॥

ज्याप्रमाणें वैदिक भाषेचें नियमन करण्यासाठीं केलेल्या प्रयत्नांनीं एक परिनिष्ठित संस्कृत अशी निराळी भाषा होऊन ती व्यवहाराला निरुपयोगी झाली, तशीच स्थिती याही भाषांची झाली. त्या त्या भाषांचे निरनिराळे व्याकरणकार उत्पन्न झाले, व त्यांनीं प्रत्येक संस्कृत शब्दाचें रूपांतर झालेंच पाहिजे, आणि तें अमुक तऱ्हेनेंच झालें पाहिजे, असे पक्के नियम करून टाकिले. यामुळें त्यांच्या जिवंतपणावर गदा आली आणि परिनिष्ठित संस्कृताप्रमाणें त्या त्या भाषांतील ग्रंथांवरून या भाषा कधीं काळीं तरी बोलण्याच्या भाषा होत्या कीं नाहीं, अशी शंका वाटूं लागली.

आता या संबंधाचे जे मुख्य नियम सांगावयाचे आहेत ते असे:—

( १ ) संस्कृतातील ऋ हा पाली, प्राकृत किंवा मराठी भाषेत आढळत नाहीं, त्याच्या जागीं या भाषात सामान्यत. अ, इ किंवा उ हे वर्ण येतात —

| | संस्कृत | पाली | प्राकृत | मराठी |
|---|---|---|---|---|
| ( ऋ=अ ) | कृष्ण | कण्ह | कण्ह | कान्हा |
| | नृत्य | नच्च | नच्च | नाच |
| | वृद्धि | वड्ढि | वड्ढि | वाढ |
| ( ऋ=इ ) | शृङ्ग | सिंग | सिंग | शिंग |
| ( ऋ=उ ) | ऋजु | उजु | उज्जु | उजू |
| | वृद्ध | वुड्ढ | वुड्ढ | बुड्ढा |

सूचना—ऋण शब्दाबद्दल पालीमध्यें 'इण' वापरतात, पण हा आदेश उच्चारसौकर्यास अनुरूप नाहीं. प्राकृतांत त्याचे ऐवजीं 'रिण' हा आदेश होतो. मराठींतही 'रीण' असा शब्द आहे. मोरोपतानें 'रिण' असाच शब्द योजिला आहे. अलीकडील मराठींत संस्कृत रूपाचा प्रचार फार आहे.

( २ ) संस्कृत शब्दात दीर्घस्वराच्या पुढें जोडाक्षर आल्यास त्या दीर्घस्वराबद्दल पाली व प्राकृत यात ऱ्हस्व स्वर वापरतात. मराठींत पुढें हा ऱ्हस्व स्वर दीर्घ होतो, पण त्याबरोबरच संयुक्त व्यंजनापैकीं एकाचा लोप होतो —

| | | | |
|---|---|---|---|
| शून्य | सुञ्ञ | सुञ्ञ | सुना-नें |
| मार्जार | मज्जार | मज्जार | माजर (मांजर) |

( कोंकणात अनुस्वार फार असें म्हणतात. पण 'मांजर' यातील अनुस्वार कोंकणात नसून देशावर आहे. )

| | | | |
|---|---|---|---|
| मार्ग | मग्ग | मग्ग | माग (मारग) |

( ३ ) संस्कृत शब्दावयवात रेफ आल्यास त्याचे ऐवजीं पाली व प्राकृत शब्दात पुढील वर्णाचें द्वित्व होतें, व नियम ( २ ) प्रमाणें

दीर्घ स्वर ऱ्हस्व होतो. मराठींत मात्र संयुक्त व्यंजनांपैकीं एकाचा लोप होऊन मागील स्वर दीर्घ होतो:—

| | | | |
|---|---|---|---|
| कर्म | कम्म | कम्म | काम |
| गर्भ | गब्भ | गब्भ | गाभा |
| मार्ग | मग्ग | मग्ग | माग |
| शर्करा | सक्खरा | सक्खरा | साखर |

(४) आम्र व ताम्र या शब्दांतील 'र'बद्दल पाली, प्राकृत व मराठी भाषांत 'ब' आदेश होतो; व मराठींत पूर्व स्वर दीर्घ होतो:-

| | | | |
|---|---|---|---|
| आम्र | अम्ब | अम्ब | आंबा |
| ताम्र | तम्ब | तम्ब | तांबे |
| आम्रातक | अम्बातक | अम्बातक | आंबाडा (फळ) |

(५) संस्कृत शब्दांतील 'क्ष'बद्दल या भाषांत 'ख' किंवा 'च' येतो:—

| | | | | |
|---|---|---|---|---|
| (क्ष=ख) | क्षीर | खीर | खीर | खीर |
| | क्षत्रिय | खत्तिय | खत्तिय | खत्री |
| (क्ष=च) | क्षुल्ल (पिता) | चुल्लपिता | — | चुलता |
| (क्ष=क्ख) | पक्ष | पक्ख | पक्ख | पाख |

(६) संस्कृत शब्दांमधील 'द्य'बद्दल या भाषांत 'ज' येतो:—

| | | | |
|---|---|---|---|
| मद्य | मज्ज | मज्ज | माज |
| सद्यः | सज्जु | सज्जु | साजक |

(७) ग्, ड्, किंवा द् यापुढें वर्गांतील तृतीय किंवा चतुर्थ वर्ण आल्यास पूर्ववर्णाबद्दल पुढील वर्णाचें वर्गांतील तिसरें अक्षर येतें:-

| | | | |
|---|---|---|---|
| दुग्ध | दुद्ध | दुद्ध | दूध |
| बुद्बुद | बुब्बुल | बुब्बुल | बुडबुडा |

(८) पदाच्यामध्यें किंवा अंतीं आलेल्या 'ष्ट' किंवा 'ष्ठ'बद्दल 'ट्ठ' येतो:—

| | | | |
|---|---|---|---|
| नष्ट | नट्ठ | नट्ठ | नाठाळ |
| अष्ट | अट्ठ | अट्ठ | आठ |
| इष्टक | इट्ठक | इट्ठक | ईंट (वीट) |
| ओष्ठ | ओट्ठ' | ओट्ठ | ओठ |

( ९ ) पदाच्या आरंभीं असलेल्या 'स्त'बद्दल 'थ' आणि मध्यें आलेल्याबद्दल 'त्थ' येतोः—

| | | | |
|---|---|---|---|
| स्तन | थन | थान | थान |
| प्रस्तर | पत्थर | पत्थर | पत्थर-पाथर(-वट) |
| आस्तर | अत्थर | अत्थर | आथरणे. |

( १० ) पदाच्या आरभीं येणाऱ्या 'स्थ'बद्दल 'थ' किंवा 'ठ' व मध्यस्थ किंवा अंतस्थ 'स्थ'बद्दल 'ट्ठ' होतोः—

| | | | |
|---|---|---|---|
| स्थविर | थेर | थेर | थेर-डा |
| स्थान | ठान | ठान | ठाण |
| अस्थि | अट्ठि | अट्ठि | आठी(ळ) |

( ११ ) पदाच्या आरभीं येणाऱ्या 'त्स'बद्दल 'थ' होतोः—

| | | | |
|---|---|---|---|
| त्सरु | थरु | थरु | थरु (कोयत्याची मूठ) |

( १२ ) उत्सुक व उत्सव या शब्दांबद्दल पालींत उस्सुक व उस्सव असे शब्द येतात. पण प्राकृतामध्ये असा बदल करूं नये असें सांगितलें आहे. मराठींतही तसा बदल करीत नाहींत.

( १३ ) बिल्व शब्दाबद्दल पालींत बेलुव, प्राकृतांत बिल्ल व मराठींत बेल असे आदेश होतात.

( १४ ) ज्या जोडाक्षराचें दुसरें अक्षर 'ल' आहे, त्याच्या आदि-वर्णाच्या आणि ल—च्यामध्ये 'इ' हा स्वर येतोः—

| | | | |
|---|---|---|---|
| श्लोक | सिलोक | सिलोक | शिलोक (बायकी शब्द). |
| क्लेश | किलेस | किलेस | किळस |

(१५) जोडाक्षराचें दुसरें व्यंजन व असेल तर त्या व-चा लोप होतोः—

| | | | |
|---|---|---|---|
| ज्वलति | जलति | जलति | जळतें |
| द्वीप | दीप | दीप | — |
| स्वामी | सामी | सामी | सामी (तामिळींत) |
| द्वार | द्वार | दुवार | दार |

येथें प्राकृत व मराठी यांतच बदल झाला आहे.

(१६) जोडाक्षरांत ह्-च्या पुढें व् आल्यास त्यांची अदलाबदल होतेः—

| | | | |
|---|---|---|---|
| जिह्वा | जिव्हा | जिव्हा | जिव्हा |

पण मराठींत या शब्दाबद्दल जीभ शब्द फार वापरतात. पाली व प्राकृतांतही 'ह्' बद्दल भ घालण्याची पद्धत आहेः—

| | | | |
|---|---|---|---|
| गह्वर | गव्हर-गब्भर | गव्हर-गब्भर | गाभारा |

(१७) ब्-च्या पुढें वर्गांतील तृतीय किंवा चतुर्थ वर्ण आल्यास ब्-च्या जागीं पुढील वर्णाच्या वर्गांतील तिसरें अक्षर येतेंः—

| | | | |
|---|---|---|---|
| शब्द | सद्द | सद्द | साद |
| कुब्ज | कुज्ज | कुज्ज | खुजा |

(१८) पदाच्या आरंभीं येणाऱ्या 'स्क'बद्दल 'ख' येतोः—

| | | | |
|---|---|---|---|
| स्कंध | खंध | खंध | खांदा |
| संस्कृत | सक्कत | सक्कअ | — |

सूचनाः—'संस्कृत' या शब्दाबद्दल येणारे दोन्ही आदेश उच्चारसौकर्यास अनुरूप नाहींत.

(१९) 'ष्क'बद्दल 'क्ख' येतोः—

| | | | |
|---|---|---|---|
| शुष्क | सुक्ख | सुक्ख | सुखा किंवा सुका |

(२०) 'स्प' 'स्फ' व 'ष्प' यांबद्दल 'फ' किंवा 'प्फ' येतोः—

| | | | |
|---|---|---|---|
| स्पंद | फंद | फंद | फंद |
| स्फोट | फोट | फोट | फोड |
| स्फुटन | फुटन | फुटन | फुटणें |
| बाष्प | बप्फ | बप्फ | वाफ |

(२१) कांहीं ठिकाणीं पदाच्या आरंभीं येणाऱ्या 'प'बद्दल 'फ' येतोः—

| | | | |
|---|---|---|---|
| पुष्प | पुप्फ | पुप्फ | फूल |
| परशु | फरसु | फरसु | फरस |
| पनस | पनस | फनस | फणस |
| पर्शुका | फस्सुक | फरसुका | फासळ्या |
| परुष | फरुस | फरुस | फरस (दगडी जागा) |

(२२) 'क्त' व 'त' या जोडाक्षराबद्दल 'त्त' आणि 'क्थ'बद्दल 'त्थ' येतोः—

| | | | |
|---|---|---|---|
| भक्त | भत्त | भत्त | भात |
| सप्त | सत्त | सत्त | सात |
| सिक्थ | सित्थ | सित्थ | शीत (भाताचें) |

(२३) ष्ण, ष्ण, स्न, श्न आणि ह्न यांचे जागीं ण्ह येतोः—

| | | | |
|---|---|---|---|
| उष्ण | उण्ह | उण्ह | ऊन्ह. |
| तृष्णा | तण्हा | तण्हा | तहान. |

## संस्कृतांतून प्राकृतांत येतांना शब्दांत होणारे फेरफारः—

पुढील नियम पालीभाषेला मुळींच लागू नाहींत; व मराठींतही अशा प्राकृत शब्दांपासून फारशीं रूपें आलेलीं आढळत नाहींत.

(१) क, ग, च, ज, द, त, प, य आणि व हे नऊ वर्ण एकटे–असंयुक्त–असून शब्दाच्या आरंभीं नसतील तर त्यांचा प्रायः लोप होतो. नियमांत प्रायः पद घालण्याचें कारण प्राकृतप्रकाशांत असें सांगितलें आहे कीं, श्रुतिसुख होत असेल, तर त्या ठिकाणीं लोप होत नाहीं असें समजावें. याला उदाहरण ह्मणून विदुर, आदर, अपार, प्रयागजल, दव, दानव वगैरे शब्द दिले आहेत. पण या व्याकरण-कारांची श्रुतिसुखाविषयीं काय कल्पना होती हेंच कळत नाहीं. वर दिलेल्या शब्दात नियमाप्रमाणें बदल केला तर, ते जितके श्रुतिसुभग होतील, तितकेच पुढील शब्द होतात, असें सहज दिसून येईलः–

(क) शकट=सअट; नकुल=णउल; सहकार=सहआर; नौका=णोआ.

(ग) नग=णअ; सागर=साअर; भागीरथी=भाइरही; नगर=णअर.

(च) वचन=वअण; सूची=सुई (म. सुई); उचित=उइद; सूचक=सूअअ.

(ज) रजक=रअअ; प्रजापति=पआवइ; गज=गअ; रजत=रअद.

(त) वितान=विआण; रसातल=रसाअल; रत्न=रअण; कृत=किअ.

(द) नदी=नई; गदा=गआ; मदन=मअण; वदन=वअण.

(प) रिपु=रिउ; कपि=कइ; विपुल=विउल.

(य) वियोग=विओअ; नयन=नअण.

(व) दिवस=दिअह; लावण्य=लाअण्ण; जीव=जीअ.

( २ ) ख, घ, थ, ध आणि भ हे वर्ण असंयुक्त असून शब्दाच्या प्रारंभीं नसतील, तर त्यांच्याबद्दल प्रायः 'ह' हा वर्ण येतो. पालीमध्येही हा नियम कोठें कोठें उपयोगांत आणितात, पण प्राकृतापेक्षां त्या भाषेत या नियमाचा उपयोग कमीच आहे:—

(ख) मख=मह; मुख=मुह; मेखला=मेहला; सखी=सही; लिखति=लिहति (म० लिहितो).

(घ) मेघ=मेह; माघ=माह; लघु=लहु (म० हलु)

(थ) नाथ=नाह; गाथा=गाहा; मिथुन=मिहुण (म० मेहुण)

(ध) साधु=साहु; राधा=राहा; बधिर=बहिर (म० बहिरा)

(भ) सभा=सहा; स्वभाव=सहाव; शोभन=सोहण.

( ३ ) प्राकृतांत संस्कृत शब्दांतील 'न' बद्दल सर्वत्र 'ण' होतो. कांहींच्या मतानें आद्य 'न'बद्दल विकल्पानें ण होतो.

नदी=णई; कन्या=कण्णा; शयन=सअण.

( ४ ) 'प' असंयुक्त असून शब्दाच्या आरंभीं नसेल तर त्याबद्दल प्रायः 'व' होतो.

शपथ=सवह; शाप=साव; उपमा=उवमा; दीप=दीव (म० दिवा); कच्छप=कच्छव. (म० कांसव)

( ५ ) पदाच्या आरंभीं येणाऱ्या 'य'बद्दल 'ज' होतो. (मागधींत 'ज' होत नाहीं).

यशः=जस; यम=जम; यमुना=जउणा (तुल० अमुना;) ज्यति=जाति.

(६) अनुस्वाराच्या पुढें आलेल्या 'ह' बद्दल 'घ' येतो.

सिंह=सिंघ (सींह विकल्पानें); संहार=संघार.

सूचना–सर्व प्राकृतव्याकरणकारांमध्ये एक गोष्ट विशेष दिसून येते ती ही कीं, त्यांनीं पाली, व प्राकृत या भाषांना साधारण असलेले सर्व नियम प्रायः तिसऱ्या अध्यायाच्या आरंभीं दिलेले आहेत; आणि केवळ प्राकृतालाच लागू असलेले नियम दुसऱ्या अध्यायांत दिले आहेत. तिसऱ्या अध्यायांतील नियम फक्त संयुक्त व्यंजनांना लागू असून दुसऱ्यांतील फक्त असंयुक्तांनाच लागू आहेत. यावरून असें दिसून येईल कीं, पालीमध्यें फक्त संयुक्त वर्ण आल्यास फरक होतो, पण प्राकृतांत, संयुक्त असो किंवा असंयुक्त असो, फरक हा केलाच पाहिजे, अशी प्रवृत्ती असावी.

तेव्हां परिशिष्टांत दिलेल्या नियमांचें समालोचन केलें असतां असें दिसून येईल कीं, ठरीव नियमांप्रमाणें बनविलेले शब्द नेहमीं उच्चारास सुकर होतातच असें म्हणतां येणार नाहीं. मृदु वर्णांचे जागीं मृदुतर वर्ण घातल्यानें शब्दोच्चार सुलभही होत नाहीं व श्रुतिसुभगही होत नाहीं. वाजाच्या पेटींत स्वरांत मृदु व कठोर असा विभाग असतो; पण केवळ मृदु स्वरांनीं युक्त संगीत कधींही चांगलें वठत नाहीं. तीच गोष्ट भाषेंतील वर्णांसही लागू आहे. 'संस्कृत' बद्दल 'सुकअ'; 'पर्शुका'बद्दल 'फस्सुका'; 'वचन'बद्दल 'वअण'; 'दिवस'बद्दल 'दिअह' ही रूपें पाहिलीं असतां आणि हे मधील शब्द भाषेंत आले नाहींत हें लक्षांत घेतलें असतां वरील गोष्ट चांगली कळेल. उच्चार-सौकर्य कशानें साधतें याचा निर्णय आपल्या कळनकळ्याच आपोआप करितात; शास्त्रकारांच्या आज्ञेनें झालेला निर्णय अनुचीत व कृत्रीम आहे; आणि म्हणूनच त्या नियमांप्रमाणें बनविलेले शब्द व असेच शब्द वापरणाऱ्या भाषा या सर्व कृत्रीम आहेत.

# भाग दुसरा



# मराठी व्याकरणाची घटना

## १–प्रातिपदिकांचीं रूपें–(१)नामें

मराठी भाषा म्हणजे प्राचीन आर्य भाषेचें परंपरेनें बनलेलें आधुनिक स्वरूप, हें मागील विभागांतील संक्षिप्त इतिहासावरून दिसून येईलच. त्याचप्रमाणें सांप्रतचें मराठी व्याकरण म्हणजे संस्कृत व्याकरणाचें बनलेलें स्वरूप होय. व्याकरणाचे मुख्य दोन प्रकार;—नामादिकांचीं रूपें आणि क्रियापदाचीं रूपें. इतर गोष्टी या दोन प्रकारांच्या अंगभूत असावयाच्या. तेव्हां प्रथमतः हे दोन प्रकार सांगूं.

*वि भ क्ति रू पें*—पहिल्यानें असें सांगून ठेविलें पाहिजे कीं, पुढील प्रतिपादनांत संस्कृत व मराठी व्याकरणसंबंधी व्याख्या, लक्षणें, वगैरे प्रकार जे येतील ते वाचकास माहित आहेत, असें समजावयाचें. या गोष्टीही येथें सांगत बसल्यानें व्यर्थ कालक्षेप होईल. व्याकरणांत प्रत्यय, रूपें, यांचा इतिहासही सांगितला आहे. परंतु तो केवळ कारणापुरता सांगितला आहे. संस्कृत व्याकरणांत प्रथमेपासून सप्तमी, अशा सात विभक्ती आहेत. संबोधन हा प्रथमेचाच एक प्रकार मानितात. प्रत्येक विभक्तीचीं एकवचन, द्विवचन, आणि बहुवचन अशीं तीन वचनें. या विभक्तींचे मुख्य प्रत्यय असे सांगितले आहेतः—

| विभक्ती | एकवचन | द्विवचन | बहुवचन |
|---|---|---|---|
| प्रथमा | स् | औ | अस् |
| द्वितीया | अम् | औ | अस् |
| तृतीया | आ | भ्याम् | भिस् |

| | | | |
|---|---|---|---|
| चतुर्थी | ए | भ्याम् | भ्यस् |
| पंचमी | अस् | भ्याम् | भ्यस् |
| षष्ठी | अस् | ओस् | आम् |
| सप्तमी | इ | ओस् | सु |
| संबोधन | स् | औ | अस् |

हे प्रत्यय असेच्या तसेच व्यंजनान्त नामास लागतात, फक्त संधी मात्र व्हावयाचे. तथापि स्, हा प्रत्यय व्यंजनापुढें आला असतां जातो. हा तरी संधीच गणलेला आहे. व्यंजनान्त नामाना हे प्रत्यय लावितांना नामाचा लिंग-भेद लक्षात घ्यावयाचा नाहीं. तरी नपुसकलिंगी नामाच्या पहिल्या दोन विभक्तींचे प्रत्यय निराळे आहेत.

स्वरान्त नामाना आणि इतर काहीं नामाना विशेष प्रसंगीं निराळे प्रत्यय लागतात. नामाच्या अन्ताप्रमाणें आणि लिंगभेदाप्रमाणें प्रत्ययामध्यें काहीं फेरफार होतात. आपणास त्यातले मुख्य फेरफार तेवढे पाहिले पाहिजेत.

या प्रत्ययात तेच तेच प्रत्यय पुन्हा पुन्हा आहेत. याचा विचार केला तर एकंदर प्रकार असा होतो.—संबोधन हें प्रथमेचेंच स्वरूप, म्हणून तें गाळून टाकू. बाकी सात विभक्तींचे एकवीस प्रत्यय राहिले. त्यात एकवचनाचे निरनिराळे प्रत्यय सहा, द्विवचनाचे तीन, आणि बहुवचनाचे पाच मिळून सर्व प्रत्यय चौदा होतात. त्यातही पुन्हा द्विवचन आपल्यास नकोच. तेव्हा आपल्या विचारासाठीं अकरा प्रत्यय शिल्लक राहिले.

संस्कृत विभक्तींना द्विवचन आहे, तरी त्याचीं निरनिराळ्या विभक्तींचीं रूपें बहुधा एकसारखीं आहेत. फक्त तीन भिन्न रूपानीं सर्व कार्य होतें. पाली आणि प्राकृत यामध्यें द्विवचन नाहींच. संस्कृत आरण्यात विभक्तींमध्यें मात्र त्याचीं निरनिराळीं रूपें आहेत. यावरून संस्कृताच्या चलतीच्या काळींही द्विवचनाचा प्रघात थोडाच होता, असें दिसून येईल.

आता लिंगभेद आणि अन्त्य यामुळें या अकरा प्रत्ययात होणारे मुख्य फेरफार असेः—द्वितीया बहुवचनीं 'अन्'; तृतीया

एकवचनीं 'इन' आणि बहुवचनीं 'ऐस्' (आणि क्वचित् 'एहि' किंवा 'इहि'); चतुर्थी एकवचनीं 'य'; पंचमी एकवचनीं 'अत्'; षष्ठी एकवचनीं 'स्य' स्वरादि प्रत्ययांमागें क्वचित् 'न' लागतो. जसें–'ना' 'नाम्', इत्यादि.

सर्वनामप्रत्यय कांहीं निराळे आहेतः—पुल्लिंगी, प्रथमेच्या अनेकवचनीं 'ए', चतुर्थी, पंचमी आणि सप्तमी यांच्या एकवचनीं अनुक्रमें 'स्मै', 'स्मात्' आणि स्मिन्; षष्ठीच्या अनेकवचनीं 'साम्' यांतले कांहीं प्राकृतांत नामांनाही लागतात, हें पुढें दिसून येईल.

मूळ संस्कृतांत असलेल्या निरनिराळ्या विभक्ती आणि त्यांचे प्रत्यय, पुन्हा त्यांचे वैकल्पिक प्रत्यय, भिन्न अन्तांचीं आणि लिंगांचीं नामें, त्यांचीं निरनिराळीं रूपें, अशल्या पुष्कळशा कठीण गोष्टी कमी करून किंवा सौम्य करून लोकव्यवहाराची भाषा सुलभ राखावी, हा पहिल्यापासूनचा प्रयत्न दिसून येतो. त्या प्रयत्नाच्या परंपरेनें हल्लींच्या मराठींतलीं रूपें झालीं, हें लक्षांत ठेवावें. यासाठीं प्रथमतः फक्त अकारान्त नामें आणि तींही पुल्लिंगी नामें आणि त्यांचे प्रत्यय मुख्यतः घेण्यांत येऊन त्यांवरून प्राकृतांतलीं रूपें झालीं.

पा ली म धी ल वि भ क्ती—पालीमध्ये प्रथमा आणि द्वितीया भिन्न आहेत. तृतीयेंत पंचमीचा समावेश होतो. चतुर्थीचें एकवचनी रूप थोडेंसें येतें. परंतु सर्वत्र षष्ठीनें काम होतें. पुढें 'पुत्त' हा शब्द चालवून दाखवितों:—

| विभक्ती | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथमा | पुत्तो | पुत्ता |
| द्वितीया | पुत्तं | पुत्ते |
| तृतीया | पुत्तेन | पुत्तेहि, पुत्तेभि |
| पंचमी | पुत्ता पुत्तस्मा–पुत्तम्हा | पुत्तेहि, पुत्तेभि |
| चतुर्थी | पुत्ताय | पुत्तानं |
| षष्ठी | पुत्तस्स | पुत्तानं |
| सप्तमी | पुत्ते,पुत्तस्मिं,पुत्तम्हि | पुत्तेसु |
| संबोधन | पुत्त, पुत्ता | पुत्ता |

'राज' शब्द याहूनही सोपा आहेः—

| | | |
|---|---|---|
| प्रथमा | राजा | राजा, राजानो |
| द्वितीया | राजानं | राजा, राजानो |
| तृतीया, पंचमी | रञ्जा | राजूहि भि |
| चतुर्थी, षष्ठी | रञ्ञो | रञ्ञ, राजून |
| सप्तमी | रञ्ञे, राजनि | राजूसु |
| संबोधन | राजा | राजानो |

धेनु शब्दाचीं रूपें:—

| | | |
|---|---|---|
| प्रथमा | धेनु | धेनू, धेनुयो |
| द्वितीया | धेनु | धेनू, धेनुयो |
| तृतीया, पंचमी | धेनुया | धेनूहि,-भि |
| चतुर्थी, षष्ठी | धेनुया | धेनून |
| सप्तमी | धेनुया, धेनुय | धेनूसु |
| संबोधन | धेनु | धेनू, धेनुयो |

या रूपांचें मनन केलें असतां दिसून येईल, कीं, 'पुत्त' शब्दाच्या प्रत्ययांत तीन सर्वनाम-प्रत्यय शिरले आहेत (उदा०--पुत्ते, पुत्तस्मा, पुत्तस्मिं). 'राज' शब्द मूळचाच कठीण असल्यामुळें थोडा वेडा-वांकडा आहे. 'धेनु' शब्द अगदींच साधा आहे. 'राजा' आणि 'धेनु' यांचीं प्रथमा आणि द्वितीया यांचीं बहुवचनाचीं रूपें एकच आहेत. 'धेनु' शब्दाचीं पुष्कल रूपें अगदीं सारखीं आहेत. या शब्दाच्या एक-वचनीं 'उ' आणि अनेकवचनीं 'ऊ' हे अन्त्य सर्व प्रत्ययांच्या पूर्वी कायमचे आहेत. 'पुत्त' शब्दाच्या अन्तीं एकवचनीं 'अ' आणि अनेक-वचनीं 'आ' हे अन्त्य कायम आहेत. स्वरादि प्रत्ययांपूर्वी मात्र संधी झाले आहेत. हे प्रकार पुढें मराठी रूपें ताडून पाहातांना उपयोगी पडतील.

'पुत्त' शब्दाचीं प्राकृतांत रूपें:—

| | | |
|---|---|---|
| प्रथमा | पुत्तो | पुत्ता |
| द्वितीया | पुत्तं | पुत्ते |
| तृतीया | पुत्तेण,-णं | पुत्तेहि,-हिं |
| चतुर्थी | पुत्ताअ | पुत्ताण,-णं |
| षष्ठी | पुत्तस्स | |
| पंचमी | पुत्ता, पुत्ताहिंतो पुत्ताहि | पुत्ताओ, पुत्ताहिंतो |
| सप्तमी | पुत्तम्मि, पुत्ते | पुत्तेसु,-सुं |
| संबोधन | पुत्ता, पुत्त | पुत्ता |

*यांत चतुर्थीचें रूप 'पुत्ताअ' असें दिलें आहे, हें अगदीं क्वचित् आढळतें. म्हणजे मूळची चतुर्थी गेली.*

जुने पाली आणि प्राकृत व्याकरणकार चतुर्थी गेली आणि तिचें काम षष्ठीनें होतें असें सांगतात. ऐतिहासिक दृष्ट्या हेंच खरें आहे. पण आपण आपल्या मराठीच्या सोयीकरितां चतुर्थी जाऊन तिच्या जागीं षष्ठी आली, म्हणजे षष्ठीची चतुर्थी झाली असें म्हणूं. व्यवहार असाच आहे.

पालींत तृतीया आणि पंचमी या एक झाल्या. प्राकृतांतही तोच प्रकार दिसतो. परंतु प्राकृत व्याकरणकार वररुचि आणि हेमचंद्र यांनीं पंचमी निराळी दाखविली आहे. तो, दो, दु, ओ, उ, इत्यादि अक्षरें तृतीयेचा बहुवचनी प्रत्यय जो 'हि' त्यापुढें आणि सप्तमीचा बहुवचनी प्रत्यय 'सु' यापुढें लागतात, असें व्याकरणकार म्हणतात. कदाचित् 'तो' प्रत्यय संस्कृतांतील 'तस्' प्रत्ययावरून आला असेल; आणि 'हि' कदाचित् 'दक्षिणाहि' 'उत्तराहि' या संस्कृत रूपावरून आला असेल. अखेरीस 'हिंतो' आणि 'सुंतो' असे पंचमीचे प्रत्यय बनले. तथापि हे पुढें अपभ्रंशांत राहिले नाहींत.

*येथें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, बोलणारे सोईस येईल तसें बोलतात.* सोपीं सोपीं रूपें घेऊन त्यांच्या साम्यावरून इतर रूपें बोलण्यांत

येतात. ग्रथकार आणि व्याकरणकार तीं अमक्या शब्दावरून झालीं असें ठरवू पाहातात. हा ठरविण्याचा प्रकार केवळ कृत्रीम किंवा कल्पनामय असतो. तृतीया आणि पचमी याच्या उपयोगात फार गड बड होती पचमीचा अर्थ दाखविण्यासाठीं तशा अर्थाच्या कित्येक अव्ययाचा उपयोग होत होता पुढे 'होऊन' या कृदन्त अव्ययाचा उपयोग करण्याचा प्रघात कायमचा होऊन मराठींतली प च मी बनली. असा एकदर इतिहास दिसतो. पालीमध्य आणि प्राकृतात सर्वनाम-प्रत्यय येत, त्यातला सप्तमीचा 'स्मिं' मात्र 'म्मि' असा राहून बाकीचे नष्ट झाले अपभ्रंशात व मराठींत त्याचा 'इं', 'ईं' झाला अकारान्त पुलिंगी नामाचीं प्राकृत विभक्तिरूपें दिलीं आहेत इतर नामाच्या रूपात काहीं लक्षात घेण्यासारखा फरक नाहीं. अन्त्य सोपे करून अन्त्य आणि प्रत्यय याची जुळणी करण्याचा आणि उच्चारसौकर्याचा प्रयत्न मात्र सर्वत्र आढळून येतो 'पुत्ता' 'पुत्ताअ', असे निरनिराळ्या विभक्तींत आलेलीं प्रत्ययविरहित रूपें पुढें उत्पन्न झालेल्या सामान्य-रूपाचीं दर्शक होत.

आता 'पुत्त' शब्द अपभ्रंशाप्रमाणे चालवू

| | | |
|---|---|---|
| प्रथमा | पुत्तु | पुत्त |
| द्वितीया | पुत्तु | पुत्त |
| तृतीया | पुत्तेण, पुत्त | पुत्तहि,–हिं, पुत्तहिं,–हिं |
| चतुर्थी | [रूपें नाहींत, त्याच काम षष्ठीच्या रूपानीं होतें] | |
| पचमी | पुत्तहे,–हु | पुत्तहु |
| षष्ठी | पुत्तसु,–स्सु, पुत्तह | पुत्तह |
| सप्तमी | पुत्ते, पुत्ति, पुत्तहिं | पुत्तहिं |
| सबोधन | पुत्त | पुत्त [–हो, अव्यय] |

या रूपावरून दिसून येईल, कीं तृतीयेचा 'इण' आणि षष्ठीचा 'सु (स्सु)' याशिवाय सर्व प्रत्ययाचा लोप झाला आहे. प्रथमा आणि द्वितीया याच्या एकवचनाशिवाय इतरत्रही उकार येतो, आणि पुष्कळ ठिकाणीं 'ह' येतो 'उ' आणि 'ह' हीं अक्षरें फवळ

उच्चाराकरितां आहेत, असें दिसतें. 'ह' हें अक्षर नामाचा अन्त्य आणि स्वरादि प्रत्यय यांच्या जुळणीकरितांच येतें. हेमचंद्रानें सांगितलें आहे कीं, शेवटचा उकार आणि हकार यांचा उच्चार हळू करावा. यावरून अपभ्रंशांत प्रत्ययांचें काय उरलें ? अर्थात् शब्दाचा अन्त्य, आणि 'ह' चा झालेला 'अ' यां मिळून झालेलें सामान्यरूप.

प्राकृतांत आणि अपभ्रंशांत नपुंसकलिंगी नामांचे शेवटीं अनुनासिक असतें. मराठींत ( अपभ्रंशांतही ) तें अकारान्त नामांत नष्ट झालें. अनेकवचनीं आइँ, इँ यांपासून 'एँ' प्रत्यय झाला.

आतां ज्ञानेश्वरीची भाषा म्हणजे जुनें मराठी यांतील रूपें पाहूं. मराठींत 'पुत्त' यांचें 'पूत' झालें.

| | | |
|---|---|---|
| प्रथमा | पूतु, पूत | पूत |
| द्वितीया | पूतु, पूत | पूत |
| तृतीया | पूतें, पूतार्थी | पूतीं, पूतांशीं |
| चतुर्थी | पूतास, पूतातें | पूतांस, पूतांतें |
| पंचमी | पूता-होऊनि, पूता-होनी-होनी, पूताहूनि, | पूतांहोऊनी, इ०. |
| षष्ठी | पूताचा | पूतांचा |
| | ( विशेषणरूप ) | |
| सप्तमी | पूतीं | पूतीं |
| संबोधन | पूता | पूत(हो) |

हीं निव्वळ जुन्या मराठीचीं रूपें सांगितलीं. यांशिवाय केवळ आकारान्त व क्वचित् ईकारान्त सामान्यरूप हें तृतीयेपासून पुढें ह्या त्या विभक्तीचें रूप म्हणून उपयोगांत आहे. तसेंच कांहीं संस्कृत आणि प्राकृत रूपांचा अवशेषही ज्ञानेश्वरींत आणि त्या वेळच्या मराठींत आहे. त्याचप्रमाणें शेवटीं उ, इ, ई, इ, यां, इत्यादि लागलेलींही रूपें आहेत. या रूपांचा विचार पुढें होईल. आतां पुढें सांप्रतच्या मराठींतलीं रूपें पाहाः—

| | | |
|---|---|---|
| प्रथमा | पूत | पूत |
| द्वितीया | पूत | पूत |
| तृतीया | पूतें, पूताने, पूतार्थी | पूतानीं, पूताशी, पूताहीं |
| चतुर्थी | पूताला, पूतास, पूतातें. | पूताला, पूतास, पूताते. |
| पचमी | पूताहून | पूताहून |
| षष्ठी | पूताचा | पूताचा (विशेषणरूप) |
| सप्तमी | पूतीं | पूतीं |
| सबोधन | पूता | पूतानो |

अपभ्रशात दोन प्रत्ययाशिवाय बाकीचे सर्व गेले अशी भाषा साध्या बोलण्यात कशी तरी चालेल, परतु वाड्मयात आणि लेखन व्यवहारात अशा भाषेने निर्वाह होणार नाहीं तेव्हा नामादिकाचीं रूपें कशीं करावीं असा प्रश्न प्रथमारभींच्या ग्रथकारास पडलाच पाहिजे. या वेळीं प्राकृत भाषा फार दूर नव्हती प्राकृतामधून काहीं प्रत्यय घेतले, आणि विभक्ती पुन्हा सजविल्या

जुन्या मराठींत द्वितीयेपासून सर्व विभक्तींत सामान्य असें एकवचनीं 'पूता–' आणि अनेकवचनीं 'पूता–' असें रूप सिद्ध झालें होते. स्वरादि प्रत्ययाबरोबर सधी होऊन पूतें, पूतीं, अशीं रूपें झालीं. तेव्हा हें एक सर्वसामान्य असे विभक्तिरूप बनलें याचा हव्या त्या विभक्तीसाठीं उपयोग ज्ञानेश्वरींत विपुल आहे. पचतत्र हा गद्यग्रथ असून त्यातही तसेंच आहे. तेव्हा वस्तुत असे दिसून येईल कीं प्रथमा आणि द्वितीया, आणि हें सामान्यरूप या तीनच विभक्ती मराठींत उरल्या. निरनिराळे सबध दाखविण्यासाठीं पुढें निराळ्या स्वतत्र शब्दाचा म्हणजे शब्दयोगी अव्ययाचा उपयोग होऊ लागला असा उपयोग करण्याची चाल अपभ्रशाच्या काळातही होती. अर्थात प्रत्ययाची भानगड जाऊन शब्दाच्या परस्पर जुळणीनें विभक्ति सबध दाखविण्याची तऱ्हा आली तेव्हा मराठींत विभक्तिरूपाची व्यवस्था अशी झाली —

| | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथमा आणि द्वितीया | पूत | पूत |
| सामान्यरूप | पूता | पूतां |

या सामान्यरूपापुढें विभक्तिसंबंध दाखविणारे अव्ययरूप शब्द जोडिले म्हणजे विभक्तींच्या अर्थाचे शब्द तयार झाले. ते असे:—

| | | |
|---|---|---|
| तृतीया | पूताकडून | पूतांसह |
| चतुर्थी | पूताकारणें | पूतांसाठीं, पूतांर्थ |
| | पूतासाठीं | [ पूतां+अर्थ ] |
| पंचमी | पूतापासून | पूतांहोऊन |
| षष्ठी | पूतासंबंधीं | पूतांविषयीं |

सप्तमी पूता+आंत=पूतांत, पूताठायीं; पूतांमध्ये, पूतांमधीं, इ०.

येथें फक्त थोडीं अव्ययें लावून दाखविलीं आहेत. प्रत्येक विभक्तीचीं अनेक शब्दयोगी अव्ययें, अथवा त्यांपासून बनलेले नवीन प्रत्यय आहेत. ही सामान्यरूपाला शब्द जोडून विभक्तिरूपें करण्याची पद्धत जर अशीच राहिली असती, तर भाषा अगदीं साधी, सोपी बनली असती. इंग्लिश भाषेत जुन्या काळीं सर्व विभक्ती प्रत्ययांनीं होत. पुढें प्रत्यय जाणें सुरू होऊन ते सर्व नष्ट झाले, आणि शब्दयोगी अव्ययांच्या साह्यानें संबंध दर्शविण्याची चाल पडली. इंग्लिश भाषेत ही चाल कायमची झाली. याचें कारण ती भाषा बोलणारे लोक बेटामध्यें एकीकडे स्वतंत्र राहात होते, यामुळें त्यांच्या भाषेवर जुन्या भाषा ल्याटीन, ग्रीक, किंवा शेजारच्या भाषा, यांचा पगडा पडला नाहीं. इंग्रजी भाषेला स्वतंत्रपणे आपली सुधारणा करून घेण्यास पाहिजे तशी मोकळीक मिळाली. युरोपांतील अन्य भाषांमध्यें अजून प्रत्यय-घटित रूपांची भानगड आहे. मराठीला अशा रीतीनें विभक्तींच्या प्रत्ययांतून अगदीं मोकळें होण्याची संधी आली होती. परंतु तिच्या मार्गे संस्कृत आणि प्राकृत यांची परंपरा होती. संस्कृत आणि प्राकृत या भाषांमध्यें ग्रंथ तयार होत. तोच क्रम मराठीनें पुढें चालविला. संस्कृत आणि प्राकृत या भाषा व्याकरणबद्ध असल्यामुळें

त्यातील विभक्तींची माडणी मराठीपुढें उभीच होती. तसेंच मराठीची ग्रथरचना कवितेंत पडली, यामुळें जुनाट रूपाचा उपयोग भाषेंतून गेला नाहीं. अर्थात् मराठींत जुन्या विभक्तिप्रत्ययाचे अवशेष कायम राहिले आहेत. मात्र ते अगदीं थोडे आहेत, हें लक्षात येईलच.

सध्या मराठींत जे प्रत्यय ह्मणून आहेत, ते कसे झाले आहेत हें पाहू. जुन्या परपरेनें नामाचे एकवचनीं आणि अनेकवचनीं अन्त बनून नामें मराठींत आलीं तींच त्याचीं प्र थ मे चीं रू पें झालीं. अन्त्य, उपान्त्य आणि अनेकवचन, याविषयीं पुढें चर्चा केली आहे.

तृ ती या—तृतीयेचा 'आ' प्रत्यय ( उदा०—डोळा ) हा सानुस्वार सामान्यरूप आहे. 'ऍं' प्रत्यय अपभ्रंशातला आहे. तोही वास्तविक सानुस्वार एकारान्त सामान्यरूपच आहे. अनेकवचनीं 'हीं' प्रत्यय हा पुरातन सस्कृतातला प्रत्यय 'एहिं', 'इहिं' याचेंच रूप आहे. तो प्राकृतातून पुढें शेवटपर्यंत येऊन पोंचला आहे. याचें अल्परूप 'ईं' असें झालें आहे.

तृतीयेचा सस्कृत प्रत्यय 'इन' आहे. हा प्राकृतात ही आहे. हाच प्रत्यय लागून जुन्या मराठींत रूपे झालीं आहेत. मालवणी आणि चित्तपावनी भाषेंत आणि कोंकणात अन्यत्रही फक्त 'न' प्रत्यय आहे. जसें—'देवान दिलन'. या 'न' मध्यें 'ऍं' एकवचनीं आणि 'ईं' अनेकवचनी मिळून 'नें' आणि 'नीं' हे प्रत्यय झाले. हे दुहेरी प्रत्यय आहेत; आणि 'न' मध्यें 'ऍं' किंवा 'ईं' हे प्रत्यय रूपाना विशेष जोर येण्यासाठीं मिळालेले दिसतात. ज्ञानेश्वरीमध्यें कर्तृदर्शक तृतीया बहुधा 'ऍं' प्रत्यय लागून होते, व करणी तृतीया 'एनि' लागून होते. पण दोन प्रकारची मिसळही आहे. उदा०—वारेनि ( वाऱ्यानें ), मुकेनि ( मुक्या माणसानें ), उन्हाळेनि, इ०. 'एनि' किंवा 'नि' हें 'नें' चे पूर्व स्वरूप आहे. 'नें' 'नीं' हे प्रत्यय प्रथमतः सर्वनामाना होऊ लागले. ज्ञानेश्वरींत तेणें, येणें, जेणें, अशीं रूपें आहेत. नतर ते नामाना मागून होऊ लागले. पचतत्रामध्य नुस्ता 'न' प्रत्यय नामाना आहे आणि 'नें' आणि 'नीं' हेही आहेत. खिस्तपुराणात 'न' प्रत्यय आहे. 'नें' आणि 'नीं' हे

प्रत्यय पंधराव्या शतकाच्या अखेरीपासून नामांना लावलेले जुन्या पत्रांमध्यें आढळतात.

दुहेरी प्रत्यय लावण्याची चाल फार प्राचीन आहे. ती वेद भाषेंत ही बरीच आढळते. 'हस्त' आणि 'देव' यांचें 'हस्ताः' आणि 'देवाः' असें व्हावयाचें, त्याप्रमाणें आणखी 'हस्तासः' 'देवासः' अशींही रूपें आढळतात. 'महत्त्व' हें भाववाचक नाम 'महत्वता' असें वेदांत येतें, तर आपल्या वामन कवीस 'मौन्यपण' असें केल्याबद्दल दोष द्यावयास नको! चालू भाषेंत आपण 'दास्यत्व' असें ह्मणतों. अशीं रूपें कदाचित् साहचर्यानेंही होत असतील. एका शब्दाचें रूप अमुक एक झालें आणि तो शब्द व तें रूप हीं विशेष रूढ असली म्हणजे त्यांसारखे दिसणारे दुसरे शब्द तसेच असावे असें वाटतें. अशा रीतीनें प्रत्येक भाषेंत अनेक रूपें तयार होतात, हा अनुभव सर्वत्र आहे. 'भर', 'वीर' यांचीं रूपें 'भरला', 'विरलें' अशीं होतात, तर 'कर', 'मर' यांचीं 'करला', 'मरला' अशीं रूपें कां होऊं नयेत, असें साहाजिक वाटतें. 'मरुत्' याचें जर 'मरुतः' होतें, तर 'देव' याचें देवासः' करावें असें वाटतें. येथें 'देवाः' यांत प्रत्यय लागला नाहीं असा भास होतो आणि तें रूप कोतें वाटतें. इंग्रजी भाषेंतलें Children हें दुहेरी प्रत्ययघटित रूप मदशूर आहे.

'शीं' असा 'सह', बरोबर, या अर्थाचा तृतीयेचा प्रत्यय आहे. हा 'सम' यापासून झाला असें कोणी मानितात, कोणी 'सह' पासून झाला असेंही म्हणतात. 'सवें' असा प्रत्यय आहे, तो 'सम' यापासून झाला, आणि 'सह' यांतला 'ह' जाऊन आणि 'ईं' लागून 'सीं' झाला असें दिसतें. 'स'च्या पुढें इ, ए, इत्यादि स्वर आले असतां त्याचा 'श' उचार होतो. अशा प्रकारें 'शीं' झाला. 'सवें' या पासून ही 'शीं' होईल. सम, सह, हीं दोन्ही अव्ययें अर्थाला एकच आहेत. सम, सह, यांच्या अगोदर संस्कृतांत तृतीया असते. मराठीमध्येंही 'सोन्यानिशीं' असें रूप येतें.

चतुर्थी—'स' हा प्रत्यय संस्कृतांतील षष्ठीचा प्रत्यय 'स्य' आणि प्राकृतांतील 'स्स' यांपासून झाला. 'स्य', 'स्स', 'स' ही परंपरा संस्कृत,

पाली, प्राकृत आणि अपभ्रंश यांत सारखी चालू आहे. 'स' याचें 'ई' लागून 'सी' होतें. कारण जुन्या मराठींत पुष्कळ वेळा शब्दाचे शेवटीं 'ई' स्वर येतो. हा 'सी' आणि तृतीयेचा 'शीं' यामध्ये घोंटाळा होऊन दोन्ही एकच असें कोणास वाटतें. परंतु असें वाटण्याचें कारण दोहोंची एकरूपता हें आहे. वरोवरी ते एक नाहींत.

'समान देणें अरिमित्रासी। उदारता काय वर्णूं ? '

येथें 'अरिमित्रासी' ही चतुर्थी आहे. येथें 'अरिमित्राशीं' असें कोणी म्हणणार नाहीं, आणि अशीं अनुस्वारही येणार नाहीं. पण 'रामाची हरीशीं बरोबरी नाहीं' यात 'हरीसी' असें कोणी म्हणणार नाहीं, आणि अनुस्वारही नाहींसा होणार नाहीं. तेव्हा 'हरीशीं', ही तृतीया आणि 'अरिमित्रासी' ही चतुर्थी.

'स' अथवा 'सी' हें रूप 'स्स'चेंच आहे, याचें एक जुनें प्रमाण आहे. ज्ञानेश्वरीच्या अगोदरचा त्रोटक ज्योतिषग्रंथ रत्नमाला यात 'अमक्याचा स्वामी अमुक' अशा अर्थाची 'बुधासी विष्णू', 'बृहस्पतीसी ब्रह्मा', 'सूर्यासी अग्नि', 'गुरूसी इंद्र', अशीं वाक्यें आहेत.

'ला' हा प्रत्यय 'लागीं,' या 'लग्' धातूच्या रूपापासून आला. [ लग्न–चिकटलेलें, लागलेलें ] हा निरनिराळ्या रूपानीं हिंदी, पंजाबी, सिंधी व व्रजभाषा यामध्येंही आहे. प्राकृतात हा 'लग्गइ' असा आहे. खानदेशी मराठींत 'ले' आहे. कोंकणच्या भाषात तो 'ला', 'ल', 'ले', असा आहे. जुन्या भाषेंत तो सर्वनामाना होतो. ज्योतिषग्रंथात 'याला' असें रूप आहे. हा प्रत्यय पंचतंत्रात धातुसाधित अव्ययाना लावलेला आढळतो (उदा०—खायाला), आणि क्वचित् नामानाही आलेला आहे.

'तें' हा प्रत्यय 'तेहिं' या अपभ्रंशातल्या शब्दयोगी अव्ययापासून आला. अपभ्रंशात 'ह'चा उच्चार तोकडा होता, तो पुढें नष्ट झाला. त्यातला 'इ' स्वरही जाऊन, अनुस्वार मागील 'ते'वर गेला, आणि 'तें' असा प्रत्यय मराठींत झाला. याचा उपयोग ज्ञानेश्वरीपासून कवितेमध्यें सर्वत्र आहे.

अनेकवचनी प्रत्यय 'ना' ( देवाना ) हें प्राकृत प्रत्यय 'ण' याचें रूप असावें. अथवा देवा+ला=देवान्+ला=देवाना, असेंही होईल.

'देवान्‌ला' 'लोकान्‌ला' असें साध्या बोलण्यांत आपण म्हणतोंही. अनुस्वार आणि 'ल' मिळून 'न' झाल्याचें दुसरें उदाहरण करी+ल ( भविष्यकाळचा प्रत्यय )='करीन' हें क्रियापदरूप आहे. आतां येथें 'ना' झाल्यावर मागील अनुस्वार गेला पाहिजे. पण अनेकवचनीं सामान्य-रूपाच्या शेवटीं अनुस्वार असतो, या सामान्य नियमानें, आणि उच्चारांत फारसा फरक नाहीं, म्हणून अनुस्वार देण्याची चाल कायम राहिली.

पं च मी—जुनीं पंचमीचीं रूपें अगोदरच नष्ट झालीं होतीं. 'तुंतो आणि हिंतो' हे प्रत्यय लागून होणारीं प्राकृतांतील पंचमीचीं रूपें अपभ्रंशांत आलीं नाहींत मराठींत पंचमी विभक्ती होऊन हें कृदन्तरूप नामाच्या सामान्यरूपापुढें किंवा नुसत्या नामापुढें येऊन होऊं लागलीं. पुढें 'होऊन' याचें 'हौन', 'होन' आणि शेवटीं 'हून' झालें.

"सुवर्ण-होऊनि आलें । लेणीं ममती भिन्नें.
मग पाहिजे तंव सोनें । आघवें चि तें."

—ज्ञानेश्वरी.

"पाताळा-होऊनि निम्न । जियेचिये उंचिये साने गगन,
जिये पाहातां त्रिभुवन । अणुहि नव्हे."

—ज्ञानेश्वरी.

"स्वरूप, वैभव, अलंकार । श्रिये-होऊन सुंदर,
सेवेलागीं अतितत्पर । सदा सादर सावधाने."

—एकनाथ.

"राजगडास वाराणसी-होऊन सुखरूप पावल्यावरी मथुरेस माणसें पाठविलीं."

—सभासदविरचित छत्रपति-चरित्र.

"काळोखा-होउनु उजुवाडु वरवा काय ऐसें कोणुइ न पुसे".

—ख्रिस्तपुराण, प्रस्तावना.

"निष्टुर तियेचें अंतःकरण । पाषाणा-होऊनि कठिण,
म्हणौनि शस्त्र न लगे जाणा । मनुष्याचे जिवीं."

—पहिलें पुराण.

"इजिता-होऊनि आलियावरी। मरले तिन्हीमाम वेरी,
लोकु क्रमौनी पातले पुढारी। सिनाई पर्वती."

—किस्त.

ख्रिस्तपुराणांत पंचमीचा प्रत्यय सर्वत्र होऊन हाच आहे. ख्रिस्तपुराणाचे अगोदर ज्ञानदेव, मुकुंदराज आणि एकनाथ यांचे ग्रंथ होते. यांशिवाय आणखीही ओवीबद्ध वाङ्मय असावें. ज्ञानदेव आणि एकनाथ यांचे ग्रंथ लेखकांचे हातीं सापडून त्यांतील जुनीं रूपें बदललीं आहेत, यामुळें 'होऊन' याचें होनी, होनी, होन, हून असें झालें. परंतु ख्रिस्तपुराण १६१० सालीं रोमनलिपींत छापलें गेलें आणि त्यात फरक होण्यास कारणच नव्हतें, यामुळें त्यांत 'होऊन' लागून झालेलीं आणि त्या वेळचीं दुसरीं रूपें जशींच्या तशींच कायम राहिलीं आहेत.

ज्ञानेश्वरीमध्यें बरींच रूपें 'क्लेशौनि', 'काष्ठौनि', मेघौनि', 'नखौनि' अशीं लिहिलेलीं आहेत. 'मुंबईहून' म्हणजे 'मुंबई आहे तेथून'. 'होऊन' याचें 'हून' झाल्याचीं दुसरीं उदाहरणें आहेत;—'मी-होऊन असें करणार नाहीं,' 'तो-होऊन तेथें गेला तर बरें'—येथें 'मीहून' 'तोहून' असें होतें. प्रांतिक मराठींत 'घरसून' 'मुंबईसून' अशीं रूपें आहेत, तीं 'घर-असून', 'मुंबई-असून' यांवरून मधील अचा लोप होऊन झालीं. 'अस' धातूच्या अचा लोप संस्कृतांत होतो आणि कोकणी-भाषेंतही होतो. 'मैं सलों', 'तूं सस', 'तो से', 'ते सत' अशीं रूपें चित्पावनींत आहेत. पूर्वरूपसंधीमध्येंही अचा लोप होईल. कोंकणी भाषेंत 'घराशीं ऐलो' 'घरासनी ऐलो' अशीं रूपें होतात. हीं 'असून' यावरूनच आलेलीं आहेत. बंगाली आणि हिंदी यांमध्येंही 'हो'च्या धातुसाधिताचा असा उपयोग आहे. बंगाली—'घर-हइते आसिलाम'. हिंदी—'बनारस-होके आया हूं.' इत्यादि.

म्हणून, करून, बोलून हीं रूपें ज्ञानेश्वरींत म्हणौनि, करौनि, बोलौनि अशीं येतात. पंचमीचीं रूपें 'हौनी' लागून झालेलीं कष्टौनि (कष्टाहून), मेघौनि (मेघापासून), जन्मौनि, अशीं ठिकठिकाणीं आहेत. तसेंच 'होन' असें रूप लागून झालेलींही आहेत. यावरून होऊन याचाच 'हून' आणि त्याचाच पुढें 'ऊन' असे प्रत्यय झाले.

षष्ठी—संस्कृतांतील मूळच्या षष्ठीची चतुर्थी झाली; इतकेंच नाहीं, पण अपभ्रंशांत सर्व विभक्तींमध्यें आढळणारें 'हत्य-न्ह' असें रूप षष्ठीचेंच होय. ही विभक्ती दुसऱ्या सर्व विभक्तींचें काम करिते असें संस्कृतांत आहे. मूळची षष्ठी गेल्यावर षष्ठीचें स्वामित्व दाखविण्याचें काम 'च' (चा, ची, चें)-प्रत्ययान्त विशेषणानें होऊं लागलें. (देवाचा, देवाची, देवाचें); तेव्हां ऐतिहासिक दृष्ट्या मराठींत षष्ठीचीं रूपें नाहींत. च-प्रत्ययान्तरूपें विशेषणाखालीं येतील. परंतु भाषेचा अभ्यास करणारांच्या सोयीकरितां तीं रूपें षष्ठी विभक्तीच्या सदराखालीं घालण्यास चिंता नाहीं.

हा 'च'-प्रत्यय संस्कृतांत 'त्य' म्हणून जो विशेषणाचा प्रत्यय आहे, तोच होय. पालींत आणि प्राकृतांत त्याचें 'च्च' असें होतें. सत्य–सच्च, साच; 'च्च' चा 'च' होतांना मागें 'अ' असतां त्याचा 'आ' होतो व मागें ऱ्हस्व स्वर असल्यास तो दीर्घ होतो. या गोष्टीचें आणि विभक्तीचे प्रत्यय लागण्याचे पूर्वी होणारें सामान्यरूप यांचें अगदीं साम्य असल्यामुळें च-प्रत्ययाच्या पूर्वींही सामान्यरूपच होतें असें आपण समजतों.

च-प्रत्ययान्त विशेषणाची व्यवस्था मराठींतील लिंगाप्रमाणें फिरणाऱ्या इतर विशेषणांप्रमाणेंच आहे. त्यास नामाप्रमाणें समजून त्याला विभक्तीचे प्रत्ययही लावितां येतात.

सप्तमी—सप्तमीचे 'आं' आणि 'ईं' हे दोनच प्रत्यय आहेत. 'आं' हें सामान्यरूप आहे. मात्र अंतीं अनुस्वार आला आहे. 'ईं' हा प्रत्यय संस्कृतांतील सर्वनामप्रत्यय 'स्मिन्' आणि त्यावरून प्राकृतांत आलेला 'म्मि' यापासून झाला. 'ईं' हा प्रत्यय पाय, कान, हात, घर, शिर, मुख इत्यादि विशेष उपयोगांतल्या कित्येक अकारान्त शब्दांस जुन्या भाषेंत आणि कांहीं ठरीव वाक्यांत येतो. 'हें माझ्या हातीं नाहीं,' 'राम कौसल्येच्या उदरीं आला,' 'ती गोष्ट माझ्या कानीं आली आहे'. अशाच रीतीनें तोंडीं, मुखीं, गांवीं, रात्रीं, दिवसीं, इत्यादि.

'आं' हा प्रत्यय 'पाय' यास आणि कांहीं आकारान्त नामांस जुन्या भाषेंत येतो.

वरील उदाहरणांशिवाय चालू भाषेंत प्रत्यय लागून सप्तमी विभक्तीचीं रूपें होत नाहींत. ती विभक्ती आत, मध्यें, मधीं, वगैरे शब्दयोगी अव्ययें लागून होते.

संबोधन.—नामाचें सामान्यरूप हें संबोधनाचें एकवचन, आणि त्यास 'नो' हें अव्यय लागून अनेकवचन होतें. संबोधनाचें एकवचन हें नामाचें सामान्यरूप, असा नियमच जाणावा. असाच अगदीं हुबेहूब प्रकार पालीमध्यें आहे.

मराठींत अगदीं जुने विभक्तिप्रत्यय फक्त एक दोन आहेत. ते स्वरादि असल्यामुळें ह्यांचे अगोदर सामान्यरूप होत नाहीं. शिवाय ते सगळ्या नामांना लागतही नाहींत. थोडेसे नवीन प्रत्यय आहेत, पण विभक्तीचीं रूपें नामाच्या सामान्यरूपापुढें निरनिराळ्या विभक्तींचा अर्थ दाखविणारीं शब्दयोगी अव्ययें लागून होतात. यांतलीं कित्येक अव्ययं मूळचे शब्द असून आतां त्याचा स्वतंत्र उपयोग नाहींसा झाला आहे, यामुळें ते प्रत्ययच झाले आहेत. जसे,—देवाप्रति, देवास्तव, देवासाठीं, देवापाशीं, देवाकरवीं, देवाबद्दल, देवांमाजी, इ०. हे नवे प्रत्यय आणि प्रत्येक विभक्तीचीं शब्दयोगी अव्ययें यांचें विशेष विवरण व्याकरणांत पाहावें.

अनेकवचन.—अपभ्रंशांत पहिल्या दोन विभक्तींचीं दोन्ही वचनें सारखींच. यामुळें मराठींत बहुतेक पुल्लिंगी नामांचीं दोन्ही वचनें सारखींच बनलीं आहेत. कित्येक आकारान्त नामाचें अनेकवचन एकारान्त आहे. या आकारान्त नामांचा अन्तींचा दुसरा 'अ' हें संस्कृतांतील 'क'चें रूप आहे. यामुळें या नामांच्या अंतीं आलेले दोन 'अ' या स्वराचा संधि 'ए' होतो.

स्त्रीलिंगी नामात हीं दोन्हीं रूपें सारखीं असण्याचा प्रकार बहुतेक आहे. तेव्हां अनेकवचनाचा विचार करितांना 'रीत' याचें मूळरूप 'रीति' अनेकवचन 'रीती'; 'वीट' याचें मूळ रूप 'इष्टिका' अनेकवचन 'विटा';—अर्थात् दोन्ही रूपे सारखींच होतात. अकारान्त स्त्रीलिंगी नामें हीं मूळचीं आकारान्त किंवा ईकारान्त आहेत. त्यांचें अकारान्त रूप हें केवळ प्रथमेच्या एकवचनाचें रूप आहे.

नपुंसकलिंगी नामाचा प्राकृत अनेकवचनीं प्रत्यय 'आईं', 'ईं', असा आहे. त्यापासून 'फळें', 'केळीं', 'मोत्यें', इत्यादि नपुंसकलिंगी नामांचे अन्त्य बनतात. 'मोत्यें' याचें 'मोतियें' असें रूप जोडाक्षरांतील अवयवांत स्वर शिरून होतें.

सामान्यरूप.—संस्कृतांत नामांचा लिंग-भेद आणि अन्त्य यांवरून प्रत्ययांत भेद होतो. तसेंच त्या प्रत्ययांच्या अगोदरचें रूपही तीन प्रकारचें होत असतें, शिवाय नामाचें अन्त्याक्षर आणि प्रत्ययाच्या आरंभींचा स्वर, अथवा व्यंजन यांचे संधी, इत्यादि भानगडींमुळें रूप बनविणें ही गोष्ट कठीण वाटण्यासारखी आहे. जनपदभाषेंत या प्रकारांकडे दुर्लक्ष करून नाम आणि प्रत्यय यांचा संयोग सोपा करण्याचा प्रयत्न आहे. पालींमध्यें निरनिराळ्या अंतांच्या नामांचें प्रत्ययांपूर्वी एक ठरींव रूप होतें, असें दिसून येईल.

अपभ्रंशांतही असाच प्रकार आहे. पुत्ता-ह, असें रूप तृतीयेपासून पुढें सर्वत्र आहे. मराठींत एकवचनीं पुत्ता– आणि अनेकवचनीं पुत्तां– अशीं तृतीयेपासूनच्या सर्व विभक्तींचीं दोन सामान्य रूपें बनलीं.

प्रत्यय नसल्यामुळें शब्दयोगी अव्ययें लावावयाचीं. हीं नामाच्या पुढे जोडतांना दोहोंचा एकजीव होऊन एक शब्द बनण्यास नामाचें कांहीं रूप बनलें पाहिजे. याकरितां भाषेंतली शब्द जोडावयाची नेहमींची रीत अशी आहे कीं, षष्ठीचें रूप करून पुढें शब्द जोडून लावा. पुढील उदाहरणें पाहा:—

'रामाच्या-कडून हें काम होणार नाहीं.'

'वैद्याच्या-पासून औषध आण.'

'हरीच्या-मध्यें किंवा हरीच्यांत ( हरीच्या—आंत ) कांहीं पाणी नाहीं.'

'माझ्या-पेक्षां त्याच्याजवळ ( त्याच्यापाशीं )हरीचें चांगलें जुळतें.'

'आमच्या-पाशीं असल्या गमज्या चालणार नाहींत.'

'दगडाच्या-पेक्षां वीट मऊ.'

'आयच्या घराच्या-पुढें एक मोठें झाड आहे.'

यांतील 'च्या' हें रूप काढून टाकून रामाकडून, वैद्यापासून, हरीमध्यें, हरींत, त्याजवळ, आम्हांपाशीं, आम्हांशीं, दगडापेक्षां,

घरापुढें असे शब्द बनतात. अशीच पद्धत प्राकृतात होती. 'मम' आणि 'तुम' या षष्ठीच्या रूपास सर्व प्रत्यय जोडलेले आढळतात. मम, तुम, द्वितीया, ममाइ, तुमे, तृतीया, ममादो, ममादु, तुमाहु, पचमी, ममम्मि, सप्तमी, इत्यादि. अपभ्रंशात षष्ठीच्या रूपास शब्दयोगी जोडितात. जसे,—तवु केहिँ=तुझ्या साठीं, अन्नह रेसि=अन्यासाठीं. अपभ्रंशात 'हत्तह' ही हत्त, हात याची षष्ठी आहे त्याचें 'हत्ता, हाता' असें झाल. अपभ्रंशात सर्वत्र अतींचा स्वर आणि 'ह' असें शिल्लक राहिल आहे 'पुत्तह' हेंच षष्ठीचेंही रूप होय. षष्ठी विभक्ती हव्या त्या विभक्तीचें काम करिते. यासाठीं हें जें सर्वत्र एकच बनलेलें रूप, हे षष्ठीचें रूप आहे. षष्ठीचा प्रत्यय 'स' याचाच हा अपभ्रंशात सर्वत्र येणारा 'ह' झाला, असें उघड दिसतें. आता प्रथमारंभीं तें सर्वच ठिकाणीं षष्ठीचें रूप नसेल परतु प्रत्यय नष्ट झाल्यावर नामाच्या अन्तीं राहिलेला अवशेष आणि षष्ठीचें रूप यामध्यें सादृश्य असल्यामुळें तें षष्ठीचेंच रूप बनून गेल किंवा मानलें गेलें

मराठींत एकवचनीं सामान्यरूपाचे अन्त्य आ, ई, ऊ, ए आणि ओ असे पाच आहेत हे कसे बनले हें पाहू.

हे सामान्यरूपाचे अन्त्य पाहून अशी शका येईल कीं, षष्ठीच्या रूपाचा अन्त्य जर 'आ' आहे, तर सगळ्या नामाच्या सामान्यरूपाचा अन्त्य 'आ' कसा झाला नाहीं ? याचें उत्तर असं आहे कीं, पुष्कळ ठिकाणीं अन्त्य 'आ'च आहे. सर्वत्र मात्र नाहीं. बोलणारे, हे लिहिणाऱ्याप्रमाणें किंवा ग्रंथकाराप्रमाणें व्याकरणाची टापटीप बघत बसत नाहींत आपला आशय ऐकणारास सुलभपणें सागता आला, म्हणजे त्यांचें काम झाल. 'ए' हा अन्त्य स्वर सामान्य रूपाच्या 'आ'च्या सधीनेंच झाला आहे. ईकारान्त आणि ऊकारान्त सामान्य रूपाच्या वेळीं मात्र सामान्यरूपाचा पाहुणा स्वर जो 'आ' त्यापेक्षा नामाचा मूळचा अन्त्य स्वर जोरदार होऊन 'आ'चा लोप झाला. आकारान्त सामान्यरूपें देव, देवा, बाप, बापा, काका, काका, भाऊ, भावा, तट्टु, तट्टा, घोडा, घोड्या, केळें, केळ्या, लाडू, लाडवा, इत्यादि आहेत. ईकारान्त कवी, केळ, केळी, इत्यादि. ऊकारान्त मानू,

काकू, इत्यादि. एकारान्त, माता, माते, ईट, इटे, इत्यादि. यांत केवळ आकारान्त सामान्यरूपें उघडच आहेत. केवळ ईकारान्त आणि ऊकारान्त हीं मुख्य स्वर जोरदार होऊन झालीं. घोड्या, केळ्या, लाडवा, माते, हीं मात्र विशेष कारणानें झालीं आहेत.

एकाद्या ठिकाणीं प्रत्यय लावावयाचा असतां मूळचें नांव विशेष वहिवाटींतलें नसल्यास, अथवा रूप कठीण होईल असें वाटल्यास बोलणारे त्या शब्दापुढें सर्वनामाचा उपयोग करून त्याला प्रत्यय लावितात. 'मी आज गोविंदाचे येथें गेलों होतों.' या वाक्यांत बोलणारास गोविंदाचे घरीं, कीं बिन्हाडीं, कीं वाड्यांत, का कचेरींत, काय ह्मणावें याची अडचण आली, म्हणून त्यानें 'येथें' हें सर्वनामात्मक अव्यय घालून काम करून घेतलें. गव्हरनर, रेसिडेंट, कलेक्टर, वगैरे परकीय शब्द आले असतां आपण त्यांस प्रत्यय न लावितां गव्हर्नर-यानें, रेसिडेंट-यांना, कलेक्टर-यांस असें बहुधा म्हणतों. अशा प्रकारें शब्दाच्या पुढें प्रथमतः सर्वनामाचें रूप ठेवून मग पूर्ण शब्द बनविण्याची रीत मराठीनें नवीनच पाडली नाहीं. ती प्राचीन आणि सार्वत्रिक आहे. संस्कृत भाषेंतील काळांचीं रूपें मी, तूं, तो, या सर्वनामांचीं रूपें पुढें लावून झालीं आहेत, असें लक्षपूर्वक पाहिलें असतां आढळून येईल. युरोपियन भाषांतही असाच प्रकार झाला आहे, असें भाषाशास्त्रज्ञ सांगतात. इंग्रजी भाषेंत फारसे प्रत्यय नाहींत. पण 's' हा षष्ठीचा प्रत्यय अशा प्रकारें उत्पन्न झाला असें त्या भाषेच्या व्याकरणांत सांगितलें आहे. 'King's crown' हें मूळचें 'King his crown' 'राजा जो त्याचा मुकुट' असें होतें. आणि पुढें 'h' आणि 'i' हीं निरर्थक अक्षरें जाऊन 'King's crown' असें झालें.

देव, बाप, काका, यांचें देवा, बापा, काका, असें सहज करितां आलें. पण घोडा + स असें आलें, तेव्हां पंचाईत पडली. बोलणारानें मनांत आणलें, कीं याचा निकाल आपण कशाला करा, तूर्त आपण 'घोडा यास' असें म्हणूं म्हणजे झालें! तसेंच 'केळें यास' असें प्रथमतः म्हणण्यांत आलें. पुढें लौकरच उच्चाराचें एकीकरण म्हणजे संधी होऊन घोड्यास, केळ्यास, अशीं रूपें बनलीं. लाडू + आस,

याचे प्रथमतः लाड्ड–यास असें होऊन ऊच्या सान्निध्यानें 'य'चा 'व' झाला, आणि लाडवास असें रूप बनलें. आणि पुढें लाड्वास असें उच्चारास त्याहून सोपें रूप बनलें. घोडियास, केळियास, लाडुवास, अशा प्रकारचीं जुनीं रूपें आढळतात, तीं वर्ष,–वरीस, श्री,–शिरी, श्लोक,–शिलोक, अशा प्रकारें उच्चार सौकर्यासाठीं जोडाक्षरामध्यें स्वर घिरून झालीं. माता + ईस=मातेस असें सरळ संधीनें झालें. आता 'ईट' हा जर अकारान्त शब्द, तर त्याचें ईटे का झालें ? याचें कारण 'ईट' हा शब्द प्रथमेच्या एकवचनीं अकारान्त होतो. तो मूळचा 'इष्टिका' असा आकारान्त आहे. 'केळ' हा अकारान्त स्त्रीलिंगी शब्द आहे. याचें केळीस का होते ? तर त्याचें 'केळ' हें प्रथमेच्या एकवचनाचें रूप आहे. मूळचें रूप 'कदली' असें ईकारान्त आहे. जे स्त्रीलिंगी शब्द मूळचे संस्कृत इ ईकारान्त आहेत, त्याचें सामान्यरूप ईकारान्त होतें, आणि जे मूळचे आकारान्त आहेत, त्याचें एकारान्त होतें.

याप्रमाणें प्रथमतः मुख्य मुख्य शब्दावरून पद्धत पडून गेल्यावर सादृश्यानें इतर नामाचीं तशीं रूपें होऊं लागलीं. कोठें बोलणाराचीं निरनिराळीं मतें होऊन वैकल्पिक रूपें आलीं. अशा रीतीनें निरनिराळीं सामान्यरूपें बनलीं.

नामाचीं सामान्यरूपें करण्याच्या किरकोळ गोष्टी व्याकरणात आहेत. येथें आणखी चर्चा करण्याची गरज दिसत नाहीं. अनेकवचनीं सामान्यरूप हें एकवचनीं सामान्यरूपाच्या अन्तीं अनुस्वार येऊन, आणि कोठें क्वचित् फेरफार होऊन बनतें. त्याविषयींची माहितीही व्याकरणावरून होईल.

असामान्यरूपें—ज्ञानेश्वरींत किंवा अगदीं जुन्या भाषेंत सामान्यरूपाचे आणि विभक्तींच्या रूपाचे चमत्कारिक प्रकार आढळतात. माडगावकर यानीं ज्ञानेश्वरीच्या आरंभीं असाधारणरूपाची एक यादी दिली आहे. तीं असाधारण रूपें बहुतेक सर्व सामान्यरूपें आहेत. सामान्यरूपाचा उपयोग करून तृतीयेपासून प्रत्येक विभक्तीचा अर्थ दाखविला आहे. हें सामान्यरूप एकारान्तही असतें. जसें,–पृथिवियेचा सगळेन, त्याचेन, गुणेशीं, इ०. गुजराथी आणि हिंदी या भाषातही केवळ

सामान्यरूपानें हवी ती विभक्ती दाखवितात. सामान्यरूपानें हवी ती विभक्ती दाखविण्याची रीत पुढील मराठींतही आहे. पण तिचा प्रचार कमी होऊन पूर्ण विभक्तिरूपें अधिकाधिक होत गेली आहेत. अकारान्त रूपांना 'उ' लावलेलीं रूपें 'पुतु', 'मातु' इत्यादि आणि 'ई' लाविलेलीं रूपें बोलोनि, बोलोनी, म्हणुनि, म्हणुनी, त्यासि, त्यासी, वगैरे सर्वत्र आहेत. सर्व प्रकारच्या अकारान्त रूपांना ऱ्हस्व किंवा दीर्घ 'उ' किंवा 'इ' स्वर लावावयाचाच अशी जुनी पद्धत होती. पण ती उत्तरोत्तर कमी होत गेली आहे. कवितेंतली भाषा जुनी असावयाची या समजुतीवर हीं रूपें पुढील कवितेंत आहेत. तसाच त्यांचा उपयोग शेवटचें अक्षर वृत्तसुखासाठीं दीर्घ करण्यासाठींही होतो. उपान्त्य 'ई', 'ए'चा 'ऐ' आणि 'उ', 'ओ'चा 'औ' केलेलीं रूपें सर्वत्र आहेत. 'भानुचेनि तेजें, 'सूर्याचेनि किरणें', असा उपयोगही सर्वत्र आहे. 'भानूचें तेज' यांत 'भानूचें' हें तेज याचें विशेषण आहे. तेज याची 'तेजें' अशी तृतीया झाली, तेव्हा विशेषणाचीही 'भानुचेनि' अशी तृतीया झाली. विशेषणाचीं भानुवा-चे, काळ्या-काळे, अशीं दोन सामान्यरूपें मराठींत सध्याही आहेत. अकारान्त आणि आकारान्त नामांचीं प्रथमा आणि द्वितीया यांचीं अनेकवचनें एकारान्त येतात. हीं सर्वनामरूपांच्या सादृश्यावरून येतात. ज्ञानिये, अविवेकिये, पाये, धावे, ठाये, राये, लोके, अशीं रूपें ज्ञानेश्वरींत आहेत, आणि कित्येक शिलालेखांत व ताम्रपटातही आहेत. जुन्या ज्योतिष ग्रंथांत 'आचार्यांहीं' 'दैत्याहीं, यांबद्दल 'आचार्यें', 'दैत्यें', अशीं रूपें आहेत. यांशिवाय अर्धीच्या तशीं संस्कृत रूपें, क्वचित् बिघडलेलीं संस्कृत रूपें, अर्धवट संस्कृत आणि प्राकृत, असे प्रकार ज्ञानेश्वरींत आणि त्या काळच्या भाषेंत आहेत. क्वचित् द्विवचनासारखीं रूपें आहेत. कोठें सतिसप्तमी-सारखेही प्रकार आहेत. द्विवचन हें पालींत आणि प्राकृतांत कोठेंही नाहीं. परंतु लोकांच्या भाषेचा प्रकार असा असतो कीं, जुने प्रकार कोनाकोपऱ्यांत असवाव, ते पुष्कळदां बोलण्यांत पुढें येतात. फार जुन्या अशा वेदभाषेंतलेही प्रकार जे परिनिष्ठित संस्कृतांत आले नाहींत,

ते प्राकृतात आणि मराठींतही आलेले आहेत. परतु त्यावरून नियम असा काहीं बाधता येणार नाहीं.

ज्ञानेश्वरी हा मराठींतला अगदीं पहिला ग्रथ. तोही गहन विषयावर असून, त्यातील विचार सर्वांना नीट कळावे, म्हणून उपमा, दृष्टान्त, वगैरे पुष्कळ घातले आहेत. विवरणही विस्तृत आहे, यामुळें शब्द, रूपें वगैरे विपुल आलीं आहेत. या वेळीं मराठी भाषा स्थिर झालेली नव्हती. त्या वेळचे शिलालेख वगैरे आणि एक दोन सापडणारे त्रोटक ग्रथ यामध्यें जुनीं संस्कृत, प्राकृत रूपें, लोकाचे तोंडीं असणारे चमत्कारिक प्रकार, अशा गोष्टी फार आहेत लोक ज्या प्रकारच्या भाषेंत बोलतात अथवा लोकाना जी भाषा समजते, तींत ज्ञानदेवादिकानीं रचना केली आहे. दुसरी एक लक्षात आणण्यासारखी गोष्ट अशी आहे कीं, ज्ञानेश्वरीच्या लेखकानीं केलेल्या प्रतींवर आपण विश्वास ठेवून चालणार वाचणारे आणि लेखक हे दोघेही भाषाशुद्धीविषयीं अज्ञान असावयाचे.त्यांच्या हातून ग्रथात अनेक प्रमाद शिरलेले असणारच, तेव्हा ज्ञानेश्वरींत सापडलेले रूप खरेंच आहे, असे समजण्यास काहीं आधार नाहीं. त्यातलीं अनेक चमत्कारिक अथवा असाधारण रूप केवळ लेखकप्रमाद असतील, असें समजण्यास पुष्कळ कारणें आहेत. यासाठीं अशीं रूपें घेऊन 'हें पाणिनींत आहे', 'असकें अमुक प्रातीं किंवा अमुक लोकाचे भाषेत सापडतें', असे तर्क काढीत बसण्यात काहीं अर्थ नाहीं त्या वेळीं भाषा अस्थिर असल्यामुळें असले प्रकार तेव्हाच्या एक दोन ग्रथात आढळतात, पण ते भाषेचे प्रकार असे धरून चालता यावयाचें नाहीं. शिवाय ज्ञानदेव आणि एकनाथ याच्या लोकप्रिय ग्रथाच्या पाहिजे त्यानें प्रती केल्यामुळें त्यातलीं अमकीं रूपें त्याच्या वेळचींच असें खात्रीनें काहींच सागता येणार नाहीं या काळातला बहुधा जशाच्या तसाच हातीं आलेला ग्रथ खिस्तपुराण, किरकोळ जुने लेख व मोडी पत्रें होत. तेव्हा या गोष्टीच्या निकालासाठीं याचा अभ्यास व्हावयास पाहिजे. त्यानतर उत्तरोत्तर भाषा स्थिरावत गेली आहे. यासाठीं आज आपल्या भाषेंत जीं रूपें ज य्य त आ हे त म्हणजे स्थिर झालीं आहेत, त्याच्या इतिहासाचा छडा लावण्याचा

प्रयत्न करावा. एकादुसऱ्या विलक्षण किंवा चमत्कारिक रूपावरून कांहीं नियम बांधीत बसण्यापासून तादृश फायदा नाहीं.

मराठींत प्रथमा आणि द्वितीया एक झाल्या याचा अर्थ कोणी द्वितीया मुळींच गेली असा करितात. पण वास्तविक तसें झालेलें नाहीं. प्रथमा आणि द्वितीया यांचीं रूपें एकसारखीं झालीं. कर्म अर्थ असतां प्रथमेसारख्या रूपांनाच द्वितीया म्हणावयाचें. खेरीज चतुर्थीच्या रूपांचाही कर्माच्या जागीं उपयोग होऊं लागला. तेव्हां द्वितीया अशी झाली:-

(१) अप्रत्यय म्हणजे प्रथमेसारखीं रूपें:—

देव, देव; ' मी देव पूजितों'.

(२) सप्रत्यय म्हणजे चतुर्थीचीं रूपें:—

देवास, देवाला, देवातें. देवांस, देवांला, देवांतें, देवांना.

' मी देवाला पूजितों', ' मी देवांस पूजितों', इत्यादि.

इंग्रजी नामांना विभक्तिप्रत्यय नाहींत. परंतु सर्वनामांचीं जुनीं प्रत्ययघटित रूपें अजून उपयोगांत आहेत. त्यांतील चतुर्थीच्या रूपांचा द्वितीयेसारखा उपयोग आहे; अर्थात् सर्वनामांची द्वितीया आणि चतुर्थी यांचीं रूपें एकच आहेत. मराठींत पुरुषवाचक सर्वनामांचीं द्वितीया आणि चतुर्थी यांचीं रूपें एकच आहेत. तेव्हां कर्म हें कारक असतां तें दर्शविणारें रूप त्यास द्वितीया म्हणावें.

## (२) सर्वनामें

'कोण' (जुनें रूप कवण) हें सर्वनाम 'कोऽन्यः' यापासून झालें. प्राकृत 'कउण', हिंदी 'कौन'.

'हा' हें संस्कृत 'एषः', अपभ्रंश 'एहो', 'एहू' किंवा 'एहु' यापासून झालें. सामान्यरूप 'ह' किंवा 'य' असतें. 'य' हें सामान्यरूप संस्कृत 'इदम्', अपभ्रंश 'आय' असें झालें असेल.

मराठी मी (चितपावन मे) हें अपभ्रंशांतील सामान्यरूप 'मइ' याचें रूप होय. अपभ्रंशांत 'हउं' म्हणजे मी आहे; त्यापासून कोंकणी 'हांव' आलें आहे. 'आम्ही' हें संस्कृत 'अस्मके' अपभ्रंश 'अम्हइ'

याचे रूप आहे. 'तू' हें अपभ्रंश 'तुह' आणि 'तुह्मी' हें अपभ्रंश 'तुम्हइ' यापासून आलें. हीं रूपें अपभ्रंशांत पालीमधून आलीं आहेत.

'जो' हें 'यः' यातील 'य'चा 'ज' होऊन झालें. 'तो' हें संस्कृतातील 'तत्' आहे. ओकार हा प्रथमेच्या एकवचनाचा प्रत्यय आहे. 'काय' हे 'कः'पासून अथवा 'कोऽयम्' यापासून झालेलें दिसतें.

षष्ठीचीं 'माझा', 'तुझा' हीं रूपें प्राकृतात आहेत. 'मी' आणि 'तू' याचीं मिं, मीं, तु, तू, आह्मि, आम्हीं, तुह्मि, तुह्मीं, अशीं रूपें मूळपासून आहेत. याच्या अन्तीं अनुस्वारही जुनाच आहे. सांप्रत मी, आम्ही, तुह्मी, याची प्रथमा असता अनुस्वार देऊ नये आणि तृतीया असता द्यावा अशी रीत पडली आहे, ही चांगली आहे. तृतीयेंतील अनुस्वार योग्य रीतीनें आलेले दिसतात.

मी+आ (तृतीयेचा प्रत्यय) = म्या, किंवा पूर्वरूपसंधीनें मीं.

तू+आ = 'तुवा', 'त्वा', पूर्वरूपसंधीने 'तूं'.

आम्ही+आ तसेंच तुह्मी+आ = पूर्वरूपसंधीनें आम्हीं, तुह्मीं.

'ह्म' हा जोडाक्षरात संस्कृतात ह्+म असा अनुक्रम असतो. जसें-- 'ब्राह्मण'. परंतु पालीमध्यें अनुक्रम फिरून म्+ह असा होतो. तेव्हा शुद्ध मराठी शब्दांत 'म्हणजे, आम्ही, तुम्ही' अशींच रूपें शुद्ध. सांप्रत छापखान्यांनीं 'ह्म' हा (ह+म) असा टाईप केला आहे, हा अशुद्ध आहे.

'तो' या सर्वनामाचें 'त्या' असें सामान्यरूप झाल्यावर 'जो' याचें 'ज्या', 'हा' याचें 'ह्या' (सौम्यरूप 'या') अशीं सामान्यरूपें सादृश्यावरून झालीं. कोणत्याही भाषेमध्यें सादृश्याचा प्रकार चालू असतो, आणि एकासारखीं एक रूपें उत्पन्न होतात.

'तो' याचें सामान्यरूप 'त्ये' होऊन 'त्येला', 'त्येन' अशा प्रकारचीं प्रातिक रूपें झालीं आहेत. जुनें वैदिक 'त्येन' रूप आहे, तेंच पुढें आलेलें दिसतें. अशींच 'ह्येन', 'ह्योला', 'त्येला', 'त्येणन्', 'त्येचा' अशींही रूपें सादृश्यानें झालीं.

कोंकणी आणि चित्पावनी भाषा आणि दुसऱ्या कित्येक प्रातिक भाषा यामधील कित्येक विभक्तीरूपें विचारणीय आहेत. कोंकणी

भाषेंत 'राणी' याचें अनेकवचन 'राण्यो' आणि 'वर्ष' याचें 'वर्सो'. चतुर्थीचा प्रत्यय 'क' क्वचित् 'का' आणखी 'ला' आहेच. तृतीयेचा प्रत्यय कोंकणांत सर्वत्र 'न'–मुकेन, त्याणण, इ०. चतुर्थीचा 'स' प्रत्यय लावून आणखी पुढें 'ला' लावितात. जसें–बापासला, आईसला, लोकरीसला, माणसासला, इ०. कोंकणांत मीवद्दल हॉव, आव, हाव, हउ (अपभ्रंश हउँ) हवे, हावे प्रथमा; मिनी, तुनी, तृतीया. माना, तुना, चतुर्थी. चित्पावनींत अकारान्त आणि आकारान्त नामाचें प्रथमेचें एकवचन ओकारान्त–मुलगो, घोडो, इत्यादि. कोंकणीमध्यें उकारान्त,–पुतु. कोंकणच्या चालू भाषेंतही सामान्यरूपानें विभक्तीचें काम पुष्कळदां होतें. 'देवा–कृपा'–'देवाच्या कृपेनें'.

वऱ्हाडी आणि नागपुरी भाषांत हिंदीच्या सादृश्यानें पुल्लिंग आणि नपुंसकलिंग एक होऊं पाहात आहेत. अनेकवचनी सामान्यरूपांत ही, ई येतात. बापाहीस–बापास; माणसाहीले, माणसाइले–माणसास. चतुर्थीचा प्रत्यय 'ले'. माहा, तुहा, तृतीया. मध्यप्रांतांतल्या पूर्वभागांत मराठी भाषा आहे. तिला हाळबी ह्मणतात. या भाषेंत नपुंसकलिंग नाहीं. विशेषणें लिंगाप्रमाणें फिरत नाहींत. षष्ठी विशेषणाचें रूप 'चो' असें सर्वत्र असतें.

याशिवाय प्रांतिक मराठी प्रकारांत ऐतिहासिकदृष्ट्या विचार करण्यासारखीं रूपें नाहींत. फरक आहेत ते बहुतेक उच्चारांच्या संबंधाचे, आणि त्यासाठीं अक्षरांत भेद झाला आहे, असे आहेत.

---

## (३) अन्त्य आणि उपान्त्य

शब्द प्राकृतांतून मराठींत येतात तेव्हां त्यांचें अन्त्य आणि उपान्त्य स्वर यांना अनेक फेरफार होऊन मग ते मराठी बनतात. मराठींत स्वाभाविक उच्चार ह्मणून ठरले आहेत, त्यांप्रमाणें हे फेरफार घडून आले पाहिजेत; त्यांप्रमाणें जुळले नाहींत, तर ते मराठी उच्चार नव्हत. अन्त्य आणि उपान्त्य यांच्यासंबंधाची चर्चा प्रौढबोध व्याकरणांत विस्तारानें केली आहे. येथें जरूर तेवढा ऐतिहासिक संबंध सांगावयाचा आहे.

मराठी शब्दाचें प्रथमेचें एकवचन, हें त्या शब्दाचें मराठींत येताना जें रूप बनतें, तें होय. हें रूप एकदम प्रथमेचें एकवचन बनून येतें. ज्याला आपण मराठींतलें अमुक अंताचें नाम असें म्हणतों तें त्या नामाचें प्रथमेचे एकवचन असतें, मूळ नाम नव्हे. उदाहरणार्थ, संस्कृतातले आ, इ–ई, उ–ऊ, या अंताचे स्त्रीलिंगी शब्द संस्कृतातून आणि प्राकृतातून आले, म्हणजे ते मराठींत अकारान्त बनतात. परंतु त्याच्या मूळच्या अन्ताचें विस्मरण झालेलें नसतें. कारण सामान्यरूप त्या मूळच्या अन्त्यस्वरास अनुसरून होतें मूळच्या आकारान्ताचें एकारान्त, इ ईकारान्ताचें ईकारान्त, उ ऊकारान्ताचें एकारान्त इत्यादि. अनेकवचन होण्याचे संबधानेंही असाच प्रकार होतो, हें मागें सांगण्यात आलेंच आहे. संस्कृतातील व्यंजनान्त शब्द प्राकृतात आणि मराठींत येताना त्याचें व्यंजन जातें, अथवा त्यांत अ मिळतो, आणि ते स्वरान्त होतात क्वचित् अशा शब्दाचें संस्कृतातलें प्रथमेचें एकवचन मराठींत घेतात. कित्येक शब्दाचें अनेकवचनच मूळचा शब्द म्हणून घेतलेलें आहे. उदा०–नभ, चंद्र, दुर्वास, दुर्वासा, चंद्रमा, श्रीमन्त, भाग्यवन्त, इत्यादि. यावरून दिसून येईल कीं, मराठींत व्यंजनान्त शब्द नाहींत.

अन्त्य व्यंजनाचा लोप करणें किंवा व्यंजनान्त शब्द अकारान्त करून घेणें ही चाल वेदमार्गेतून जनपदभाषा म्हणजे प्राकृत यांच्या द्वारें चालू देशभाषांत आली आहे. लौकिक संस्कृत भाषा ही व्याकरणाला अनुसरून अगदीं ठरीव असल्यामुळें तींत ही पद्धत फारशी नाहीं. जुन्या संस्कृतात असलीं उदाहरणें अनेक आढळतात. 'देव कर्मन्' याचें अकारान्त शब्दाप्रमाणें 'देवकर्मेभिः' (ऋ० १०-१३०-१) 'पश्चात्' याचें पालीप्रमाणें पश्चा, (तै० सं० १०-४-११ आणि शत० ब्रा० १-१ २-५), लौकिक संस्कृतात 'पश्चार्ध' शब्द आहे, त्याच्या सिद्धीची कात्यायनानें तो 'अपर'चा आदेश आहे असें सांगून वासलात लाविली आहे. 'युष्मान्' याचें 'युष्मा' (वाज० सं० आणि शत 'ब्रा०), 'नीचात्' याचें 'नीचा', (तै० सं० आणि प्रातिशा०), लौकिक संस्कृतातही अन्य गती नसल्यास 'स्' या अन्त्य व्यंजनाचा लोप मानून

'ये सान्तास्तेऽदन्ताः' असा नियम सांगितला आहे. 'पिंडं दद्याद् गया-शिरे,' हें उदाहरण प्रसिद्धच आहे. भाषानें 'शिरस्' शब्द अकारान्त मानला आहे; (न लिंगं च शिरोपधानममलं शीर्षाभिधातोपधैः, स्वप्न०) जन्मन्, कर्मन्, जगत्, हे शब्द संस्कृतामध्येंही व्यंजनाचा लोप करून अकारान्त उपयोगिलेले आहेत. पालींत आणि प्राकृतांत व्यंजनान्त शब्द नाहींत असा स्पष्ट नियम आहे. हिंदी, गुजराथी, बंगाली या देशभाषांतही मूळचे व्यंजनान्त शब्द स्वरान्त करून घेतात. मराठीवर मात्र संस्कृताच्या फाजील अभिमान्यांचा उगाच जुलूम आहे! या विवरणावरून आपल्या देशी भाषा अगदीं जुन्या संस्कृतापासून किंवा लौकिकांतल्या आर्यभाषांवरून परिणतिद्वारें बनल्या हें स्पष्ट दिसून येईल.

मराठीमध्यें शब्दाचा उपान्त्य जोरदार असतो. अर्थात् उपान्त्य स्वर दीर्घच असावयाचा. 'अ' याला दीर्घत्व मानलेलें नाहीं, तरी उपान्त्य 'अ' दीर्घच मानला पाहिजे. कारण त्याचा उच्चार दीर्घ असतो, गॅर्यंतें यांतील 'व' मधला 'अ' दीर्घ आहे. पण गॅवेतास असें रूप झाल्यावर तो ऱ्हस्व होतो. मराठींत 'आ' हा स्वरही ऱ्हस्व आणि दीर्घ मानिला पाहिजे. जसें, दारें, दॅारांस, इ०—खेडाळू लोक गवात कापाड, सुखाड, जोखाट, पायवाण, असे उच्चार करितात.

मराठींत शब्दांच्या अन्तीं बहुतेक 'अ' असतो. त्याचा उच्चार अगदीं ऱ्हस्व असतो. कारण उपान्त्य जोरदार असतो.

संस्कृतांतून प्राकृताच्याद्वारें मराठींत येतांना पुष्कळ शब्दांचे अन्तीं नुसते अ, आ, असतात. आणि उपान्त्य इ, ई, असतात. मराठीच्या स्वभावाप्रमाणें उपान्त्य जोरदार होऊन अन्तींचे अ, आ, जातात. अशा रितीनें मराठींत दीर्घ ई-ऊकारान्त शब्द बनतात.

| | | |
|---|---|---|
| मौक्तिक | मोत्तिअ | मोतीं |
| यूथिका | जुईआ | जुई |
| मृत्तिका | मत्तिआ | माती |
| वालुका | वालुआ | वाळू |
| जलौका | जलोआ जलूआ, | जळू, इत्यादि. |

नाम नपुंसकलिंगी असून अन्तीं अनुस्वार असल्यास त्याचे मागचा 'अ' गेला तरी तो अनुस्वार कायमच असतो. यामुळें मराठींत नपुंसकलिंगी नामांच्या शेवटीं अनुस्वार असावयाचा असा नियमच झाला आहे. अकारान्त नपुंसकलिंगी नामांच्या शेवटीं मात्र तो नाहीं.

मराठींत संस्कृत शब्द जसेच्या तसेच घेण्याची चाल अलिकडे पडली; त्याचे अगोदर इ–ई, उ–ऊ या अन्तांच्या संस्कृत शब्दांचे अन्त्य अकारान्त करून घेत असत. जसें, रीति, रीत; गति, गत; नीति, नीत; प्रीति, प्रीत; मधु, मध; वस्तु, वस्त; इत्यादि.

हल्लीं संस्कृत शब्द जसेच्या तसेच घेतात, त्यांचे अन्त्य जसे मूळचे असतील तसे लिहावे, अर्थात् करि, हरि, रुचि, भानु, धेनु, यांचे अन्त्य ऱ्हस्व लिहावे, असा पुष्कळांचा आग्रह आहे. पण मराठींत हे अन्त्य स्वर ऱ्हस्व लिहिणें हें चुकीचें आणि अशुद्ध आहे. कारण मराठींत शब्दाच्या अन्तीं ऱ्हस्व स्वर असूंच नये, असा भाषेच्या स्वभावावरून आणि उच्चारावरून ठरलेला नियम आहे. तसेंच, हे स्वर संस्कृतांत तरी भाषेत उपयोग केल्यावर ऱ्हस्व असत नाहींत. त्यांच्यापुढें विसर्ग येऊन ते दीर्घच होतात. मग मूळचा म्हणजे संस्कृत कोशांतला शब्द मराठींत जसाच्या तसाच लिहावा, त्याचें मराठीच्या नियमाप्रमाणें प्रथमेचें एकवचनही करूं नये, असा जुलूम काय म्हणून ? अन्तींचा विसर्ग गेला म्हणजे मागील स्वर दीर्घ झालाच पाहिजे. यामुळें रामः= रामा, हरिः=हरी, भानुः=भानू, असे अन्त्य झाले. उपान्त्य ऱ्हस्व स्वर असून त्याचे पुढें विसर्ग असला, तर मराठींत विसर्ग गेल्यावर त्याच्या मागील स्वर दीर्घ होतो; उदाहरणार्थ, 'दुःख' या संस्कृत शब्दावरून मराठींत 'दूख'=दुखणें, असा धातु बनतो. आज्ञार्थी द्वितीय पुरुषाचें एकवचन हा मूळचा धातु असतो. एक त्रासलेला मनुष्य आपल्या दुखणाऱ्या पायास म्हणतो, 'पाया, तूं हवा तितका 'दूख' मी जुमानीत नाहीं !' यांत उपान्त्य विसर्ग जाऊन त्याच्या अगोदरचा 'उ' दीर्घ झाला आहे.

प्राकृतांत कवि, रुचि, रवि, भानु, हे तत्सम शब्द घेतात, तेव्हां त्यांचा अन्त्य दीर्घच लिहितात.

होतें हा सृष्टींतला न्याय भाषेला फार लागू आहे. शिवाय भाषेंतल्या कठीण गोष्टी सोप्या करून घेण्याचा प्रयत्न बोलणारे साधेल त्या ठिकाणीं मुद्दामही करितात. तेव्हां अनुस्वार खरोखरीच जास्त असल्यास तो आपोआप कमी होईल.

वास्तविक पाहिलें तर या तक्रारीचें कारण अनुस्वाराची फाजील व्याप्ती हें नसून अनुस्वाराचा जास्त नाकांतून उच्चार हें आहे. कोंकणांतील अगदीं दक्षिणेकडला भाग, कारवार, गोवा, मालवण येथून जोरदार अनुस्वारास आरंभ होतो. त्या प्रदेशांत अनुस्वाराचा उच्चार इतका जोरदार असतो कीं, त्यामध्यें त्याच्यापुढें असलेल्या व्यंजनाचा उच्चारही अगदीं झेपून जातो. तेथून उत्तरेकडे यावें तसतसा हा जोरदारपणा कमी होऊन, ठाणें जिल्ह्यांतील अनुस्वाराचा उच्चार देशावरील अनुस्वारासारखाच कमी आहे. देशावर कोल्हापूर, सोलापूर, वऱ्हाड वगैरे अगदीं कडेच्या प्रांतांत आणि कमी माहितगार लोकांच्या भाषेंत हा उच्चार फारच कमी; इतका कमी कीं त्यामुळें बोलण्याच्या भाषेंत अर्थाची हानी होते. तेव्हां तक्रार आहे ती उच्चाराच्या संबंधाची आहे. त्याला उपाय भाषेंतला एकादा वर्ण काढून टाकणें हा नव्हे. दुसरे कोणी लोक असें म्हणूं लागतील कीं, आम्हांस ख्या, ळचा, क्षचा, ज्ञचा, उचा किंवा ऋचा उच्चार करितां येत नाहीं, तर तीं अक्षरें भाषेंत कमी करा अथवा तीं मुळींच काढून टाका. तर असलें म्हणणें कोण ऐकेल ! तेव्हां याला उत्तम मार्ग म्हटला म्हणजे ज्यांना अनुस्वाराचा उच्चार नीट करितां येत नसेल, त्यांनीं दुसऱ्यांचें उदाहरण घेऊन तो लिहितांना चुकी होणार नाहीं इतक्यापुरता तरी शिकावा, हेंच योग्य आहे. अनुस्वार जर भाषेच्या संवयींत किंवा हिशोबांत नको असेल, तर प्राकृत शब्द होतांना जशीं मूळ संस्कृतांतलीं अनेक अक्षरें वगैरे लुप्त झालीं, तसाच प्रकार अनुस्वाराचा झाला असता किंवा होईल. त्यासाठीं मुद्दाम प्रयत्न नको आणि तसा प्रयत्न सफळही होणार नाहीं.

---

## ( ५ ) विशेषणांचीं रूपें

संस्कृत भाषेचा असा नियम आहे कीं, विशेषणास विशेष्याप्रमाणेंच लिंग, वचन आणि विभक्ती यांचे विकार व्हावे. ही पद्धत प्राकृतांतही आहे. तथापि पालीमध्यें विशेष्य सविभक्तिक असतां विशेषणाचें सामान्यरूप करावें, अशी चाल क्वचित् आढळते. पाली ही वाङ्मयव्यवहारास घेतलेली फार जुनी प्राकृत. तेव्हां विशेषणाचें सामान्यरूप करणें ही रीत अत्यंत प्राचीन आणि स्वाभाविक आहे आणि विशेषण विशेष्याप्रमाणें पूर्णपणें चालविणें ही संस्कृताची पद्धतच कृत्रीम आहे, असें दिसतें. लौकिक संस्कृतांत आणि प्राकृतांत विशेषण विशेष्याप्रमाणें विकृत होतें. पण मराठींत विशेषण अंशतः विकृत होतें; म्हणजे त्याचें केवळ सामान्यरूप होतें. हा एवढाच प्रकार मराठीनें पालीभाषेपासून घेतला हें मागें सांगितलेंच आहे. हा प्रकार जुन्या संस्कृतांतही आहे. ऋग्वेदांत विशेषणाला पूर्ण विकार न होतां त्याचें केवळ सामान्यरूप केलें आहे (प्रत्यय तेवढा गाळला आहे) अशीं उदाहरणें सांपडतात; —'धर्म वीर्यय्व ब हु ला [बहुलानि] पृथूनि'; 'भुवनानि वि श्वा'; दुर्गाणि वि श्वा [ विश्वानि ]' इत्यादि.

मराठींत असा प्रकार झाला आहे कीं, विशेष उपयोगांत असलेलीं जीं विशेषणें त्यांना लिंग आणि वचन यांमुळें विकार व्हावा आणि विशेष्यास विभक्ती लागली असतां विशेषणास सामान्यरूप व्हावें. सामान्यरूप हें षष्ठीचा अवशेष आहे, व षष्ठी सर्व विभक्तींबद्दल येते. तेव्हां सामान्यरूप होतें म्हणजे विभक्तीच लागते. यामध्यें सोपेपणा जास्त आहे, एवढें मात्र खरें. विशेष उपयोगांतलीं विशेषणें अमकीं हें जसें सांगतां येणार नाहीं तसेंच अमक्यांनाच विकार होतो हें कांहीं सांगतां येणार नाहीं. जीं विशेषणें तितकीं उपयोगांत नाहींत, अथवा जीं आपण संस्कृतांतून नवीन नवीन घेतों, त्यांना विकार होत नाहीं. यावरून विशेषणाचे प्रत्यय काढून टाकण्याचा भाषेचा विचार एके काळीं होता असें मानावें लागतें. आतां मात्र भाषा एकप्रकारें कायमची झाल्यामुळें ती गोष्ट साधणार नाहीं. तथापि हा प्रकार सध्या आहे त्यापेक्षां जास्त

वाढवूं नये, हें बरें. विशेषणाचा विधिविशेषणासारखा उपयोग केल्यास आपण त्याला विकृत करीत नाहीं. 'ती बाई चांगली विद्वान् आहे,' असें आपण म्हणतों. पण विशेषणाचा वाच्य विशेषण म्हणून उपयोग करण्याची पाळी येते, तेव्हां तें विकृत करावेंसें वाटतें. जसें, 'ती विदुषी बाई आहे.' पण येथें 'ती विद्वान् बाई आहे', असें म्हटलें तर काय बिघडेल? विशेषणांना विकृत करण्याचा प्रघात मूळचा आहे तेवढा पुरे. तो आणखी मुद्दाम वाढवूं नये. कवितेंत कवी कोणत्याही विशेषणांना आपल्या सोयीप्रमाणें विकृत करितात.

---

## २—क्रियापद—रूपें

पालीमध्यें संस्कृतांतल्या दहांपैकीं आठ लकार आहेत. प्राकृतांत वर्तमान, भविष्य आणि आज्ञार्थ राहिले. बाकीचे काळ वगैरे दाखविण्यास कृदन्त विशेषणांचा उपयोग होऊं लागला. मराठींत वर्तमान आणि आज्ञार्थ राहिले. वर्तमानापासून एक प्रकारचा भूत आणि भविष्य हे झाले. आणि बाकीचे मराठी लकार कृदन्त विशेषणांवरून 'अस' धातूच्या साह्यानें झाले.

मराठींत १ जुना वर्तमान, २ चालू वर्तमान, ३ रीतीभूत, ४ साधा भूत आणि ५ भविष्य, असे पांच काळ, आणि १ आज्ञार्थ, २ विध्यर्थ आणि ३ संकेतार्थ असे तीन अर्थ, मिळून आठ लकार आहेत.

संस्कृत वर्तमानावरून जुना वर्तमान आला आणि त्यापासून रीतीभूत व भविष्य हे काळ झाले. संस्कृत आज्ञार्थावरून मराठी आज्ञार्थ आला. चालू वर्तमान, भूतकाळ, विध्यर्थ आणि संकेतार्थ हे कृदन्त विशेषणांवरून झाले. मूळ संस्कृत काळांवरून झालेल्या मराठी काळांच्या रूपांस लिंगभेद नाहीं. कृदन्त विशेषणांपासून झालेल्या काळांस तो आहे.

## (१) जुना वर्तमान काळ

| कर धातु सकर्मक | | हस धातु अकर्मक | |
|---|---|---|---|
| मी करीं | आम्ही करूं | मी हसें | आम्ही हसूं |
| तूं करिसी | तुम्ही करा | तू हससी | तुम्ही हसा |
| तो करी | ते करिती | तो हसे | ते हसती |

हस धातूचीं रूपें

| संस्कृत | | प्राकृत | |
|---|---|---|---|
| हसामि | हसामः | हसाम्मि | हसम्म |
| हससि | हसथ | हससि | हसह |
| हसति | हसन्ति | हसादि, हसइ | हसन्ति |

वरील रूपांवरून दिसून येईल कीं प्राकृत प्रत्ययांतील द्वितीय पुरुषीं अनेकवचनाच्या 'ह'चा 'अ' झाला, आणि 'न्ति'चा 'न्' गेला. हा 'न्' संस्कृतांत सार्वत्रिक नाहींच. हस् धातूच्या मराठी रूपांत प्रथम पुरुषीं एकवचनीं 'एँ' आणि तृ. पु. एकवचनीं 'ए' असे प्रत्यय आहेत. हे आत्मनेपदी प्रत्ययांवरून आले, आणि ते फक्त अकर्मक धातूंस लागतात. आत्मनेपद प्राकृतांत जरी नियमित नाहीं, तरी अकर्मक धातूंना आत्मनेपदी प्रत्यय होतात, आणि प्राकृतांतून ते मराठींत येतात. संस्कृतांत 'इ' ही परस्मैपदाची आणि 'ए' ही आत्मनेपदाची खूण आहे. तो प्रकार प्राकृताचे द्वारें मराठींत अनुक्रमें सकर्मक आणि अकर्मक धातूंच्या रूपांत आला आहे.

'सी' आणि 'ती' यांचे मागें 'इ' आगम होतो. हा आगम मराठी क्रियापदांच्या रूपांमध्यें व्यञ्जनादि प्रत्ययांच्या पूर्वीं सर्वत्र होतो. हा सकर्मक धातूंना विकल्पेंकरून होतो. जसें, करिसी, करसी; करिती, करती. इत्यादि अकर्मक धातूचे रूपांत हा आगम होत नाहीं. 'करिसी' हें रूप 'करिशी' असेंही होतें.

हा 'इ' आगम होण्याचें कारण असें आहे कीं, प्रत्यय एकाक्षरी असून अकारान्त असला तर मराठी भाषेच्या नियमाप्रमाणें उपान्त्य

दीर्घ झाला पाहिजे. 'अ'चा उच्चार दीर्घ करितां येतो, पण तो समाधानकाक दीर्घ उच्चार होत नाहीं; तेवढ्यानें भागत नाहीं. अशाच तऱ्हेच्या कारणासाठीं संस्कृतांत धातूंच्या अनेक रूपांत 'इ' आगम येत असतो, त्याप्रमाणें तो मराठींत आला. त्याच्या पुढें अकारान्त एकच व्यंजन असलें म्हणजे तो दीर्घ असतो. जसें, करील, करीत. या ठिकाणी तो वैकल्पिक नाहीं. परंतु करिती, करिसी, येथें पुढील अक्षर दीर्घ झाल्यामुळें मागील म्हणजे उपान्त्य अक्षर दीर्घ करण्याचें कारण उरलें नाहीं, म्हणून तो ऱ्हस्व होतो आणि वैकल्पिकही होतो, म्हणजे न केला तरी चालतें. कित्येक प्रांतांत आगम न करितां 'करस,' 'करत,' अशीं रूपें बोलण्यांत योजितात. परंतु लिहिण्यामध्यें आणि पुस्तकांतून आगम करितात. विकल्प असतां आगम करावा कीं नाहीं असा प्रश्न उत्पन्न होईल. पण सुव्यवस्थेसाठीं सकर्मक धातूंना हा आगम होतो, आणि अकर्मक धातूंना होत नाहीं, असा नियम करणें चांगलें.

शीक, बोल, सांग, पढ, आचर, स्मर वगैरे कित्येक सकर्मक क्रियापदें अशीं आहेत कीं, तदर्थक क्रियेचा व्यापार कर्त्यावरही असतो. अशा क्रियापदांतही आगम नसतो. हा आगम सर्व लकारांमध्यें आहे. 'ई' आगमाविषयींचें जास्त विवरण व्याकरणांत आलें आहे.

जुना वर्तमानकाळ मराठीप्रमाणेंच गुजराथी बंगाली, उरिसा, हिंदी, सिंधी आणि पंजाबी इतक्या भाषांमध्यें आहे.

मराठींत हा काळ जुन्याकाळीं होता. तो सध्या चालू भाषेंत येत नाहीं. कवितेंत याचीं रूपें फार येतात, आणि कवितेंत वर्तमानकाळ घालावयाचा असतां हींच रूपें योजावीं अशी अजून चाल आहे. याचें कारण तो कवितेंतल्या उपयोगाला सोपा आहे. चालू भाषेंत याचीं रूपें कित्येक जुन्या चालत आलेल्या म्हणींत येतात; जसें:—'लेंकी बोले, सुने लागे,' 'दाम करी काम,' 'खाई त्यास खवखवे' इत्यादि. अथवा न, ना, हीं अव्ययें असतां येतात—'तो कांहींच न बोले अथवा बोलेतना, तेथें माझा नाइलाज झाला', इत्यादि. चालू भाषेंत दुसऱ्या म्हणजे कृदन्तावरून झालेल्या आणि लिंगाप्रमाणें फिरणाऱ्या वर्तमानाचीं रूपें उपयोगांत आहेत. जसें:—बोलते, करितो, खातात, इत्यादि.

## (२) रितीभूतकाळ

जुन्या वर्तमानाच्या रूपांपैकीं द्वितीय पुरुष एकवचनाचा प्रत्यय 'सी' याबद्दल 'स' करून आणि तृतीयपुरुष बहुवचनाचा 'ती' याबद्दल 'त' करून रि ती भू त का ळ तयार करितां येतो. जसें:—

| | | | |
|---|---|---|---|
| करीं | करूं | हसें | हसूं |
| करीस | करा | हसस | हसा |
| करी | करीत | हसे | हसत |

याचा उपयोग चालू भाषेंतही आहे, हा लकार पुढें भूतकाळ झाल्या-कारणामुळें त्या रूपांचा वर्तमानकाळीं उपयोग चालू भाषेंतून गेला असावा.

## (३) भविष्यकाळ

जुन्या वर्तमानकाळाच्या रूपांच्या शेवटीं 'ल' असें अक्षर लागून भ वि ष्य का ळ होतो.

| | |
|---|---|
| करीं-ल | करूं-ल |
| करिशी-ल | करा-ल |
| करी-ल | करिती-ल |

करीं आणि करूं यांतील शेवटचा अनुस्वार आणि हा 'ल' मिळून करीन, करून अशीं रूपें झालीं. अनेकवचनीं 'करून' हें रूप सांप्रत उपयोगांत नाहीं; 'करूं' असेंच आहे. परंतु मराठेशाहींतील पुष्कळ जुन्या पत्रांतून 'करून', 'पाठवून', 'लिहून' अशीं अनेकवचनीं रूपें आलेलीं आहेत. अशीं रूपें प्राचीन मराठींत होतीं. हीं रूपें शाहूच्या कारकीर्दीच्या अखेरपर्यंतच्या लेखांत आढळतात. सन १७५७ मधल्या एका पत्रांत हें रूप आहे. अगदीं जुन्या काळीं त्याच्या शेवटीं उकारही येत असे. जसें—लिहुनु (लिहूं), करुनु (करूं), पाठवुनु (पाठवूं), इत्यादि.

असें दिसतें कीं, आरंभीं मराठींत भविष्यकाळाचीं रूपें नव्हतीं. प्रथमारंभीं वर्तमानकाळच्या रूपांवरून भविष्याचा बोध होई. ज्ञानेश्वरीच्या जरा अगोदरचे जे दोन शिलालेख, त्यामध्यें कित्येक स्थळीं भविष्यकाळाचा बोध हवा असून त्याचें काम वर्तमानानें केलें आहे.

पंचतंत्र आणि ज्ञानेश्वरी यांत 'ल' भविष्यकाळचीं रूपें आहेत. पंच-तंत्रांत घरसोड असून ज्ञानेश्वरींत तीं बहुतेक कायम आहेत. यावरून तेराव्या शतकाचे मध्याचे सुमारास 'ल' लावण्याचा प्रघात कायमचा सुरू झाला, असें ठरतें.

वर्तमानकाळावरून भविष्यकाळाचा बोध होणें ही गोष्ट असामान्य नाहीं. संस्कृतांत भविष्याबद्दल वर्तमानाचा उपयोग पुष्कळ ठिकाणीं करितात. इंग्रजी भाषेंतही आरंभीं पुष्कळ दिवस भविष्यकाळ नव्हता; वर्तमानकाळावरून भविष्याचा बोध होई. पुढें shall आणि will या साह्यक्रियापदांचा वर्तमानकाळाचे रूपांचे अगोदर उपयोग होऊं लागला. या रूपांवरूनही भविष्यकाळाचा चांगलासा बोध होत नाहींच.

सांप्रतही इंग्रजींत आणि मराठींत क्रिया खात्रीनें लगेच होईल, अशा अर्थी वर्तमानावरून भविष्याचा बोध होतो. जसें—"He starts for Bombay to-morrow mornin"; "मी उद्यां स्वतांच मुंबईस जातों आणि या प्रकरणाचा निकाल करून येतों."

जुन्या वर्तमानकाळच्या रूपांवरून भूतकाळाचाही बोध होतो. जुनी कथा सांगत असतां वर्तमानकाळाचें रूप घालून गोष्ट झाली असें सांगतात. हा प्रघातही संस्कृतांत बराच आढळतो. 'स्म' हें अव्यय वर्तमानकाळीं क्रियापदापुढें लाविलें असतां त्यापासून भूतकाळाचा बोध होतो, हें प्रसिद्धच आहे.

सिंधी, गुजराथी, बंगाली या भाषांत संस्कृतांतील द्वितीय किंवा स्य-भविष्यावरून आलेला काळ आहे. हिंदी आणि पंजाबी यांमध्यें 'गा' असें अक्षर लावून भविष्य करितात. हें 'गा'चें रूप लिंगाप्रमाणें गा, गी, आणि वचनाप्रमाणें गे, गीं असें फिरतें. 'गा'हें गमचें रूप असावें. 'करेगा' याचा मूळचा अर्थ 'करण्याचे उद्देशानें' असा कांहीं होईल. इंग्लिश भाषेंत shall हें मूळचें sceal असें रूप असून त्याचा अर्थ 'करणें भाग आहे' असा होता; आणि will हें wile असें असून 'करण्याचा उद्देश आहे,' असा त्याचा मूळ अर्थ होता.

जुन्या वर्तमानाच्या रूपांना 'ल' लागून जीं हीं भविष्याचीं रूपें होतात, त्यांना लिंगभेद नाहीं. परंतु गोव्याच्या मराठींत 'ल' हें अक्षर

'करत' या वर्तमान विशेषणास मध्यें 'अ' येऊन मग लागतें, आणि त्या रूपापासून रितीभूताचा अर्थ होतो ( जसें, 'करतालो' ); आणि त्यालाच नुसता 'ल' लागून भविष्याचा अर्थ होतो ( जसें, करतलो ); हीं दोन्हीं रूपें लिंगावरून फिरतात.

हा भविष्यकाळचा 'ल' कसा आला हें स्पष्ट सांगतां येत नाहीं. संस्कृतांत आणि प्राकृतांत ल, इल, आल, असे प्रत्यय अनेक ठिकाणीं अनेक अर्थांनीं होतात. हा भावार्थक किंवा हेत्वर्थक ल-प्रत्यय असावा. 'तो वाचील' म्हणजे 'वाचण्याचें काम करण्याचा त्याचा हेतू आहे,' अशा अर्थी तो मूळारंभीं उत्पन्न झाला असावा.

## ( ४ ) आज्ञार्थ

मराठींत मूळ संस्कृतापासून झालेला आणि लिंगाप्रमाणें न फिरणारा चौथा लकार आ ज्ञा र्थ हा आहे. जसें:—

| संस्कृत | | प्राकृत | |
|---|---|---|---|
| हसानि | हसाम | हसाइँ | हसाम्ह |
| हस | हसथ | हस | हसअ |
| हसतु | हसन्तु | हसउ हसदु | हसन्तु |

मराठी

| | |
|---|---|
| हसूं | हसूं, हसों |
| हस | हसा |
| हसू, हसो | हसूत, हसोत |

द्वितीय पुरुष एकवचनाचें रूप करीं, देईं, हसें, शिरूं, धांवें, असें कवितेंत येतें.

इंग्रजी भाषा जाणणारांस ठाऊक आहेच कीं, त्या भाषेंत आज्ञार्थाचीं रूपें फक्त द्वितीय पुरुषीं आहेत. संस्कृतांत तिन्ही पुरुषीं आहेत. मराठी, उरिया आणि बंगाली या भाषांत आज्ञार्थाचीं सर्व रूपें आहेत. इतर भाषांत फक्त द्वितीय पुरुष एकवचन असून इतर रूपांचें काम विध्यर्थानें होतें. मराठींत हीं स्वतंत्र रूपें असून शिवाय विध्यर्थानेंही काम होतें.

द्वितीय पुरुषीं एकवचनीं आज्ञार्थाचा निराळा प्रत्यय नाहीं. म्हणून हें रूप म्हणजे मूळचा धातु असें समजण्याची चाल आहे. जसें—हस, कर, हो, बस, शीक, दूख, वगैरे.

## (५) चालू वर्तमान

मराठींत सर्वत्र येणारा वर्तमानकाळ कृदन्त आणि साह्य क्रियापद यांच्या जुळणीनें झाला आहे. वर्तमानकाळचें विशेषण 'त' प्रत्यय लागून होतें. हा संस्कृतांत 'न्त्' किंवा 'त्' आहे. याला पुढें 'आहे' याचीं रूपें लागून 'करीत आहें', 'बसत आहेस', 'जात आहेत', 'लिहीत आहे' अशीं रूपें होतात. या दोन शब्दांचा संयोग होऊन 'करितों', 'बसतोस', 'जातात', 'लिहितो' अशीं रूपें बनतात. 'करीत' हें विशेषण असल्यामुळें तें लिंगाप्रमाणें आणि वचनाप्रमाणें फिरतें.

'करीत' याचें प्रथमेचें एकवचन करितो+आहें; पूर्वरूपसंधीनें 'आ' जाऊन 'करितोहें'; पुढें करितोंय्, करितों. यांतील अगोदरचीं रूपें बोलण्यांत आणि क्वचित् ग्रंथांतही अजून आढळतात. 'आहे' यांतील 'आ' आणि 'हे' या दोन्ही अक्षरांचा लोप झाला, तरी अनुस्वाराचा लोप न होतां तो मागील 'तो' वर जाऊन कायमचा बसला. असले जोड शब्द तयार होत असतांना मूळचा अनुस्वार असल्यास तो तसाच राहातो. त्याचें काम उच्चारास जोर आणण्याचें असल्यामुळें जेथें जोराचें काम असतें तेथें तो जाऊन बसतो. करीत + आहेस; करितो + आहेस; करितोएस, करितोस. करीत + आहां=करिताहां= करितांआं, करितां. करीत + आहेत, करिताहेत, करिताएत, करितात. [करत्यात, करत्याति, इत्यादि कुणबाऊ रूपें चिन्त्य आहेत]. करिती (स्त्रीलिंगी) + आहे, संधीनें करित्याहे, करित्याए, करित्ये. पुढें 'त्ये' हें उच्चारास कठिण वाटतें म्हणून, 'करिते'. कोल्हापूर वगैरे पूर्वेकडील भागांत [ती] 'करिती', एवढेंच रूप होतें. करीतें (नपुं०) + आहे, करितेंए=करितें, इत्यादि. रूपें होण्याची अशी घटना एकदां सुरू झाली म्हणजे सादृश्य-न्याय मध्यें येऊन बारीक सारीक अडचणी नाहींशा होतात. तेव्हां चालू वर्तमानाचीं रूपें पुढील प्रमाणें होतात.

जसें:—

| पुल्लिंगी | | स्त्रीलिंग | |
|---|---|---|---|
| करितों | करितों | करितें | करितों |
| करितोस | करितां | करितीस<br>करित्येस<br>करितेस | करितां |
| करितो | करितात | करिती,<br>करित्ये,<br>करिते | करितात |

| नपुंसकलिंग | |
|---|---|
| करितें | करितों |
| करितेंस | करितां |
| करितें | करितात |

*यांत 'इ' आगम होतो, त्याविषयीं पूर्वीं सांगितलेंच आहे.* कोंकणांतील दक्षिणेकडल्या भाषांत या काळाच्या रूपांना लिंगभेद नाहीं. निरनिराळ्या प्रांतिक भाषांत हीं रूपें अशीं होतातः—

| कोंकणी | | गोमंतकी | |
|---|---|---|---|
| करतां | करतांव | करतां | करतांव |
| करताय<br>करतायस | करतात | करतास | करतात |
| करता | करतात | करता | करतात |

| मालवणी | | चितपावनी | |
|---|---|---|---|
| करतें,<br>करतंय | करतों<br>करतव | करचां | करचां |
| करतस | करतात | करचस | करचां |
| करता | करतत | करचे | करचत |

या रूपांतील य, व, यांचा आणि शेवटल्या अक्षरांचा उच्चार अगदीं तोकडा करितात. वऱ्हाडे लोकांच्या बोलण्यांत हीं रूपें मूळ मराठी-प्रमाणेंच आहेत, पण लिंगभेद मात्र नाहीं.

## (६) संकेतार्थ

चालू वर्तमानकाळाच्या द्वितीयपुरुषीं एकवचनीं आणि तृतीयपुरुषीं दोन्ही वचनीं थोडा फरक होऊन संकेतार्थ उत्पन्न होतो. याचा अर्थ भूतकाळासारखा असतोः—

| पुल्लिंग | | स्त्रीलिंग | |
|---|---|---|---|
| करितों | करितों | करितें | करितों |
| करितास | करितां | करितीस | करितां |
| करिता | करिते | करिती | करित्या |

| नपुंसकलिंग | |
|---|---|
| करितें | करितों |
| करितेंस | करितां |
| करितें | करितीं |

यांत तृतीय पुरुषांचीं रूपें 'करित' या वर्तमान विशेषणाचें तिन्ही लिंगी प्रथमेचें एकवचन आणि अनेकवचन जसें असावयाचें, तशींच आहेत.

ह्या काळाचीं रूपें वर्तमानकाळाच्या रूपांत फेरफार होऊन होतात, असें जें मागें सांगितलें, तें तीं रूपें कशीं करावीं हें थोडक्यांत समजण्यासाठीं सांगितलें. हा लकार त्या वर्तमानावरून झाला असें समजूं नये. हा लकार चालू वर्तमानापेक्षां जुना आहे. तो वर्तमानकाळ मराठींत नवीन उत्पन्न झाला आहे. मराठींत वर्तमान कृदन्त जें 'करीत', (प्राकृतांत करन्त, धावन्त इ०), त्याचा संस्कृतांतील संकेतार्थाच्या अर्थी उपयोग आहे. तोच उपयोग या लकाराच्या द्वारें मराठी, हिंदी, सिंधी, गुजराथी, बंगाली आणि उरिया या भाषांत आला आहे. मराठींत जुना वर्तमान कवितेंत मात्र वर्तमानार्थी राहून बोलण्यांत रितीभूत झाला, आणि वर्तमानकृदन्तावरून दुसरा नवा वर्तमान झाला; परंतु बंगाली, उरिया, हिंदी वगैरे भाषांत जुना वर्तमान अर्थाला तसाच राहून, वर्तमानकृदन्ताच्या साह्यानें झालेल्या काळावरून रितीभूताचा आणि संकेतार्थाचा बोध होऊं लागला. मराठींत

तसा संकेतार्थ आला; आणि त्याच वर्तमानकृदन्तापासून आणखी रूपें साधून नवीन वर्तमान झाला.

हा जो मराठींतला संकेतार्थ, याच्या अर्थाच्या संबंधानें विशेष चर्चा येथेंच केली पाहिजे. हा संकेतार्थ पूर्ण अर्थाचा नाहीं. 'मी घरीं असतों, तर तुला भेटलों असतों', पण घरीं नव्हतों, त्यामुळें अर्थात् भेटलों नाहीं. अमुक झालें असतें, किंवा अमुक व्हावयास पाहिजे होतें, असा याचा अर्थ आहे. संस्कृत संकेतार्थ लृङ् याचाही अर्थ अगदीं असाच असतो. 'सुवृष्टिश्चेदभविष्यत्तदा सुभिक्षमभविष्यत्'; 'सुवृष्टि होती ( झाली असती ), तर सुबत्ता होती ( झाली असती )'. याप्रमाणें मराठींतली ही आख्यातविभक्ती आणि संस्कृतांतील तिच्या जोडीची आख्यात विभक्ती लृङ् यांमध्यें अर्थदृष्ट्या फरक नाहीं; पण संस्कृतांतील लृङ्-वरून मराठी संकेतार्थाचीं रूपें आलीं नाहींत. मराठी चालू वर्तमानाच्या रूपांवरून तीं आलीं आहेत. मराठींत संकेताचा बोध करण्यासाठीं निरनिराळी वाक्यरचना होत असते. 'मी मुंबईस जातों तर तुझ्या भावास भेटतों', यांत भूतकालिक, न घडलेल्या गोष्टीचा सांकेतिक उल्लेख आहे. 'मी मुंबईस गेलों, तर तुझ्या भावास भेटेन', यांत चालू काळाला उद्देशून संकेत केला आहे. यांत 'भेटेन' या ठिकाणीं 'भेटतों' असें वर्तमानाचें रूप घातल्यास भेटण्याचा संभव अथवा संकेत अधिक खरा होण्याचा संभव दर्शित होतो. 'मी मुंबईस जाईन तर तुझ्या भावास भेटेन' यामध्यें जाण्याचा संकेत संशयीत असतो. जाणें झालें तर भेटण्याचा संभव पुष्कळ. दुसरें वाक्य 'मी मुंबईस गेल्यास तुझ्या भावाला भेटेन'; 'मी मुंबईस गेलों असतां तुझ्या भावास भेटेन;' आणि 'मी मुंबईस गेलों म्हणजे तुझ्या भावास भेटेन', अशा तऱ्हेनेंही करतां येतें. यांत 'जर-तर' या संकेतबोधक अव्ययाचा उपयोग नसतो. या निरनिराळ्या प्रकारच्या वाक्यांत अर्थाचा फरक दिसून येतो.

कोणत्याही भाषेंत निरनिराळे क्रियार्थ दर्शविण्यासाठीं नियमित काळ व अर्थ असतात. परंतु बोलणाराचें तेवढ्यानें काम होत नाहीं, यामुळें तेवढ्याच आख्यात विभक्तींवरून निरनिराळे अर्थ काढतात;

अथवा कृदन्तें आणि क्रियापदरूपें यांच्या साह्यानें निरनिराळ्या घटना बनवून आणितात. इंग्रजी आणि मराठी या भाषांतील क्रियार्थदर्शक घटनांची तुलना या दृष्टीनें फार मनोरंजक आहे असें दिसून येईल. संस्कृत ही चालू भाषा नसल्यामुळें तींत दहा लकार किंवा आख्यात-विभक्ती बनून राहिल्या आहेत, आणि त्यांच्या उपयोगानें काम झालेलें दृष्टीस पडतें. मराठींत प्रथमतः थोड्या आख्यात विभक्ती घेतल्या. परंतु त्यांनीं भागेना, म्हणून त्यांच्यावरूनच आणखी आख्यातविभक्ती तयार केल्या. जुन्या वर्तमानावरून रितीभूत आणि भविष्य झाले. चालू वर्तमानावरून संकेतार्थ झाला. याखेरीज कृदन्तें आणि धातुरूपें, आणि प्रातिपदिकांचीं रूपें व धातुरूपें यांच्या घुळणीनें क्रियापदाचा अर्थ आणण्याच्या अनेक तऱ्हा आहेत. यांची चर्चा व्याकरणामध्यें केलेली आहे. वर्तमानावरून निरनिराळे क्रियार्थ उत्पन्न करणें, ही फार जुनी तऱ्हा आहे. वेदभाषेंत 'लेट्' म्हणून एक आख्यातविभक्ती आहे. ही आख्यातविभक्ती म्हणजे केवळ वर्तमानकाळाच्या रूपांचा किंचित् फेरफारानें केलेला तऱ्हेतऱ्हेचा उपयोग होय. अशा प्रकारें अनेक तऱ्हेचे—अगदीं निरनिराळे असेही—क्रियार्थ वेदभाषेंत बनविलेले आढळतात. या रीतीनें बोलणारांची पुष्कळशी सोय अगदीं थोडक्यांत होत असावी. संस्कृत भाषा व्यवस्थित बनल्यावर ही 'लेट्' नांवाची आख्यातविभक्ती नष्ट झाली. परंतु व्याकरणबद्ध संस्कृतांतही ठरीव आख्यातविभक्तींवरून निरनिराळे अर्थबोध करून घ्यावे लागतातच.

वर्तमानकृदन्तावरून भूतकाळाचा बोध होतो अशा प्रकारचें 'हो' धातूचें उदाहरण मराठींत आहे.

| | |
|---|---|
| पुल्लिंगी—मी होतों | आम्ही होतों |
| तूं होतास | तुम्ही होतां |
| तो होता | ते होते |

स्त्रीलिंगी—मी होत्यें, तूं होतीस, ती होती, इ०

या रूपांत भूतकाळाचा 'ल' नसून भूतकाळाचा बोध होतो. 'हो' धातूपासून ल-भूतचीं झालों, झाला, वगैरे रूपें झालीं आहेत. 'हो'च्या

भूताचा 'अस' धातूच्या रूपांऐवजीं उपयोग होतो. परंतु 'अस' धातूच्या ल–भूताचा उपयोग भूतार्थी न होतां संकेतबोधक होतोः–

| | |
|---|---|
| मी असलों, असल्यें | आम्ही असलों |
| तूं असलास, असलीस | तुम्ही असलां |
| तो असला | ते असले, |
| ती असली | त्या असल्या |
| तें असलें | तीं असलीं, इ०. |

(७) भूतकाळ.

मराठींत चालू भाषेमध्यें असणारा भूतकाळ हा 'ल' प्रत्यय लागून होणारें भूतकाळाचें विशेषण गेला, दिसला, इत्यादि यांवरून झाला. विशेषणावरून झाल्याकारणानें या काळास लिंगभेद आहे.

| हस धातु पुल्लिंग | | स्त्रीलिंग | |
|---|---|---|---|
| मी हसलों | आम्ही हसलों | मी हसल्यें | आम्ही हसलों |
| तूं हसलास | तुम्ही हसलां,–लेत–लांत | तूं हसलीस | तुम्ही हसलां,–ल्यात,–लांत |
| तो हसला | ते हसले | ती हसली | त्या हसल्या |

नपुंसकलिंग.

| | |
|---|---|
| मी हसलें | आम्ही हसलों |
| तूं हसलेंस | तुम्ही हसलां,–लांत,–लींत |
| तें हसलें | तीं हसलीं |

सकर्मक धातूवरून ल-विशेषण कर्मणी होतें. कर्मणिप्रयोग प्रथम किंवा द्वितीयपुरुषीं कर्म असतां होत नाहीं, यामुळें सकर्मक धातूंचीं रूपें फक्त तृतीयपुरुषीं असतात. जसें,—

[ निबंध ] लिहिला, [ निबंध ] लिहिले.

[ पोथी ] वाचिली, वाचली; [ पोथ्या ] वाचिल्या; वाचल्या.

[ पत्र ] धाडिलें, धाडलें; [ पत्रें ] धाडिलीं, धाडलीं.

कित्येक सकर्मक क्रियापदें असतां त्यांवरून कर्मणिरूपें न होतां कर्तरीच होतात.—'मी वेद शिकलों'. कित्येकांवरून विकल्पें दोन्ही

होतात;—'मी वेद पढलों,'—'वेद पढला'. याविषयीं जास्त माहिती व्याकरणांत पाहावी. [ उमज आणि आचर धातू ]

प्रथम आणि द्वितीयपुरुषीं कर्मपद आहे असे प्रयोग कवितेंत असतात. मोरोपंतानें असले प्रयोग बरेच केले आहेत. पुढील उदाहरणें तुकारामाचीं आहेतः—

" केलासि तूं उभा आजवरी संतीं, धरविले हातीं कट दो, देवा".

" इंद्रियांचीं दीनें । आम्ही केलों नारायणें".

याविषयीं जास्त माहिती व्याकरणांत पाहावी.

याचीं रूपें चालू वर्तमानकाळाप्रमाणें ल-प्रत्ययान्त विशेषण आणि 'आहे' हें साह्य रूप ह्यांच्या जुळणीनें सिद्ध होतातः—

गेलो + आहें=गेलो हें=गेलोयँ, गेलोएँ=गेलों

गेली + आहेस=गेलीएस=गेलीस

गेले + आहांत=आहा याबद्दल आ होऊन, गेलांत; ए होऊन गेलेत; इत्यादि.

तृतीय पुरुषीं प्रत्यय न लागतां फक्त एकवचनीं आणि अनेकवचनीं–प्रथमेच्या रूपांसारखीं–रूपें होतात. यावरून त्यांच्या पुढें आहे, आहेत, अशीं रूपें मानावयाचीं असें दिसतें. याचा संबंध पुढें कर्मणिवाक्यरचनेमध्यें येईल.

' ते बसले ' याबद्दल ' ते बसलेत ', ' त्या बसल्या ' याबद्दल ' त्या बसल्यात, बसल्याती ', ' ती बसलीं ' या बद्दल ' बसलिऐंत ' अशीं प्रत्यय लागलेलीं रूपें बोलण्यांत येतात. यावरून तृतीयपुरुषीं प्रत्यय लावण्याचा प्रयत्न होत असे.

कर्मणिप्रयोग फक्त याच रूपांवरून होतो, यासाठीं या रूपांना उद्देशून कर्मणिप्रयोगाविषयीं चर्चा येथेंच केली पाहिजे होती, पण याचा संबंध वाक्यघटनेकडे पोंचतो. येथें या रूपांचें मूलभूत असें जें ल-विशेषण, त्याचा इतिहास सांगावयाचा.

संस्कृतांत भूतकालवाचक ( कर्मणि ) विशेषण 'कृत'.

मराठींतला 'ल' प्रत्यय या 'त' पासून झाला. परंतु तो कसा बनला याविषयीं निरनिराळीं मतें आहेत.

पालीमध्यें 'ऋ' चा 'अ' होऊन 'कत' होतें. मुख्य प्राकृतांत (महाराष्ट्रींत) 'कय (कअ)' होतें. शौरसेनींत 'कद' होतें, मागधींत 'कड' होतें. मराठी ही प्राकृतच आहे. तिला आपण अजूनही प्राकृत असें नांव देतों. मराठींत 'कल' होतें. तेव्हां या 'कृत'च्या रूपांवरून भाषांना हवीं तर अशीं नांवें देतां येतातः—

| | |
|---|---|
| संस्कृत–कृतभाषा | मागधी–कडभाषा |
| पाली–कतभाषा | शौरसेनी–कदभाषा |
| महाराष्ट्री–कयभाषा | मराठी–कलभाषा |

वास्तविक पाहिलें तर मूळच्या 'कृत' या संस्कृताचीं इतर भाषांत जशीं रूपें झालीं, तसें मराठींत 'कल' हें रूप झालें. या सर्व भाषा एकच आहेत. अमक्या देशभाषेंतलें अमकें रूप अमक्या प्राकृतांतील अमक्या रूपापासून झालें, असें स्पष्ट ठरविण्याजोगा भिन्नभाव या भाषांमध्यें नाहीं. शौरसेनींत 'द' याचीं ड, र, ल, अशीं अक्षरें होतात. तेव्हां शौरसेनींतल्या 'द'चा मराठींत 'ल' झाला, असें म्हणण्यास चिंता नाहीं. तसेंच पालीमधूनच एकदम मराठींत पुष्कळ व्याकरणव्यवस्था आल्या आहेत, हें मागें दाखविण्यांत आलें आहे. तेव्हां पालीमधील 'कत' याचेंच 'कल' झालें असेल.

त, ट, द, ड, न, हीं अक्षरें एकमेकांबद्दल झाल्याचीं आणि त्यांबद्दल 'ल' झाल्याचीं शेंकडों उदाहरणें प्राकृत शब्दांत आहेत. कांहीं निवडक उदाहरणें प्रौढबोध व्याकरण क. २१३ (४ आ, इ) यांत दिलीं आहेत. मृच्छकटिक नाटकांत 'अज्जए कले निचए' असें 'आर्ये, कृतः निश्चयः' याबद्दल आलें आहे. तेव्हां मराठींत स्वतन्त्रपणेंच 'कृत' याचें 'कल' झालें असें मानण्यासही प्रत्यवाय नाहीं.

मराठी ही महाराष्ट्रीपासूनच झाली, असें म्हणण्याचा ज्यांचा आग्रह आहे, त्यांना यासंबंधानें अशी अडचण येते कीं, महाराष्ट्रींत या 'त'चा 'द' वगैरे न होतां 'य' आणि मग 'अ' होतो. तेव्हां य, अ, याचा 'ल' कसा होईल? ते म्हणतात कीं, यासाठीं प्रथमतः अ, ए, वगैरे होऊन पुढें हा नवीन 'ल' आला. याला जुळण्यासारखीं अशीं केला, गेला, मेला, जाहला, आला, भियाला, पियाला,

इत्यादि थोडीं रूपें आहेत. हीं रूपें महाराष्ट्रीमधून आलीं असतील आणि त्यांतला 'ल' हा बाहेरचा असेल; परंतु एकंदर रूपें अशा रीतीनें झालीं नाहींत. त्यांतील 'ल' बाहेरचा नसून मूळच्या रूपाचाच अवयव आहे, म्हणजे तो मूळ शब्दांतल्याच त, द, ड, किंवा न चा झालेला आहे. पुढील कित्येक उदाहरणांवरून हें लक्षांत येईल:—

तप्त; यांतील शेवटच्या जोडाक्षरांत स्वर शिरून, तपत; पुढें 'त' चा 'ल' होऊन—तापला. याचप्रमाणें:—

| | | | |
|---|---|---|---|
| प्राप्त– | प्रापत, पापत=पावला | मुक्त– | मुकत = मुकला |
| लब्ध– | लबध (हा 'ध' तचा आहे)=लाभला | रक्त– | रअत = लाल |
| | | ज्ञान– | जाणत (न) = जाणलें |
| बद्ध– | बदध = बांधला | आगत– | आअद = आला |
| भक्षित | — भक्षिला | दृष्ट | — दिसला, देखला |
| वृष्ट | — वर्षला | | |
| पालित | — पाळला | रक्षित | — राखला |
| मारित | — मारिला | प्रविष्ट | — प्रवेशला |
| रुष्ट | — रुसला | उपविष्ट | — बैसला, बसला |
| तुष्ट | — तोषला | त्रुटित | — तोडला |

'इ-' आगम घेणारा धातु असून 'त' च्या मागें 'इ' स्वर असला म्हणजे अगदीं उघड उघड 'त' चा 'ळ' झालेला दिसून येतो. तेव्हां यावरून हा 'ल' मूळ 'त'प्रत्ययान्त कृदन्ताचाच अवयव आहे, बाहेरचा 'ल' नव्हे, असें अगदीं खास ठरवितां येतें.

*आतां मराठीमध्यें या 'ल' च्या पुढें आणखी एक 'ल' लागतो;* जसें,—लिहिलेलें, केलेलें, बसलेला, गेलेला, इत्यादि. यावरून महाराष्ट्रीमधील बाहेरचा जास्त 'ल' लावण्याची चाल ही मराठीनें घेतली आहे, असें दिसतें; भूतकृदन्ताचा क्रियापदाप्रमाणें उपयोग करावयाचा असतां, मूळचा 'ल' झालेला तेवढाच असतो. परंतु केवळ विशेषणाचा उपयोग कर्तव्य असतां एक जास्त 'ल' लागतो; उदा०— 'मुकेलेला मनुष्य,' 'पाठविलेलें, धाडलेलें पत्र', 'तो मुंबईस कधीं गेलेला नाहीं, इत्यादि.

एक 'ल' असून केवळ विशेषणासारखा उपयोगही पुष्कळदां असतो; उदा०—'वाळलें गवत', 'केला धर्म देवाला रुजू होतो', 'आजेविला नाम प्रतिनिधि', 'देखल्या देवा दंडवत', 'आला गेला पाहुणा' इत्यादि.

दोन 'ल' असतां पूर्णभूतकाळासारखा उपयोग असतो, असें या उदाहरणांवरून दिसून येईल.

ज्ञानेश्वरी वगैरे जुन्या ग्रंथांत या काळाचीं कित्येक चमत्कारिक रूपें आहेत. अशीं कित्येक रूपें या वेळापर्यंत येऊन पोंचलीं आहेत. सद्या रूपांपैकीं 'दिसला' हें पालींतील रूपासारखें रूप आहे. सांगितलें, हाणितलें, यांचा पूर्वीचा 'त' राहून जास्त 'ल' लागला आहे. भाषा स्थिरावली नव्हती तेव्हांच्या उपयोगाचे हे अवशेष होत. त्यांवरून हीं रूपें निरनिराळ्या प्राकृत भाषांमधलीं आहेत असें दिसून येईल.

## (८) विध्यर्थ

हा लकार विशेषणावरून झाला आहे. संस्कृतांत विध्यर्थक विशेषण 'तव्य' प्रत्यय लागून होतें. त्या प्रत्ययाचें प्राकृतांत 'अव्व' होतें. मराठींत 'अव्' होतें. हें विशेषण कर्मणी आहे. यामुळें याच्या उपयोगाच्या संबंधानें सर्व गोष्टी ल-भूताप्रमाणेंच आहेत. याचीं अकर्मक धातूचीं रूपें अशीं:—

| | | | |
|---|---|---|---|
| मी हसावा | आम्हीं हसावे | मी हसावी | आम्ही हसाव्या |
| तू हसावास | तुम्ही हसावेत | तू हसावीस | तुम्ही हसाव्या, -व्यात |
| तो हसावा | ते हसावे,-वेत | ती हसावी | त्या हसाव्या, -व्यात |

| | |
|---|---|
| मी हसावें | आम्हीं हसावें |
| तूं हसावेंस | तुम्हीं हसावीं–वींत |
| तें हसावें | तीं हसावीं,–वींत |

या काळाचीं कर्मणी रूपें फक्त तृतीय पुरुषीं होतात. तीं एकवचनीं आणि अनेकवचनीं केवळ लिंगदर्शक प्रत्यय लागून अशीं होतात:—

| | |
|---|---|
| ग्रंथ वाचावा | ग्रंथ वाचावे |
| पोथी लिहावी | पोथ्या लिहाव्या |
| पत्र धाडावें | पत्रें धाडावीं |

ह्या विशेषणाचा नामाप्रमाणें उपयोग होऊन त्यास चतुर्थीचे आणि च-विशेषणाचे प्रत्यय लागतात, आणि नामें, विशेषणें, व अव्ययें होतातः– करावयास, करावयाला, करावयातें, करावयाचें, इ०. यांतील 'व'चा लोप करून तीं करायाचें, करायाला, अशीं ही लिहितात.

याप्रमाणें मराठींत एकंदर आठ लकार बनले आहेत. त्यांतले पांच काळ आहेत आणि तीन अर्थ आहेतः— १ जुना वर्तमानकाळ, २ चालू वर्तमान, ३ जुना किंवा रितीभूत, ४ चालू (ल-)भूत, ५ भविष्यकाळ, ६ आज्ञार्थ, ७ विध्यर्थ आणि ८ संकेतार्थ.

यांतले २,४,७ आणि ८ हे विशेषणांवरून झाल्यामुळें लिंगाप्रमाणें बदलतात. बाकीचे चार मूळ क्रियापदावरून झाले म्हणून बदलत नाहींत. तसेंच ल-भूत आणि विध्यर्थ हे कर्मणिविशेषणांपासून झाले, म्हणून मराठींत ते सकर्मक धातूंवरून कर्मणीच आहेत, आणि ते फक्त तृतीयपुरुषीं होतात.

संस्कृतांत सर्व काळीं कर्तरी आणि कर्मणी अशीं दोन प्रकारचीं क्रियापदांचीं रूपें होतात. कांहीं काळांचें कर्मणिरूप प्रत्ययाचे अगोदर 'य' लागून होतें. कांहीं काळांचें आत्मनेपदी रूप होऊन होतें. पालींत आणि प्राकृतांत बहुतेक असाच प्रकार आहे; मात्र आत्मनेपद कमी होत गेल्यामुळें य-प्रत्ययानेंच विशेषतः कर्मणि रूपें होतात. मराठींत 'य' प्रत्ययाचा 'ज' होऊन करिजे, लिहिजेलें, बोलिजेल, अशीं रूपें होत असत. यांचा उपयोग ज्ञानेश्वरींत आणि जुन्या कवितेंत पुष्कळ आहे. क्वचित् 'य' प्रत्यय लागून करियलें, धरियलें, अशीं रूपें आढळतात. पुढें हीं रूपें उपयोगांतून गेलीं. रूपें गेलीं तेव्हां वास्तविक कर्मणिप्रयोगही मराठींत नष्ट झाला. ल-भूत आणि विध्यर्थ यांचीं रूपें स्वभावतःच कर्मणी असल्यामुळें त्यांच्या वाक्याचा कर्मणिप्रयोग होतो. याचा विचार पुढें वाक्यघटनेंत आहे.

संस्कृतांत प्रयोजक प्रत्यय 'प' आणि 'अय' असे दोन आहेत. 'प' हा जुना प्रत्यय असून फक्त आकारान्त वगैरे कांहीं धातूंना होतो. 'अय' सर्वत्र होतो. पालींत हे दोन्ही प्रत्यय होतात; पण 'प' चा उपयोग जास्त. इतर प्राकृतांत 'अय' प्रत्यय होतो. मराठींत 'प' वरून 'व' (अव) होऊन करविणें, देवविणें, बसविणें, असे प्रयोजक धातू होतात.

कांहीं धातूंच्या उपान्त्य 'अ'स वृद्धी होऊन प्रयोजक धातू होतात. जसें, मरणें, मारणें; तरणें, तारणें; इत्यादि. हा प्रघात फार जुना आहे. पालीमध्यें अशीं प्रयोजक रूपें होतात.

गोंव्याच्या भाषेंत 'अव' प्रत्ययाबद्दल 'अय' होतो. हा 'अय' किंवा 'प', 'व' चाच झालेला आहे. जसें, 'करायणां,' 'कराइणां,' इत्यादि. शिवाय त्या प्रांतांत 'व' चीं रूपें आहेतच.

## (९) कांहीं कृदन्तें

कृदन्तांचा इतिहास व्याकरणामध्यें जेथच्या तेथें सांगितला आहे. येथें त्याचें थोडक्यांत दिग्दर्शन करून कांहीं विशेष गोष्ट असल्यास सांगावयाची:—

(१) वर्तमानकृदन्त नाम करणें, हें धातूस 'अन' प्रत्यय लागून संस्कृतांत होतें. त्यास नपुंसकलिंगी 'एँ' प्रत्यय लागून मराठी कृदन्त झालें.

(२) संस्कृतांत धातूस 'त' '(न्त)' प्रत्यय होऊन विशेषण होतें, त्याचेंच मराठींत करीत, जात, येत, लिहीत, असें झालें.

(३) वरील विशेषणाचा नामासारखा उपयोग होऊन आणि त्याची सप्तमी होऊन करितां, येतां, जातां, इत्यादि अव्ययें झालीं. त्यांस पुढें ना लागतो; जसें, जातांना.

(४) ऊंकारान्त वर्तमान अव्यय 'करू', ह्याचा प्रत्यय संस्कृतांतील 'तुम्' (कर्तुं, दातुं, इ०) प्रत्ययावरून झाला.

(५) करीत, जात, येत, या विशेषणांना लिंगविकार होऊन पुढें भूतकाळाचें क्रियापद येतें, आणि अशा रीतीनें 'करिता झाला',

'जाती झाली', 'असतें झालें', अशीं जोड क्रियापदें होतात. मराठींत सकर्मक धातूंना कर्तरिभूतकाळ नाहीं, यामुळें 'तो पत्र लिहिता झाला' 'ते अमुक काम करिते झाले' असे प्रयोग होतात, ते कर्तरिभूतार्थी उपयोगितां येतील.

( ६ ) 'ल'-प्रत्ययान्त आणि 'लेल'-प्रत्ययान्त कर्मणिविशेषण मागें सांगितलेंच आहे.

( ७ ) भूतकाळवाचक 'ऊन'-प्रत्ययान्त अव्ययें घेऊन, जाऊन, येऊन, यांचा 'ऊन' प्रत्यय हा संस्कृतांतील अगदीं जुना प्रत्यय 'त्वान्' आणि प्राकृतांतील 'त्तूण' यापासून झाला.

( ८ ) भविष्य विशेषण 'णार', हें 'करण' या कृदन्त नामाच आर ( कार ) प्रत्यय लागून झालें. जसें, करणार, जाणार, बोलणार, इत्यादि.

( ९ ) 'आव' प्रत्ययानें होणारें विध्यर्थविशेषण मागें आलेंच आहे.

मधल्या संस्कृत काळांत आणि प्राकृतांत कृदन्ताचा मुख्य क्रियापदाप्रमाणें उपयोग करण्याची चाल पडली आणि तीमुळें मराठी वगैरे देशी भाषांत विशेषणांवरून काळ आले, हें मागें सांगितलेंच आहे. मराठी कृदन्तांचाही असाच उपयोग होतो, हें लक्षांत येईल. या विषयीं पुढें वाक्यघटनेंत चर्चा येईल.

मराठींतले तद्धितप्रत्यय आणि दुसरे अनेक प्रत्यय संस्कृत आणि प्राकृत यांमधून मराठींत आले आहेत. बरेचसे प्रत्यय मराठींत उत्पन्न झाले आहेत. याबद्दल व्याकरणांत जेथल्या तेथें सांगितलें आहे. या ठिकाणीं त्याविषयीं जास्त चर्चा करण्याप्रमाणें कांहीं नाहीं.

कित्येक प्रत्यय आणि रूपें अशीं दिसून येतात कीं, त्यांचें मूळ जरी संस्कृतांत दिसून येत नाहीं, तथापि ते प्रत्यय आणि रूपें अगदीं जुन्या अशा वेदभाषेंतून आलेलीं असावीं. संस्कृत व्याकरण झालें आणि संस्कृत भाषा नियंत्रित झाली, त्या वेळीं असले शब्द त्या भाषेंत गोवले न गेले, तरी ते शेंकडों वर्षांपासून लोकभाषेमध्यें रूढ होते. लोकभाषांवरून पुढें देशभाषा मुख्यत्वेंकरून झाल्या, त्यामुळें असलीं रूपें व भाषापद्धतीचे प्रकार त्या भाषांतून अवतीर्ण झाले आहेत.

असे प्रकार पुष्कळ सागता येतील. परतु पाल्हाळ होऊ नये ह्मणून काहीं ठळक उदाहरणें सागतों. सस्कृत व्याकरणात सुमारें अठराशें धातू सागितले आहेत. त्यातले सुमारें साडेआठशें सस्कृतात उपयोगिलेले आढळतात. यावरून कित्येक पाश्चात्य विद्वानानीं असेंही म्हटलें आहे कीं, बाकीचे सर्व ब्राह्मणानीं कृत्रीम बनविले. परतु सस्कृतात उपयोगिलेले आढळून येतात, त्याखेरीज शेंकडों धातू पाली प्रथातून आढळून येतात. यावरून ते कोणीं बनावट केले नसून लोकव्यवहारात होते, असें स्पष्ट होतें. असाच प्रकार अनेक इतर शब्दाच्या सबधानेंही आढळून येतो. असले लौकिक भाषेंतले शब्द चालू देशभाषात आले आहेत, आणि त्याचें मूळ सस्कृतात न आढळलें म्हणजे त्याना देशी असें नाव देतात. पाली भाषेचा चागला अभ्यास चालू होऊन असल्या शब्दाची छाननी झाली पाहिजे

मराठींत कित्येक असे जोड शब्द आहेत, कीं ते निकट येतात, आणि त्यातील पुढल्यास विभक्तिप्रत्यय लागून, मागल्याचें सामान्य रूप होते, ( क्वचित् सामान्यरूप होतही नाहीं ), आणि पुढील शब्दास लागलेला विभक्तिप्रत्यय मागील शब्दाशीं घ्यावा लागतो. हा एक अर्धनष्ट द्वद्व किंवा अलुक् समाहारद्वद्व करण्याचा प्रकार आहे जसे — आगा खाद्यावर, उरा पोटाशीं, पोटा पाण्याचें, नाका डोळ्याचा, हाता-तोंडाशीं, बोला फुलाला, सग्या सोयऱ्यास, पोरा सोराना, झाडा माडात, लहान मोठ्यास, साज सकाळ इत्यादि. हा प्रकार सस्कृतात नाहीं. अशा शब्दाच्या जोड्याचा सस्कृतात द्वद्व समास होतो परतु वेदभाषेंत हा प्रकार आहे. "त्वमग्ने वृतपा असि देव आ मर्तेष्वा," ' हे अग्ने, तू देव आणि मर्त्य याना नियम लावून देणारा आहेस ', यात ' देवेषु—मर्त्येषु ' याबद्दल ' देव मर्त्येषु ' घातले आहे ( २ ) "वृषा रुक्ष ओषधीषु नूनात्", ' अग्नि वृक्ष-औषधींमध्यें ( झाडामाडात ) गर्जना करून पेटत आहे ', यात ' रूक्षेषु ओषधीषु ' अस यावयाचें ( ३ ) "तस्मिन्महत्स्वाजिषूतेमर्भे हवामहे", ' त्या( इद्रा )ला आम्ही लहानमोठ्या युद्धात आवाहितों ', यात ' अर्भेषु—महत्सु ' यावयाचें, येथें अगदीं मराठीप्रमाणें ' अर्भे—' असें सामान्यरूप झालें आहे, हें

लक्षांत ठेवावें. व्यवस्थित संस्कृतांत याची समासघटना ठरली. परंतु लोकभाषेंत हा प्रकार शेंकडों वर्षे तरला राहून ही तऱ्हा मराठीपर्यंत येऊन पोंचली आहे.

'खा खा खातो, ' 'मांड मांड मांडला ', मर मर मरतो ' असलीं वाक्यें मधल्या संस्कृतांत आढळत नाहींत, पण तीं वैदिक भाषेपासून चालू असून मराठीपर्यंत येऊन पोंचलीं आहेत, यांत संशय नाहीं. 'मला नाहीं वाटत कीं तो हरीची निंदा करील!' असलें वाक्य मराठींत अगदीं भाषासंप्रदाय म्हणून उपयोगांत आहे. पण तें मधल्या संस्कृतांतून आलें नसून प्राचीन संस्कृतांतलें आहे. वेद, ब्राह्मणें, उपनिषदें, सूत्रें, या फार जुन्या संस्कृताचा अभ्यास चालू देश-भाषांच्या तुलनेनें होऊं लागला असतां असे अनेक प्रकार दिसूं लागतील. असें होणें अगदीं स्वाभाविक आहे. लक्षांत ठेवावयाची गोष्ट एवढीच आहे कीं, चार-पांच हजार वर्षांमागें चालू असलेली आणि एक-प्रकारें विस्मृतीप्रत पोंचलेली वेदभाषा ही जरी संस्कृत म्हणून निराळी बनली, तरी मूळपासूनची भाषापरंपरा चालू देशभाषांपर्यंत अव्याहत येऊन पोंचली आहे; आणि संस्कृतांतून देशभाषेंत आलेले नव्हत असे अनेक शब्द, रूपें आणि भाषणसंप्रदाय वेदभाषेंतून लोकांच्या बोलण्यांत राहात राहात आलेले आपल्यास आढळून येतील.

निष्पन्न मराठी अशी तद्धितादि प्रत्यय लागून झालेली मराठी शब्दांची घटना कोठून आली असेल अशा विचार करितांना असले प्रत्ययघटित शब्द फार जुन्या काळापासून चालत असलेल्या शब्दांवरून झाले असतील, असें मानण्यास वास्तविक कांहीं चिंता नाहीं.

स्थिरावलेल्या संस्कृतांत नाहींत, पण जुन्या संस्कृतांत होते असे भाषेंत आलेले प्रकार ठिकठिकाणीं सांगितलेच आहेत. स्थिर संस्कृतांत विभक्तीच्या एकाद्या वचनाचें बहुधा एकच रूप असतें. मराठींत एका अर्थाचीं अनेक विभक्तिरूपें होतात, हा अगदीं जुना प्रकार आहे. स्थिरसंस्कृतांत एकेका प्रकारचें बहुधा एकेक धातुसाधित असतें. जुन्या संस्कृतांत आणि पुढें मराठींत अशा प्रकारचीं एकाच अर्थाचीं निरनिराळीं रूपें आहेत.

मराठींत कृदन्तांना चतुर्थीचे प्रत्यय स, ला, इत्यादि लागून आणि षष्ठीविशेषणाचा 'च'प्रत्यय लागून करावयास, करायला, करण्यास, करावयाचें, इत्यादि प्रकारचीं नामें, विशेषणें तयार होतात. असा प्रकार लौकिक अथवा परिनिष्ठित संस्कृतांत आढळून येत नाहीं. पण तो प्राचीन वेदभाषेंत होता, असें आढळून येतें. त्या भाषेंत वक्षे, जीवसे, पिबध्यै, कर्तवे, दातवै, हन्तवे, दृशये, रोहिष्यै, अशीं कृदन्तांचीं चतुर्थीचीं रूपें आहेत. यांतील कांहीं रूपें केवळ नामाचीं चतुर्थीचीं रूपें असून अव्ययें बनलीं आहेत. हीं रूपें वर सांगितलेल्या मराठी रूपांसारखींच अगदीं आहेत. लौकिक संस्कृतांत कृदन्त अव्ययाचा प्रत्यय 'तुम्' आहे. पण 'कर्तुं' ही 'कर्तु' या कृदन्तनामाची द्वितीया होय. याचेंच रूपांतर मराठींतलें 'करावयास' हें असलें पाहिजे. 'कर्तु' याचीच चतुर्थी होऊन 'कर्तवे' असें अव्यय बनलें. तें सामान्यरूपासारखें मानलें जाऊन त्यापासून 'करावयास' असें झालें.

---

## ३–कांहीं किरकोळ गोष्टी

(१) भाववाचक नामाचा मराठी प्रत्यय 'पण' याचें मूळ आपल्याला लौकिक संस्कृतांत आढळणार नाहीं; पण जुना प्रत्यय 'त्वन' असा आहे, त्यापासून 'पण' झाला यांत शंका नाहीं.

मराठींत जिवस ( शक्तिमान् ) असा शब्द आहे. जुन्या संस्कृतांत किंवा वेदभाषेंत 'जीवस' असें भाववाचक नाम आहे. हे दोन्ही शब्द एकच आहेत; परंतु पुढील संस्कृतांत हा शब्द नाहीं. मराठींत अशाच प्रकारचे ढोलस, हाडस, कणीस ( कण-स,–दाणेदार ), इत्यादि शब्द आहेत.

हत्वा, पीत्वा ( हाणून, पिऊन ) हीं जुनीं कृदन्तें तृतीयेचीं रूपें आहेत.

मराठींतलीं अव्ययें घेऊन तपासून पाहिलीं असतां असें दिसून येईल, कीं त्यांतलीं पुष्कळ मूळचीं निरनिराळ्या नामांचीं अथवा सर्वनामांचीं विभक्तिरूपें आहेत. कित्येक तशींच अथवा थोडा फार

फेरफार होऊन अव्ययें बनलीं. कित्येक अशीं बनलीं आहेत कीं त्यांना आतां स्वतंत्र अर्थ नसून तीं शब्दाबरोबर आलीं म्हणजे एकंदर घटनेला अर्थ येतो. नामांचे, सर्वनामांचे आणि क्रियापदांचे प्रत्यय असेच बनत गेले. कडे, मधें, मधीं, मध्यें, केव्हां, केंची, कोठें, कधीं, साठीं, स्तव, पाशीं, वगैरे रूपें अशींच आहेत.

मराठीत केवळ सामान्यरूपानें विभक्ती दाखवितात, म्हणजे प्रत्यय गाळतात. असा प्रकार वेदभाषेंत होता. 'चत्वारि शृंगा [ शृंगाणि ]'; 'परमे व्योमन्' 'नाभौ' या सप्तमीबद्दल 'नाभा' ( मराठी,–डोळां, माथां, पायां, इत्यादि) 'अतो विश्वन्यद्भुता( नि )' येथें प्रत्यय गाळला आहे; यशा, हिमा, उरुया, अशा तृतीया आहेत; अशा रीतीनें प्रत्यय गाळून व आ, या, इया, असे अन्त्य-स्वर करून सामान्यरूपासारखीं रूपें केलेलीं आढळतात. लौकिक संस्कृत ठाम झाल्यावर जरी असले प्रकार फारसे आढळत नाहींत, तरी ते चालू भाषेंत होते; कारण तशा प्रकारचीं रूपें पालींत आहेत. जसें,–विनिच्छया–[ विनिच्छयानि ]; लक्खना–[ लक्खनानि ]; मन्ता–[ मन्ताय ]; परिञ्ञा–[ परिञ्ञाय ]; विनया–[ विनयाय ]; इत्यादि. हीच तऱ्हा पुढें मराठींत आली.

मराठीमध्यें कवितेंत मूळचे ऱ्हस्व-दीर्घ स्वर वृत्तसुखासाठीं किंवा इतर कारणांनीं बदलतात. हा प्रकारही प्राचीन आहे. 'इमं मे वरुण श्रुधी( धि )' अशा प्रकारचीं पुष्कळ वैदिक उदाहरणें आढळतात. वृत्तसुखार्थ किंवा अन्यकारणांनीं ऱ्हस्व किंवा दीर्घ स्वर फिरविण्याची वहिवाट लौकिक संस्कृतांतही आहे. 'अपि माषं मषं कुर्यात्, छन्दोभंगं न कारयेत्' अशी संस्कृत म्हणच आहे. प्रख्यात ग्रंथकार जरी कोष-व्याकरणांना अनुसरून चालतात, तरी कोषकार आणि व्याकरणकार यांनींच अशा रूपांच्या सिद्धतेची इयी तेवढी मोकळीक ठेविली आहे. कोषांत एकाच शब्दाचे ऱ्हस्व-दीर्घ निरनिराळे अंत आढळतात. तसेंच एकच शब्द अनेकलिंगी सांगितला असतो. हें काय म्हणून ! अर्थात् कसाही कल्पिला तरी चालतो अशी वहिवाट होती म्हणून. कात्यायनाचें 'कृदिकारादक्तिनः' हें वार्तिक अशाच कामीं लाविलें

जात आहे; आणि त्यामुळें रात्रि–रात्री, भूमि–भूमी; शकटि–शकटी; पद्धति–पद्धती; शरयु–शरयू; अशा जोड्या तयार झाल्या आहेत.

लौकिक संस्कृतांत सामासिक शब्दाच्या प्रथमपदातील अन्त्य 'ई' ऱ्हस्व झाल्याचीं उदाहरणें पुष्कळ आहेत. 'ङ्यापोः संज्ञा छन्दसोः' या सूत्रानें कालिदास ( काली + दास ) वगैरे प्रयोग सिद्ध मानितात. पण 'वैदेहिबन्धोर्हृदय' ( रघु. १४ ) येथें संज्ञा नसताही स्वर ऱ्हस्व केला आहे. 'गर्भिणिप्रायाश्चित्त', 'पत्नयः', 'पत्निभिः', असे प्रयोग आश्वलायनश्रौतसूत्रांत आले आहेत. गर्भिणि, पत्नि, असे ऱ्हस्व इकारान्त प्रयोग तैत्तिरीय संहिता व ब्राह्मण यांत जागोजाग आहेत. रामायणांत 'मुनिपत्नयः', 'लक्ष्मिसपत्न', 'लक्ष्मिवर्धन', 'केतकिपुष्प', असे प्रयोग आहेत. अलीकडील संस्कृतांतला 'यथा सुराणा सुधया ( सुधाया )च सत्या' असा प्रयोग आणि स्मृतींतील 'पत्यौ' याबद्दल 'पतौ' सुप्रसिद्धच आहेत. या सर्व सोयी वृत्तसुखासाठीं अथवा ग्रंथरचनेच्या सुलभतेसाठीं केलेल्या आहेत हें उघड आहे. तेव्हां मराठी कवी व ग्रंथकार यांनीं असें केलें म्हणून त्यांना दोष देण्याचें कारण नाहीं.

हे जे प्रकार सांगितले, ते व्याकरणानें मान्य केलेले सांगितले. परंतु ग्रंथकारांनीं व्याकरणाचे नियम बाजूला ठेवून केलेले अनेक प्रकार आढळून येतात. साध्या पुराणाची गोष्ट राहोच, पण रामायण, महाभारत, यामध्येंही कवींनीं व्याकरणाचे न जुमानता केलेले शेंकडों प्रयोग आहेत संस्कृत भाषा अत्यंत नियमबद्ध असें जें आपण समजतों, तें केवळ क्षणण्यापुरतेंच आहे. आता एवढें खरें कीं, संस्कृत भाषा ही केवळ विद्वानांची भाषा झाल्यानंतर जे ग्रंथकार झाले, त्यांनीं व्याकरण पुढें ठेवूनच ग्रंथरचना केली आहे, यामुळें पुढील संस्कृत आणि विशेषतः काव्यनाटकादि ग्रंथ जास्त व्यवस्थित आहेत. परंतु पुराणें वगैरे जे अगदीं लौकिक ग्रंथ, त्यांत व्याकरणास सोडून केलेले प्रयोग पुष्कळ आहेत.

जुन्या संस्कृतांत 'देवासः' 'हस्तासः' अशीं अनेक वचनें येतात. मूळचीं अनेकवचनी रूपें हींच होतीं. पुढें लौकिक संस्कृतांत बदल

झाला. तथापि या प्राचीन संस्कृत रूपांवरून झालेलीं रूपें पालीमध्यें आहेत. कोंकणी मराठींत बापाष, भावाष, पुतास, आयशीस, अशीं मूळचीं नामें किंवा सामान्यरूपें मानून त्यांचे पुढें बापासला, भावासला, पुतासला, आयशीसला, अशीं रूपें करितात.

संस्कृत धातूंच्या गणांच्या खुणा प्राकृतांत नाहींत. पण क्वचित त्यांचे अवशेष मराठीपर्यंत येऊन पोंचले आहेत. बुझावणें ( बुध्य ), उपजणें (उत्पद्य), झुजणें (युध्य), माजणें ( माद्य ), खिजणें ( खिद्य ), जाणणें ( जानामि ), या धातूंत हा प्रकार दिसून येईल.

(२) संधीः—संस्कृतांत दोन स्वर अथवा व्यंजनें जवळ आलीं असतां —शब्द एकच असतां—संधी झालाच पाहिजे असा नियम आहे. संधी मुळारंभीं उच्चारसौकर्याकरितां करूं लागले हें उघडच आहे. पालीमध्यें संस्कृतांतले कठीण संधी जाऊन पूर्वरूप आणि पररूप संधी राहिले. दोन स्वरांपैकीं जो जोरदार असेल आणि ज्याचा उच्चार साधा असेल, तोच राहावयाचा. मराठींत हे पालींतले संधी आले आहेत. शिवाय रूपें बनतांना संस्कृताप्रमाणें, पालीप्रमाणें आणि क्वचित् निराळ्या प्रकारेंही संधी होतात ते व्याकरणांत जेथच्या तेथें सांगितले आहेत.

हे फेरफार भाषा बोलण्यामध्यें चालू असतां फार होतात. संस्कृत भाषा केवळ वाङ्मयाची आणि विद्वानांची बनून नियमांनीं निगडित झाल्यावर अर्थात् ते बंद पडले. परंतु त्यांचा प्रघात लोकव्यवहाराच्या चालू भाषेपर्यंत येऊन पोंचला आहे.

( ३ ) लिंगभेदः—मनुष्यें आणि इतर प्राणी यांच्या नांवांचा पुरुष-स्त्रीभेद भाषेमध्यें दाखविला जाणें हें स्वाभाविक आहे. परंतु संस्कृत भाषेंत अप्राणिवाचक नामांनाही पुरुषस्त्रीभेद मानलेला आहे. असाच प्रकार युरोपांतील बहुतेक भाषांमध्यें आहे. इंग्रजी भाषेनें मात्र हा प्रकार अगदीं टाकून दिला आहे. हिंदुस्थानांतील देशी भाषांपैकीं सिंधी, हिंदी, यांमध्यें हा भेद आहे; परंतु त्या भाषांत नपुंसकलिंग नसल्यामुळें हा भेद बराच सोपा झाला आहे. निर्जीव पदार्थ पुरुष किंवा स्त्री मानावयाचे असें ठरल्यावर मग त्यांतले पुरुष म्हणजे पुल्लिंगी कोणते मानावे आणि स्त्रीलिंगी कोणते मानावे या विषयीं मत-

भेद उत्पन्न व्हावयाचा. तसा मतभेद संस्कृतांत झाला आहे, आणि त्या भाषेंत एकच शब्द पुष्कळदां दोन, किंवा तीन लिंगी असतो. विशेषणास विशेष्याचा लिंगभेद व्हावयाचा; आणि मराठींतलीं कित्येक क्रियापदरूपें मूळचीं विशेषणें आहेत, यामुळें मराठींत—आणि त्याचप्रमाणें इतर देशी भाषांमध्यें—हा लिंगभेद क्रियापदांनाही येऊन चिकटला आहे. प्राचीनकाळीं हा लिंगभेद काढून टाकण्याचा प्रयत्न झालेला दिसतो. परंतु संस्कृत भाषा ही कृत्रीम आणि ठरींव, व फक्त विद्वत्तेच्या वाङ्मयाची भाषा असें झाल्यामुळे हा प्रयत्न सिद्धीस गेलेला दिसत नाहीं. मात्र मागें सांगितल्याप्रमाणें एकच शब्द अनेक लिंगी हवा तर मानावा, अशी सवलत मात्र उत्पन्न झाली. लोकांच्या बोलण्याच्या भाषेंत हा घोटाळा काढून टाकण्याचा सक्त प्रयत्न झाला असावा. कारण पालीभाषेमध्यें पुष्कळ शब्द नपुंसकलिंगी मानलेले आणि तसे उपयोगिलेले आहेत. त्या भाषेंत प्राणिवाचक शब्दही नपुंसकलिंगी मानून त्यांचीं तशीं रूपें केलीं आहेत. कानडी भाषेंत हा लिंगभेद फारच सोपा आहे. त्या भाषेंत मनुष्यें आणि देवादिक, यांच्या नांवांना मात्र पुरुष-स्त्री-भेद आहे. इतर प्राण्यांचीं आणि सर्व वस्तूंचीं नांवें नपुंसकलिंगी. आर्य देशी भाषांवर संस्कृताचा सासुरवास जोरदार झाल्यामुळें या संबंधाची सुव्यवस्था करून घेण्याचें काम त्या भाषांना साध्य झालें नाहीं.

(५) आ द रा र्थी ब हु व च नः—मराठींत आणि इतर देशभाषांमध्यें आदरार्थी बहुवचन असतें. मनुष्य एक असला तरी बहुवचनीं बोलावयाचें. पत्रव्यवहारात पन लिहिणारा दुसऱ्यास नेहमीं 'तुम्ही' म्हणतो. चार चौघांत बोलतांना ज्याच्याशीं बोलावयाचें तो बराच कमी प्रतीचा अथवा वयानें लहान असला तर त्यास उद्देशून एकवचनीं बोलतात, नाहींतर बहुवचन घालितात. कोणाही सभ्य गृहस्थाविषयीं किंवा प्रसिद्ध पुरुषाविषयीं बोलावयाचें झालें तर तो फार जुन्या काळचा नसल्यास बहुवचनीं बोलावें लागतें. शिवाजी, बाजीराव, यांविषयीं एकवचनीं बोलावें, परंतु चिपळूणकर, रानडे, गोखले, भांडारकर, व्हाईसराय, गव्हरनर, ग्लाडस्टन, यांबद्दल बहुवचन घालावयाचें. नानाफडनवीस,

सखारामबापू, परशुरामभाऊ पटवर्धन, हरीपंत फडके, यांबद्दल बोलावयाचें झाल्यास मन संशयग्रस्त होतें. जुन्या परकी गृहस्थाच्या नांवापुढें साहेब शब्द घातल्यास बहुधा बहुवचन घालतात. महंमद पैगंबर याचा मराठी क्रमिक पुस्तकांत उल्लेख आला, तेथें एकवचनीं लिहिल्यामुळें आमच्या मुसलमान बंधूंना राग आला, आणि पुस्तकांत नांवापुढें 'साहेब' शब्द व आदरार्थी बहुवचन घालण्याची सुधारणा करण्यांत आली! ही चाल आपल्या सर्व चालू भाषेंत कशी आली हें कळत नाहीं. ही जुन्या संस्कृतांत युष्मद्, अस्मद्, भवत्, वगैरे शब्दांखेरीज इतरत्र नाहीं. जुन्याकाळीं बायका नवऱ्यांबद्दल बोलतांनाही त्यांना आर्यपुत्र, देव, महाराज, अशा संमाननीय पदवींनें संबोधीत, पण एकवचन घालीत, असें नाटकें, पुराणें, यांतील संवादांवरून दिसतें. मुसलमान लोकांमध्यें दुसऱ्यास अशी मान देण्याची पद्धत आहे, यावरून त्या लोकांचे चालीवरून ही चाल देशी भाषांत आली असावी.

---

## ४—वाक्य-घटना

मराठी वाक्यघटनेचीं मुख्य अंगें म्हटलीं म्हणजे कारक आणि प्रयोग यांची व्यवस्था, आणि कृदन्तांच्या जुळणीनें होणारी क्रियापदांची व्यवस्था अथवा संयुक्त क्रियापदें, हीं होत. यांचा मोढ-बोध व्याकरणांत समग्र विचार आहे. परंतु व्याकरणामधील विवेचन शास्त्रीय पद्धतीवर आणि आकुंचित असल्यामुळें येथें कांहीं गोष्टींचा ऐतिहासिकदृष्टया खुलासा करण्याचें योजिलें आहे.

यासंबंधानें एक गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे; ती अशी कीं, आमच्याकडे ब्रिटिश राजसत्ता सुरू झाल्यानंतर लौकरच मराठी व्याकरणाची रचना झाली; त्या वेळीं संस्कृत, प्राकृत आणि चालू देशभाषा यांचा परस्परसंबंध कळण्याजोगा त्या भाषांचा अभ्यास नसल्यामुळें प्रथम-व्याकरणकारांनीं व्याकरणव्यवस्था भाषेच्या इतिहासाकडे लक्ष देऊन केली नाहीं. यामुळें कित्येक अडचणींचे प्रकार कायमचे होऊन बसले आहेत. त्या वेळीं हा इतिहास माहीत असता तर अशी अडचणीची

व्यवस्था झाली नसती. सांप्रत या अडचणीच्या गोष्टी कळूं लागल्या आहेत, यासाठीं त्यांचें शक्य तितकें निराकरण केलें पाहिजे.

## ( १ ) कारक–विचार

अपभ्रंशांत प्रथमा आणि द्वितीया एक झाल्या. यामुळें मराठींत कर्म हें कारक असतां विभक्ती प्रथमाच मानण्याची चाल पडली. चतुर्थीच्या रूपांवरूनही कर्माचा बोध होतो. त्या वेळीं त्या रूपांची द्वितीया विभक्ती मानितात. उदाहरणार्थ, 'मी ब्राह्मण बोलावितों' यांत 'ब्राह्मण' हें कर्म पद आहे. तसेंच 'मी ब्राह्मणास बोलावितों' यांत 'ब्राह्मणास' हें कर्मपद आहे. दोन्ही वाक्यांचा अर्थ अगदीं सारखाच आहे. पण 'ब्राह्मण' ही प्रथमा आणि 'ब्राह्मणास' ही द्वितीया असें दादोबांनीं ठरविलें. वस्तुतः ज्या कारणानें 'ब्राह्मण' ही कर्मणि-प्रथमा म्हणावयाची, त्याच कारणानें 'ब्राह्मणास' ही कर्मणि-चतुर्थी मानिली पाहिजे. मग मराठी व्याकरणांत द्वितीया मुळीं नाहींच, असें म्हणावें लागेल. पण मागील प्रतिपादनावरून दिसून आलेंच आहे कीं, द्वितीया नष्ट झाली नसून, तिचीं आणि प्रथमेचीं रूपें एकसारखीं झालीं आहेत. तसेंच व्याकरणांतल्या व्यवस्था जर भाषेच्या अभ्यासाच्या सोयीकरितां ठरावयाच्या आहेत, तर द्वितीयेच्या कारकाचे असे विभाग पाडून घोंटाळा करणें बरोबर नाहीं. आमच्या विद्यार्थ्यांना या गोष्टी नीट समजावयास लागण्याच्या अगोदरच इंग्लिश, संस्कृत आणि मराठी या तिन्हीं भाषांचा बरोबर अभ्यास सुरू झालेला असतो. तेव्हां विद्यार्थ्यांपुढें वास्तविक कांहीं कारण नसतांना मराठींत जी प्रथमा ती इंग्रजींत आणि संस्कृतांत द्वितीया, असलें कोडें आणून मांडणें युक्त नाहीं. यासाठीं प्रथमा किंवा द्वितीया हा भेद करितांना रूपाकडे लक्ष न देतां कारकाकडे लक्ष देणेंच उक्त आहे. 'ब्राह्मण' हें प्रथमेचें तसेंच द्वितीयेचें रूप, अगदीं बरोबर रीतीनें, प्रथमतः संस्कृतांतील आणि त्यानंतर प्राकृतांतील व्यवस्था-परंपरेनें सिद्ध होत आहे. त्याचप्रमाणें 'ब्राह्मणास' ह्या रूपावरून कर्माचा बोध होत असतां त्याला द्वितीया म्हणण्यास हरकत नाहीं. तेव्हां कर्म कारक असतां त्या

पदाची द्वितीया मानून द्वितीयेचीं रूपें प्रथमेप्रमाणें अप्रत्यय आणि चतुर्थीप्रमाणें सप्रत्यय अशीं दोन प्रकारचीं होतात, असेंच समजणें रास्त आहे.

यासंबंधानें कित्येक असा मुद्दा पुढें आणीत असतात कीं, 'विभक्ती प्रत्ययांवरून म्हणजे रूपांवरून मानावयाच्या, कारकावरून मानावयाच्या नाहींत; आणि संस्कृतांत विभक्ती प्रत्ययांवरून मानलेल्या आहेत'. आतां हें म्हणणें निव्वळ चुकीचें आहे. कोणत्याही भाषेंत विभक्ती मानण्याचें कारण कारक म्हणजे वाक्यांत शब्दांचा परस्पर संबंध, हेंच असतें. संस्कृतांत प्रत्ययांवरून विभक्ती मानलेल्या नाहींत. त्या भाषेंत निरनिराळ्या विभक्तींचीं अनेक रूपें एकसारखीं आहेत. सर्व नपुंसकलिंगी नामांच्या आणि दुसऱ्या अनेक नामांच्या प्रथमा आणि द्वितीया एक आहेत. इंग्रजी भाषेंतही दोन्हीं विभक्तींचीं रूपें एक असून कारकाप्रमाणें प्रथमा किंवा द्वितीया असें नांव देतात. तसेंच त्या भाषेंत me, us, you, him, her, them, हीं सर्वनामरूपें मूळचीं चतुर्थीचीं असून कर्माचा अर्थ असतां त्यांना द्वितीया म्हणतात. हा अगदीं हुबेहूब मराठीसारखा प्रकार आहे. तेव्हां असल्या वादांत कांहीं जीव नसून प्रौढबोध व्याकरणांत केलेली व्यवस्था अगदीं शास्त्रीय पद्धतीला धरून आणि व्यवहारास सोयीची अशी आहे.

षष्ठी विभक्ती चतुर्थीच्या जागीं गेल्यावर मराठींत तिचें कारक दाखविण्यासाठीं च-प्रत्ययान्त विशेषणांचा उपयोग होऊं लागला. या विशेषणास षष्ठीचें रूप असें नांव द्यावें कीं काय हा प्रश्न आहे. शब्दाचें खरें स्वरूप समजल्यानंतर तो शब्द अमुक आहे असें म्हणणें हा केवळ व्यवस्थेचा प्रकार होय. प्रथम शिकणारांना भाषेंत 'षष्ठी' विभक्ती नाहीं, आणि रामाचा, हरीचें इत्यादि हीं च-प्रत्ययान्त विशेषणें आहेत, हें नीट कळावयाचें नाहीं; आणि पुढेंही हीं मूळचीं विशेषणें असलीं तरी उपयोगाच्या दृष्टीनें सांप्रत हीं षष्ठीचीं रूपें आहेत, असें मानणें व्यवस्थेच्या दृष्टीनें सोयीचें आहे. यासाठीं हीं विशेषणें षष्ठीचीं रूपें होत, असें म्हणण्याची चाल पडली आहे, ती बदलण्याचें कारण नाहीं. मूळस्वरूप लक्षांत असलें म्हणजे झालें.

## (२) प्रयोग-व्यवस्था

मागें सांगितलें आहे त्याप्रमाणें भाषेच्या पूर्व इतिहासाकडे लक्ष न दिल्यामुळें मराठी व्याकरणांतील प्रयोगांची व्यवस्था उगाच भानगडीची झाली आहे. संस्कृत भाषेंत कर्तरि आणि कर्मणि अशीं दोन प्रकारचीं क्रियापदरूपें असतात. मराठींतही जुन्या काळीं अशीं रूपें होतीं. जुन्या मराठींत धातूला 'ज' लागून 'कीजे' 'करिजेलें', 'कीजेल' अशीं कर्मणिरूपें होत, पण तीं पुढें नष्ट झालीं. सांप्रत तीं जुन्या लेखांमधून आणि कवितेंत आढळतात.

हल्लीं आपण प्रयोग मानतों, ते वाक्याचे मानतों. 'अमुक वाक्यांत' किंवा 'अमुक वाक्याचा कर्तरिप्रयोग अथवा कर्मणिप्रयोग' असें आपण म्हणतों. याचें कारण असें कीं कर्तरि प्रयोगांत किंवा कर्मणिप्रयोगात कर्ता, कर्म आणि क्रिया यांचे दर्शक जे शब्द त्यांची वाक्यांत कांहीं नियमित व्यवस्था असते आणि तदनुरूप त्यांचीं रूपें केलेलीं असतात.

संस्कृत वाक्यांत कर्तरिप्रयोग असतां कर्तृदर्शक शब्दाची प्रथमा व कर्मदर्शक शब्दाची द्वितीया असते; व क्रियापद कर्तृदर्शक शब्दाशीं पुरुष आणि वचन यांसंबंधानें जुळतें. तसेंच कर्मणिप्रयोग असतां कर्तृदर्शक शब्दाची तृतीया व कर्मदर्शक शब्दाची प्रथमा असते; व क्रियापदामध्यें 'य' अक्षर असतें अथवा त्याचें कांहीं नियमित रूप असतें. मराठींत बाह्यतः दिसण्यामध्यें असाच प्रकार आहे. परंतु वास्तविक फरक आहे तो पुढें सांगूं.

अशी दोन प्रकारची वाक्यघटना भाषेंत होण्याचें कारण असें आहे कीं, आपण बोलतांना दोन तऱ्हेनें बोलतों. एक क्रिया करणारास उद्देशून बोलतों, अथवा जी क्रिया घडली ती ज्या पदार्थावर घडली, त्याला मुख्यतः उद्देशून बोलतों. 'रामा पत्र लिहितो', यांत 'लिहितो' ही हकीगत 'रामा' या कर्त्याला उद्देशून सांगितली. परंतु 'रामानें पत्र लिहिलें', यांत ही हकीगत 'पत्र' या कर्मास उद्देशून सांगितली.

संस्कृत भाषा ही बोलण्याची भाषा नाहीं. यामुळें तिच्या व्याकरणांत वाक्यघटनेचा विचार तितका व्यापक नाहीं; मराठी भाषा

ही बोलण्याची भाषा आहे; याशाठीं मराठीची वाक्यघटना जास्त विचारणीय आहे. मराठी भाषेची सुधारणा करितांना तिच्या शब्द-घटनेस आपण संस्कृताचें साह्य घेतों. परंतु वाक्यघटनेस सांप्रत आपल्या बोलण्यांत असलेली इंग्रजी भाषा हिचें साह्य घेतों. हा प्रकार साहजिकच आहे. तें साह्य घेतांना अमुक एक गोष्ट मराठीस नीट जुळेल की नाहीं हें मात्र पाहिलें पाहिजे.

वाक्याची प्रयोगव्यवस्था संस्कृत, मराठी आणि इंग्रजी या तिन्ही भाषांत बहुतेक सारखीच आहे. क्रियापदाचीं रूपें घालण्याचे संबंधानें मात्र थोडा फरक आहे. यासंबंधानें इंग्रजी आणि मराठी या भाषांतली तऱ्हा परस्परांशीं जुळते.

तिन्ही भाषांत भावेप्रयोग म्हणून एक वाक्यघटनेचा प्रकार आहे; पण त्याची व्यवस्था निरनिराळी आहे.

इंग्रजी भाषेच्या व्याकरणांत वाक्यपरिच्छेद म्हणून वाक्यघटना सांगण्याचा प्रकार आहे. तो सांप्रत मराठी व्याकरणांत घेतला आहे. संस्कृत व्याकरणामध्यें जरी वाक्यघटनेचें विवरण फारसें नाहीं तरी तो प्रकार तुलनेसाठीं घेतां येतो. प्रिन्सिपाल आपटे यांनीं आपल्या संस्कृत वाक्यरचनेच्या पुस्तकांत संस्कृत वाक्यांचा परिच्छेद इंग्रजी व्याकरणाच्या पद्धतीप्रमाणें करून दाखविला आहे, तो यासंबंधांत तुलनेसाठीं विचारांत घेण्यासारखा आहे. वाक्यपरिच्छेदाच्या व्यवस्थे-प्रमाणें वाक्यांत जेव्हां आपण कर्त्याला उद्देशून बोलतों तेव्हां तो कर्तरिप्रयोग, आणि कर्माला उद्देशून बोलतों तो कर्मणिप्रयोग. ज्याला उद्देशून बोलतों तें उद्देश्य. अर्थात् कर्तरिप्रयोगांत कर्तृपद उद्देश्य. त्याला अनुलक्षून क्रियापद असतें; आणि कर्मणिप्रयोगांत कर्मपद उद्देश्य; त्याला अनुलक्षून क्रियापद असतें.

संस्कृतांत कर्मणिप्रयोग असतां क्रियापदाचें विशेष रूप होत असतें. त्याला कर्मणिरूप म्हणतात. मराठींतही तसें विशेषरूप होत असे. पण ती व्यवस्था उपयोगांतून गेली. अर्थात् मराठी भाषेत कर्मणिप्रयोगच आतां होत नाहीं. म्हणजे काय, तर कर्माला उद्देशून बोलावयाचें आणि मग तदनुरूप क्रियापदाचें रूप बनवून घालावयाचें

हा बोलणाराच्या मर्जीप्रमाणे वाक्यरचना करण्याचा प्रकार मराठींत नष्ट झाला. 'हरी पुस्तक वाचितो', आणि 'हरी पुस्तक वाचील', या वाक्यांचा कर्तरिप्रयोग आहे. या वाक्यांचा अर्थ कायम ठेवून, मराठींत आपणांस कर्मणिप्रयोगघटित वाक्यरचना करितां येत नाहीं.

'हरीनें पुस्तक वाचिलें' या वाक्यघटनेला आपण कर्मणिप्रयोग म्हणतों. पण मागल्या दोन वाक्यात वर्तमान आणि भविष्यकाळ आहेत, आणि प्रस्तुत वाक्यांत भूतकाळ आहे. यामुळें पहिल्या दोन कर्तरी वाक्यांचा आणि या कर्मणी वाक्याचा अर्थ अगदीं निराळा आहे. प्रस्तुत वाक्यातलें क्रियापद 'वाचिलें' हें कर्मणी विशेषणावरून झालें, म्हणून तें कर्मणी आहे, आणि यामुळें वाक्याची रचना कर्मणी करावी लागली; ती आपल्यास हवी तशी करितां आली नाहीं. तसेंच वर्तमान आणि भविष्य या काळीं कर्मणिप्रयोग घटना आपणांस करितां येत नाहीं. आणि भूतकाळीं कर्तरिप्रयोग-घटना अशक्य आहे. असा प्रकार मराठींत झाला आहे. अर्थात् मराठी वाक्यघटनेंत कर्मणिप्रयोग नाहीं, असेंच ठरविणें भाग आहे. मराठी-मधील भूतकाळचें क्रियापद कर्मणी कृदन्त विशेषणावरून आलें, यामुळें तें वाक्यांत असतां कर्मणिप्रयोग आपोआप होतो. तोच प्रकार विध्यर्थी वाक्याचा आहे. 'करावें' 'बोलावें' वगैरे विध्यर्थक रूपें मूळचीं कर्मणी आहेत. यामुळें तीं असतां वाक्य कर्मणिप्रयोगांत करावें लागतें, किंवा तें आपोआप तसें बनतें. उदा.—'म्यां काम करावें'; 'त्यानें असें कधीं न बोलावें'; 'गुराख्यानें गाई राखाव्या'; इ०. तेव्हां मराठींतले जे आठ लकार त्यांतले ल भूत आणि विध्यर्थ हे फक्त कर्मणी आहेत. ते वाक्यांत असतां वाक्याचा कर्मणिप्रयोग आपोआप होतो, व कर्तरिप्रयोग होऊ शकत नाहीं. तसेंच बाकीचे सहा लकार केवळ कर्तरी. त्यां-वरून कर्मणिप्रयोग होऊ शकत नाहीं. ही व्यवस्था सकर्मक क्रियापदांच्या संबंधानें होय, हें उघडच आहे. अशी स्थिती असल्यामुळें आपल्या भाषेंत वाक्याचे आपल्या मजाप्रमाणे कर्तरिप्रयोग आणि कर्मणिप्रयोग करून आपणांस बोलतां येत नाहीं. वर्तमान आणि भविष्यकाळीं कर्मणीशिवाय आणि भूतकाळीं कर्तरीखेरीज आपण निर्वाह करून घेतों.

'Hari wrote a letter' या इंग्रजी वाक्याचें अथवा 'हरिः पत्रं अलिखत्' या संस्कृत वाक्याचें भाषांतर मराठींत कर्तरिप्रयोगानें करितां येत नाहीं. 'हरी पत्र लिहिता झाला' अशा रीतीनें भूतकाळ आणि कर्तरिप्रयोग कायम ठेवून मराठी वाक्य करण्याची जुनी तऱ्हा आहे, तिचा उपयोग सांप्रत फारसा होत नाहीं. तो होऊं लागल्यास या संबंधाची थोडीशी अडचण नाहींशी होईल.

इंग्रजी भाषेंतील वाक्यांची प्रयोगविषयक रचना बहुतांशीं मराठी-सारखी आहे. ह्या भाषेंत मूळ धातूच्या कर्मणी विशेषणापुढें साह्य-धातूचें रूप घालितात. तसें मराठींत घातलें असतां तिन्ही काळीं कर्मणिप्रयोग दाखवितां येतोः—

By-me a letter is written
म्यां पत्र लिहिलें [आहे]
By-me a letter was written
म्यां पत्र लिहिलें [होतें]
By-me a letter will be written
म्यां पत्र लिहिलें [असेल]

यांतील इंग्रजी वाक्यांतलें Written हें रूप मराठींतल्याप्रमाणें भूतकालिक कर्मणिविशेषण आहे. असाच अगदीं हुबेहूब प्रकार संस्कृतांतही होईलः—

'मया पत्रं लिखितं अस्ति'
'मया पत्रं लिखितं आसीत्'
'मया पत्रं लिखितं भविष्यति किंवा भवेत्'

संस्कृत भाषेंत कर्मणी क्रियापद बनविण्याची निराळी स्वतंत्र रीत आहे, यामुळें वरील वाक्यांतलीं कर्मणी विशेषणें क्रियापदाबरोबर येत नाहींत, आणि वाक्याचा प्रयोग सांगण्याची भानगडही उत्पन्न होत नाहीं. आतां अगोदर मराठीमधलें भावेप्रयोगाचें स्वरूप सांगून, मग या अडचणीचा विचार करूं.

ज्या वाक्यांत क्रियापद कर्त्याची अथवा कर्माची हकीकत सांगत नाहीं, तर क्रिया झाली एवढें सांगतें; तें भावी वाक्य, अशा वाक्यांतलें क्रियापद रचनेला कर्मणी असतें आणि बोलणारा कोणालाही विवक्षित रीतीनें उद्देशून बोलत नाहीं, तर क्रियेचा भा व म्हणजे क्रि या र्थ याला उद्देशून बोलतो, असें आपण कल्पितों; म्हणून या रचनेला भा वे प्र यो ग असें नांव पडलें.

संस्कृतांत भावेप्रयोग फक्त अकर्मक धातूवरून होतो व त्याचा उपयोगही थोडाच आहे. 'मया गम्यते', 'सूर्येण प्रकाश्यते', 'कृष्णेन स्थीयते', असे भावेप्रयोग संस्कृतांत होतात. हीं वाक्यें त्या भाषेंत कर्तरीही करितां येतात, यामुळें कांहीं भानगड उरत नाहीं.

इंग्रजी भाषेंत जुन्या काळीं भावी वाक्यें बरींच होत असावीं. परंतु सांप्रत 'It' सर्वनाम घालून तीं कर्तरी करून घेतात. जसें–'It is dark'; 'It thunders'; 'It was day-light'; 'It will be a broad day when you reach there'. तेव्हां त्या भाषेंत सांप्रत या संबंधाची कांहीं भानगड उरलेली दिसत नाहीं.

मराठींत भावी वाक्यांवरून विवक्षित अर्थ उत्पन्न होतो, आणि कित्येक ठिकाणीं वाक्य भावी रचनेंतच असावें लागतें. म्हणून या भाषेंत त्यांचें मोठें महत्व आहे. 'त्यानें आज गांवाला जावें', 'लखूनें लहानपणीं नित्य फार रडावें', 'रामानें रावणास मारिलें', 'रावसाहेबांनीं आपल्या भावाला इंजिनियर खात्यांत लाविलें', इत्यादि वाक्यांत जो विविक्षित अर्थ आहे तो दुसऱ्या रीतीनें सांगतां येणार नाहीं; आणि अशीं वाक्यें आपणांस भाषेंत अवश्य पाहिजेत. या वाक्यांत क्रियापदें विध्यर्थी अथवा भूतकाळीं, अर्थात् कर्मणी आहेत, तेव्हां अर्थात् भावी वाक्यरचना म्हणजे कर्मणी क्रियापदाच्या उपयोगाचीच एक तऱ्हा आहे. याप्रमाणें मराठींत प्रयोगव्यवस्था फार चमत्कारिक आणि भानगडीची असल्यामुळें विद्यार्थ्यांना वाक्याचें विवरण करितांना फार अडचण पडते. शिवाय मूळारंभीं या प्रयोगव्यवस्थेचा इतिहास न पाहातां व्यवस्था ठरविली, यामुळें जास्तच गोंधळ उत्पन्न झाला आहे. 'विद्यार्थी पुस्तक वाचितो' या कर्तरी वाक्याचें कर्मणी रूप असें

शिकणारास विचारलें असतां तो 'विद्यार्थ्यानें पुस्तक वाचिलें' असें लगेच सांगतो. पण हें वाक्य पहिल्या वाक्याचें कर्मणी नव्हे, यांत अर्थ पुष्कळ फिरत आहे, हें शिकणारास समजत नाहीं. तसेंच कित्येक वाक्यें कर्मणी करतांच येत नाहीत, भावीच करावीं लागतात; आणि कित्येक भावी होत नाहीत, कर्मणीच करावीं लागतात; कित्येक सकर्मक क्रियापदांवरून भूतकाळ असतांही कर्मणी न होतां कर्तरीच होतो; कित्येकांवरून कर्तरी अथवा कर्मणी दोन्हीं होतात; असे अनेक भानगडींचे प्रकार आहेत.

मराठींत वाक्याची कर्मणी रचना वास्तविक नष्ट झाली आहे. कर्मणी अर्थ जो ठरला आहे, तो क्रियार्थक धातुसाधित कर्मणी विशेषणामध्यें आहे. असें जर आहे, तर विद्यार्थ्यांनीं वाक्यविवरण करितांना कर्मणिप्रयोग मानूंच नये. अर्थात् वाक्याचे प्रयोग मानूं नयेत, म्हणजे सर्व भानगड मिटली. 'तो काम करितो' हें वाक्य कर्तरी. 'त्यानें काम केलें' यांत 'केलें' हें 'काम' याचें कर्मणी विधिविशेषण, आणि वाक्य पुरें होण्यास अर्थानुरोधानें 'आहे' 'होतें' किंवा 'असेल' असें साह्य क्रियापद पुढें मानावयाचें. तेव्हां 'त्यानें काम केलें आहे', यांत 'काम' कर्ता, 'आहे' क्रियापद आणि हा कर्तरिप्रयोग. 'केलें' हें कर्मणी विशेषण, त्याचें विशेष्य काम. याचा क्रियापदाशीं कांहीं संबंध नाहीं. ज्या कर्मणी विशेषणाला आपण क्रियापद म्हणतों, तें कर्मणि-कृदन्त विशेषण तृतीयपुरुषीं असतां विशेषणाप्रमाणें फक्त लिंग आणि वचन याप्रमाणें फिरतें, आणि कर्मणिप्रयोग फक्त तृतीयपुरुषीं होतो. तेव्हां याचा केवळ विशेषणासारखा उपयोग असून पुढें क्रियापद गुप्त समजावयाचें हें उघड दिसतें.

'रामानें रावणास मारिलें' अशा वाक्यांत आपण 'अशी एक गोष्ट घडली' असें विधान करितों. अर्थात् हें वाक्य 'रामानें रावणास मारिलें आहे', किंवा 'मारिलेलें आहे'(अशी स्थिती किंवा हकीगत आहे) असें ठरतें. तेव्हां 'मारिलेलें' हें क्रियावाचक नाम 'आहे' या क्रियापदचा कर्ता होय. अर्थात् हा कर्तरिप्रयोग झाला. 'त्यानें जावें' याची रचना वास्तविक 'त्यानें जावें (असें आहे)' अशी होय. यावरून दिसून येईल

कीं, मराठींत वाक्याचा प्रयोग सर्वत्र कर्तरी होऊं शकतो. तेव्हां वाक्याचे प्रयोग मुळींच मानावयास नकोत. कर्मणी विशेषणें आणि कर्मणी क्रियावाचक नामें यामध्यें कर्मणीचा अंतर्भाव असतो. त्याचा संबंध सांगितला म्हणजे कर्मणीचें काम झालें. व्याकरण चालवितांना अशी वाक्यव्यवस्था सांगण्याचें ठरविलें असतां विद्यार्थ्यांना फार सोपें जाईल व भाषेची कोणतीही हानी होणार नाहीं.

भावेप्रयोगांत क्रियार्थाला उद्देशून आपण बोलतों. आणि त्यालाच क्रियापद असेंही म्हणतों. म्हणून वाक्यपरिच्छेद करितांना उद्देश्य सांगतां येत नाहीं. उद्देश्य नाहींच, मग तें सांगावयाचें कसें ? 'रामानें रावणास मारिलें' म्हणजे 'मारिलें आहे' असें म्हटलें, कीं मग हा कर्तरिप्रयोग होऊन '*मारिलें' हा क्रियार्थ उद्देश्य आणि कर्ता* झाला.

कर्मणिप्रयोग चालू भाषेंत फक्त तृतीयपुरुषीं होतो. प्रथम आणि द्वितीयपुरुषीं कर्मपद असतां वाक्यार्थ भावेप्रयोग करून दर्शवावा लागतो, 'रामानें पुस्तक वाचिलें', 'पुस्तकें वाचिलीं', असें होतें, पण 'रामानें मी पाठविलों', 'तूं पाठविलास', असें होत नाहीं हीं वाक्यें 'रामानें मला पाठविलें', 'तुला पाठविलें' अशीं करावीं लागतात.

कर्मणी कृदन्तावरून भूतकाळचें कर्मणी क्रियापद बनतें आणि वाक्याचा कर्मणिप्रयोग होतो. ही व्यवस्था इतर देशी भाषांत आहे. परंतु कर्मणिप्रयोग केवळ तृतीयपुरुषीं होणें, ही व्यवस्था फक्त मराठींत आहे. जुन्या मराठींत—निदान कवितेमध्यें—प्रथम आणि द्वितीय पुरुषीं कर्मपद असतां कर्मणी झाल्याचीं उदाहरणें आहेत. यावरून असे प्रयोग भाषेंत आणण्याचा प्रयत्न झालेला दिसतो. मोरोपंताच्या कवितेंत अशीं वाक्यें विशेष सांपडतात. मोरोपंतानें संस्कृत भाषेच्या नमुन्यावर वाक्यें करण्याचा आणि भाषेस व्याकरणानें निगडित करण्याचा प्रयत्न केला आहे हें याचें कारण आहे.—

" मी आधींच काढों नेणें। वरी कळविलों मोहें मेणें',

—ज्ञानदेव.

'केलासि तूं उभा आजवरी संतीं ।
घरविले हातीं कट दो देवा'.

—तुकाराम.

'इंद्रियांचीं दीनें । आम्ही केलीं नारायणें'.

—तुकाराम.

'तो तूं मूर्त निरीक्षिलासि नयनीं भाग्योदयें निश्चयें'.

—विठ्ठल.

'तूं पूजिलासि भरतें, नतें परम हर्षितें'.

—मोरोपंत.

'त्यातें प्रद्युम्न म्हणे, मायेसि तुम्ही दिलां उपायनसे'.

—मोरोपंत.

अशा प्रकारचीं आणखी उदाहरणें प्रौढबोध व्याकरणांत पाहावीं.

कर्मपद प्रथम आणि द्वितीय पुरुषीं असतांना कर्मणिप्रयोग न करितां भावेप्रयोगच करावा, अशा प्रकारची पद्धत भाषेमध्यें पडण्याचें कारण काय असावें ? या शंकेचें नीटसें निराकरण करितां येत नाहीं. 'बापानें आपला मुलगा गांवाला धाडला', आणि 'बापानें आपल्या मुलास गांवाला धाडिलें', या दोन वाक्यांत अर्थ एकच आहे. परंतु दुसरें वाक्य हें विशेष सौम्य, आणि त्यांत ज्याच्यासंबंधानें विधान केलें आहे त्याचा उल्लेख अगदीं एकेरीवर येऊन केलेला नाहीं. 'रामानें रावण मारिला' आणि 'रामानें रावणास मारिलें', या वाक्यांच्या रचनेचीही अशीच स्थिती दिसून येईल. प्रथम आणि द्वितीय पुरुषीं कर्मपद बहुधा मनुष्यवाचक असतें. तें विशेषनामात्मक असतां प्रत्यक्ष अमुक व्यक्ती असा अर्थ असल्यामुळें भावेप्रयोगच करावा लागतो. कारण, तसें न केल्यास मनुष्यास राग येईल कीं काय अशी भीति वाटते. तें सामान्यनामात्मक असतां विकल्पें कर्मणिप्रयोग अथवा भावेप्रयोग होतो. कर्मपद निर्जीव पदार्थात्मक असतां तेथें कोणी रागावण्याची अथवा नाखूष होण्याची भीती नसते; अशा वाक्यांचा कर्मणिप्रयोगच होतो. अशा प्रकारें कर्मणीबद्दल भावी रचना करण्याचा प्रघात पडला असावा.

केव्हां कर्मणी वाक्यामध्यें क्रियापद कर्मपदाप्रमाणें असून शिवाय तें कर्तृपदाला जुळेसें केलेलें असतें. असले प्रयोग गद्यांत आणि पद्यांत आढळतात. हे विशेषतः द्वितीय पुरुषीं आणि तृतीय पुरुषीं कर्ता असतां होतात. जसें:—'तू पत्र वाचिलेंस', 'तुम्ही पत्रें वाचिलींत'; 'त्यानें पत्र लिहिलन्', 'त्यांनीं पत्रें लिहिलीं किंवा लिहिलनी', इत्यादि.

त्याचप्रमाणें भावी वाक्यरचना करण्याचा उद्देश असून क्रियापद कर्मपदाशीं जुळवितात. जसें:—'त्यानें आपल्या मुलास शाळेंत पाठविला'. 'तुलाच बोलवावा असें तो म्हणाला'. 'आईनें मुलीस निजविली' इ०.

भूतकाळीं क्रियापद असतां सकर्मक क्रियापदावरून कर्तरिप्रयोगाची रचना होत नाहीं. परंतु कित्येक क्रियापदांच्या संबंधानें तशीं वाक्यें भाषेंत होत असतात. 'मी स्नान केलें'; 'रामा फराळ केला आणि मग कामाला गेला'; 'ते आमच्या घरींच भोजन केले'; 'श्रमित माजघरच्या दिवाणखान्यात निद्रा केले'; इत्यादि. कित्येक सकर्मक धातू असे आहेत कीं त्यांवरून सामान्य क्रियापदाप्रमाणें भूतकाळीं कर्मणिप्रयोग न होता कर्तरिप्रयोगच होतो. 'मी याचें कारण उमजलों'. 'विद्यार्थी पुस्तक पढला'; 'मी भात जेवलों'; 'तो संस्कृत शिकला'; 'मी तुझी गोष्ट विसरलों;, 'हरी पर्वत चढला'; 'ती असें म्हणाली', इत्यादि. कित्येक धातूंचा असा उपयोग विकल्पेंकरून होतो. उदा०:— 'मी धर्म आचरिलों' अथवा 'धर्म आचरिला'; 'मी वेद पढलों' किंवा 'म्यां वेद पढला'; इत्यादि. अशा वाक्यांच्या संबंधाची विशेष चर्चा व्याकरणांत केलेली आहे.

हे प्रयोग भाषेंत असण्याचें कारण असें दिसतें, कीं मुळारंभीं या संबंधानें भाषेस कायमचें स्वरूप येत असतां दोन्ही प्रकारच्या किंवा निरनिराळ्या तऱ्हेच्या रचना होत होत्या. परंतु त्यांतल्या ज्या रचना सोयीच्या वाटल्या त्या भाषेंत स्थिरावल्या. तथापि दुसऱ्या प्रकारच्या रचनेचे अवशेषही अजून आहेत. अथवा 'मी काम केलें' याच अर्थानें भूतकाळीं सकर्मक धातूवरून कर्तरिप्रयोग करण्याचा म्हणजे 'मी काम केलों', 'हरी पत्र लिहिला' तसेंच 'ती असें म्हणाली' अथवा 'बोलली' याप्रमाणेंच 'ती असें सांगितली ( सांगती झाली )'

असे प्रयोग करण्याचे प्रयत्न झाले असतील, आणि त्यांचें हें उर्वरित असेल. अशीं वाक्यें कानाला आज गोड लागत नाहींत. पण अशीं वाक्यें करण्याचा प्रघात असता, तर चांगलें झालें असतें, असें वाटतें. यांतला एक प्रकार भाषेंत कायमचा राहून दुसरा वाईट कां ठरला आणि भाषेंतून गेला कसा, हें सांगतां येणें कठीण आहे. अशा प्रकारचे जे भिन्न भिन्न प्रयोग किंवा वाक्यरचनेचे प्रकार सांगितले, त्यांतले अमके प्रयोग अशुद्ध असें कोणी म्हणतात. कोणी ते असंस्कृत लोकांच्या बोलण्यांत येतात ह्मणून त्याज्य असें सांगतात. परंतु ते जर अगदीं चांगल्या सुशिक्षित आणि प्रमुख लोकांच्या बोलण्यांत व लिहिण्यांतही येतात, तर त्यांना अशुद्ध अथवा ग्राम्य ह्मणून त्याज्य ठरविणें योग्य नाहीं. भाषेंत चालू असलेले प्रघात व्याकरणानें मान्य केले पाहिजेत. उपयुक्त तें टिकतें आणि अनुपयुक्त नष्ट होतें हा सृष्टींतला नियम भाषेलाही लागू आहे. अशल्या गोष्टी नको असतील तर भाषा सोडून देईल. परंतु त्या भाषेमध्यें उपयोगांत असतांना अमान्य करणें युक्त नाहीं.

कर्मपदाची द्वितीया विभक्ती प्रथमेप्रमाणें प्रत्ययविरहित असते अथवा चतुर्थीप्रमाणें होते. यासंबंधानें भाषेंतील प्रघात कर्मणी व भावी प्रयोग करण्याचे संबंधानें वर जें सांगितलें आहे, त्यासारखाच आहे. 'मी रामाला गांवास पाठवीन,' असें आपण म्हणतों; 'रामा पाठवीन' असें ह्मणत नाहीं. पण 'मी ब्राह्मण बोलावितों' अथवा 'ब्राह्मणास बोलावितों', 'गोपाळा गाय बांधितो' अथवा 'गाईस बांधितो', असे दोन्ही प्रकार रूढ आहेत. अप्राणिवाचक नाम कर्म असतां 'मी पुस्तक वाचितों' 'मी पत्र लिहीन', अशी एकच तऱ्हा असते. अशी व्यवस्था असण्यास मागें सांगितलें तेंच कारण असेल. मात्र या व्यवस्थेमुळें भाषेची बरीचशी सोय होते.

इंग्रजी भाषेंत प्रथमा आणि द्वितीया यांचीं रूपें अगदीं एक असतात. यामुळें त्या विभक्ती ओळखण्यास वाक्यांतील अर्थाशिवाय दुसरा मार्ग नाहीं. मराठींत बहुतेक तोच प्रकार आहे. परंतु मराठींत कित्येक क्रियापदांना लिंगभेद असल्यामुळें तसें क्रियापद वाक्यांत

असतांना जास्त सोय होते. 'पोपट डाळिंब खातो' यांत अर्थावरून कर्ता आणि कर्म ओळखितां येतीलच. शिवाय 'खातो' या पुल्लिंगी रूपावरूनही नीट बोध होईल. पण 'वाघ शेळी पळवील किंवा मारील', या वाक्यांत केवळ अर्थावर घोरण ठेवावें लागेल. अर्थ स्पष्टच असतो. कारण 'शेळी वाघाला पळवील' किंवा 'मारील' असें म्हणण्याचें कोणाच्या स्वप्नींही येणार नाहीं. 'गोविंदा शिंपी बोलावितो', यानें अर्थ नीट न कळला तर 'शिंप्यास बोलावितो', असें हवें तर म्हणतां येतें. परंतु माणसा-माणसांत प्रत्यक्ष संबंध आल्यावर स्पष्टपणा जास्त पाहिजे म्हणून की काय, स-प्रत्यय द्वितीया घालून कर्मपद दाखविलें असतें. 'अर्जुन कर्ण मारील', असें म्हटलें असतां 'कर्ण अर्जुनास मारील' की 'अर्जुन कर्णास मारील' अशी शंका येण्याचा संभव आहे. यामुळें स्पष्टपणें 'अर्जुन कर्णास मारील', असेंच म्हणण्याची चाल पडली.

आतांपर्यंत भाषाप्रचाराचे जे शेवटचे कांहीं प्रकार सांगितले, ते भाषेमध्ये कसे आले आहेत अथवा त्यांचा इतिहास काय असावा याचा विचार करूं लागलें असतां बोलणारापेक्षांही भाषेची सूक्ष्मदृष्टी अधिक आहे असें दिसून येऊन मोठें आश्चर्य वाटतें. कर्मणिप्रयोग केवळ तृतीयपुरुषीं कां ? तो प्रथम आणि द्वितीय पुरुषींही करण्याचा प्रयत्न झाला असतां तो कां सफल झाला नाहीं? प्रथम आणि द्वितीय पुरुषीं तोच अर्थ आणावयाचा असतां भावीच कां करावा ? ' तू काम केलेंस ', ' त्यानें चाकराला गांवाला धाडलें', 'त्यांनीं मला रुपये दिले नाहीं' असल्या वाक्यांचें मर्म काय ? भूतकालीं अमुक कर्मपद असतां कर्मणीच करावा, अमुक असतांना भावीच करावा, तसेंच अमक्या कर्मपदाची अप्रत्ययद्वितीया करावी आणि अमक्याची सप्रत्ययद्वितीयाच केली पाहिजे, असले विशेष प्रकार कसे आले, इत्यादि गोष्टी आपल्या सवयींच्या झाल्यामुळें त्यामध्यें कांहीं विशेष आहे असें न वाटलें, तरी भाषेच्या इतिहासाच्या आणि पूर्वपरंपरेच्या दृष्टीनें विचार केला असतां त्यांमध्यें भाषेच्या स्वभावाची सूक्ष्मता दिसून येते. बोलणारे भाषेंतील शब्द आणि त्यांची विशेष प्रकारची रचना यांची पर्वा न करितां परस्परांचें मनोगत समजण्याचा डौल घालितात. परंतु भाषा निरनिराळ्या

वाक्यार्थांचा सूक्ष्म भेद पुढें आणण्याचा स्वभावतःच प्रयत्न करीत असते; आणि बोलणारांना जरी सूक्ष्म भेद समजत असला, आणि तो भेद समजण्यासाठीं भाषेमध्यें प्रथमारंभीं ज्या युक्त्या केलेल्या होत्या त्यांची आतां बोलणारांना जरी महती वाटली नाहीं, अथवा त्याचा भावार्थ कळेनासा झाला असला, तरी तो योग्य रीतीनें समजण्याची जी परंपरा असेल ती पूर्णपणें अथवा अंशतः पुढें आणण्याचा भाषेचा स्वाभाविक धर्म असतो. ती परंपरा लौकर सुटत नाहीं, आणि त्या परंपरेमुळें वरच्या-सारखे सूक्ष्मभेदाचे प्रकार भाषेत चालू असतात. एकाद वेळ असले प्रकार भाषेत कोनाकोपऱ्यांत असतात. त्यांचा उपयोग एकाद्या एकीकडच्या प्रांतांतले, अथवा एकाद्या विवक्षित जातीचे अथवा धंद्यांतले लोकच करितात. परंतु असले प्रकार भाषेच्या परंपरेच्या इतिहासाच्या दृष्टीनें मोठे महत्त्वाचे असतात. मुख्य मराठींत भविष्यकाळास लिंग-भेद नसून तो गोव्याचा भाषेत आहे. त्याचे उलट मुख्य मराठींत 'होतो' 'जातो' 'करितात' इत्यादि चालू वर्तमानाच्या रूपांना लिंगभेद असतांना कोंकणच्या भाषांत तो घालवून देण्याचा प्रयत्न झालेला कां दिसतो ? 'मी जातों' ''तूं जातोस' 'ते जातात' याबद्दल कोंकणचे लोक 'मी जातॉय् किंवा जातॉए', 'तूं जाताएस का ?' 'ते जाताएत किंवा जात्याति', असे हेल काढून बोलूं लागले कीं आपण त्यांना हसतों. पण असले थट्टास्पद मानण्यांत येत असलेले उच्चार भाषेचा प्राचीन इतिहास सांगतात. इतिहासशोधनाच्या उपयोगीं पडणारे भाषेतील जुने शिलालेख किंवा ताम्रपट आहेत. अशा प्रकारच्या आणखी अनेक गोष्टी सांगतां येतील. 'तो गुरें किंवा गाढवें हांकितो', म्हणजे तो गुराख्याचा धंदा करितो. पण 'तो गुरांस किंवा गाढवांस हांकितो' म्हणजे तीं वाटेंत आलीं होतीं त्यांना एकीकडे हांकून देतो. असाच अर्थ 'तो गाडी हांकतो', आणि 'गाडीला एकीकडे हांक', यांत आहे. 'तो पोर मारितो' म्हणजे ठार मारितो, पण 'पोरास मारितो' म्हणजे त्याला ठार मारितो अथवा 'त्याला आघात करितो' 'त्या वाड्याचा पुढला दिवाणखाना,' म्हणजे दिवाणखाना वाड्याचा भाग आहे. पण 'त्या वाड्याचे (किंवा वाड्याच्या) पुढला दिवाणखाना' म्हणजे वाड्या-

पुढें दुसरी इमारत असून तिचा दिवाणखाना. अशा प्रकारें शब्दाच्या स्वरूपांतील अल्प भेदांवरून अथवा दुसऱ्या एखाद्या क्षुल्लक कारणानें शब्दार्थांत फेरफार कसे होतात याविषयींचे बरेच प्रकार शब्दघटनेच्या भागांत सांगितले आहेत.

## ( ३ ) संयुक्त क्रियापदें

वाक्यांत शब्दांचा परस्पर संबंध प्रत्ययांच्या साह्यानें सांगण्यापेक्षां तो शब्दांच्या जुळणीनें दर्शविणें जास्त सुलभ आणि सोयीचें असतें. प्रत्ययांना स्वतांचा अर्थ नसतो आणि ते प्रायः एकाक्षरी, यामुळें लहान असतात, आणि त्यांचा उच्चार नीट होत नाहीं. ते सुशिक्षित, अशिक्षित, लहान, थोर, यांच्या नीट लक्षांत राहात नाहींत, आणि त्यांचा उपयोग करण्याचे कामीं हयगय होऊं लागते. कित्येक वेळां प्रत्यय अगदीं एकच, किंवा अत्यन्त सारखे असून अर्थ निराळा दाखवावयाचा असतो. असें करणें अडचणीचें वाटतें. परंतु शब्दांचें तसें होत नाहीं. कोणत्याही भाषेंत अगदीं जुनी किंवा प्रथमची व्यवस्था प्रत्यय-घटित असते, परंतु पुढें ती शब्दसंबंधावर येऊन बसते. मराठींत हा प्रकार क्रियापदांच्या जुळणीमध्यें फार उत्पन्न झाला आहे. नामें आणि कृदन्तें यांना कित्येक नियत साह्य क्रियापदांची जोड देऊन अनेक क्रियापदें मराठींत करतां येतात. यामुळें मराठींत भिन्न भिन्न क्रियार्थ सुलभतेनें आणि सुंदर रीतीनें सांगतां येतात. या जोड क्रियापदांच्या रचनेनें आपण काळ, आणि अर्थ, कर्तरी आणि कर्मणी रचना, आज्ञा, संशय, जोरदारपणा, सयपणा, वगैरे बोलण्याच्या संबंधाचे अनेक विकार आणि फेरफार सहज प्रदर्शित करितों. ही व्यवस्था नसती तर हे प्रकार सांगण्यासाठीं निरनिराळ्या प्रत्ययांचें साह्य घ्यावें लागलें असतें, आणि सर्व व्यवस्था कठीण झाली असती. जणू काय 'ही व्यवस्था कठीण' असा संस्कृतावरून अनुभव घेऊनच मराठीनें ही नवीन व्यवस्था उत्पन्न केली आहे! ही व्यवस्था मराठींत चालू संस्कृतावरून आली नाहीं. चालू संस्कृतांत असले प्रकार अगदीं संकुचित आहेत. ही करण्याचे कामीं मराठीला फार जुन्या काळीं

वाक्यार्थांचा सूक्ष्म भेद पुढें आणण्याचा स्वभावताच प्रयत्न करीत असते; आणि बोलणारांना जरी सूक्ष्म भेद समजत असला, आणि तो भेद समजण्यासाठीं भाषेमध्यें प्रथमारंभीं ज्या युक्त्या केलेल्या होत्या त्यांची आतां बोलणारांना जरी महती वाटली नाहीं, अथवा त्याचा भावार्थ कळेनासा झाला असला, तरी तो योग्य रीतीनें समजण्याची जी परंपरा असेल ती पूर्णपणें अथवा अंशतः पुढें आणण्याचा भाषेचा स्वाभाविक धर्म असतो. ती परंपरा लौकर सुटत नाहीं, आणि त्या परंपरेमुळें वरच्यासारखे सूक्ष्मभेदाचे प्रकार भाषेंत चालू असतात. एकाद वेळ असले प्रकार भाषेंत कोनाकोपऱ्यांत असतात. त्यांचा उपयोग एकाद्या एकीकडच्या प्रांतांतले, अथवा एकाद्या विशिक्षित जातीचे अथवा धंद्यांतले लोकच करितात. परंतु असले प्रकार भाषेच्या परंपरेच्या इतिहासाच्या दृष्टीनें मोठे महत्त्वाचे असतात. मुख्य मराठींत भविष्यकाळास लिंगभेद नसून तो गोव्याच्या भाषेंत आहे. त्याचे उलट मुख्य मराठींत 'होतो' 'जातो' 'करितात' इत्यादि चालू वर्तमानाच्या रूपांना लिंगभेद असतांना कोंकणच्या भाषेंत तो घालवून देण्याचा प्रयत्न झालेला कां दिसतो ? 'मी जातों' ''तूं जातोस' 'ते जातात' याबद्दल कोंकणचे लोक 'मो जातोंयू किंवा जातोंए', 'तूं जाताएस का ?' 'ते जाताएत किंवा जात्याति', असे हेल काढून बोलूं लागले कीं आपण त्यांना हसतों. पण असले थट्टास्पद मानण्यांत येत असलेले उच्चार भाषेचा प्राचीन इतिहास सांगतात. इतिहासशोधनाच्या उपयोगीं पडणारे भाषेंतील जुने शिलालेख किंवा ताम्रपट आहेत. अशा प्रकारच्या आणखी अनेक गोष्टी सांगतां येतील. 'तो गुरें किंवा गाढवें हांकितो', म्हणजे तो गुराख्याचा धंदा करितो. पण 'तो गुरांस किंवा गाढवांस हांकितो' म्हणजे तीं वाटेंत आलीं होतीं त्यांना एकीकडे हांकून देतो. असाच अर्थ 'तो गाडी हांकतो', आणि 'गाडीला एकीकडे हांक', यांत आहे. 'तो पोर मारितो' म्हणजे ठार मारितो, पण 'पोरास मारितो' म्हणजे त्याला ठार मारितो अथवा 'त्याला आघात करितो' 'त्या वाड्याचा पुढला दिवाणखाना,' म्हणजे दिवाणखाना वाड्याचा भाग आहे. पण 'त्या वाड्याचे (किंवा वाड्याच्या) पुढला दिवाणखाना' म्हणजे वाड्या-

पुढे दुसरी इमारत असून तिचा दिवाणखाना. अशा प्रकारें शब्दाच्या स्वरुपातील अल्प भेदावरून अथवा दुसऱ्या एकाद्या क्षुल्लक कारणानें शब्दार्थात फेरफार कसे होतात याविषयींचे येरेच प्रकार शब्दघटनेच्या भागात सांगितले आहेत.

## ( ३ ) संयुक्त क्रियापदें

वाक्यात शब्दाचा परस्पर संबंध प्रत्ययाच्या साह्यानें सांगण्यापेक्षा तो शब्दाच्या जुळणीनें दर्शविणें जास्त सुलभ आणि सोयीचें असतें. प्रत्ययाना स्वतःचा अर्थ नसतो आणि ते प्राय एकाक्षरी, यामुळें ल्हान असतात, आणि त्यांचा उच्चार नीट होत नाहीं. ते सुशिक्षित, अशिक्षित, ल्हान, थोर, याच्या नीट लक्षात राहात नाहींत, आणि त्यांचा उपयोग करण्याचे कामीं हयगय होऊं लागते. कित्येक वेळा प्रत्यय अगदीं एकच, किंवा अत्यन्त सारखे असून अर्थ निराळा दाखवावयाचा असतो. असें करणें अडचणीचें वाटतें. परंतु शब्दाचें तसें होत नाहीं. कोणत्याही भाषेंत अगदीं जुनी किंवा प्रथमची व्यवस्था प्रत्यय घटित असते, परंतु पुढें ती शब्दसंघावर येऊन बसते. मराठींत हा प्रकार क्रियार्थाच्या जुळणीमध्यें फार उत्पन्न झाला आहे. नामें आणि कृदन्तें यांना कित्येक नियत साह्य क्रियापदांची जोड देऊन अनेक क्रियापदें मराठींत करता येतात. यामुळें मराठींत भिन्न भिन्न क्रियार्थ सुलभतेनें आणि सुंदर रीतींनें सांगता येतात या जोड क्रियापदाच्या रचनेनें आपण काळ, आणि अर्थ, कर्तरी आणि कर्मणी रचना, आज्ञा, संशय, जोरदारपणा, संयपणा, वगैरे बोलण्याच्या संबंधाचे अनेक विकार आणि फेरफार सहज प्रदर्शित करितों. ही व्यवस्था नसती तर हे प्रकार सांगण्यासाठीं निरनिराळ्या प्रत्ययाचें साह्य घ्यावें लागलें असतें, आणि सर्व व्यवस्था कठीण झाली असती. जणू काय 'ही व्यवस्था कठीण' असा संस्कृतावरून अनुभव घेऊनच मराठीनें ही नवीन व्यवस्था उत्पन्न केली आहे! ही व्यवस्था मराठींत चालू संस्कृतावरून आली नाहीं. चालू संस्कृतात असले प्रकार अगदीं संकुचित आहेत. ही करण्याचे कामीं मराठीला फार जुन्या काळीं

वेद-भाषेंत होते असे अनेक प्रचार उपयोगांत आणावे लागले आहेत, असें दिसून येतें.

हीं संयुक्त क्रियापदें अनेक तऱ्हांनीं होतात. कांहीं सकर्मक क्रियापदांचा कर्माशीं निकट संबंध असून कर्मपद आणि क्रियापद मिळून संयुक्त अर्थ असतो; नुसत्या क्रियापदास अर्थ नसतो. उदा०—झोंप घेणें, मार खाणें, दम खाणें, त्रागा करणें, इत्यादि.

कित्येक संयुक्त क्रियापदें त्यांच्या बरोबर नामाच्या विभक्तीचें रूप घेऊन होतात, आणि दोन्ही मिळून विवक्षित अर्थ असतो. उदा०—रागें भरणें, सिद्धीस नेणें, डोकीस घालणें, डोकींत घालणें, डोक्यांत घालणें, पायां पडणें, हातीं घेणें, तोंडीं लागणें, तोंडीं लावणें, इत्यादि. कित्येक विशेषणें आणि क्रियापदरूप यांनीं मिळून संयुक्त अर्थ होतो. उदा०—गोड लागणें, ठार मारणें, गोड करणें, नीट बसणें, इत्यादि.

कृदन्त आणि पूर्ण क्रियापद यांच्या साह्यानें अनेक संयुक्त क्रियापदे बनतात. जसें—जाणार आहे, बोलत बसला, करितां येतें, घेऊं लागला, करून टाकिलें, करिता झाला, जावयाचें आहे, करावयास पडलें, इत्यादि. ही संयुक्त क्रियापदांची जोडणी फार उपयोगाची असून तिच्यामुळें भाषेच्या व्यवस्थेमध्यें उत्तम सोय झाली आहे. या जोड क्रियापदाचें विस्तृत विवरण व्याकरणांत केलें आहे. यासाठीं येथें जास्त कांहीं लिहीत नाहीं. मागील व्याकरणांत यांची व्यवस्था नीट न केल्यानें त्यांच्या व्याकरणव्यवस्थेंत घोंटाळा राहिला, आणि ही उत्तम सोय असून हा सर्व कठीण प्रकार आहे अशी शिकणारांची समजूत होते. असें वाटण्याचें कारण असें आहे कीं संयुक्त क्रियापद म्हटलें, कीं त्याचा काळ ठरविला पाहिजे, असें वाटूं लागतें. अशीं जोड क्रियापदें मराठी भाषेंत फार होतात. त्यांतलीं नामें आणि विशेषणें यांच्या साह्यानें होणारीं सोडून दिलीं तरी, कृदन्त विशेषणें आणि अव्ययें यांच्या साह्यक्रियापदाशीं जुळणीनें होणारींही पुष्कळ आहेत. त्यांना कशीं तरी काळांचीं जोड नांवें दिलींच पाहिजेत, अशी पक्की समजूत झालेली आहे. परंतु इतक्यांना संयुक्त काळांचीं नांवें देणें

शक्य नाहीं. तसेंच अशीं नांवें ठरवीत बसण्यापासून तादृश फायदाही नाहीं. कृदन्त हें मूळचें नाम, विशेषण अथवा अव्यय असावयाचेंच; तेव्हां तें जसें असेल तसें मानून साह्यधातूचें रूप तेवढें क्रियापद मानावें, आणि वाक्याची व्याकरणव्यवस्था सांगावी म्हणजे अडचण वाटणार नाहीं.

## ( ४ ) म्हणी आणि वाक्संप्रदाय

भाषेमध्यें म्हणी आणि वाक्संप्रदाय म्हणून कांहीं विशेष प्रकार असतात. म्हण म्हणजे सर्वसामान्य झालेल्या विशेष अर्थाचें वाक्य; आणि वाक्संप्रदाय म्हणजे एखाद्या शब्दाचा अर्थदृष्टीनें विशेष प्रकारचा उपयोग करून बनविलेलें वाक्य, वाक्यांश अथवा शब्दसमूह. वास्तविक रचनेच्या संबंधानें पाहिलें तर संप्रदाय आणि म्हण हीं दोन्ही एकच होत, परंतु त्यांत थोडा भेद असतो; आणि इंग्रजींत motto आणि Idiom असे दोन शब्द असल्यामुळें मराठींतही दोन शब्द योजण्याचा प्रघात पडला आहे. म्हण हें पूर्ण वाक्य असतें. संप्रदायामध्यें एखाद्या शब्दाचा विशेष अर्थानें उपयोग केला असतो. मग तो शब्दसंघ पूर्ण वाक्य असतो अथवा वाक्यांश असतो.

म्हणी आणि संप्रदाय यांच्या विषयींचीं निराळीं स्वतंत्र पुस्तकें झालीं आहेत. यासाठीं प्रस्तुत पुस्तकांत तद्विषयीं फारशी चर्चा करण्याचा उद्देश नाहीं. त्यांची उत्पत्ती कशी होते, त्यांचें स्वरूप साधारणतः कसें असतें आणि भाषेंत त्यांचा उपयोग कसा होत असतो आणि त्यांपासून विशेष कार्य कोणतें होतें, यासंबंधाचें अल्प विवरण येथें करावयाचें आहे.

एकादी पौराणिक, ऐतिहासिक, लौकिककथा अथवा एकादा अनुभव लोकांना श्रुत किंवा ठाऊक झालेला असतो. आणि त्याचा परिणाम, तात्पर्य किंवा इत्यर्थ सर्वांना मान्य असा गणलेला असतो. त्याची योग्य प्रसंगीं आठवण करून देऊन आपल्या म्हणण्याला पुष्टी आणणें यासाठीं म्हणीचा उपयोग करीत असतात. ती म्हण म्हटली कीं, त्या विवक्षित गोष्टीची आठवण होऊन प्रस्तुत गोष्टीच्या संबंधानें आपण निर्णय काय करावा, अथवा प्रसंगीं वर्तन कसें ठेवावें, याचा

उपदेश आपणास मिळतो. म्हणीमधलें सत्य साधारणतः सर्वमान्य असें गणलेलें असतें, यामुळें ती लक्षांत आली अथवा ती कानीं पडली कीं, एकप्रकारें प्रस्तुताविषयीं बोलणारानें खात्री केली अथवा ऐकणाराची खात्री झाली अशी उभयपक्षीं समजूत होते. अशा म्हणीचा भाषेमध्यें उपयोग असतो. अर्थात् म्हणीच्या योगानें एखाद्या गोष्टीचें थोडक्यांत प्रतिपादन करून आपला मुद्दा सिद्ध केल्याचें श्रेय येतें. 'नरो वा कुंजरो वा', 'हा सूर्य, हा जयद्रथ', 'रामाकाळीं वानरांना वाचा', या तीन म्हणींत सर्वश्रुत असा पौराणिक कथासंबंध सांगून प्रतिपादन केलें आहे. 'नरो वा कुंजरो वा' या म्हणींत अश्वत्थामा नांवाचा माणूस मेला असेल अथवा हत्ती मेला असेल, असें घड खरें नाहीं आणि खोटेंही नाहीं असें विधान करून धर्मानें वेळ मारून नेली, याची आठवण करून देऊन बोलणारा समर्थन करितो. कृष्णानें लपविलेला सूर्य प्रकट करून सूर्य आणि जयद्रथ दोन्ही अर्जुनापुढें आणून सोडले, आणि आतां आपली प्रतिज्ञा संभाळ असें सुचविलें, हा दुसऱ्या म्हणीचा गोषवारा. रामाच्या वेळीं वानर बोलत असत, म्हणून नेहमींच अशक्य गोष्टी शक्य होतात कीं काय? असें शेवटल्या म्हणींत दर्शविलें आहे. 'गंगेस घोडे न्हाले', 'त्याचें नशीब शिकंदर आहे', 'मोठा आला बाजीराव', यांत ऐतिहासिक गोष्ट किंवा पुरुष यांचा संबंध लक्षांत आणून दृष्टान्ता-दाखल वाक्यें बनविलीं आहेत. 'बादरायणसंबंध', 'ज्या गांवच्या बोरी त्याच गांवच्या बाभळी', 'कोठें इंद्राचा ऐरावत, कोठें शामभट्टाची तट्टाणी', यांत लौकिक गोष्टींचा संबंध सांगून आपल्यास हवा असा अर्थ उत्पन्न केला आहे. 'येथें येथें तळें सांचे', 'दाम करी काम', 'चोराच्या मनांत चांदणें', 'गांव तेथें म्हारवडा आहेच', यांत जगांतील एकेक नित्याचा अनुभव व्यक्त करून नीतिबोध केला आहे. अशा प्रकारें म्हणीच्या योगानें एखाद्या गोष्टीचा थोडक्यांत निर्णय केला असतो अथवा खात्री पटविली असते.

मनुष्याचे सर्व प्रकारचे उद्योगधंदे आणि व्यवहार यांचा संबंध आणून म्हणी बनविलेल्या असतात. ज्यास अनुलक्षून मराठींत म्हण

बनली नाहीं, असा कोणताही व्यवहार सांपडणार नाहीं. म्हणी मुद्दाम बनविल्या असतील असें दिसत नाहीं. पुष्कळ म्हणी सहजगत्या झाल्या असतील. परंतु त्यांच्या शब्दरचनेच्या टापटिपीवरून, त्यांतल्या पुष्कळ म्हणी त्या त्या कामांतल्या चतुरांनीं बनविलेल्या दिसतात. तसेंच चालू असलेल्या म्हणींवरून सादृश्यानें आणखी म्हणी बनतात. पुष्कळ म्हणींत जुन्या तऱ्हेची वाक्यरचना आहे. यावरून त्या जुन्या काळापासून उपयोगांत आहेत. तसेंच, त्यांची जी ठरीव शब्दरचना आहे तशीच ती ठेवावी लागते. अर्थ कायम ठेवून शब्दरचना फिरविली, तर म्हण सर्वमान्य होणार नाहीं. म्हण जशी चालत आली असेल तशीच ती उच्चारिली पाहिजे. म्हणी म्हणजे जुन्या शास्त्रीय ग्रंथांतल्या सूत्रांप्रमाणेंच आहेत. 'थेंबें थेंबें तळें सांचें' याचें 'थोडें थोडें पाणी मिळवून पाण्याचा मोठा संचय होतो' असें वाक्य केलें तर तें सर्वमान्य होणार नाहीं. कारण त्या लहानशा वाक्यांत अर्थ चटदिशीं ध्यानांत आणून देण्याची जी खुबी आहे ती मोठ्या वाक्यांत नाहीं.

भाषासंप्रदाय असें आपण ज्यांना म्हणतों, ते शब्दसंघ बहुधा अपूर्ण असतात. तशीं वाक्यें पुष्कळदां म्हणींसारखींही असतात. यामुळें कित्येक प्रसंगीं अमकी म्हण आणि अमका वाक्संप्रदाय हें स्पष्ट सांगतां येणार नाहीं. एकप्रकारें अशा प्रकारच्या सर्व वचनांस म्हणी असें एकच नांव देण्यास चिंता नाहीं. ज्या शब्दसमूहानें विशेष अर्थाचा उल्लेख केला असतो ती म्हण, आणि एकाद्या वस्तूच्या नांवाचा नेहमींपेक्षां निराळ्या तऱ्हेनें उपयोग करून वाक्य अथवा वाक्यांश बनविला असतो तो वाक्‌संप्रदाय, असा भिन्नपणा दाखविला तरी चालेल.

संप्रदायामध्यें शरीरावयव, घरांतले पदार्थ, नित्यांतल्या गोष्टी, यांचा विशेष प्रकारें उपयोग असतो. 'हातास येणें', 'तोंडास तोंड देणें', 'डोळा ठेवणें', 'उंबरघांट ओलांडणें', 'प्राण टाकणें', 'दोंदाड शिपायी', 'हातचा मळ', 'पराचा कावळा', 'पिंपळावरचा मुंजा', 'चावडीवर दरवडा', 'एका माळेचे मणी', 'ओढून चंद्रबळ आणणें',

'तारंबळ होणें', 'कल्पांत होणें', 'गुळाचा गणपती', इत्यादि वाक्संप्रदायांनीं एकेक्या पदार्थाचा विशेष रीतीनें बोलण्यांत उपयोग करून उपमेच्या, रूपकाच्या, दृष्टान्ताच्या, उदाहरणाच्या, परिणामाच्या अथवा आठवणीच्या द्वारें विवक्षित अर्थ लक्षांत आणून दिला आहे, आणि त्यायोगानें आपल्या बोलण्याची अथवा प्रतिपादनाची विशेष संपादणी केली आहे.

सांप्रतची भाषापद्धती पाहिली तर तीमध्यें म्हणी आणि तशा प्रकारचीं वचनें यांचा उपयोग कमी होत चालला आहे. यांचा उपयोग विशेषतः जुनीं माणसें, बायका आणि अशिक्षित परंतु अनुभविक मंडळी यांच्या भाषणामध्यें जास्त होत असतो. असल्या वचनांमध्यें असलेलें सत्य सर्वमान्य आहे, त्याच्यावर कोणास शंका घेण्याचा अधिकार नाहीं, अशी साधारणतः समजूत असते; म्हणून असे लोक प्रतिपक्षीयांस किंवा श्रोत्यांस निरुत्तर करण्यास म्हणीचा उपयोग करितात. परंतु गद्यभाषेचा प्रचार जास्त होऊं लागल्यानें असलीं संक्षिप्त वचनें मागें पडत चाललीं आहेत. आतां थोडक्यांत दृष्टांत देऊन बोलावयास नको, चार जास्त शब्द बोलून समाधान करण्यास चिंता नाहीं, अशी समजूत होत चालल्यामुळें आणि जसजसा विद्याप्रसार आणि ज्ञानवृद्धी हीं होत जातात, तसतसे लोक अल्प प्रतिपादनांनीं अथवा शहाणपणाच्या ठरीव वाक्यांनीं संतुष्ट होण्यासारखे नसतात, प्रत्यक्षप्रमाणाची अपेक्षा असते, यामुळें म्हणीवर बोलणाराचा तितका भर आणि विश्वास आतां नसतो. या कारणानें भाषेंत म्हणींचा उपयोग कमी होत चालला आहे. तसेंच आतां लोक अधिक चाणाक्ष आणि शिक्षित होत चालल्यामुळें लोकांचा अंधपरंपरेचा भरंवसा कमी होत चालला आहे; आणि ज्ञानप्रसारामुळें कित्येक म्हणींचा अर्थही खोटा ठरतो. तसेंच बोलणाराला 'दुसऱ्याचें उसनें वचन कां घ्यावें ! आपले आपणच हवें तें प्रतिपादन करण्यास कमी आहों काय?' असेंही वाटतें. तेंही पण साहजिकच आहे. यामुळें म्हणींचा उत्तरोत्तर उपयोग कमी होत जाणार हें उघड आहे. परंतु वाक्संप्रदायाचा उपयोग म्हणण्यासारखा कमी होत आहेसें

दिसत नाहीं. याचें कारण म्हणीमध्यें थोडक्यांत प्रतिपादन केलेलें असून तें श्रोत्यानें मान्य करावें असा वक्त्याचा आग्रह असतो. वाक्संप्रदायामध्यें अशा प्रकारचा कांहीं आग्रह नसून केवळ उदाहरण किंवा दृष्टांत, अथवा ज्या गोष्टीचें प्रतिपादन करावयाचें त्यासारख्या दुसऱ्या गोष्टीची आठवण, याच्या योगानें बोलण्याला नुसता जोर आणलेला असतो. तसेंच ज्ञानप्रसारानें खोटीं ठरलेलीं विधानें जशीं म्हणींत गोंवलेलीं आहेत तसा प्रकार वाक्संप्रदायाचा नाहीं. यामुळें वाक्संप्रदायाचा उपयोग भाषेंत कमी होणार नाहीं, असें म्हणण्यास चिंता नाहीं.

## ( ५ ) अर्थांतरन्यास

म्हणी आणि संप्रदाय याप्रमाणें भाषेंत आणखी एक प्रकारची विशेष रचना असते. बोलणारा एखाद्या गोष्टीचें प्रतिपादन करीत असतां एखादी विशेष गोष्ट सांगताना तिच्या समर्थनाकरितां ऐकणाराला कबूल असलेल्या अशा सामान्य तत्त्वाची आठवण करून देतो. अशा प्रतिपादनास अर्थान्तरन्यास किंवा साधारणपणें दृष्टान्त सांगणें असें आपण म्हणतों. अशी रचना आपल्या बोलण्यांत नेहमीं असते. अशी रचना समजून उमजून मुद्दाम करावी लागते असें नाहीं. तर सहजगत्या घडून येते. आपल्यास एखादी गोष्ट ऐकणाराच्या मनांत भरून द्यावयाची असली, अथवा कबूल करून घ्यावयाची असली म्हणजे 'अमकें असें असें नाहीं का?' 'मग त्यातलेंच हें!' असें आपण नेहमीं म्हणत असतों. चांगले कवी आणि ग्रंथकार अर्थान्तरन्यासपद्धतीचा नेहमीं उपयोग करितात. कवी मोरोपंत याच्या भाषेची मुख्य खुबी हीच असते. त्याच्या दहा आर्या वाचल्या असतां त्यांत एक दोन तरी अर्थान्तरन्यास स्पष्ट किंवा प्रच्छन्न असतात. ज्ञानदेव, मुक्तेश्वर, श्रीधर, या कवींच्या भाषेंत अर्थान्तरन्यासांना उपमेचें, दृष्टान्ताचें, अथवा रूपकाचें स्वरूप आलेलें असतें. विषय कठीण असून अर्थान्तरन्यास, उपमा किंवा दृष्टान्त याचे द्वारें तो मनोरंजन रीतीनें समजून देण्याची हातोटी ज्ञानदेवास आणि तुकारामास उत्तम साधली होती. श्रीधरकवीही आपल्या उपमानीं, रूपकानीं आणि दृष्टान्तानीं लोकप्रिय

बनला आहे. मोरोपंताचे भाषेत या युक्तीला अर्थान्तरन्यासाचें विशेष प्रौढ स्वरूप व संस्कृतवळण आलेलें आहे.

### (६) प्रश्नालंकार

त्याचप्रमाणें गद्यभाषेत प्रश्न विचारून वक्त्याला एखादी गोष्ट कबूल करावयास लावण्याची युक्ती असते. हा प्रश्न असा असतो कीं, त्याला ऐकणाराकडून विवक्षित उत्तर मिळावयाचेंच असतें. यामुळें तें मिळालें असें गृहीत धरून बोलणारा आपलें प्रतिपादन पुढें चालवितो. या प्रश्नपद्धतीला प्रश्नालंकार असें संस्कृत साहित्यांत नांव आहे. पद्यापेक्षां गद्यांत याचा उपयोग पुष्कळ असतो, आणि इंग्रजी भाषेत व्याख्यानामध्यें याचा प्रचार फार आहे, यामुळें गद्यभाषेंत प्रश्नालंकार उत्तरोत्तर अधिक येत चालला आहे.

### (७) कवितेची भाषा

कवितेची भाषासरणी गद्याच्या भाषासरणीपेक्षां बरीच भिन्न असते, हा प्रकार सर्वांस माहीत आहेच. संस्कृत वाङ्मय बहुतेक पद्यमय आहे, यामुळें मराठींतही प्रथमारंभापासून पद्यालाच सुरवात झाली. संस्कृत वाङ्मयामध्यें गद्य आणि पद्य यांच्या भाषापद्धतीमध्यें भेद फार थोडा असतो. संस्कृतांतलें मुख्य वृत्त अनुष्टुप्; हें जवळ जवळ गद्य पद्धतीचेंच आहे. त्यामुळें त्या भाषेत सर्व विषयांवर अनुष्टुप् छंदांत ग्रंथ लिहिलेले आहेत; आणि संस्कृतांत जे थोडे गद्यग्रंथ आहेत, ते काव्यमय असल्यामुळें भाषासरणीच्या दृष्टीनें पद्य भाषेतच लिहिल्यासारखे आहेत, असें म्हणण्यास चिंता नाहीं. गद्यभाषा ही जास्त सुलभ आणि साधी असावयाची, आणि पद्यभाषा अधिक अलंकारिक असावयाची. पण संस्कृत गद्यभाषेपेक्षां अनुष्टुप् छंद-घटित पद्यभाषाच अधिक साधी असते. मराठींत संस्कृतांतल्या अनुष्टुप् छंदावरून ओंवी हा छंद उत्पन्न होऊन प्रथमारंभीं त्या छंदांत पद्यमय वाङ्मय सुरू झालें. प्रथमारंभीं गद्य लिहिणें झाल्यास त्याची भाषासरणी पद्यासारखीच असे, असें दिसतें. कारण मराठी पंचतंत्राची भाषा बहुतांशीं ज्ञानेश्वरीच्या भाषेसारखीच आहे. परंतु पुढें पद्याची भाषा विशेष टापटिपीची आणि व्यवस्थेची होत गेली; आणि गद्यामध्यें महत्त्वाची

रचना कोणी कांहीं केली नाहीं, यामुळें त्याची अभिवृद्धी तर झाली नाहींच, पण उलट त्याचा ऱ्हास होऊन त्याची भाषा फार वाईट बनली. रामदास आणि शिवाजी याच्या अगोदरचे आणि त्याच्या वेळचे पत्रें वगैरे कित्येक गद्य लेख उपलब्ध आहेत, त्यावरून हें दिसून येईल. यापुढें मात्र गद्य बरेंच त्वरेनें सुधारत गेलें आहे. पद्य लिहिण्याचा ज्ञानदेवानें जो प्रघात घातला तो भाषापद्धतीच्या संबंधानें उन्नती पावत गेला. परंतु आश्चर्य वाटण्यासारखी गोष्ट अशी आहे कीं, ज्ञानदेवापासून तों मोरोपंतापर्यंतच्या चारशें वर्षांत मराठी भाषा बोलणाऱ्या राष्ट्राचें एवढें स्थित्यंतर झालें असून कवितेच्या भाषेमध्यें फारसा फरक झाला नाहीं. व्याकरणसंबंधीं रूपांचा उपयोग करण्याच्या संबंधाच्या मुख्य मुख्य गोष्टी तर अगदीं एकच आहेत. गद्य लिहिण्याचा प्रघात पुष्कळसा पडला असता, तर भाषापद्धतीमध्येंही फरक पडला असता. कारण तेराव्या शतकातली पंचतंत्राची गद्यभाषा आणि अठराव्या शतकाच्या अखेरची पटवर्धनाच्या दप्तरातील गद्यलेखाची भाषा यामध्यें फार फरक आहे. फादर स्टिफेन्स् यानें आपल्या ख्रिस्तपुराणास गद्य भाषेंत प्रस्तावना लिहिली आहे. तींत गोंव्याच्या कोंकणी भाषेंतील शब्द आणि रूपें आहेत. एरव्हीं ती गद्यभाषा त्या काळच्या आमच्या इकडल्या गद्यभाषेपेक्षा पुष्कळ चांगली आहे. याचें कारण तो ग्रंथकार रस्ताच्या इंग्रजी भाषेंत आणि पोर्तुगीज भाषेंत गद्यरचना करणारा होता, आणि त्यानें त्यांतील गद्यभाषेचें अनुकरण केलें, हेंच असलें पाहिजे.

कवितेच्या भाषेंत जसा कालान्तरानें म्हणण्यासारखा फरक पडला नाहीं तसाच स्थलान्तरानेंही पडला नाहीं. ज्ञानेश्वरी आणि मोरोपन्ताचे ग्रंथ यांच्या भाषेची तुलना केली तर असें दिसून येईल कीं, ज्ञानेश्वरींतले जुने शब्द, शब्दाच्या अंतींचे उकार आणि शब्दांचीं कांहीं जुन्या तऱ्हेचीं भिन्न रूपें, ह्या गोष्टी सोडल्या तर यादिवाय कवितेच्या भाषेंतले म्हणून असलेले विशेष भिन्न प्रकार दोहींमध्यें अगदीं एकसारखेच आहेत. एकनाथानें मराठी भाषेला विशेष व्यवस्थित बनविलें. त्याच्या आणि मोरोपंताच्या भाषेंत तर वाक्यरचनेच्या संबंधाच्या मुख्य मुख्य गोष्टींमध्य फरक

अगदींच थोडा आहे. तसेंच पैठणास लिहिलेल्या एकनाथाच्या भाषेंत आणि फादर स्टिफेन्स् यानें सोळाव्या शतकाच्या आरंभीं गोमंतकांत आणि साष्टी प्रांतांत लिहिलेल्या खिस्तपुराणाच्या भाषेंतही यासंबंधानें फारसा भेद नाहीं.पण खिस्त पुराणामध्यें कोंकणच्या भाषेचे कित्येक प्रांतिक प्रकार आहेत. त्यांशिवाय ती भाषा सर्व प्रकारें एकनाथ आणि मुक्तेश्वर यांच्या भाषेसारखीच आहे.

कवितेच्या भाषेंतले मुख्य लक्षांत घेण्याजोगे प्रकार म्हटले म्हणजे जुनाट शब्दांचा आणि विषयानुरोधानें संस्कृत शब्दांचा भरणा, जुन्या वर्तमानकाळाच्या रूपांचा उपयोग आणि शब्दांच्या अन्तीं ई, ऊ, वगैरे स्वर जोडणें हे होत. रामातें, देवातें, देवासी, वगैरे कित्येक विभक्तिरूपें, तसेंच तयासी, करोनी, बोलोनियां, त्याचिया, तयाचिया, देवाचेनी, अशा तऱ्हेचीं रूपें केवळ कवितेंत येतात. अगदीं जुन्या कवितेंत येणारे कित्येक प्रकार उत्तरोत्तर कमी होत गेले आहेत. मोरोपंताच्या कवितेंत संस्कृत शब्द जास्त आहेत; परंतु कवितेंत येणारीं अशीं कांहीं ठरीव रूपें खेरीजकरून बाकीचे जुने प्रकार त्याच्या वेळीं बंद पडले होते. कवितेंत येणारे विशेष प्रकार व्याकरणांत सांगितलेले असल्यामुळें येथें विस्तार करण्याची गरज नाहीं.

कवितेची भाषा विशेष रीतीनें सजविण्यास सांपडते, यामुळें तींत अर्थालंकार घालितां येतात. आणि ते अशा भाषेंत शोभतातही. आणि मराठी कवितेंत नेहमीं यमक असतें. निर्यमक कविता जुनी क्वचित् आहे. मराठी कवितेंत अनुप्रासही पुष्कळदां येतो. भाषेमध्यें–विशेषतः पद्यांत–याचा उपयोग फार असतो. एखादा कथाप्रसंग मनोरंजक करणें, अथवा युद्धाचें, स्वारीचें किंवा समारंभाचें वर्णन करणें, उपहास किंवा तिरस्कार दर्शविणें, अथवा सामान्यतः वर्णन चटकदार करणें, याला अनुप्रास फार उपयोगी पडतो.

आमच्या कवींच्या भाषेंत उपमा आणि दृष्टान्त यांचा भरणा फार. हा प्रघात आरंभींच ज्ञानदेवानें उत्तम घातला आहे. मुक्तेश्वर, श्रीधर, महिपती यांचे ग्रंथ बाळबोध, नीतिबोधमय, मनोरंजक आणि लोकप्रिय होण्यास ह्या गोष्टी कारणीभूत झाल्या आहेत. तुकारामाच्या

अभगातही अगदीं लौकिकातले दृष्टान्त असतात. दृष्टान्ताचा प्रौढ प्रकार जो अर्थान्तरन्यास त्याचा उपयोग मोरोपंत फार करितो, हें मागें सांगण्यात आलेंच आहे. त्यांच्या भाषेच्या अनेक गुणांपैकीं हा एक महत्त्वाचा गुण आहे.

### (८) वाक्यांतील शब्दांचा अनुक्रम

मराठी वाक्यातील निरनिराळ्या शब्दांच्या संबधानें वाक्याची ठेवण कशी असावी याविषयीं कांहीं कायमचे नियम सांप्रत ठरल्यासारखे झाले आहेत. संस्कृत वाङ्मय बहुतेक पद्यमय असल्यानें त्या भाषेत वाक्संबंधाचे ठरलेले नियम नाहींत. संस्कृतात विभक्तिरूपें बहुधा ओळखण्यासारखीं असल्यामुळें आणि विशेष्यविशेषणाचाही निकट संबंध रूपावरून दाखविता येत असल्यामुळें निरनिराळे शब्द वाक्यात कोठेंही असले, तरी त्याचा अन्वय तेव्हांच कळतो. मराठी भाषेंत विभक्तिरूपें फारशीं भिन्न नाहींत. तथापि मराठींत वाक्यरचनेची पद्धत संस्कृतावरूनच आली आहे. संस्कृत गद्यवाङ्मयात वाक्यात निरनिराळ्या प्रकारचे शब्द कोठें असावे, या संबंधाच्या कित्येक गोष्टी ठरलेल्या दिसतात. आणि त्या तशाच मराठींत आल्या आहेत. वाक्यातले शब्द विभक्तींच्या अनुक्रमानें घातलेले असावे, विशेषणें त्यांच्या विशेष्याच्या अगोदर यावीं, विशेषणवाक्यें अथवा वाक्यांश असल्यास तेही विशेष्याचे अगोदर यावे, क्रियापद अगदीं अखेर यावें, अशी व्यवस्था सांप्रत दृष्टीस पडते. जुन्याकाळीं वाक्यें फार लहान, क्रियापदें थोडीं, क्रियार्थाचें काम साध्या अथवा धातुसाधित विधिविशेषणानें केलेलें, अशी व्यवस्था असल्याचे पंचतंत्रावरून दिसतें. हा प्रकार अगदीं अलीकडल्या काळापर्यंत चालू होता. ही वाक्याची ठेवण बोलण्यातील प्रघातावरून ठरलेली असली पाहिजे, आणि बोलण्यात मूळपासून असाच प्रघात असावासें दिसतें. तथापि एवढें खरें कीं, बोलण्यात वाक्यरचनेचीं बंधनें शिथिल असून, लिहिण्यात तीं पक्कीं होतात. आता ही जी वाक्यातली शब्दानुक्रमाची पद्धत आहे, ती सांप्रत मराठीला इंग्लिश भाषेची संगत मिळाल्यापासून गैरसोयीची वाटू लागली आहे. संस्कृतात आणि मराठींत जुनें पद्य

म्हटलें म्हणजे फक्त चार ओळी. तेवढ्यांत एक वाक्य पूर्ण झालें पाहिजे. मराठींत बहुतेक पद्यवाङ्मयाचीं मुख्य वृत्तें ओवी आणि आर्या. हीं अगदीं लहान असतात. मोठ्या वृत्ताचे श्लोक झाले तरी त्यांच्या चार ओळींत जास्त म्हटलीं म्हणजे फार तर सवाशें अक्षरें यावयाचीं. तेव्हां आमचीं जुनीं मराठी वाक्यें लहानच असत. आणि तीं लहान असल्यामुळें सध्या जी वाक्यांतली शब्दानुक्रमाची तऱ्हा आहे, ती इतके दिवस *अडचणीची वाटली नसावी.* परंतु आतां मराठींत इंग्लिश भाषेवरून अधिकाधिक गद्य ग्रंथरचना होत चालली आहे, आणि इंग्रजी वाक्याचें अनुकरण आपण करीत आहों. यासाठीं इंग्रजी वाक्यांतला शब्दानुक्रम अधिक सोयीचा असें पुष्कळांस वाटणें साहाजिक आहे. वाक्यांत मुख्य शब्द उद्देश्य. त्याच्याविषयीं आपण जें सांगतों, तो वाक्याचा मुख्यार्थ. हा मुख्यार्थ क्रियापदानें म्हणजे विधेयानें बोधित होतो. इंग्रजींत उद्देश्य आणि विधेय हीं बहुधा अगदीं निकटवर्ती असतात. मराठींत वाक्यामध्यें उद्देश्य अगदीं आरंभीं आणि विधेय अगदीं शेवटीं अशी रचना असते. दोहोंच्या मध्यें कर्मपद आणि क्रियाविशेषणें येतात, आणि दोहोंवर अवलंबून असणारे शब्द त्यांच्याबरोबर असतात. अर्थात् केव्हां केव्हां उद्देश्य व विधेय यांचें अंतर फारच लांबतें. बोलणारा प्रथमतः एकाद्या वस्तूचें नांव घेतो, आणि त्या वस्तुविषयीं काय सांगतो आहे, हें श्रोत्याला समजण्यास बरीच वाट पहाण्याची पाळी येते. ही अडचण इंग्रजीची संवय आपल्यास जसजशी जास्त होईल तसतशी जास्त वाटूं लागणार आहे. आणि अर्थात् मराठीची वाक्यरचना गैरसोयीची भासणारच. अमुकच तऱ्हेची व्यवस्था असावी, असा कांहीं मराठींत सक्त नियम नाहीं. आपल्या बोलण्यांत आणि *लिहिण्यांतही* उद्देश्य आणि *विधेय* पुष्कळदां आपण जवळ जवळ घालतो. तसेंच विशेषतः विशेषण-वाक्यें आणि वाक्यांश विशेष्यांच्या नंतर घालण्याचीही चाल आहे. *या दोन्ही गोष्टी अलीकडच्या चालू लेखांतून कमी आढळतात;* परंतु प्रथमारंभींच्या मराठी गद्यांत–विशेषतः मुंबईकरांच्या अगदीं आरंभींच्या गद्यांत–अशी रचना पुष्कळ आली आहे, असें *दिसून*

येईल. हे प्रकार हळू हळू वादवींत गेल्यानें इंग्लिश भाषेच्या नमुन्यावर मराठी वाक्यांतील शब्दानुक्रम नेता येईल, आणि वाक्य लांब झाल्यानें सध्या एकमेकांशीं अर्थानें संलग्न असलेले शब्द परस्परापासून लांब घालावे लागून दूरान्वित होतात, तसें होणार नाहीं. ही चाल पाडण्याचा उत्तम मार्ग म्हटला म्हणजे ग्रंथकारानीं अशी व्यवस्था थोडी थोडी करीत जाणें हा आहे. ही व्यवस्था मुद्दाम प्रयत्न करून अथवा घाईनें एकदम करूं म्हटल्यास होणार नाहीं. पण हळू हळू होण्यास कांहीं अडचण दिसत नाहीं.

वाक्याच्या रचनेची दुसरी महत्त्वाची गोष्ट एकाद्या मोठ्या वाक्यांतील ल्हान पोटवाक्यें यांचा परस्पर संबंध कसा असावा ही आहे. इंग्रजी भाषेंतलें वाक्य स्वाभाविक लांब असतें. मराठींतलें वाक्य स्वाभाविक ल्हान असतें. यामुळें पुष्कळदां असें वाटू लागलें कीं, इंग्रजींतल्या मूळ वाक्याचें रुपांतर नीट झालें नाहीं. खरें पाहिलें तर हा बराचसा गैरसमजाचा भाग आहे. एकाद्या भाषेंतले विचार दुसऱ्या भाषेंत नेणें झाल्यास दोन्ही भाषांतील शब्दांची संख्या बहुधा सारखीच असावयाची. सध्या आपणास इंग्रजी आणि मराठी या दोन भाषांचा सहवास आहे. इंग्रजींतल्या वाक्यांतल्या शब्दांना मराठी स्वरूप देऊं लागल्यास बहुधा शब्दास शब्द घालण्याची व्यवस्था करितां येते. क्वचित् थोड्या इंग्रजी शब्दांना जास्त मराठी शब्द घालावे लागतात, परंतु केव्हां जास्त इंग्रजी शब्दांबद्दल थोडके मराठी शब्द घालूनही काम होतें. मिळून एकंदर प्रमाण असें येतें कीं, मूळच्या इंग्रजी वाक्यांत जितके शब्द असतात, त्याहून मराठींत जास्त शब्द घालावे लागत नाहींत, असा पुष्कळांचा अनुभव मुद्दाम विचारून लिहिला आहे. आतां इंग्रजी गद्याचा प्रघात फार दिवसांचा आणि फार विस्तृत असल्यामुळें त्या भाषेंत गुंतागुंतीचीं आणि लांब वाक्यें शोभतात. मराठींत गद्याचा प्रचार अलीकडचा, आणि एकंदर ग्रंथरचना कमी, यामुळें आमच्यांत अजून लांब लांब वाक्यें लोकांच्या माथ्यां बाईत आमचें जुनें मोठ्यांत मोठें वाक्य म्हटलें म्हणजे एका शार्दूलविक्रीडित, हरिणी अथवा स्रग्धरा छंदांतील श्लोक. तेव्हां ही अडचण तूर्त काढून

टाकण्याचा चांगला उपाय म्हटला म्हणजे मराठींत लहान लहान स्वतंत्र वाक्यें करून तीं अव्ययानें जोडावीं. पुष्कळ मोठालीं अपूर्ण वाक्यें अथवा वाक्यांश फारसे करूं नयेत; अथवा एकमेकांवर अवलंबून असणारीं मिश्र वाक्येंही फारशीं करूं नयेत. लहान लहान स्वतंत्र वाक्यांवर अथवा फार तर संयुक्त वाक्यांवर काम भागवावें. अशा व्यवस्थेनें वाक्यांची संख्या मात्र वाढेल. शब्दांची संख्या वाढण्याची भीती नाहीं. इंग्रजी भाषेंत लांब लांब वाक्यें असतात आणि त्याच्या भागांचे परस्परसंबंध आणि एकंदर वाक्याची जुळणी गुंतागुंतीची असते. ही व्यवस्था त्या भाषेंतील पुष्कळ ग्रंथकारांनीं अयोग्य ठरविली आहे, आणि या संबंधाची रीत लावण्यासाठीं ज्यांनीं लेखनपद्धतीवर शिक्षणविषयक ग्रंथ लिहिले आहेत, त्यांनीं साधीं, सोपीं, लहान लहान, कमी गुंतागुंतीचीं वाक्यें करण्याचा उपदेश केला आहे. तेव्हां आपल्या मराठीला जर असें वळण मूळचेंच आहे तर तेंच कायम ठेवून त्याच्या जोडीला इंग्रजींतून जरूर ते प्रकार घ्यावे आणि सुधारणा करीत जावें, हेंच योग्य धोरण आहे.

# भाग तिसरा



# मराठी शब्दांची घटना

इतर प्राण्यांपेक्षां मानवास श्रेष्ठत्व प्राप्त होण्यास ज्या गोष्टी कारणीभूत झाल्या आहेत, त्यांमध्ये बोलतां येणें ही गोष्ट प्रमुख आहे. भाषेनें मनुष्यांस आपले विचार परस्परांस सांगतां येतात. यामुळें संघ करून राहाण्याचा जो मनुष्यस्वभाव त्यास मोठेंच साह्य झालें आहे, हें उघड आहे. तसेंच भाषेंतले विचार राखून ठेवण्याच्या नाना युक्त्या माणसांनीं केल्या आहेत, यामुळें पिढ्यानपिढ्या मनुष्यांस आपले विचार जमवून ठेवितां येऊन ते एकसारखे उपयोगीं पडत आले आहेत. भाषेचें मूळ शब्द, कारण आपले विचार जुळविण्यासाठीं आपण त्यांना निरनिराळे अर्थ देतों, आणि त्यांनीं भाषा व विचार जुळवितों. यासाठीं शब्दांचें म्हणजे त्यांच्या अर्थांचें महत्व मोठें आहे. एकेक शब्दाला प्रथमतः अर्थ मिळतो. तो अर्थ जुळून वाक्यें होतात. जे शब्द जुळणीला, उच्चाराला, अर्थाला चांगले असतात ते टिकतात; गैरसोयीचे असतात ते जातात; अथवा शब्दांचे अर्थ बदलत जातात. ते बदलतांना त्यांच्या स्वरूपांतही कधीं कधीं फेरफार होत जातात. अशा रीतीनें भाषेंत शब्दांची घडामोड निरंतर चालू असते. मनुष्याचें ज्ञान, अनुभव आणि इतिहास अथवा नाना विचार हे मनुष्याची बोलणी म्हणजे भाषा आणि त्यांनीं बनलेले ग्रंथ यांतच असतात असें नाहीं, तर ते शब्दांतही असतात. किंबहुना शब्द हेच भाषेचें मूळ, यामुळें ह्या गोष्टी शब्दांतच सांठविलेल्या असतात. इतकेंच कीं शब्दांत त्या बीजमात्रेंकरून असतात. पुढें त्या शब्दांचेच ग्रंथ बनतात. यासाठीं शब्द, त्यांची घटना आणि त्या घटनेच्या द्वारें त्यांना आलेले निरनिराळे अर्थ यांचा विचार भाषाशास्त्रांत फार महत्वाचा आहे. सृष्टींत मनुष्य

नव्हता अथवा असूनही त्याला कांहीं लिहून ठेवितां येत नव्हतें, तेव्हांपासूनचाही सृष्टीचा इतिहास तिच्या उदरांतील वस्तू किंवा त्यांचे प्रस्तरीभूत अवशेष आपणांस सांगत आहेत. सृष्टिगर्भशोधनाच्या शास्त्राप्रमाणें असलेले पृथ्वीच्या पोटांतले थर हे त्या इतिहास-पुस्तकाचे भाग व पृष्ठें आहेत. तोच प्रकार भाषाशास्त्रांत शब्दांचा आहे. ज्याप्रमाणें भूगर्भांत वनस्पती आणि प्राणी यांचे प्रस्तरीभूत ( fossils ) झालेले अवशेष सांपडून त्यांवरून एकंदर सृष्टी आणि सर्व प्राणी यांच्या इतिहासाचा छडा लागतो, त्याप्रमाणें भाषेंतल्या शब्दांच्या जुळणीचा व अर्थाचा प्रथमारंभापासूनचा इतिहास शोधूं लागल्यास मानवी प्राण्याच्या सर्व प्रकारच्या प्रगतीचा इतिहास सांपडतो. या दृष्टीनें पाश्चात्य देशांत भाषाशास्त्राचा अभ्यास चालू आहे. तसा अभ्यास आपल्लेकडेही झाला पाहिजे. या पुस्तकाच्या प्रस्तुत भागांत असा अभ्यास फारसा केला आहे असें नाहीं. साधनांच्या अभावीं तसें आजच करितां येणें अशक्य आहे. तथापि त्याचा अनुगम सांगण्याचा प्रयत्न केला आहे, आणि शब्दशास्त्राचा इतिहास शोधण्याची दिशा दाखविली आहे. या शास्त्रांत प्रत्येक शब्दाचा मूळापासूनचा शोध लावण्याचा प्रयत्न असतो. शब्दाचें मूळ काय, तो आला कोठून, त्यांत निरनिराळे अवयव असल्यास ते कसे जुळून आले, त्या प्रत्येकाचा अर्थ काय, त्या अवयवांची आर्थिक जुळणी झाली कशी, आणि त्या जुळणीनें विवक्षित अर्थ कसा उत्पन्न झाला, मूळापासून अर्थ कसकसा फिरत गेला, इत्यादि गोष्टींचा विचार कर्तव्य असतो. या शोधापासून अनेक तऱ्हेचा जुना इतिहास कळतो, हा सर्वमुली फायदा आहेच. पण खुद्द भाषेलाही या शोधापासून फायदा आहे. मनुष्याच्या प्रगतीबरोबर भाषेची प्रगती चालू असते. तिच्या शब्दांची आणि त्यांच्या अर्थांची वाढ होत जाते. ती नीटपणें होण्यास हा जुना इतिहास संगतवार कळेल तितका कळला पाहिजे. त्यापासून भाषेच्या सुघटनेचें काम सुलभ होऊन मनुष्याची जशी प्रगती होत जाते तशी त्याच्या भाषेचीही होत जाते. असें या शब्दघटनाशास्त्राचें महत्त्व आहे.

मराठी भाषेंत जे शब्द आहेत, ते आले कोठून, हें सांगणें फारसें कठीण नाहीं. कारण मराठी भाषारूप नदीचे मूळचे झरे काहीं फारसे नाहींत. मूळ आर्यांची जी वेदभाषा, तिचीच परिणती होऊन सांप्रतची आपली मराठी बनली, या दृष्टीनें मराठीचा मुख्य झरा कोणता हें स्पष्ट होतेंच. तेव्हा मराठी भाषेचा शब्दसमूह बहुतेक सर्व घरचाच आहे. फारशी, आरबी, पोर्तुगीज, इंग्रजी या परक्या भाषा आणि हिंदी, उर्दू, कानडी, गुजराथी, इत्यादि आपल्या शेजारच्या देशी भाषा, यामधून मराठीला शब्द कसे मिळाले आहेत, याचें विवरण शेवटच्या भागात येईल.

तुलनेसाठीं असें सांगितलें पाहिजे कीं, इंग्रजी भाषेचा प्रकार अगदीं निराळा आहे. त्या भाषेंत तिचे स्वताचे जुने शब्द—अर्थात् जुने होते ते जसाचे तसेच नव्हत, तर कालान्तरानें रूपान्तर पावलेले—पुष्कळ आहेत पण त्याशिवाय युरोपातील सर्व भाषामधून, आणि जगातील बहुतेक भाषामधून इंग्रजी भाषेंत शब्द आले आहेत, इंग्रजी भाषा अन्य भाषेंतून शब्द घेण्याच्या सबधानें विधिनिषेध मुळींच मानीत नाहीं, शब्दाची जरूर लागली आणि चागलासा शब्द असला, तर लगेच घेते, आणि आपल्यास शुळेसा करून टाकिते, असें त्या भाषेचा इतिहास लिहिणारे सागतात. मराठींत तसा प्रकार नाहीं. मराठी भाषेंत शब्दाचा भरणा आजला अगदीं थोडा आहे, आणि बहुतेक शब्द मूळचे संस्कृत म्हणजे आपले घरचेच आहेत. मराठींत शब्दाचा भरणा मूळचा थोडा आहे याचा अर्थ असा कीं, आजपर्यंत मराठीचा व्यवहार मर्यादित असल्यामुळें तिनें आपलेसे करून घेतलेले शब्द थोडे आहेत. मराठीला संस्कृताचें शब्दभाडार हवें तेवढें मोठें आहे त्यातून शब्द जसेच्या तसेच अथवा नवीन बनवून घेता येतील.

मराठींत संस्कृतातून जसेच्या तसेच घेतलेले जे शब्द, ते तत्सम. यात मराठीला जुळण्यासारखा क्वचित् थोडा फेरफारही झालेला असतो, जसें, रीती, रीत, पद्धती, पद्धत, इत्यादि. संस्कृत शब्दात फेरफार करून घेतलेले, ते तद्भव. हे फेरफार करण्याची पद्धत ठरलेली आहे. याविषयींचे ठोकळ नियमही पहिल्या भागाच्या परिशिष्टात दिले आहेत,

यासंबंधानें मागें चर्चा आलीच आहे, कीं प्रत्येक संस्कृत शब्द प्राकृतांत येणें झाला, कीं तो अमक्या ठरीव नियमाप्रमाणें बदलून घेतलाच पाहिजे. याप्रमाणें प्राकृत ग्रंथकारांनीं वहिवाट ठेविलेली असली तरी तसा प्रकार चालू भाषेंत नव्हता. सहजगत्या उच्चारसौकर्यादि कारणांनीं कांहीं शब्द फिरत. परंतु पुष्कळ शब्द जसेच्या तसेच अथवा किंचित् फेरफारानें आले आहेत; कित्येक शब्द देशी म्हणून गणले जातात. पण त्यांतलेही पुष्कळ मूळचे आर्य लोकांचेच असले पाहिजेत, हें मागें सांगण्यांत आलें आहेच.

संस्कृत भाषा ही मूळ धातू, उपसर्ग, प्रत्यय, समास-रचना, इत्यादि साधनांनीं शब्दघटनेच्या संबंधानें परिपूर्ण आणि मोठी सोयकर आहे. यामुळें मराठीला तिचा मोठा आधार असून, आपणास हवे असल्यास पाहिजे तसे शब्द तयार करून घेण्यास ती फार उपयोगी आहे. परंतु येथें स्पष्टपणें एवढें मात्र सांगितलें पाहिजे कीं, मराठींत नवीन शब्द हवा लागल्यास बनवितां येत नाहीं असें प्रतिपादन कित्येक करितात तें योग्य नाहीं. संस्कृत धातू, प्रत्यय, यांच्या साह्यानें पाहिजेत तसे नवे शब्द बनवितां येतील. ही शब्दरचना कशी होते हें विस्तारानें सांगण्याचें विशेष कारण नाहीं. केवळ मासल्यासाठीं दोन चार उदाहरणें येथें दाखल केलीं म्हणजे पुरे.

'हृ' धातू घेतला तर त्याच्या मागें उपसर्ग लागून निरनिराळ्या अर्थांचे शब्द कसे होतात, तें पाहाः—आहार, प्रहार, अपहार, संहार, अभ्यवहार (खाणें), दुर्हर, अध्याहार (बाहेरचें घेणें), विहार, प्रतिहार (द्वारप्रवेश), परिहार, उपहार, इत्यादि.

'लप्' धातू—अपलाप (लपविणें), आलाप, प्रलाप, सलाप (एकांतीं भाषण), विलाप, अनुलाप (वारंवार बोलणें), सुप्रलाप, विप्रलाप, इत्यादि.

'युज्' धातू—प्रयोग (या एकाच शब्दाचे निरनिराळे अर्थ आहेतच), संयोग, अनुयोग (प्रश्न), नियोग, निर्योग, उपयोग, दुरुपयोग, वियोग, सुयोग, उद्योग, अभियोग (हल्ला), प्रतियोग, इत्यादि.

'दिश्' धातु—प्रदेश, अपदेश (मिप), संदेश, निदेश, निर्देस, विदेश, आदेश, अतिदेश (पुष्कळ ठिकाणीं, मर्यादेपलीकडे लागू करणें), उद्देश (अभिप्राय, प्रदेश), उपदेश, इत्यादि.

हे शब्द धातूचें एकच रूप घेऊन केलेले आहेत. यांशिवाय एखाद्या धातूचीं निरनिराळ्या प्रकारचीं रूपें घेऊन त्यांवरून हवे तेवढे शब्द होतील, जसें—आहार, आहृत; उद्योग, उद्युक्त; उद्देश, उद्दिष्ट; इत्यादि.

आतां तद्धितादि प्रत्ययांच्या योगानें एकाच शब्दावरून निरनिराळ्या अर्थाचे शब्द कसे बनतात तें पाहा:—मूळ वाच्–वाचाल, वाचाट, (वडबड्या); वाग्मिन्–उत्तम बोलणारा; 'वच्' धातू घेतला तर 'वाच्' प्रयोजक धातू, आणि याचन म्हणजे पुस्तकास अथवा एखाद्या लेखास बोलवणें, असा चमत्कारिक अर्थाचा शब्द उत्पन्न झाला आहे. दंत, मूल नाम–दतिन्, दंतावल–हत्ती; दंतुर–दांत पुढें आलेला मनुष्य; दंतक–दांता (दांतासारखें कांहीं); हस्त, हस्ती (हत्ती); हस्त-वान् (मनुष्य); मराठींत हस्तक, हाताळ (चोर) मुख शब्दास 'र' प्रत्यय लागल्यानें मुखर, (वाचाळ); ख (शेत) यास 'र' लागून 'खर' गाढव; वगैरे.

समासघटनेच्या व्यवस्थेनें तर संस्कृतांत परोपरीचे उपयुक्त, गमती-दार, असे नानार्थक शब्द बनतात, या विषयीं फारसें सांगण्याचें कारण नाहीं. समासघटित शब्दानें थोडक्यांत पुष्कळ अर्थ आणतां येतो. 'सत्य-व्रत' हा एकच शब्द निरनिराळ्या समास रचनेनें तीन अर्थांचा होईल. 'देवानांप्रियः' हें एक निव्वळ संस्कृत उदाहरण आहे. मूळ अर्थ वाईट नाहीं, पण हा अलुक् समास केला तर त्याचा 'मूर्ख' असा अर्थ होतो. दासीपुत्र म्हटलें कीं, 'दासीचा पुत्र' असा साधाच अर्थ; पण 'दास्याःपुत्रः' म्हटलें कीं, ती विकल्पानें शिवी झाली. मराठींत मूळ संस्कृत सामासिक शब्द घेतां येतील, अथवा तशा प्रकारचे नवीन संस्कृत शब्दही बनवितां येतील. शिवाय शुद्ध मराठींतही समासरचना पुष्कळ आलेली आहे, आणि आपखीही हवी तर आणितां येईल.

तेव्हां यावरून मराठीला हवे तितके आणि पाहिजेत तसे शब्द बनविण्याची सोय आयतीच कशी आहे, हें लक्षांत येईल. एकाद्या

देशांत, राष्ट्रांत किंवा लोकांत ज्या गोष्टी जुन्या नसतात त्या नवीन घेतल्या म्हणजे भाषेंत तदर्थक शब्द उत्पन्न व्हावे लागतात. मग ते बहुधा जिकडून वस्तू घेतली, तिकडूनच घेण्यांत येतात. इंग्रजी भाषेंत असा प्रकार फार आहे. मराठीला संस्कृताच्या साह्यानें अशा पदार्थांचे दर्शक नवीन शब्द बनवितां येण्याचें साधन आहे. परंतु जेथें हा उपाय खुंटेल, अथवा नवीन बनविलेला शब्द चमत्कारिक, बोजड अथवा अन्य कारणानें अडचणीचा होऊं लागेल, तर मग परकी शब्द जसाचा तसाच घेण्याला हरकत नाहीं.

लोकांच्या चालीरीती, पोषाख, वगैरे यांमध्यें कालांतरानें आणि दुसऱ्या अनेक कारणांनीं फेरफार होत जातो, हें सांगावयास नकोच. तदनुरूप प्रत्येक पिढींत भाषेंतले जुने शब्द उपयोगांतून जातात, आणि नवीन शब्द उपयोगांत येतात. तसेंच देशांत राज्यक्रांती, युद्धें, स्वाऱ्या, आणि इतर प्रकारच्या ज्या उलाढाली होतात त्यांच्यामुळेंही नवीन शब्द येतात. वीस वर्षांच्या प्लेगच्या धामधुमीनें भाषेंत अनेक नवीन शब्द आले आहेत; त्याचप्रमाणें चार वर्षांच्या लढाईच्या काळांतही आले आहे. अमुक शब्द उपयोगांतून गेले कां, आणि अमुक नवीन आले कां हें कधींही स्पष्टपणें सांगतां येणार नाहीं. ज्ञानेश्वरीच्या शेवटचा कोश घेऊन पाहिलें असतां त्यामध्यें सांप्रत उपयोगांतून गेलेले अनेक शब्द सांपडतात. त्यांतले पुष्कळ अगदीं साधे, सोपे, उपयोगासाठीं चांगले वाटणारे, असे आढळून येतात. पण ते उपयोगांतून कां गेले ? असाच प्रकार तुकारामाच्या अभंगांतील अनेक शब्दांच्या संबंधानेंही दाखवितां येईल. हे जुने झालेले शब्द उपयोगांत आणूं असें एखादा ग्रंथकार म्हणूं लागला, तर त्याला तसें करितां येणार नाहीं. कारण ती गोष्ट लोकमान्य होणें अशक्य.

कित्येक शब्द एका प्रांतीं असतात, ते दुसऱ्या प्रांतीं नसतात. कित्येक शब्द नगरवासीयांच्या अथवा सुशिक्षितांच्या वापरण्यांत नसतात. लहान गांवांतून अथवा शेतकरी, धंदेवाले, कारागीर यांचे वापरण्यांत जे शब्द असतात, त्यांतले कित्येक खरोखरी चांगल्या तऱ्हेचे असतांही सुशिक्षितांच्या भाषेंत अथवा वाङ्मयांत येत नाहींत. रा. अत्रे

यांचे गांवगाडा हें पुस्तक पाहिलें असतां ही गोष्ट चांगली लक्षांत येईल. या पुस्तकांतील पुष्कळ शब्द उच्च प्रकारच्या भाषेंत कां असूं नयेत, हें सांगतां येणार नाहीं. अशा पुष्कळ शब्दांचा भाषेला चांगला उपयोग होईल असें आपणास सहजीं वाटण्यासारखें आहे. परंतु ते गांवढळ म्हणून गणले गेले आहेत.

भाषेंत जुने शब्द जाऊन नवे येणें हें चालू असतें. या गोष्टीचें मराठींत एक मुख्य कारण असें दिसतें कीं, तद्भव शब्द जुन्या मराठींत जरी सोपे म्हणून बनले, तरी ते अलीकडे पोक्तसे न वाटून भाषेंतून जात आहेत आणि त्यांच्या जागीं तत्सम शब्द किंवा जसेच्या तसेच संस्कृत शब्द येत आहेत. सध्यांच्या शिक्षणपद्धतींत संस्कृत भाषेचा साधारण अभ्यास सर्व करितात, यामुळे मूळ संस्कृत शब्द जसेच्या तसे घेण्याचा प्रघात वाढत आहे. ज्ञानेश्वरींत प्रसाद, गंभीर, नाथ, यांबद्दल अनुक्रमें पसाय, गहिरु, नाह, हे शब्द आहेत. पण आतां आपल्यास ते शब्द न आवडून मूळचे संस्कृत शब्दच जास्त पसंत वाटतात. 'आज्ञा', 'आदेश' यांबद्दल मार्गे आणा, आयस, हे शब्द होते; पण ते जाऊन मूळचे आज्ञा, आदेश हेच पुढें आले. 'हुकूम' हा परकी शब्द जास्त जोरदार वाटून तो 'आज्ञा' याबद्दल फार येतो. 'आज्ञा' यापासून झालेला 'आण' शब्द निराळ्याच अर्थाचा वाचक झाला आहे. 'भूमी या पासून झालेल्या 'भूय' शब्दापेक्षां आपण 'जमीन' हा परकी शब्द जास्त वापरतों.

फारशी, आरबी, या भाषांतले पुष्कळ शब्द मुसलमानी अमदानींत आले. पण ते जाऊन त्यांच्या जागीं सांप्रत संस्कृत शब्द येत आहेत. हे जात चाललेले परकी शब्द जसें काय आपल्यास अस्पृश्य वाटतात! 'लज्जा' यापासून झालेला 'लाज' शब्द आपणास जास्त जोरदार किंवा फजीती करणारा वाटतो. पण 'शरम', 'बेअब्रू' हे फारच फजीती करणारे, जसें काय विटाळाचे असे भासतात! संस्कृत शब्द सौम्य, प्रौढ आणि भारदस्त; त्यांच्यापासून झालेले मराठी शब्द कमी प्रौढ, पण जास्त जोरदार; आणि परकी भाषेंतले शब्द हलके वाटणारे, परंतु

क्वचित् अधिकच जोरदार, असा उपयोगाच्या संबंधानें समजुतीमध्ये उत्पन्न झालेला भिन्नभाव बऱ्याच शब्दांविषयीं आढळून येतो.

या भागांतील पुढील विवेचनामध्यें मराठींतल्या बऱ्याचशा शब्दांच्या संबंधानें विचार करावयाचा आहे असें नाहीं. शब्दांचीं रूपें आणि अर्थ यांत नानाप्रकारचे फेरफार होऊन शब्द कसे बनत जातात, आणि त्यांचा अर्थ व्यवहारांत कसा फिरतो, किंवा चमत्कारिक अर्थ कसे उत्पन्न होतात, याचा फक्त मासला दाखविण्याचा उद्देश आहे. अशा प्रकारचें पूर्ण विवेचन प्रस्तुत पुस्तकाच्या लहानशा प्रकरणांत शक्य नाहीं; आणि तसें विवेचन पुष्कळसें करूं म्हटलें तर संपावयाचेंही नाहीं. त्यासाठीं निराळाच ग्रंथ झाला पाहिजे. या विषयावर कांहीं किरकोळ ग्रंथ झाले आहेत. प्रस्तुत विवेचनावरून विद्यार्थ्यांना असला विचार करण्याची आवड उत्पन्न झाली म्हणजे आपलें कार्य झालें असें समजण्यास चिंता नाहीं.

शब्दांच्या स्वरूपांत कालांतरानें, आणि स्थलांतरानेंही, जसा बदल होतो, त्याप्रमाणें त्यांच्या अर्थांमध्येंही होतो. हा बदल आमच्या देशीभाषांमध्यें प्राचीन काळापासून झालेला फारच दृष्टीस पडेल. कारण मूळ संस्कृत भाषेचेच अत्यंत जुनी, मध्यम, पाणिनीच्या काळची, अर्वाचीन संस्कृत, इत्यादि प्रकार आहेत, आणि त्यांमध्यें शब्दांचे अर्थ फिरत गेले आहेत. वेद आणि त्यानंतरचे प्राचीन ग्रंथ हे नीट कळेनातसे होण्यास शब्दांचे अर्थ फिरत गेले आहेत, हें एक मोठेंच कारण आहे. भाषेंत प्रथमारंभीं उपसर्ग, धातु, प्रत्यय यांच्या जुळणीनें यौगिक अर्थांचे शब्द बनतात; मग त्यांचा योगरूढ अर्थ होत जातो. यामुळें अर्थ करितांना अमुक एक वेळीं विवक्षित शब्दाचा कोणता विवक्षित अर्थ होता, हें शोधावें लागतें. या गोष्टीचे प्रयत्न अगदीं प्राचीन काळींही झाले आहेत. निरुक्तकार यास्क याच्या वेळींही शब्दांच्या अर्थाविषयीं मतभेद होता. इंद्र, वरुण, वृत्र, वगैरे नांवांचा, त्या नांवांचे पुरुष प्रत्यक्ष होते असा अर्थ करीत, आणि तीं नांवें गुणांवरून पडलीं आहेत, असा लाक्षणिक रूपकार्थही करीत. यास्क म्हणतो कीं, वेदांतील सर्व शब्द यौगिक म्हणजे व्युत्पत्तिसिद्ध अर्थानें योजिलेले

असतात. हे त्याचें म्हणणें युक्तीला धरून आहे. कारण वेदांच्या वेळीं भाषा तितकी जुनी नसल्यामुळें त्यावेळीं ज्या अर्थानें मुळारंभीं शब्द बनले त्याच अर्थानें त्याचा अर्थ होत असला पाहिजे. पाश्चात्य पंडित म्याक्समुल्लर म्हणतो कीं, वेदांत विशेषनामेंही सार्थ आहेत. खरें पाहिलें तर प्रत्येक नाम प्रथमतः विशेषनाम म्हणून उत्पन्न होतें, आणि मग त्याला सामान्यनामाचें स्वरूप येतें. अशा रीतीनें शब्दांचे अर्थ बदलले याचा फायदा निरनिराळे धर्मपंथ बनविणाऱ्या आचार्यांनीं घेतला आहे. वेद, उपनिषदें, गीता, ब्रह्मसूत्रें, यावर आपापल्या दर्शनाचीं भाष्यें लिहितांना आपणास हवा तसा अर्थ उत्पन्न करण्यास आचार्यांना शब्दांच्या फिरलेल्या अर्थांचा मोठा उपयोग झाला आहे. अगदीं अली कडले आचार्य स्वामी दयानंद यांनीं आर्यसमाजाच्या स्थापनेनंतर वेदावर नवीन भाष्य लिहिलें, तेव्हा वेदांमध्यें व्युत्पत्तिसिद्ध अर्थानीं शब्द योजिले असतात या तत्वाचा उपयोग करून त्यांनीं, आपल्या मताना जुळेसा अर्थ केला.

शब्दाचीं अंगें दोन, रूप किंवा वर्ण व अर्थ. पैकीं रूपात कसकसे फरक होऊन संस्कृतापासून मराठी शब्द बनतात हें इतरत्र सांगितलेंच आहे. प्रस्तुत प्रकरणात विशेषत: अर्थान्तराचा विचार कर्तव्य आहे. त्याचप्रमाणें क्वचित्प्रसंगीं अर्थसंकोच वगैरे कसे होतात याचेंही वर्णन करण्यात येईल. येथें दिलेल्या शब्दांच्या उदाहरणात कधीं कधीं आणखीही काहीं विशेष आढळतीलच. शब्दाच्या अर्थासंबंधीं विचार चालू असता मधून मधून त्यास अनुलक्षून होणारे शब्दाचे रूपातील विकारही येथें सांगण्याचें कारण पडेल.

शब्दाच्या अर्थांत ज्या अनेक कारणानीं फरक पडतो त्यात लक्षणा हें मुख्य कारण आहे. मुख्यार्थास बाध आल्यामुळें त्याशीं संबद्ध अशा दुसऱ्या अर्थाचा बोध ज्या प्रक्रियेनें ( वृत्तीनें ) होतो, तीस 'लक्षणा' म्हणतात. पुढील विवेचनात मुख्यार्थ नाहींसा होऊन केवळ लक्ष्यार्थच मुख्य होऊन बसला आहे, अशा शब्दांचींही पुष्कळ उदाहरणें सांपडतील.

भाषेमध्यें प्रथम पदार्थांचीं नांवें त्यांचे अंगचा काहीं विशेष गुण, स्वरूप अथवा स्थिती यावरून उत्पन्न होतात. केव्हा पदार्थांना

आकृतींवरून किंवा त्यांच्या चित्रांवरूनही नांवें योजिलीं जातात. प्राचीन मिसर देशांतली चित्रलिपी सर्वांस माहीत असेलच. मुळारंभीं अशा कांहीं कारणांवरून वस्तुवाचक शब्द बनून, ते पुढें भाषेंत योगरूढ बनतात. आर्य लोकांत मुलींकडे दूध काढण्याचें काम असे, म्हणून तिला दु हि तृ नांव पडलें. पिता=पालनकर्ता; डोळा=डोलणारा, हालणारा; हत्तीची सोंड=विलक्षण हात; त्यावरून पुढें ह त्ती शब्द आला. अशा रीतीनें भाषेंत शब्द उत्पन्न होतात. असल्या अर्थांची आठवण पुढें नष्ट होऊन शब्दाचा मूळचा अर्थ जातो आणि कालान्तरानें त्याचे नवीन अर्थ उत्पन्न होतात. असाच प्रकार देशान्तरानेंही होतो. विशेष नामें हीं मूळचीं बहुधा पदार्थांच्या अंगच्या गुणावरून पडलेलीं असतात. पण पुढें तींच सामान्यनामें बनतात. ऐतिहासीक, पौराणीक अशा जुन्या पुरुषांच्या नांवांच्या संबंधानें हा प्रकार दिसून येईल. यामुळें पुष्कळ काळ लोटल्यावर त्या नांवाच्या पुरुषाच्या संबंधानें अद्भूत आणि कल्पीत आख्यायिकाही उत्पन्न झालेल्या आहेत. रा व ण याचा मूळचा अर्थ ज्याचा आवाज फार मोठा आहे असा मनुष्य. लंकेचा राजा रावण हा प्रचंड पुरुष असून त्याचा आवाज फारच मोठा असेल. इतका मोठा कीं दहा पुरुष एकदम ओरडले असतां त्याच्या आवाजाची बरोबरी होईल, असा अजमास ठरला. पुढें रावण हा एक दहा तोंडांचा राक्षस होता अशी समजूत रूढ होऊन गेली.

पृथ्वी=लांब रुंद प्रदेश; भानू=तेजस्वी; उदन्वत्=उदकमय; पिता=पालक; दुहितृ=दूध काढणारी; असे मूळचे गुणवाचक अर्थ. हे शब्द त्या पदार्थांना अगदीं बरोबर अर्थानें योजिले आहेत असें नाहीं. त्यांमध्यें अतिव्याप्तीचा दोष आहे. मात्र त्या त्या नांवाच्या प्रत्येक पदार्थामध्यें तो तो गुण विशेष आहे. अशा प्रकारें साधारण गुणावरून प्रथमतः विशेष अर्थाचे शब्द झाले. अर्थात् त्यांच्या मूळच्या अर्थामध्यें कालान्तरानें आणि स्थलान्तरानें कमजास्तपणा होण्यास जागा राहिली. मूळची आर्यभाषा ही अनुक्रमें वेदभाषा, संस्कृत, आणि शेवटीं प्राकृत व मराठी अशा परंपरेनें चालूच असल्यामुळें शब्दांच्या अर्थामध्यें होणारे फरक चालूच राहिले आहेत. भानू, चंद्र, सूर्य, उदक, कमल, वायू, तेज,

साप, इंद्र, ईश्वर, परम, देव, वगैरे शब्द विशेषतः जोड शब्दात किंवा समासात निरनिराळ्या अर्थानें कसे उपयुक्त असतात हें आपणास ठाऊक आहेच. सिंह, इंद्र, पुंगव, याचा अर्थ मुख्य, श्रेष्ठ पुरुष असा घेतलेला असतो. महिष याचा वेदकालीन अर्थ सिंह असा आहे. आर्य लोकाना हिकडे तसाच मोठा प्राणी रेडा आढळला, म्हणून त्यानीं त्याला हा शब्द लाविला. हिरण्य हा शब्द लोखंडाचाही वाचक आहे. 'मृग' याचा मूळ अर्थ कोणताही वनपशू असा आहे. इंग्रजी शब्द deer याचाही हाच प्रकार आहे. कणीक म्हणजे प्रथमत कण केलेलें, बारीक केलेलें, कोणतेंही धान्य, पण सध्याचा अर्थ गव्हाचें पीठ. असाच flour या इंग्रजी शब्दाचा अर्थ आहे. रेडाऊ लोक दाणे म्हणजे प्रांताप्रांतातील मुख्य खाण्याचें धान्य असें समजतात. रेडवळी भाषेंत माची म्हणजे मेथीची भाजी. अशा रीतीनें अर्थ फिरत जातात

पुष्कळदा अर्थसंकोच होतो, म्हणजे मूळ अर्थ पुष्कळ ठिकाणीं लागू पडण्याजोगा असून चालू अर्थ मर्यादित ठिकाणीं लागू पडतो. 'धर्म' याचा मूळ अर्थ स्वभाव या अर्थानें त्याचा आपण उपयोग करितोंच. पण त्याचा विशेष अर्थ झाला आहे. धर्म म्हणजे कर्तव्य असा अर्थ होतो. त्याचप्रमाणें ईश्वरासबधीं कर्तव्य असाही या शब्दाचा अर्थ होतो इंग्रजी भाषेंतील 'religion' या शब्दाऐवजीं मराठींत 'धर्म' हा शब्द योजितात. पण त्याचा religion आणि आपला 'धर्म' यात फरक आहे. तथापि उत्तरोत्तर दोहोंचा एक अर्थ होत चालला आहे. 'ताप' म्हणजे उष्णता. पण त्यापासून झालेला मराठी 'ताव' शब्द याचा अर्थसंकोच झाला आहे 'सोनार धातूला ताव देतो', 'धन्यानें चाकरास चांगलाच ताव दिला', 'त्यानें लाडवावर ताव मारिला', यात अगदींच निराळे अर्थ झाले आहेत. वेदना म्हणजे भावना, दुःखाची भावना, त्याचें मराठी रूप वेण म्हणजे प्रसूतिवेदना, गर्भिणी म्हणजे स्त्रीजातीचा सगर्भ प्राणी. पण गर्भार शब्द माणसास लावितात, आणि गाभण हा इतर प्राण्यास लावितात.

'ग्रहण' म्हणजे घेणें. सूर्यग्रहण, चंद्रग्रहण, यांत ग्रहण याचा अर्थ संकुचित झाला. 'संस्कार' या शब्दाचे भिन्न अर्थ विचारणीय आहेत. 'मनावर संस्कार', 'पूर्व संस्कार' इत्यादि. 'प्रत्यक्ष' म्हणजे डोळ्यासमोर. त्याचा 'मूर्तिमन्त' असाही अर्थ होतो. 'व्यापार' म्हणजे हालचाल, चलनवलन. पण व्यवहारांत 'देवघेव' असा विशेष अर्थ आला आहे. शाळा, शाला, म्हणजे स्थल. पण सध्यांचा अर्थ मुलांना शिकविण्याची जागा,—पाठशाळा. शिवाय 'अश्वशाला', 'गजशाला', 'उष्ट्रशाला' यांत निराळे अर्थ आहेतच. 'त्या गुरूची शाळा कांहीं निराळीच आहे', येथें शाळा म्हणजे शिक्षा यांत मुलांना रीतमात लावण्याची तऱ्हा, असा निराळाच अर्थ आहे. नाटकशाळा यांत तर 'शाळा' याचा अर्थ अगदींच निराळा आहे. 'हृदय' म्हणजे शरीरांतला विशेष अवयव. त्यापासून झालेला शब्द हिय्या. याचा अर्थ हृदय जोरदार असल्यानें अंगीं येणारा गुण, धैर्य. पिंड म्हणजे अन्नाचा गोळा. पण आपण शरीराचा पिंड असें म्हणतों. संभार म्हणजे कोणत्याही कामाची तयारी. मराठींत तयारीचे पदार्थ. साहित्य याचाही तसाच अर्थ झाला आहे.

याचप्रमाणें अर्थभ्रष्टता होते. व्यसन याचा मूळचा अर्थ वाईट नाहीं. पण सध्यां दारूचें, अफूचें व्यसन, असा अर्थ झाला आहे. प्रपंच म्हणजे पसारा. त्यापासून संसाराच्या पसाऱ्याला 'प्रपंच' असें म्हणतात. संसार चांगला करणें म्हणजे हात राखून खर्च करणें, हाही प्रपंचच. त्यापासून पुढें त्यांच्या घरीं प्रपंच, पंक्तिप्रपंच फार, म्हणजे हिमटेपणा फार, असा अर्थ झाला. वर्चस् म्हणजे तेज, अधिकार, जोर. वर्चस्व चालविणें म्हणजे वाईट रीतीनें अधिकार चालविणें. उपाधि म्हणजे गुण असा मूळ अर्थ असून, सध्या मराठींत त्याचा अर्थ लचांड, पंचाईत असा झाला आहे. संकेत म्हणजे बेत; याचा वाईट प्रकारचा बेत या अर्थी उपयोग होतो. अधिकार याचा मूळ अर्थ योग्यता. पण आतां 'सत्ता' असा अर्थ झाला आहे. ग्रंथ याचा मूळ अर्थ ज्यांत कांहीं ग्रथित केलें आहे असा. पुढें ज्यांत एकाद्या विषयावरील विचार एकत्र केले आहेत असा प्रबंध, असा अर्थ झाला.

पण 'त्यानें त्या लहानशा गोष्टीचा मो ठा ग्रं थ केला', यात अर्थ निराळाच !

शब्दामध्यें विशेषापासून सामान्य अर्थ होतो, तसाच सामान्यापासून विशेष अर्थ होतो. इंद्र, सिंह, याचा असा उपयोग मागें दर्शविला आहे. गवेष् याचा मूळचा अर्थ गाई शोधणें. गवसणें म्हणजे केवळ सापडणें. राजा यापासून झालेले 'राय', 'राव' हे शब्द केवळ मानदर्शक आहेत. वृद्ध यापासून मोठा या अर्थी (बुड्ढा) 'बडा' हा शब्द बनला. क्षण याचें पालींत 'खण' असें कालार्थी झालें आणि 'छण' असें सणाचा दिवस या अर्थी झालें. मराठींत पहिल्या अर्थी 'खिन' असा जुना आणि प्रांतिक शब्द आहे, आणि दुसऱ्या अर्थी 'सण' हा शब्द सार्वत्रिक उपयोगात आहे. उज्ज्वल यापासून उजळ (वि०), उजेड (ना०), हे शब्द होऊन अगदींच भिन्न अर्थाचा 'उजाड' हा शब्द झाला आहे. कुब्ज यापासून 'खुजा' आणि 'कुबडा' असे अगदीं निरनिराळे शब्द झाले आहेत.

संस्कृतात त्रास या शब्दाचा अर्थ भीती असून मराठींत त्याचा अर्थ पीडा असा करितात. तेव्हा त्रास हा शब्द या दोन भाषांत भिन्न आहे, एकच नाहीं. हें अर्थभेदाचें उदाहरण होय.

'दंत' हा शब्द मूळ रूपानें 'हरितदंत' या समासात आहे. तोंडातील 'दात' हा तद्भव आहे. केळफुलाचा किंवा फणीचा 'दाता' [सं० दन्तक] हाही तद्भवच होय. 'दंत' व 'दात' याचे उपयोगात परिस्थितिभेद आहे. 'दात' व 'दाता' यामध्ये दुसरा पहिल्याची नक्कल असें अर्थान्तर आहे.

संस्कृतात शब्दापुढें 'क' हा प्रत्यय लागून त्यासारखें, त्याची नक्कल किंवा तशाच तऱ्हेचें लहान, अशा अर्थांचे शब्द होतात. त्या 'क'चा 'अ' आणि नंतर 'आ' होऊन मराठींत अकारान्त आणि आकारान्त असे दुहेरी शब्द झाले आहेत. आकारान्ताचा अर्थ बहुधा अकारान्त शब्दासारखा किंवा त्याची नक्कल असा असतो मेळ, मेळा, कोंपर, कोंपरा, दोर, दोरा, पाट, पाटा, फास, फासा, चूर, चुरा,

पाय, पाया; नाक, नाकें; कान, कान्हा; माच, माचा अशीं अनेक उदाहरणें सांपडतील. यांत फक्त रूपभेद आहे.

'यात्रा' व 'जत्रा' यांत जनकजन्य संबंध आहे. पहिल्या शब्दांत धार्मिक अर्थ आहे, दुसऱ्यानें व्यवहाराङ्ग उचललें आहे. हे आवळे-जावळे शब्द आहेत. कधीं भिन्न शब्दांपासून एकाच तद्भवाची उत्पत्ति होते. शठ (=लुचा) व क्षत (=जखम) या शब्दांपासून खट हा शब्द निष्पन्न झाला आहे. क्वाथ (=काढा) व कृत्ति (=चामडें) या दोन शब्दांपासून कात हा शब्द साधला आहे. प्रस्तुत उदाहरणांत 'क्ष' व 'श' यांचा 'ख' बनणें, व 'ठ' व 'त' यांचे जागीं 'ट' येणें हें सर्वस्वीं नियमास अनुसरून आहे. क्षार (=खार), देश (=देस), उद्धत (=उद्धट), स्तंभ (=खांब), या शब्दांच्या तद्भवांवरून वरील नियम कळून येतील. 'खट'सारख्या शब्दांस द्विमूल म्हणावें.

एकाच वस्तूला परिस्थितिभेदानें भिन्न नांवें देण्याकरितां, कधीं कधीं मूळ भाषेंतील शब्दांचे दुसऱ्या भाषेंत येतांना अर्थान्तर होतें. संस्कृतांत 'अंगार' म्हणजे अग्नी. मराठींत त्याचा निखारा असाही अर्थ होतो. विस्तव पूर्णपणें जळून गेला म्हणजे त्याचे रूपान्तरास आपण राख म्हणतों. भस्म म्हणून अंगास लावितात ती तरी राखच होय. तेव्हां 'राख' या शब्दास निरनिराळ्या तऱ्हेनें उपयोग केल्यामुळें निरनिराळे अर्थ आले आहेत. मंत्रशास्त्राबरोबर राख मंत्रून तिचा मनुष्याचे शरीराचें रक्षण करण्याकडे उपयोग करण्याची चाल प्रवृत्त झाली. रामरक्षा हें स्तोत्राचें नांवही हाच उपयोग सुचवितें. रक्षण करणारी म्हणून 'राख'. देवळांत ठेवलेल्या धूपपात्रांत निखारे घालून त्यांवर धूप जाळितात. व त्यांतील राख पवित्र, पीडानिवारक म्हणून लोक ग्रहण करितात. ही राख 'अंगार' म्हणजे निखारा याची बनलेली असल्यामुळें तीस अंगारा म्हणतात. स्नानानंतर आंगाला लावितात त्यास भस्म म्हणतात. विभूति हा शब्द याच 'राख' या द्रव्याचा वाचक आहे, व तो खऱ्याखुऱ्या राखेच्या अर्थी, म्हणजे मंत्रित भस्माचा बोधक म्हणून वापरतात.

पुढें मनित राख या अर्थी 'रक्षा' असा उच्च संस्कृत शब्द उपयोगात आला. सारांश, एका संस्कृत मार्गेतून, अर्थांतर पावून किंवा मूळ अर्थानेंच मराठींत आलेले भस्म, विभूति, राख, व अंगारा हे शब्द एकाच द्रव्याचे भिन्न भिन्न उपयोगाचे वाचक बनले आहेत.

काहीं शब्दांचे अवयव अज्ञानामुळें नीट न कळल्यानें, त्याचे जागीं सदृश उच्चाराचे अवयव मानण्यात येतात या दुसऱ्या अवयवाचा अर्थ जरी मूळ अवयवाहून भिन्न असतो, तरी तो सामान्यतः अज्ञानानें कल्पिलेल्या संपूर्ण शब्दाचे अर्थाचे धोरणाशीं बराच मिळता असतो.

विवाहात 'लाजहोम' म्हणून एक विधी आहे, त्यात 'लाज' म्हणजे लाह्या याचा होम करण्यात येतो वधूवरानीं परस्परास माळा घातल्यापासून उत्तरोत्तर अन्योन्यविषयक लज्जा किंवा संकोच कमी होत जावा, हें साहजिक आहे या गोष्टीस अनुलक्षून वरील विधीस सामान्यजनासही कळणारें असें 'लज्जाहोम' हें रूपान्तर योजण्यात आलें.

प्रचारात 'अळव्याचा कांदा', 'कर्दळीचा कांदा' वगैरे शब्दप्रयोग आढळतात. यात 'कांदा' हा शब्द विशिष्ट आकाराच्या मुळास लावण्यात येतो. या शब्दाचा एक संकुचित अर्थ 'पलाण्डु' असा आहे. इतर ठिकाणीं 'कांदा' हा शब्द सामान्य अर्थाचा वाचक असून येथेंच तो विशिष्ट अर्थी आढळतो, तेव्हा ह्या दोन उपयोगाचे मुळाशीं भिन्न शब्द असावे असें कल्पून, त्याविषयीं विचार सुरू झाला. अशा विचार करणारांपैकीं एका तर्कपटूस सुचलें कीं, 'कंदर्प' हा संस्कृत शब्द कथापुराणात ऐकूं येतो. हा कांदा या शब्दाचें मूळ असणें अशक्य नाहीं. शिवाय या पदार्थाला दर्प ही दांडगा आहे. करिता 'कंदर्प' व 'कांदा' यामध्यें जनकजन्यसंबंध असावा. झालें, शिष्टमन्य लोकात 'कांदा' या पदार्थास शिष्टपणें 'कंदर्प' म्हणण्याचा प्रघातच पडून गेला. 'अकलेचा कांदा' यातही मूळ अर्थाचें स्वरूप बरेंच पालटलें आहे

वर परिचितपक्षपात सांगितला तसाच सौकर्यपक्षपातही शब्दान्तराचे मुळाशीं आढळतो. देवपूजेचें एक उपकरण 'नीराजन'

म्हणून असतें. वेदान्तांत निरंजन, निरामय, निर्गुण, वगैरे शब्द ब्रह्माचे वर्णनांत ऐकूं येतात; नीराजन व निरंजन हे शब्द उच्चारास सारखे आहेत. यांतून दुसरा शब्द उच्चारास सोपा असल्यामुळें, वरील उपकरणाचा वाचक होऊन बसला आहे. येथें अर्थ पाहातां केवळ भिन्न नव्हे, तर विरोधी आहे. 'निरंजन' या उपकरणांत 'अंजनाचा अभाव' असल्यास त्याचा देवपूजेकडे उपयोग होणेंच शक्य नाहीं! या शब्दाचा कोंकणी लोक 'निरांजन' असा उच्चार करितात. मूळचा शब्द नीराजन यांतील 'रा'वर उच्चाराचे सोपेपणासाठीं कोंकणांतला फार परिचित जो अनुस्वार तो देण्याची चाल पडली. पुढें देशावर त्याचा कान्हा काढून टाकण्यांत आला.

वरील पक्षपाताप्रमाणेंच श्रुतिपक्षपातानेंही कार्य होतें. 'र' वर्ण, संयोग (=जोडाक्षर) वगैरे कांहीं गोष्टींचा तामसी वृत्तीशीं संबंध जोडण्यांत आला आहे. एखाद्या निर्दय व्यक्तीविषयीं आपला तिटकारा व्यक्त करण्यास 'दुष्ट' हा संस्कृत शब्द कमजोर वाटून त्याचें घरगुती भाषेंतील रूपांतर रगर्भ 'द्रुष्ट' असें करण्यांत आलें आहे. 'उन्मत्त' याचा उच्चार बराच जोरदार आहे. पण तो पुरा न वाटून 'उर्मट' असें मराठींत रूप केलें आहे. 'शाप' याचें 'श्राप' केलें आहे, आणि मग सादृश्यानें 'उःशाप' याचें 'उश्राप' हें ओळीलाच आलें! आततायी हा शब्द संस्कृतानुसार, आग करण्यास प्रवृत्त झालेल्या एखाद्या व्यक्तीला लावितात, पण तो तद्व्यक्तिनिष्ठ तामसी वृत्तीस साजण्याकरितां म्हणून आतत्यायी असा संयोगगर्भ बनविला आहे. कोणी तर अतत्यागी असेंही म्हणतात!

एकादे विधीला, कल्पनेला किंवा सामान्यतः वस्तूला प्रथम संज्ञा मिळते ती बहुधा त्यावर असणाऱ्या धर्माची बोधक असते. कांहीं काळ गेल्यावर ती वस्तू परिचित होऊन तिच्या बोधास अवयवार्थाची जरूर राहात नाहीं. अर्थबोध या पायरीला पोंचला म्हणजे संज्ञेंतला अवयवार्थ हळूहळू कळत होईनासा होतो, व अखेर ती संज्ञा बहुतेक निरर्थक बनते. एकदां अशी अर्थाची फारकत झाली म्हणजे त्या संज्ञेचे रूपांतरास मार्ग खुला होतो. उपनयन हा विधि एकदां मौंजीबंधन या

नांवानें होता. हा विधी व संज्ञा यांतील साहचर्य दृढ स्थापित झाल्यावर, त्याचें प्रथम रूपांतर 'मौंजी' व नंतर 'मुंज' हे झालें. कर्तृत्वशून्य अशा व्यक्तीस अ जा ग ल स्त न हा शब्द लावण्यांत आला. या शब्दानें काय दर्शवावयाचें आहे तें एकदां पक्कें रूढ झाल्यावर, हा शब्द उच्चारतांच अवयवार्थ ध्यानांत आल्याशिवाय तो अर्थ बोधित होऊं लागला. तेव्हां या शब्दाच्या अन्त्यावयवाचा लोप होऊन हल्लीं त्या शब्दाचें रूप अ जा ग ळ असें प्रचारांत आहे. यापासून आणखी अक्षरांचा फेरफार होऊन 'गयाळ' आणि 'गचाळ' असे शब्द झालेले दिसतात. अशा रीतीनें वारंवार होणारा अवयवार्थानुसंधानाचा प्रयास वांचून, शब्दालाही लाघव प्राप्त होतें. अशा शब्दांतराचे मुळाशीं ला घ व स्पृ हा आहे हेंही उघड आहे.

कधीं कधीं शब्दाला अ का र ण गौ र व ही प्राप्त होतें. 'सदा' याचा जो अर्थ तोच मराठींत अनेकवार स दो दि त या शब्दानें व्यक्त करितात. येथें 'उदित' हा अवयव निरर्थक आहे, हें उघड आहे. 'इकडील 'सर्व'-(मंडळी) खुशाल आहे' असें म्हणण्याच्या ऐवजीं 'सर्वत्र' म्हणण्याची चाल सर्वांस विदित आहेच. अशा अवयवाधिक्याचे मुळाशीं अज्ञान व शिष्टंमन्यता हीं दिसून येतात. 'तत्त्व' यानें जी कल्पना व्यक्त करावयाची तिचे बोधाकरितां 'तत्त्व' शब्दाबरोबर 'असि' हा अवयव वृथा आणून त त्त्व म सि असा प्रयोग करितात. येथें 'असि' याला कांहींच अर्थ नाहीं. यांत बोलणाराच्या मिथ्या वेदान्तज्ञानाचा डौल हवा तर दिसतो.

याहूनही विशेष चमत्कृतिजनक उदाहरण म्हणजे बेणवाजा (band+वाजा) हें होय. यांत पहिला अवयव इंग्रजी भाषेंतला असून दुसरा त्याचा मराठी पर्याय आहे. सारांश इंग्रजी व मराठी (=सं० वाद्य) अशा परस्पर पर्यायशब्दांचा हा बे ण वा जा बनलेला आहे. अशा उपपत्तीचे मुळाशीं कदाचित् वाजा कोणत्या प्रकारचा हें band या पदानें दाखविण्याचाही हेतू असू शकेल. वाजा=सामान्य वाजा, व बेणवाजा= इंग्रजीवाजा. कसेंही असो. उत्तरावयवानें पूर्वावयवाची द्विरुक्ती येथें झाली आहे, व त्यामुळें शब्दाला अ का र ण गौ र व म्हणजे बो ज ड प णा आला आहे.

रूपानें सदृश असलेल्या शब्दांत श्रुतिसंदेह कधीं कधीं होतो. अनेक वेळां उत्सवाचे निमंत्रणपत्रिकेंत 'गणपतीचा उत्साह' असा शब्दप्रयोग आढळतो. भाषेंत 'उत्साह' व 'उत्सव' हे दोन्ही शब्द राजमान्य आहेत. एवढेंच नव्हे, तर यांचा अर्थद्वाराही संबंध आहे. मनुष्याचे मनांत 'उत्साह' असल्याशिवाय देवाचा 'उत्सव' होत नाहीं; व देवाचा 'उत्सव' केल्यानें मनुष्याचे 'उत्साहा'ची वृद्धी होते. हा निकट अर्थसंबंध व रूपसादृश्य हीं वरील घोटाळ्यास कारण झालीं आहेत.

वरील जोडींत अर्थाचा परस्परसंबंध असल्यानें भाषेची विशेषशी हानी होत नाहीं. परंतु कधीं कधीं हा साम्यभ्रम हास्यास्पद होतो. 'यत्न' लहान, तर 'प्रयत्न' मोठा; 'प्रताप'ही तापापेक्षां मोठा; 'चल' हलणारें तर 'प्रचल' जास्त हलणारें, 'प्ररूढ' 'रूढा'पेक्षां जास्त खोल गेलेलें. अशा साम्यानें मोहित होऊन पुष्कळ लोक " ही संस्था आम्ही (केवळ स्थापित नव्हे, तर) प्रस्थापित करितों" असा प्रयोग करितात. येथें बिचारे 'दृढ स्थापना' करूं पाहणारे, शब्दांच्या यथार्थ अर्थज्ञानाचे अभावीं 'आम्ही मोडून टाकितों' अशा अर्थाचा शब्द वापरतात! कारण प्रस्थापित याचा अर्थ घालवून दिलेलें, उपळून लाविलेलें असा आहे. हा साम्यभ्रम कांहीं अंशीं 'विष' व 'अतिविष' यांतील साम्यासारखाच आहे.

वरील 'स्थापित' व 'प्रस्थापित' या जोडींत लोकांची अर्थभ्रान्ती झाली आहे, तशी कधीं कधीं रूपभ्रान्तीही होते. संस्कृतांत 'संमुख' शब्द आहे, तसा 'उन्मुख'ही आहे, व 'विमुख'ही आहे. पहिल्या शब्दांतील 'सम्' हा उपसर्ग व 'सत्' हें कारकान्वित, यांमध्यें कधीं कधीं अर्थाचें साम्य असतें. संवर्धन, संसिद्धि, संभोग, संपूजन वगैरे शब्दांमध्यें 'सम्' चा अर्थ 'चांगलें' असा होणें शक्य आहे. सम्+नति, व सत्+नति या दोहोंचें रूप संधिनियमांनीं एकच म्हणजे 'सन्नति' असें होणें शक्य आहे. खुद्द संस्कृतांतही 'सन्मातुर' याचें रूप विकल्पानें 'संमातुर' असें आढळतें. सारांश, 'सम्'चे जागीं 'सत्' चुकून वापरतात. असाच प्रकार 'संमान' याचे जागीं येणाऱ्या 'सन्मान' या रूपांतही आहे. याचे धर्तीवर 'संमुख'चे जागीं प्रथम 'सन्मुख' हें रूप

आले, 'उन्मुख' असें आहेच, व तें शुद्ध आहे. परंतु या दोन शब्दांत 'मुख'चे पूर्वी नकार आलेला पाहून तो 'विमुख' या शब्दातही घुसविण्यात येऊन विन्मुख शब्द बनविलेला आहे. हें रूपसादृश्य भ्रमाचें उदाहरण होय. असेंच इंग्रजी भाषेंत could या शब्दाचें उदाहरण आहे. shall याचें should होतें, त्याच धर्तीवर can याचें could होतें.

'उन्मुख', 'सन्मुख' व 'विन्मुख' या त्रिकूटांत रूपाचें मिथ्यासादृश्य मानिलें आहे. कधीं कधीं दोन शब्दप्रयोगांचें अज्ञात अनुकरण करण्यानें एखादा अशुद्ध शब्दप्रयोग व्यवहारांत येतो. संस्कृतांत 'शरण गत' व 'शरणागत' असे दोन प्रयोग तुल्यार्थ आहेत. या दोहोंच्या मिश्रणापासून 'शरणाङ्गत' असा अपूर्व शब्दप्रयोग मराठींत रूढ झाला आहे. या शब्दप्रयोगास उभयविभ्रम म्हणतां येईल.

संस्कृतांत 'शुध्' धातूचा अर्थ शुद्ध म्हणजे स्वच्छ करणें असा आहे. एखाद्या पदार्थांत मिसळलेला अनिष्ट पदार्थ काढून टाकून तो पदार्थ उपयोगक्षम बनविणें म्हणजे त्याचें 'शोधन' करणें होय. सोन्यांत मिळालेली भेसळ काढून टाकणें म्हणजे त्याची शुद्धी करणें. आपल्या भातांत खडे सांपडत असतील तर तांदुळाची शुद्धी करणें जरूर आहे त्यांतील खडे, पाखडं, तूस, वगैरे काढून टाकण्याकरितां त्यांना प्रथम हुडकावें लागतें, कारण ते सर्व एकाच ठिकाणीं नसतात, किंवा ते सर्वच सहज दृष्टीस पडतात असेंही नसतें. तेव्हां शुद्धी करण्याकरितां 'तपास' करणें पुष्कळ वेळां आवश्यक असतें. हें शुद्धीचें साधन होतें. अशा परिस्थितीमुळें 'शोध' हा शब्द साध्या अर्थी न योजतां आपण तो साधनाचे अर्थी योजितों. अशा रीतीनें सांप्रतचें 'शोधणें' हें क्रियापद भाषेंत उत्पन्न झालें आहे हें साध्यसाधनविपर्यासाचें उदाहरण आहे.

संस्कृतांत 'छल' हा शब्द कपटाचा वाचक आहे. व्यवहारांत कपटाचा उपयोग अनेक वेळां दुसऱ्याचें नुकसान करण्याकडे, त्यास पीडा देण्याकडे, व त्याची हानी करण्याकडे करितात अशा स्थितीवरून, 'छळ' हा शब्द त्याचें कार्य 'पीडा' या अर्थी वापरतात. हें कार्यकारण-विपर्यासाचें उदाहरण आहे.

अनेक धर्मविधींमध्यें ब्राह्मणसमुदायाला दक्षिणा वांटावयाची असते. त्या वेळीं यजमान "नानानां गोत्रेभ्यो ब्राह्मणेभ्यो भूयसीं दक्षिणां दातुमहमुत्सृज्ये" असा संकल्प करितो. अज्ञानानें यांतील भूयसी या शब्दाचा अर्थ दक्षिणा असा करितात. 'भूयसी वांटा' वगैरे प्रयोग वैदिक लोकांचे तोंडून ऐकूं येतात. असे आणखीही वैदिक लोकांचे तोंडीं असलेले शब्द दाखवितां येतील.

ग्राम्यतापरिहार हेंही अर्थांतराचें कारण आढळतें. रोज उठल्यावर शरीरशुद्धीचा पहिला विधी अमंगल असल्यानें, त्याचें नांव किळसवाणें वाटतें. म्हणून त्याचा उल्लेख कर्तव्य असतां, तो तद्वाचक शब्दानें न करितां पर्यायानें करण्याचा प्रयत्न आपण करितों. अशा पर्याय बोधित करणारा शब्द कांहीं दिवस उपयोगीं पडतो. परंतु पुढें नेहमींच्या उपयोगामुळें, त्यांतील व उद्दिष्ट अर्थांतील पडदा नाहींसा होऊन तोच त्या कल्पनेचा बोधक बनतो. अशा रीतीनें नवीन शब्दांची जरूर भासूं लागते; याची साक्ष प्रातर्विधीचे वाचक शब्द आपणामध्यें असलेले पाहिल्यानें सहज पटेल. संस्कृतांतील 'हद्' या ( अनिट् कारिकांत असलेल्या ) धातूपासून बनलेला शब्द अमंगल कल्पना मनांत उभी करितो, म्हणून त्याचें ठिकाणीं आपण विवक्षित विधीचे स्थानावरून- परसाचे कडेचे भागावरून-एक शब्द तयार केला. कांहीं दिवस त्यानें काम केलें. पुढें तो ग्राम्य होऊन आपण त्या विधीचें कार्य मलशुद्धी यास अनुलक्षून 'शौच' हा शब्द प्रचारांत आणिला. पुढें तोही अश्लील कोटींत गेला, व आतां फिरून शब्दाची वाण आहे ती आहेच ! हल्लीं कोणी 'बहिर्दिशेस जाणें', किंवा 'दिशेस जाणें' असा प्रयोग करितात. सारांश, ग्राम्यतापरिहार हें 'शौच' या शब्दाच्या अर्थांतराचे मुळाशीं आहे. असाच प्रकार असल्या शब्दांच्या संबंधानें इंग्रजी भाषेमध्येंही झालेला आढळतो. शब्द अश्लील नव्हे, पण मनाला वाईट वाटण्यासारख्या अर्थाचा असल्यास त्यालाही चांगलें स्वरूप देतात. कोणी 'मेला' असें न म्हणतां 'वारला' म्हणजे दृष्टीआड झाला असें म्हणतात. पुढें स्वर्गवासी, कैलासवासी, वैकुंठवासी, असें कांहीं तरी म्हणतात. एकादा ख्रिस्ती मनुष्य मेला

त्तर 'स्वर्गवासी' असें म्हणतात. निदान 'परलोकवासी', असें तरी म्हणतातच. बायका 'बांगड्या पिचल्या', 'कुंकू सपलें' असें न म्हणता 'वाढवलें' असें म्हणतात. 'वाढवलें' यात 'पूर्वींचें सपल्यावर त्यात आणखी आणून घातलें' इतका अर्थ दिसतो.

कधीं कधीं एखाद्या गोष्टीच्या वर्णनात सामान्य जनास अपरिचितार्थ असा शब्द आढळतो, व तो शब्द या गोष्टींतील मुख्य कल्पनेचा वाचक बनतो. "वामनानें बळीस फसवून त्रिपाद भूमी मागितली, व बलीनें दानाचें उदक सोडताच, त्यानें विराट्स्वरूप धारण केलें, व तीन पावलें टाकिलीं त्याचा परिणाम असा झाला कीं, बली हा घाबरून व गोंधळून गेला". यातील वामनाच्या पादन्यासाचें वर्णन 'विष्णुस्त्रेधा विचक्रमे' असें वेदात आढळतें. यातील त्रेधा हें पद नीटसें न कळल्यानें, लोकांनीं तेंच पद वरील प्रसंगीं झालेल्या बलीच्या मन स्थितीला लाविलें, व तेव्हापासून 'त्रेधा' हा शब्द भीतीनें उडालेली घाबरगुंडी, याचा वाचक होऊन बसला आहे येथें वाच्य म्हणजे अर्थ व वाचक म्हणजे शब्द यात केवळ बादरायण संबंधच आहे, असें म्हटलें पाहिजे तारांबळ ही एक प्रकारची त्रेधाच, पण ती-मध्यें भीतीचें कारण नसतें, केवळ तातडी, घाई असते. पण हाही शब्द अशाच चमत्कारिक तऱ्हेनें झाला आहे. विवाहादिकांच्या वेळीं योग्य तारेचें म्हणजे नक्षत्राचें बळ लागतें, म्हणजे चंद्र वगैरे अमुक एक नक्षत्रीं किंवा राशींत अनुकूल स्थितींत हवे असतात 'तारा-बल' याची योग्य वेळ साधण्यासाठीं फार घाई करावी लागते. यासाठीं तारांबळ असा शब्द प्रचारात आला.

वरील 'त्रेधा' या शब्दाच्या मूळ व वर्तमान दोन अर्थांत ओढून ताणून काहीं संबंध लाविता येतो पण कधीं कधीं हाही संबंध नसतो. मनस्वी याचा 'मनाचा खंबीर', 'विद्वान्' वगैरे मूळ अर्थ व 'अतिशय' हा प्रस्तुत अर्थ यात अर्थाअर्थीं काहींच संबंध दिसून येत नाहीं.

कधीं मूळ अर्थ आणि वर्तमान अर्थ यात विरोध आढळतो. 'प्रस्थापित' याचा संस्कृतातील 'पाठविलेला' हा अर्थ, व मराठींतील 'प्रतिष्ठापित' हा अर्थ यामध्यें असलेला विरोध मागें दर्शविलाच आहे. 'सूतक' हा

शब्द संस्कृतांत धात्वर्थाला धरून 'जननाशौच', 'सोयर,' याचा वाचक असून, मराठींत मरणाशौचाचा वाचक झाला आहे. जननाशौचांत स्पर्शदोष नाहीं, तर मरणाशौचांत तो आहे. सारांश दोन परस्पर भिन्न आशौचांचे शब्दांपैकीं एकाचा वाचक शब्द मराठींत अन्याचा बोधक बनला आहे, म्हणजे या अर्थांतराचे मुळाशीं अर्थ-विरोध हें कारण आहे.

कचित् परस्पर विरुद्धार्थक असलेले शब्दप्रयोग एकार्थ होतात. इंग्रजींतही असलीं उदाहरणें सांपडतात. "It is of the *first* importance," and "it is of the *last* importance." ह्या दोन्ही वाक्यांत हे शब्द विरुद्धार्थक असूनही, एकंदर शब्दप्रयोगाचा अर्थ, एकच आहे. असाच प्रकार अज्ञानतः, मराठीमध्यें परोक्ष व अपरोक्ष या जोडींत सांपडतो. दोन्ही शब्द आणि 'परोक्ष' म्हणजे देखत आणि 'अपरोक्ष' म्हणजे पाठीमागें अशा प्रकारेंही आपण (एखाद्याचे) 'पाठीमागें' अशा अर्थी वापरतों, येथें 'अपरोक्ष' या शब्दांतील निषेधार्थक 'अ' हें अव्यय निरर्थक होऊन बसलें आहे. परोक्ष म्हणजे अप्रत्यक्ष व अपरोक्ष म्हणजे प्रत्यक्ष असे या शब्दांचे मूळ अर्थ आहेत.

अर्थाचे व्याप्तीचा विस्तार कांहीं शब्दांत झालेला आढळतो. बाणभट्ट कवीनें लिहिलेल्या काल्पित ग्रंथाचें 'कादंबरी' हें नांव त्यांतील नायिकेच्या नांवावरून पडलें. पुढें तज्जातीय ग्रंथांत हा ग्रंथ श्रेष्ठ ठरल्यामुळें त्याची संज्ञा कादंबरी ( काल्पित कथानक ). ही सामान्य ठरली; म्हणजे मूळ असलेलें विशेषनाम सामान्यनाम बनलें. वास्तविक 'काल्पित कथा' ( इंग्रजी novel ) याला कादंबरी हा शब्द योग्य नाहीं. 'नाव्हेल' या सारखाच जो 'नवल' शब्द, तो योजणें बरें. गुजराथींत 'नवल–कथा' असा शब्द योजितात.

'पीतांबर' हा शब्द मूळ पिंवळ्या वर्णाच्या रेशमी वस्त्राचा वाचक असून पुढें तो कोणत्याही वर्णाच्या रेशमी वस्त्राचा वाचक बनला. हल्लीं तांबडा, हिरवा, जांभळा पीतांबर, असे शब्दप्रयोग तर होतातच; पण मौज ही कीं, पिंवळा पीतांबर असाही प्रयोग होतो ! उपजातिवाचक शब्द जातिवाचक बनला आहे; व म्हणून 'अम्बर'

याचे पूर्वी असलेलें 'पीत' हें पद अर्थशून्य झालें. रुमाल या फारशी शब्दाचा अर्थ तोंड पुसावयाचा फडका. पण त्याचा अर्थ चौकोनी लहान मोठें वस्त्र किंवा फडका असा होऊन, हात रुमाल, डोकीचा रुमाल, कांहीं पदार्थ बांधून ठेवण्याचा रुमाल, असे अर्थ आले. करंगळी ( करांगुली ) म्हणजे हाताचें बोट. आतां आपण पायाची करंगळीही म्हणतों. गाईचें गोमूत्र, म्हशीचें गोमूत्र, असेही प्रयोग अडाणी लोक करितात.

हीं उदाहरणें 'शाळा' शब्दाच्या विपरीत प्रकाराचीं दर्शक आहेत. 'शाला' शब्दाचे आधुनिक अर्थाला मागें 'पाठ' या पदाची जरूरी आहे, तर 'पीताम्बर' यांतील 'पीत' हें पद निरर्थक आहे. अर्थदृष्टीनें 'पाठ' हें पद अध्याहृत धरावें लागतें, तर'पीत' हें पद लुप्त म्हणून सोडावें लागतें. रु-माल यांत 'माल' याचा अर्थ फडका असा आहे, तेव्हां 'रु' म्हणजे तोंड हें पद निरर्थक झालें. 'सह्याद्रिपर्वत' 'विंध्याद्रिपर्वत' यांतही 'अद्रि' हें पद अर्थशून्य मानावें लागतें.

एखाद्या शब्दाच्या अर्थांत तो दुसऱ्या भाषेंत जातांना मुळांत नसलेला चांगुलपणा शिरतो. धूर्त हा शब्द संस्कृतांत बहुधा निंद्य अर्थानें म्हणजे आपल्या चातुर्याचा उपयोग दुसऱ्यास फसविण्याकडे करणारा या अर्थी वापरितात. अलंकारग्रंथांत हा शब्द वारंवार आढळतो. मराठींत याच्या अर्थांतील चांगला भाग तेवढा राहून दूषणीय भाग लोपला आहे. मराठींत चतुर, धोरणी, अशा अर्थी हा शब्द योजितात. म्हणजे हा शब्द अर्थप्रशस्तीचें उदाहरण आहे.

याचे उलट कधीं कधीं मूळ अर्थांत नसलेली निंदा दुसऱ्या भाषेंत त्या शब्दापासून बोधित होते. हें बहुधा तद्बोधित वस्तू किंवा व्यक्ती यांचे उपयोगावर व वर्तनावर अवलंबून असतें. ब्राह्मण लोकांच्या सुप्रसिद्ध दारिद्र्यामुळें, त्यांचे मुलांस विद्यार्जनाकरितां दुसऱ्याची किरकोळ चाकरी करावी लागते. घरांत देवपूजा, पाट-भांडीं व ताटें मांडणें, भाजी आणणें वगैरे किरकोळ कामें करण्यास साक्षात् पगारी नोकर न ठेवितां, पुष्कळ ठिकाणीं शाळेंत शिकणारीं गरीब मुलें भोजनावारी बाळगण्याची चाल धनिक लोकांत आहे. अशा स्थितींत मुलगा

एकीकडे 'विद्यार्थी' व एकीकडे 'चाकर' असा उभयविध असतो. येथें उपलब्ध होणारें सेवकत्वाचें साहचर्य 'विद्यार्थी' या शब्दास चिकटलें आहे; व 'हा मुलगा आमच्याकडे विद्यार्थी आहे' असल्या वाक्यांत 'हा पोटावारी नोकर आहे' हें बोधित होतें. अशा अर्थी 'शिष्य' या शब्दाचा उपयोग जास्त होतो. पेशवाईत कोंकण्या या शब्दाचा असा उपयोग होता. कोंकणांतून चितपावन, कऱ्हाडे वगैरे ब्राह्मणांचे मुलगे पोट भरण्यास पुण्यास येत. पुढें कोंकण्या पेशव्यास (नानासाहेबास) तें दूषणीय वाटून असे मुलगे फडावर प्रविष्ट होऊं लागले. अशा रीतीनें पुढील काळांतले कोंकणस्थ सरदार आणि मुत्सद्दी तयार झाले. हीं अर्थदूषणाचीं उदाहरणें होत

संमानार्थ उपपदें भिन्न प्रांतांत भिन्न आढळतात. आपल्या महाराष्ट्रांत 'पंत' किंवा 'राव' वापरितात, तर तेलंगणांत 'आचार्य' हा शब्द वैष्णवब्राह्मणांच्या नांवापुढें जोडितात; जसें, कृष्णाचार्य, भीमाचार्य वगैरे. मराठेशाहींत ब्राह्मणास 'पंत' आणि मराठ्यास 'राव' म्हणत. पेशव्यांच्या कुलांतील पुरुषांस मात्र 'राव' म्हणत. 'गुरुराव पंतलू' यांत राव व पंत हे दोन्ही शब्द एकाच व्यक्तीस लाविले आहेत. 'आचार्य' हें पद विद्वान् ब्राह्मणास लावावयाचें. या शब्दाच्या अर्थाची झालेली अवनती करुणास्पद आहे. हा सन्मानार्थ म्हणून सामान्यतः कोणत्याही ब्राह्मण गृहस्थाच्या नांवापुढें जोडण्यांत येऊं लागला. पुढें तेलंगणांतील लोक इकडे स्वयंपाककुशल म्हणून धंदा करण्याकरितां येऊं लागले. अर्थात् ते आपलें नांव अस्सल आचार्य म्हणून सांगत. हे स्वयंपाक्याचा धंदा करणारे लोक 'आचार्य' उपपद धारण करीत असल्यानें हा धंदा व 'आचार्य-पद' यांचें साहचर्य स्थापित होऊन कालक्रमानें त्याचा 'आचारी' म्हणजे 'सैपाकी' असा अर्थ झाला. गुजराथेंत आणि सामान्यतः उत्तरहिंदुस्थानांत, मारवाडांत महाराज हा शब्द ब्राह्मण स्वयंपाक्यास अथवा पाणक्यास अशाच रीतीनें लावला गेला आहे. कारण तिकडे कोणत्याही ब्राह्मणाला 'महाराज' म्हणतात.

एकाद्या शब्दास वर्तमान अर्थ कसा प्राप्त झाला हें पाहण्यानें विविध व मनोरंजक, उपयुक्त माहिती मिळते. लेखनपद्धतीचा विचार

केला असतां वर्ण, अक्षर, लिपी व लेख हे शब्द मनांत येतात. यांतील प्रत्येक आपणास जुनी माहिती देण्यास तयार आहे. या चौकडींतील 'वर्ण' व 'लिपी' हे समकालीन असून 'अक्षर' व 'लेख' हेही समकालीन, परंतु पूर्व युगलापेक्षां अर्वाचीन दिसतात. यांतील 'वर्ण' शब्द रंगाचा वाचक असून, त्यावरून रंगानें लिहिण्याची चाल व्यक्त होते. 'लिपी' हा शब्द 'लिप्' लेप देणें, लिपणें, या धातूवरून साधला असून, त्यानें पृष्ठोक्त लिहिण्याची चाल सूचित होते. 'अक्षर' हा शब्द 'गळून न पडणारें', ज्याच्या खपल्या पडत नाहींत, जें कायम टिकतें, अशाचा सूचक आहे. तसाच 'लेख' हा शब्द 'लिख्' खरडणें या धातूपासून निघाला असून, त्यावरून खोदून लिहिणें अनुमित होतें. लिहिलेलें गळून पडणे शक्य आहे. ही अडचण दूर करणें इष्ट वाटून खोदून लिहिण्याची युक्ती निघाली असावी. लिहिलेलें गळून न पडणें ही गोष्ट साधणें मुख्य होतें. हीच तजवीज 'अक्षर' या पदांत दिसून येते. 'वर्ण' या पदाप्रमाणें विधिमुखानें 'अक्षर' हा शब्द प्रवृत्त झाला नसून, तो निषेधमुखानें व्युत्पन्न झाला आहे. 'अक्षर' या शब्दावरून अमुक आहे असें नाहीं, तर काय नाहीं हें सूचित होतें. 'गळून न पडेल' अशा रीतीनें लिहिलेलें असा अर्थ उघड आहे. इंग्रजींतले write, scribe हे शब्द अशाच प्रकारें खरवडणें, खोदणें अशा मूळ धातूंपासून झाले आहेत. यावरून 'लिहिणें' म्हणजे दगडावर, धातूच्या पत्र्यावर अथवा झाडाच्या सालीवर खोदणें, ही चाल सर्वत्र होती असें दिसतें. या शब्दांवरून लेखनकलेचा इतिहास समजतो, म्हणून अशा शब्दांस इतिहासबोधक शब्द म्हणावें.

कांहीं शब्दांच्या परीक्षणावरून पूर्वीच्या शस्त्रांविषयींची माहिती उपलब्ध होते. 'पर्शु' हा शब्द बरगडीचा वाचक आहे. याचें रूपांतर 'परशु' असें होतें. पूर्वी मानवजातीच्या परिणतींत असा एक काल गेला कीं ज्या वेळीं हाडाच्या केलेल्या शस्त्राचा उपयोग लढण्याकडे करीत असत. इंद्राचें प्रसिद्ध आयुध वज्र हें दधीचि ब्राह्मणाच्या हाडाचें बनविलें हें पुराणप्रसिद्ध आहे. बरगडीचा उपयोग शस्त्र म्हणून करीत असत, तसा पशूंचे शिंगाचाही उपयोग होत असे, असें मानण्यास आधार

आहे. 'गण्डके खड्गखड्गिनौ' असा अमरकोश आहे. येथें गेंडा या पशूस 'खड्ग' किंवा 'खड्गी' असें म्हटलें आहे. तलवारीस खड्ग ही संज्ञा आहे. शिंगाचें अनुकरण आकारानें करणारें जें हत्यार उपयोगांत आलें त्यालाही 'खड्ग' हें नांव देण्यांत आलें. सृष्टिसिद्ध वस्तूंच्या धर्तीवर बनविलेल्या पदार्थांस त्यांच्या उपमानांचींच नांवें आपण देतों, हें या घ न स (आयुधविशेष) या नांवावरून वाचक होतें. 'चर्मन्' हा शब्द संस्कृतांत ढालेचा पर्याय बनला आहे. ढाल चर्माची बनविलेली असते.

अं कि त म्हणजे-चाकर. यावरून पूर्व इतिहास किंवा प्रघात लक्षांत येतो. पूर्वी चाकराचे आंगावर स्वामित्वदर्शक 'चिन्ह' किंवा 'खूण' करीत असत असें वाटतें.

ज्याला आपण धोबी म्हणतों, त्याला 'धावक' व 'रजक' अशा दोन संस्कृत संज्ञा आहेत. पैकीं पूर्वोक्त सुसंगत आहे, परंतु उत्तरोक्त तशी दिसत नाहीं. तिचा अर्थ रंगविणारा असा आहे. यावरून असें दिसतें कीं, पूर्वी परीट व रंगारी एकच असे. सैं पा की हा शब्द 'स्वयंपाक' स्वतः अन्न शिजविणें यापासून झालेला दिसतो. कडक वैष्णव आपलें आपण अन्न शिजवितात. आतां त्यांचा अर्थ दुसऱ्या करितां अन्न शिजविणारा नोकर असा झाला, आणि त्याचें काम 'सैंपाक.'

प्र ह र हा शब्द तीन तासांच्या अवधीला लावितात. याचा धात्वर्थ किंवा यौगिक अर्थ 'प्रहार करणें', 'ठोकणें' अशा क्रियेनें अन्वित दिसून येतो. हा यौगिकरूढ अर्थ व कार्यबोधक रूढ अर्थ यांचा संबंध जोडूं जातां असें प्रतीत होतें कीं, पूर्वी तीन तीन तासांनीं वेळ कळविण्याकरितां ठोके वाजविण्याचा प्रघात असावा. ठोके वाजविण्याचें काम ज्या स्थळीं चालत असे त्यालाही 'पाहरा' अशी संज्ञा आहे. तो ही 'प्रहर' यावरून निघालेली आहे. अशा रीतीनें 'प्रहर' यावरून प्राक्कालीन चालीचा बोध होतो.

अंतर मोजण्याचे शब्द पाहिले असतां, त्यांवरून पूर्वकालाविषयीं कांहीं माहिती मिळते. वेळोवेळीं जो प्रकार विद्यमान असतो त्याची नोंद भाषेंत अनेक रीतींनीं झालेली आढळते. धनुर्बाणाचा उपयोग विशेष प्रचारांत होता तेव्हां एखादे वृक्षाची उंची 'शरक्षेप' याच्या

मापेंत गणीत असत. शरक्षेपोच्छ्रित अशी एका वृक्षाची उंची दश-कुमारचरितांत सांगितली आहे. गाईचे कळप प्राक्कालीं पुष्कळ पाळीत असल्यानें, या कळपांशीं माणसांचा संबंध जास्त येत असे. 'गोरुत' अंतर असें अंतरमापन दशकुमारचरितांतच सांगितलें आहे. अद्यापही 'अमुक घर येथून एक हां के व र आहे' असा शब्दप्रयोग केलेला आढळतो. शेतकरी लोक 'कासरा' म्हणजे बैलाच्या मानेची दोरी, इच्यावरून अंतर मोजून 'सूर्य का स रा भ र वर आला' असा उप-योग करितात. इंग्रजी मापेंतही bowshot, gunshot, earshot, वगैरे शब्दप्रयोग आहेत.

हे वर दिलेले शब्द त्या त्या वेळीं सर्वतः प्रवृत्त असलेल्या प्रचाराची नोंद करीत आहेत. परंतु नियमित अंतर—जें गणितशास्त्रांत हिशेबा-करितां वापरितां येईल असें—या शब्दांवरून बोधित होत असे असें दिसत नाहीं. वरील शब्दांवरून केवळ स्थूलमान मनांत येत असेल. परंतु एखादे शब्दावरून सूक्ष्मनियत अंतर कळेल तर त्या शब्दाची जास्त किंमत होईल. असें अंतर 'क्रो श' या शब्दावरून बोधित होतें. हा शब्द शास्त्रीय परिभाषेंत शिरला आहे, यावरून त्याचा प्राथमिक व लाक्षणिक अर्थ यांचा संबंध जोडणें जास्त उपयुक्त आहे. हा शब्द 'क्रुश्' ओरडणें, आरोळी मारणें, या धातूपासून निष्पन्न आहे. अर्थात् त्याचा मूळ अर्थ 'आरोळी' असा आहे. हल्लीं दोन हजार दडांनीं मोजलेलें अंतर असा त्याचा शास्त्रीय अर्थ आहे. यावरून अनुमान उघड होतें कीं, हा शब्द उपयोगांत आला त्या वेळीं पुरुषाची आरोळी अडीच मैल ऐकू जात असावी.

अशाच प्रकारचा बोध चा ळि शी या शब्दावरूनही होतो. चाळीस वर्षें वयास झालीं म्हणजे दृष्टीला मंदत्व येतें. त्यापासून व्यवहारांत अडचण येऊ नये म्हणून उपनेत्र लावण्याचा प्रघात पडला, म्हणून उपनेत्रांना चाळिशी हे नांव पडलें. हें नांव आपूट दृष्टीसाठीं केलेल्या चष्म्यास देता येणार नाहीं, हें उघड आहे.

पूर्वी पैशाबद्दल भाडें (व्याज)घेणें हें निषिद्ध—कचित् पातकही—मानलें जात असे. यास पुरावा व्या ज या शब्दाचाच होय. या

शब्दाचा मूळ अर्थ 'लबाडी' असा आहे. हा अर्थ वरील कल्पना गृहीत धरल्याशिवाय संभवत नाहीं. ख्रिस्ती धर्मपुस्तकांत आणि मुसलमानांच्या धर्मांतही व्याज घेण्याचा निषेध आहे, व पुष्कळ धार्मिक मुसलमान हल्लींही व्याज घेत नाहींत. आमचे प्राचीन ऋषी जास्त व्यवहारदक्ष होते. ऋग्वेदांतील एका सूक्तांत व्याज फार घेऊं नये, असें सांगितलें आहे; अगदीं घेऊं नये असें नाहीं. मात्र हा उपदेश पुष्कळ व्याज घेण्याच्या पद्धतीचा निषेध करुन मग केला आहे.

कांहीं शब्दांवरून विचारांतील क्रांती बोधित होते. एकाद्या ग्रंथाचा अर्थ विशद करण्याकरितां शब्दविस्तार करणें हा टीका शब्दाचा मूळ अर्थ. 'स्थितस्य गतिश्चिंतनीया' या न्यायानें ग्रंथकाराची बाजू चांगली सजविण्याचाही टीकाकाराचा उद्देश असे. संस्कृत महाकाव्यांचा प्रसिद्ध टीकाकार मल्लिनाथ याच्या उपरिनिर्दिष्ट धोरणावरून 'मल्लिनाथी' हा शब्द येन केन प्रकारेण स्वीकृत पक्षमंडन या अर्थी रूढ झाला आहे.

याचे उलट प्रकार टीका या शब्दाच्या आधुनिक अर्थावरून प्रत्ययास येतो. ग्रंथकाराची बाजू शक्य तितकी उचलून धरणें हें धोरण सोडून, ग्रंथावर अभिप्राय देणारे लोक ग्रंथकाराची टर उडवूं लागले. तेव्हांपासून प्रतिकूल शब्दविस्तरास 'टीका' हें नांव देण्यांत येऊं लागलें. याचा उपयोग एकाद्या मनुष्याच्या किंवा गोष्टीच्या संबंधानें *प्रतिकूळ बोलणें* असाही होतो.

*शतकृत्य* म्हणजे एकादें मोठें काम असा अर्थ झाला आहे. 'तूं काय शतकृत्य केलेंस ?' म्हणजे मोठीशी महत्वाची गोष्ट कोणती केलीस, असें आपण विचारतों. 'शत-क्रतु' म्हणजे शंभर अश्वमेध यज्ञ केल्यानें इंद्रपद मिळतें, या पौराणिक समजुतीस अनुलक्षून हा उपयोग आहे, 'क्रतु' याचें 'कृत्य' झालें. क्वचित् 'क्रतू' असाही उपयोग कोणी करितात.

शब्दांत होणारा फरक कधीं कधीं हानिकारक होण्याचा संभव असतो. उदाहरणार्थ, *सीमान्तपूजन* या शब्दाचें रूपान्तर *श्रीमंतपूजन* असें लोकांत झालें आहे. उच्चारसौकर्याला हें प्रतिकूल

आहेच. पण शिवाय त्याच्यामुळें वधूच्या बापाला भावी वराच्या प्रथमपूजनासाठीं श्रीमती थाटाची तयारी करावी लागून 'वरदक्षणा' या नावाखालीं हुंडा भरावा लागतो!

करवदें सर्वांस माहीत आहेत. या लहानशा रानफळाचें नाव मोठ्या गमतीनें आलेलें दिसतें. संस्कृतात त्यास 'करमर्द' म्हणतात. हीं फळें काढताना हाताला चीक लागतो. तो जाण्यास 'कराचें मर्दन' करावें लागतें. अशा रीतीनें कराचे मर्दन करण्याचा प्रसंग आणणाऱ्या बारीक फळास 'करमर्द' ही संज्ञा संस्कृतात आली.

'शब्दसृष्टीचे ईश्वर' अशी कवींची महती रामदासानें गाइली आहे. तीस अनुसरून, आपल्या प्रतिभाचातुर्यानें अर्थहीन शब्दासही वेळेस कवी सुसंगत अर्थ हुडकून काढितात. असा प्रकार कोडगा शब्दाचें 'कोटिगा' हें रूप कल्पिण्यात मोरोपंतानें केला आहे. 'कोडगा' हा शब्द मराठींत सर्वश्रुत आहे. त्याचा अर्थ 'अनेकवार निषेध केला असताही तीच गोष्ट निर्लज्जपणें फिरून फिरून करणारा', असा आहे. यात 'निर्लज्जपणाची चिकाटी' याहून जास्त अर्थ गर्भित नाहीं. जयद्रथानें काम्यक वनात द्रौपदीस पाहून तो तिच्या रूपास मोहित झाला आणि तिला वश करण्याकरिता आपल्या कोटिक नावाच्या सेवकास वारवार पाठविलें. येथें मानापमान बाजूस ठेवून त्या तेजस्वी साध्वीकडे धन्याकरिता कोटिकास जावें लागलें. यात त्याच्या वर्तनात 'निर्लज्जपणाची चिकाटी' दिसून आली. त्याच्या उदाहरणावरून कदाचित् लज्जाहीन मनुष्यास 'कोडगा' हा शब्द लाविण्यात आला असेल. पौराणिक व्यक्तींचीं नावें गुणविशेषवाचक म्हणून वापरण्याचा सार्वत्रिक प्रचार आहेच. कैकयी, जमदग्नि, कर्ण, शूर्पणखा, वगैरे नावें अशाच प्रकारचीं होत. मोरोपंतानें याची व्युत्पत्ती अन्यथा कल्पिली आहे. 'स्वयें हि काथितों, नसे तिलहि लाज, मी कोटिगा' या केकेमध्यें 'कोटि वेळा नको म्हटलें असता करणारा' अशा अर्थाचा 'कोडगा' हा शब्द मोरोपंतानें नवीन बनवून योजिला आहे. तो अर्थदृष्ट्या तर सर्वस्वी योग्य आहेच, परंतु रूपदृष्ट्याही 'कोटिक' शब्दापेक्षा सरस होय.

शब्दाचा मूळ अर्थ 'लबाडी' असा आहे. हा अर्थ वरील कल्पना गृहीत धरल्याशिवाय संभवत नाहीं. ख्रिस्ती धर्मपुस्तकांत आणि मुसलमानांच्या धर्मांतही व्याज घेण्याचा निषेध आहे, व पुष्कळ धार्मिक मुसलमान हल्लींही व्याज घेत नाहींत. आमचे प्राचीन ऋषी जास्त व्यवहारदक्ष होते. ऋग्वेदांतील एका सूक्तांत व्याज फार घेऊं नये, असें सांगितलें आहे; अगदीं घेऊं नये असें नाहीं. मात्र हा उपदेश पुष्कळ व्याज घेण्याच्या पद्धतीचा निषेध करून मग केला आहे.

कांहीं शब्दांवरून विचारांतील क्रांती बोधित होते. एकाद्या ग्रंथाचा अर्थ विशद करण्याकरितां शब्दविस्तार करणें हा *टीका* शब्दाचा मूळ अर्थ. *'स्थितस्य गतिश्चिंतनीया'* या न्यायानें ग्रंथकाराची बाजू चांगली सजविण्याचाही टीकाकाराचा उद्देश असे. संस्कृत महाकाव्यांचा प्रसिद्ध टीकाकार मल्लिनाथ याच्या उपरिनिर्दिष्ट धोरणावरून 'मल्लिनाथी' हा शब्द येन केन प्रकारेण स्वीकृत पक्षमंडन या अर्थी रूढ झाला आहे.

याचे उलट प्रकार टीका या शब्दाच्या आधुनिक अर्थावरून प्रत्ययास येतो. ग्रंथकाराची बाजू शक्य तितकी उचलून धरणें हें धोरण सोडून, ग्रंथावर अभिप्राय देणारे लोक ग्रंथकाराची टर उडवूं लागले. तेव्हांपासून प्रतिकूल शब्दविस्तारास 'टीका' हें नांव देण्यांत येऊं लागलें. याचा उपयोग एकाद्या मनुष्याच्या किंवा गोष्टीच्या संबंधानें प्रतिकूल बोलणें असाही होतो.

शतकृत्य म्हणजे एकादें मोठें काम असा अर्थ झाला आहे. 'तूं काय शतकृत्य केलेंस ?' म्हणजे मोठीशी महत्वाची गोष्ट कोणती केलीस, असें आपण विचारतों. 'शत-क्रतू' म्हणजे शंभर अश्वमेध यज्ञ केल्यानें इंद्रपद मिळतें, या पौराणिक समजुतीस अनुलक्षून हा उपयोग आहे, 'क्रतू' याचें 'कृत्य' झालें. क्वचित् 'क्रतू' असाही उपयोग कोणी करितात.

शब्दांत होणारा फरक कधीं कधीं हानिकारक होण्याचा संभव असतो. उदाहरणार्थ, सीमान्तपूजन या शब्दाचें रूपान्तर श्रीमंतपूजन असें लोकांत झालें आहे. उच्चारसौकर्याला हें प्रतिकूल

आहेच. पण शिवाय त्याच्यामुळें वधूच्या बापाला भावी वराच्या प्रथमपूजनासाठीं श्रीमंती थाटाची तयारी करावी लागून 'वरदक्षणा' या नांवाखालीं हुंडा भरावा लागतो!

करवदें सर्वांस माहीत आहेत. या लहानशा रानफळाचें नांव मोठ्या गमतीनें आलेलें दिसतें. संस्कृतांत त्यास 'करमर्द' म्हणतात. हीं फळें काढतांना हाताला चीक लागतो. तो जाण्यास 'कराचें मर्दन' करावें लागतें. अशा रीतीनें कराचें मर्दन करण्याचा प्रसंग आणणाऱ्या बारीक फळास 'करमर्द' ही संज्ञा संस्कृतांत आली.

'शब्दसृष्टीचे ईश्वर' अशी कवींची महती रामदासानें गाइली आहे. तीस अनुसरून, आपल्या प्रतिभाचातुर्यानें अर्थहीन शब्दांसही वेळेस कवी सुसंगत अर्थ हुडकून काढितात. असा प्रकार कोडगा शब्दाचें 'कोटिगा' हें रूप कल्पिण्यात मोरोपंतानें केला आहे. 'कोडगा' हा शब्द मराठीत सर्वश्रुत आहे. त्याचा अर्थ 'अनेकवार निषेध केला असतांही तीच गोष्ट निर्लज्जपणें फिरून फिरून करणारा', असा आहे. यांत 'निर्लज्जपणाची चिकाटी' याहून जास्त अर्थ गर्भित नाहीं. जयद्रथानें काम्यक वनांत द्रौपदीस पाहून तो तिच्या रूपास मोहित झाला आणि तिला वश करण्याकरितां आपल्या कोटिक नांवाच्या सेवकास वारवार पाठविलें. येथें मानापमान बाजूस ठेवून त्या तेजस्वी साध्वीकडे धन्याकरितां कोटिकास जावें लागलें. यांत त्याच्या वर्तनांत 'निर्लज्जपणाची चिकाटी' दिसून आली. त्याच्या उदाहरणावरून कदाचित् लज्जाहीन मनुष्यास 'कोडगा' हा शब्द लाविण्यात आला असेल. पौराणिक व्यक्तींचीं नावें गुणविशेषवाचक म्हणून वापरण्याचा सार्वत्रिक प्रचार आहेच. कैकयी, जमदग्नि, कर्ण, शूर्पणखा, वगैरे नांवे अशाच प्रकारचीं होत. मोरोपंताने याची व्युत्पत्ती अन्यथा कल्पिली आहे. 'स्वयें हि कार्थितों, नसे तिलहि लाज, मी कोटिगा' या केकेमध्यें 'कोटि वेळां नको म्हटलें असतां करणारा' अशा अर्थाचा 'कोडगा' हा शब्द मोरोपंतानें नवीन बनवून योजिला आहे. तो अर्थदृष्ट्या तर सर्वस्वी योग्य आहेच, परंतु रूपदृष्ट्याही 'कोटिक' शब्दापेक्षां सरस होय.

मोरोपंतानें दिलेली व्युत्पत्ती खरी नसून ती त्यांनीं जाणूनबुजून 'कोडगा' या शब्दावर लादली असेल तर हें एक प्रसह्यार्थीकरणाचें उदाहरणच होय. असे प्रयत्न पुष्कळ ठिकाणीं आढळतात. ग्रीक भाषेंतून diametre या शब्दावरून उघड उघड सिद्ध झालेल्या 'जामित्र' या ज्योतिःशास्त्ररूढ शब्दाचें 'जायामित्र' असें मूलरूप आपल्या पूर्वजांनीं मानिलें आहे. सारांश जेथें अर्थ होत नसेल, किंवा आपणास दिसत नसेल, तेथें बुद्धीच्या जोरावर किंचित रूपविकृती मानून तो बनविणें हें विद्वत्संमत आहे.

आपल्या कालमानामध्यें चांद्र व सौर वर्ष यांचा मेळ घातलेला आहे; तरी मुख्यतः नेहमीं व्यवहारांत चांद्रमानालाच विशेष महत्त्व आहे. महिनेही चांद्रमानांतीलच असल्यानें त्यांचीं नांवें तदनुरूप आहेत. प्रत्येक महिन्यांत पौर्णिमेला चंद्र कोणत्या नक्षत्रास असतो हें पाहून हीं नांवें ठेविलीं आहेत; म्हणजे नक्षत्रांच्या नांवावरून मासनामें प्रवृत्त झालीं आहेत. चित्रा नक्षत्र पौर्णिमेस असल्यानें पहिल्या महिन्यास 'चैत्र' ही संज्ञा आहे. त्याचे पुढील महिन्यास 'वैशाख' म्हणतात. नक्षत्रांतील आद्यस्वरास वृद्धी होऊन मासनाम सिद्ध होतें. याप्रमाणें तृतीयमासाचें नांव ज्यैष्ठ असावें, व तें तसें मूलतः आहेही. परंतु कोणीकडून तरी त्याचे जागीं परिचित असा 'ज्येष्ठ' हा शब्द योजण्यांत आला. एवढेंच नव्हे तर तेंच मूळ नांव आहे असें मानून त्याचा 'ज्येष्ठ' म्हणजे वडील अपत्याशीं संबंध जोडण्यांत येऊन आणि त्या महिन्याचा क्रमांक तीन आहे असें पाहून, तीन ज्येष्ठांचा योग विवाहविधींत वर्ज्य करण्याचा प्रघात पडला आहे. वधू वडील मुलगी, वरही वडील मुलगा, अशांचा विवाह ज्येष्ठ महिन्यांत निषिद्ध मानिला आहे. याचे मुळाशीं 'ज्येष्ठ' या शब्दाचा 'ज्यैष्ठ' या शब्दाशीं झालेला घोंटाळा हेंच कारण असावें. अशा रीतीनें परिचितापरिचित शब्दांपैकीं अपरिचित शब्दांचे ठिकाणीं परिचित शब्द घुसडून देण्याची प्रवृत्ती भाषेंत दिसून येते. इंग्रजींत असलेला 'helpmate' हा शब्दही मूळ 'help meet' या पदयोगावरून आला आहे असें तज्ज्ञांचें मत आहे.

5879

भिन्न भिन्न प्रकारच्या आदर्शांत एकाच वस्तूचीं प्रतिबिंबें भिन्नरूप दिसतात. असाच कांहींसा प्रकार शब्दांसंबंधानेंही घडतो. संस्कृत शब्द व न हा हिंदी भार्षेत ब न या रूपानें संक्रांत झाला आहे. मराठींत तो 'वन' अशा अविकृत रूपानेंच प्रवृत्त आहे. पण हिंदींतील 'बन' हें रूपही मराठींत आलें आहे, आणि 'वन' व 'बन' या एकाच वस्तूच्या दोन प्रतिबिंबांत अर्थान्तर उत्पन्न झालें आहे. 'वन' ही संज्ञा आपण सामान्य वापरितों, तर 'बन' हा शब्द विशेषतः 'केवड्याचें बन' अशा विशिष्ट अर्थाच्या पदयोगांत आढळतो. 'विवक्षित फुलझाडाची लहानशी राई' असाही त्याचा अर्थ झालेला दिसतो.

हिंदी भार्षेत रूपभेद होण्याचें कारण ती भाषा बोलणारांच्या वर्णोच्चारपद्धतींतील भेद होय. योगाभ्यासरत अशा मनुष्यास आपण योगी म्हणतों, पण याचेंच हिंदी प्रतिबिंब जोगी हा शब्द आपण विशेष पेशाच्या साधुजनांस लावितों. आधारभूत वस्तू एकच असून, प्रतिबिंबें भिन्नार्थ कशीं होतात हें वरील शब्दांवरून दिसून येतें. कर्म या शब्दावरून 'काम' शब्द झाला. संस्कृतांत 'कर्म' याचा आणि मराठींत 'काम' याचा केवळ वा ई ट अ र्थ नाहीं. पण मराठींत 'कर्म' हा शब्द एकादें वाईट, निंद्य काम या अर्थी योजितात. अशी स्थिती असल्यामुळें मराठींत 'कर्तव्य' या शब्दापुढें 'कर्म' शब्द जोडून क र्त व्य क र्म असें म्हणतात, हें बरोबर नाहीं. 'कर्तव्य' या शब्दांतच आपल्ययाला हवा तो अर्थ आहे.

कधीं कधीं प्र ति बिं बा न्त र सहसा ओळखूंही येत नाहीं, इतकें उच्चारभेदमूलक अंतर त्यांत पडतें. 'विनायकं प्रकुर्वाणो रचयामास वानरम्' असें सुभाषित आहे. येथें घडवूं पाहिलेली वस्तू व घडून तयार झालेली वस्तू यांत फार अंतर असल्यानें परस्पर संबंधही दृष्टीआड झाला आहे. असाच प्रकार बन्सी या संबंधानें आढळतो. 'संशय' या शब्दाचा उच्चार 'सन्शय' असा उत्तरेकडील लोक करितात. या उदाहरणावरून 'बन्सी' याचें मूळ 'वंशी' असें आहे, हें उघड होतें. अर्थैक्य ही दोहोंमध्यें आहेच. प्रस्तुत शब्द 'बन्सी' ही आपणास परिचित आहे, तरी वरील उच्चारपद्धतींतील भेद लक्षांत आणिल्या-

5879

मोरोपंतानें दिलेली व्युत्पत्ती खरी नसून ती त्यांनीं जाणूनबुजून 'कोडगा' या शब्दावर लादली असेल तर हें एक प्रसह्यार्थीकरणाचें उदाहरणच होय. असे प्रयत्न पुष्कळ ठिकाणीं आढळतात. ग्रीक भाषेंतून diametre या शब्दावरून उघड उघड सिद्ध झालेल्या 'जामित्र' या ज्योतिःशास्त्ररूढ शब्दाचें 'जायामित्र' असें मूलरूप आपल्या पूर्वजांनीं मानिलें आहे. सारांश जेथें अर्थ होत नसेल, किंवा आपणास दिसत नसेल, तेथें बुद्धीच्या जोरावर किंचित रूपविकृती मानून तो बनविणें हें विद्वत्संमत आहे.

आपल्या कालमानामध्यें चांद्र व सौर वर्ष यांचा मेळ घातलेला आहे; तरी मुख्यतः नेहमीं व्यवहारांत चांद्रमानालाच विशेष महत्त्व आहे. महिनेही चांद्रमानांतीलच असल्यानें त्यांचीं नांवें तदनुरूप आहेत. प्रत्येक महिन्यांत पौर्णिमेला चंद्र कोणत्या नक्षत्रास असतो हें पाहून हीं नांवें ठेविलीं आहेत; म्हणजे नक्षत्रांच्या नांवावरून मासनामें प्रवृत्त झालीं आहेत. चित्रा नक्षत्र पौर्णिमेस असल्यानें पहिल्या महिन्यास 'चैत्र' ही संज्ञा आहे. त्याचे पुढील महिन्यास 'वैशाख' म्हणतात. नक्षत्रांतील आद्यस्वरास वृद्धी होऊन मासनाम सिद्ध होतें. याप्रमाणें तृतीयमासाचें नांव ज्यैष्ठ असावें, व तें तसें मूलतः आहेही. परंतु कोणीकडून तरी त्याचे जागीं परिचित असा 'ज्येष्ठ' हा शब्द योजण्यांत आला. एवढेंच नव्हे तर तेंच मूळ नांव आहे असें मानून त्याचा 'ज्येष्ठ' म्हणजे वडील अपत्याशीं संबंध जोडण्यांत येऊन आणि त्या महिन्याचा क्रमांक तीन आहे असें पाहून, तीन ज्येष्ठांचा योग विवाहविधींत वर्ज्य करण्याचा प्रघात पडला आहे. वधू वडील मुलगी, वरही वडील मुलगा, अशांचा विवाह ज्येष्ठ महिन्यांत निषिद्ध मानिला आहे. याचे मुळाशीं 'ज्येष्ठ' या शब्दाचा 'ज्यैष्ठ' या शब्दाशीं झालेला घोंटाळा हेंच कारण असावें. अशा रीतीनें परिचितापरिचित शब्दांपैकीं अपरिचित शब्दांचे ठिकाणीं परिचित शब्द घुसडून देण्याची प्रवृत्ती भाषेंत दिसून येते. इंग्रजींत असलेला 'helpmate' हा शब्दही मूळ 'help meet' या पदयोगावरून आला आहे असें तज्ज्ञांचें मत आहे.

5879

भिन्न भिन्न प्रकारच्या आदर्शांत एकाच वस्तूचीं प्रतिबिंबें भिन्नरूप दिसतात. असाच कांहींसा प्रकार शब्दासबधानेंही घडतो. संस्कृत शब्द वन हा हिंदी भाषेंत बन या रूपानें संक्रांत झाला आहे. मराठींत तो 'वन' अशा अविकृत रूपानेंच प्रवृत्त आहे. पण हिंदींतील 'बन' हें रूपही मराठींत आलें आहे, आणि 'बन' व 'वन' या एकाच वस्तूच्या दोन प्रतिबिंबांत अर्थान्तर उत्पन्न झालें आहे. 'वन' ही संज्ञा आपण सामान्य वापरितों, तर 'बन' हा शब्द विशेषतः 'केवड्याचें बन' अशा विशिष्ट अर्थाच्या पदयोगांत आढळतो. 'विवक्षित फुलझाडाची ल्हानशी राई' असाही त्याचा अर्थ झालेला दिसतो.

हिंदी भाषेंत रूपभेद होण्याचें कारण ती भाषा बोलणाराच्या वर्णोच्चारपद्धतींतील भेद होय. योगाभ्यासरत अशा मनुष्यास आपण योगी म्हणतों, पण याचेंच हिंदी प्रतिबिंब जोगी हा शब्द आपण विशेष पेशाच्या साधुजनास लावितों. आधारभूत वस्तू एकच असून, प्रतिबिंबें भिन्नार्थ कशीं होतात हें वरील शब्दावरून दिसून येत. कर्म या शब्दावरून 'काम' शब्द झाला. संस्कृतात 'कर्म' याचा आणि मराठींत 'काम' याचा केवळ वाईट अर्थ नाहीं. पण मराठींत 'कर्म' हा शब्द एकादें वाईट, निंद्य काम या अर्थी योजितात अशी स्थिती असल्यामुळें मराठींत 'कर्तव्य' या शब्दापुढें 'कर्म' शब्द जोडून कर्तव्यकर्म असें म्हणतात, हें बरोबर नाहीं. 'कर्तव्य' या शब्दातच आपल्याला हवा तो अर्थ आहे.

कधीं कधीं प्रतिबिंबान्तर सहसा ओळखूही येत नाहीं, इतकें उच्चारभेदमूलक अंतर त्यांत पडतें. 'विनायक प्रकुर्वाणो रचयामास वानरम्' असें सुभाषित आहे. येथें घडवूं पाहिलेली वस्तू व घडून तयार झालेली वस्तू यांत फार अंतर असल्यानें परस्पर संबंधही दृष्टी-आड झाला आहे असाच प्रकार बन्सी या संबंधानें आढळतो. 'संशय' या शब्दाचा उच्चार 'सन्शय' असा उत्तरेकडील लोक करितात. या उदाहरणावरून 'बन्सी' याचें मूळ 'वंशी' असें आहे, हें उघड होतें. अर्थैक्य ही दोहोंमध्यें आहेच. प्रस्तुत शब्द 'बन्सी' ही आपणास परिचित आहे, तरी वरील उच्चारपद्धतींतील भेद लक्षात आणिल्या-

5879

शिवाय त्याचें मूळ सांगतां येणें कठीण आहे. शब्द संस्कृतांतून मराठींत प्रत्यक्षतः न येतां दुसऱ्या भाषेंतून मराठींत आला म्हणजे त्या भाषेचा छाप त्यावर पडून त्याची मूलपीठिका दृग्गोचर होत नाहीं; त्यामुळें त्याचा अर्थही परिचित असला तरी तो चटकन लक्षांत येत नाहीं. वंश म्हणजे वांबू, त्याचे तुकड्याची केली असल्यामुळें मुरलीला 'वंशी' किंवा उत्तरेकडील उच्चाराप्रमाणें 'बन्सी' असें म्हणतात. या उच्चारवैचित्र्यानें 'वंशी' या शब्दाशीं 'बन्सी'चा असलेला संबंध सहसा प्रतीत होत नाहीं, व तोंपर्यंत अर्थही दुर्बोध वाटतो; पण तो संबंध एकदां कळला कीं अर्थाचा उलगडा होतो.

संस्कृतांत 'रलयोः सावर्ण्यम्' असा नियम आहे. त्यास अनुसरून मराठींतही 'र'चे स्थानीं 'ल' आढळतो. हा केवळ बोबडे लोकांचेच उच्चारांत नव्हे—ते 'र' कधींच उच्चारीत नाहींत—तर स्पष्ट उच्चार करणाऱ्या लोकांच्याही बोलण्यांत कधीं कधीं आढळतो. 'प्रारब्ध' याचे स्थानीं 'प्रालब्ध' हा शब्दही मराठींत रूढ आहे. इंग्रजींत ही कित्येक शब्दांत र् व ल् यांचा विकल्प आहे. rectilinear आणि rectilineal हे दोन्ही शब्द विद्वन्मत आहेत.

*मागें व न व य न यांचें अर्थान्तर सांगितलें. त्यांतही व य योः सावर्ण्यम् हा नियम दिसून येतो. ज् व य् यांचेंही सावर्ण्य अभिमत आहे. 'यंत्र' याचा मूळ अर्थ विशेष रीतीनें भागांची परस्परांशीं जुळणी करून इष्टकार्य घडवून आणण्याकरितां केलेली योजना.* समाजाच्या पूर्वावस्थेंत धान्याचें पीठ पाटावरवंटा यांच्या साह्यानें वाटून घेत. हें त्रासाचें व मेहनतीचें वाटून, दगडावर दगड ठेवून वरील दगड फिरवून, त्या दोहोंमध्ये धान्याचें पीठ करणें, ही योजना निघाली. तेव्हांचे दृष्टीनें या योजनेस 'यंत्र' किंवा 'जातें' असें नांव मिळालें. या रूपान्तरांत 'य' चे ठिकाणीं 'ज' प्रवृत्त झाला आहे.

'यंत्र' शब्द सामान्य अर्थाचा वाचक असून 'जातें' हा विशेषार्थक वाचक आहे, हें उघड आहे. यंत्र हा व्यापक असून, जातें हा शब्द व्याप्त आहे. 'जातें' असें बनण्याचे अगोदर 'यंत्रक' असें झालेलें

असेलच. युक्ती, जुक्ती हे शब्द अशाच प्रकारचे आहेत. कदाचित् अशाच रीतीनें मुलें ग म त याचें ज म त करितात!

कांहीं अशुद्ध शब्द व्यवहारातच नव्हे, तर शास्त्रातही इतके रूढ होऊन गेले आहेत कीं, त्याचे शुद्धतेविषयीं शंका सहसा येत नाहीं. एखादें व्यंजन लागोपाठ दोनदा आलें म्हणजे आ वृ त्त झालें कीं त्यास संस्कृतांत 'द्विरावृत्त' म्हणतात. मराठी जाणणाराला या शब्दाचा 'द्वित्व (=दोनपणा) या शब्दाशीं घोटाळा होऊन द्वित्त असें निर्मूल व अशुद्ध रूप उत्पन्न झालें आहे. याला consolidated stock याचें consols, आणि spectacles याचें specks अशा सारख्या इंग्रजी शब्दाचें साम्य आहे.

संस्कृतांत 'चरित' व 'चरित्र' हे दोन्ही शब्द आहेत. याचा अर्थ भेद आहे. च रि त म्हणजे एखाद्या पुरुषाचें इ ति वृ त्त, व च रि त्र म्हणजे त्याचें वागण्याचें धोरण. 'त्र' हा प्रत्यय साधनवाचक आहे. नेत्र, खनित्र, पात्र, वगैरे शब्दांत हाच प्रत्यय आहे. सांप्रत 'चरित' या अर्थी 'चरित्र' हें रूप वापरण्याचा क्रम पडला. तो अयथार्थ आहे हें सांगणें नकोच. 'निद्रित' हें शुद्ध रूप टाकून 'निद्रिस्त' हें अशुद्ध रूप आपण वापरितों तेंही वरीलप्रमाणेच आहे.

संस्कृतांत जशीं जोडाक्षरें पुष्कळ येतात तसेच अनुस्वारही पुष्कळ येतात या कल्पनेप्रमाणें संस्कृतानभिज्ञांनीं 'विनति,' याचें 'विनंति' असें रूपांतर केलें, व तें राजमान्य होऊन बहुधा प्रत्येक पत्राचे शेवटीं सांपडतें.

शब्दाच्या आद्य लघुस्वराचा लोप करण्याची मराठीची प्रवृत्ती(अरण्य=) रान, (इयत्ता=) यत्ता, (उपरि=) वर, वगैरे शब्दावरून उघड होते. संस्कृतातही अशी प्रवृत्ती आहे. 'अव' आणि 'अपि' याच्या आद्य स्वराचा लोप होऊन 'अवतंस' 'वतंस' तसेच 'अपिहित' व 'पिहित' असे दुहेरी शब्दप्रयोग संस्कृतांत आढळतात. ही प्रवृत्ती येथेंच न थांबून 'हृदि सर्वस्य धिष्ठितम्' वगैरे ठिकाणीं 'अधि' मध्येंही दृग्गोचर होते. हिंदींतील 'आदित्यवार' याचें 'इतवार' हे रूप ठाऊक आहेच.

शिवाय त्याचें मूळ सांगतां येणें कठीण आहे. शब्द संस्कृतांतून मराठींत प्रत्यक्षतः न येतां दुसऱ्या भाषेंतून मराठींत आला म्हणजे त्या भाषेचा छाप त्यावर पडून त्याची मूलपीठिका दृग्गोचर होत नाहीं; त्यामुळें त्याचा अर्थही परिचित असला तरी तो चटकन लक्षांत येत नाहीं. वंश म्हणजे बांबू, त्याचे तुकड्याची केली असल्यामुळें मुरलीला 'वंशी' किंवा उत्तरेकडील उच्चाराप्रमाणें 'बन्सी' असें म्हणतात. या उच्चारवैचित्र्यानें 'वंशी' या शब्दाशीं 'बन्सी'चा असलेला संबंध सहसा प्रतीत होत नाहीं, व तोंपर्यंत अर्थही दुर्बोध वाटतो; पण तो संबंध एकदां कळला की अर्थाचा उलगडा होतो.

संस्कृतांत 'रलयोः सावर्ण्यम्' असा नियम आहे. त्यास अनुसरून मराठींतही 'र'चे स्थानीं 'ल' आढळतो. हा केवळ बोबडे लोकांचेच उच्चारांत नव्हे—ते 'र' कधींच उच्चारीत नाहींत—तर स्पष्ट उच्चार करणाऱ्या लोकांच्याही बोलण्यांत कधीं कधीं आढळतो. 'प्रारब्ध' याचे स्थानीं 'प्रालब्ध' हा शब्दही मराठींत रूढ आहे. इंग्रजींत ही कित्येक शब्दांत र् व ल् यांचा विकल्प आहे. rectilinear आणि rectilineal हे दोन्ही शब्द विद्वन्मत आहेत.

*मागें व न व य न यांमें अर्थान्तर सांगितलें. त्यांतही य व योः सा व र्ण्य म् हा नियम दिसून येतो. ज् व य् याचेंही सावर्ण्य अभिमत आहे. 'यंत्र' याचा मूळ अर्थ विशेष रीतीनें भागांची परस्परांशीं जुळणी करून इष्टकार्य घडवून आणण्याकरितां केलेली योजना.* समाजाच्या पूर्वावस्थेंत धान्याचें पीठ पाटावरवंटा यांच्या साह्यानें वाटून घेत. हें त्रासाचें व मेहनतीचें वाटून, दगडावर दगड ठेवून वरील दगड फिरवून, त्या दोहोंमध्यें धान्याचें पीठ करणें, ही योजना निघाली. तेव्हांचे दृष्टीनें या योजनेस 'यंत्र' किंवा 'जातें' असें नांव मिळालें. या रूपान्तरांत 'य' चे ठिकाणीं 'ज' प्रवृत्त झाला आहे.

'यंत्र' शब्द सामान्य अर्थाचा वाचक असून 'जातें' हा विशेषार्थक वाचक आहे, हें उघड आहे. यंत्र हा व्यापक असून, जातें हा शब्द व्याप्त आहे. 'जातें' असें बनण्याचे अगोदर 'यंत्रक' असें झालेलें

असेलच. युत्ती, युक्ती हे शब्द अशाच प्रकारचे आहेत. कदाचित् अशाच रीतीनें मुलें गमत याचें जमत करितात!

कांहीं अशुद्ध शब्द व्यवहारातच नव्हे, तर शास्त्रातही इतके रुढ होऊन गेले आहेत कीं, त्याचे शुद्धतेविषयीं शंका सहसा येत नाहीं. एखादें व्यंजन लागोपाठ दोनदा आलें म्हणजे आवृत्त झालें कीं त्यास संस्कृतात 'द्विरावृत्त' म्हणतात. मराठी जाणणाराचा या शब्दाचा 'द्वित्व (=दोनपणा) या शब्दाशीं घोटाळा होऊन द्वित्त असें निर्मूल व अशुद्ध रूप उत्पन्न झालें आहे. याला consolidated stock याचें consols, आणि spectacles याचें specks अशा सारख्या इंग्रजी शब्दाचें साम्य आहे.

संस्कृतात 'चरित' व 'चरित्र' हे दोन्ही शब्द आहेत. याचा अर्थ भेद आहे चरित म्हणजे एखाद्या पुरुषाचें इतिवृत्त, व चरित्र म्हणजे त्याचें वागण्याचें धोरण. 'त्र' हा प्रत्यय साधनवाचक आहे. नेत्र, खनित्र, पात्र, वगैरे शब्दात हाच प्रत्यय आहे. सांप्रत 'चरित' या अर्थी 'चरित्र' हें रूप वापरण्याचा प्रम पडला. तो अयथार्थ आहे हें सागणें नकोच. 'निद्रित' हें शुद्ध रूप टाकून 'निद्रिस्त' हें अशुद्ध रूप आपण वापरितों तेंही वरीलप्रमाणेंच आहे.

संस्कृतात जशीं जोडाक्षरें पुष्कळ येतात तसेच अनुस्वारही पुष्कळ येतात या कल्पनेप्रमाणें संस्कृतानभिज्ञानीं 'विनति,' याचें 'विनंति' असें रूपांतर केलें, व तें राजमान्य होऊन बहुधा प्रत्येक पत्राचे शेवटीं सापडतें.

शब्दाच्या आद्य लघुस्वराचा लोप करण्याची मराठीची प्रवृत्ती (अरण्य=) रान, (इयत्ता=) यत्ता, (उपरि=) वर, वगैरे शब्दावरून उघड होतें. संस्कृतातही अशी प्रवृत्ती आहे. 'अव' आणि 'अपि' याच्या आद्य स्वराचा लोप होऊन 'अवतंस' 'वतंस' तसेच 'अपिहित' व 'पिहित' असे दुहेरी शब्दप्रयोग संस्कृतात आढळतात. ही प्रवृत्ती येथेंच न थाबून 'हृदि सर्वस्य धिष्ठितम्' वगैरे ठिकाणीं 'अधि' मध्येंही दृग्गोचर होते. हिंदींतील 'आदित्यवार' याचें 'इत्वार' हें रूप ठाऊक आहेच.

शब्दाचें आद्याक्षर संयुक्तव्यंजन असल्यास आरंभीं विशेषतः 'इ' घालण्याची उत्तरेकडील भाषांची रीत असून ती मराठीमध्यें ही आली आहे. जसें, इस्कूल (स्कूल), अस्तुरी, इस्त्री (स्त्री), इत्यादि.

मराठींत येतांना संस्कृत शब्दांत वर्णविपर्ययही झालेला दिसून येतो. गोक्षुर व कटुकी यांचे जागीं क्रमानें गोखरू व कुटकी हीं रूपें स्वरविपर्ययाचीं उदाहरणें होत. 'कोटि' व 'क्षेप' यांचा 'टोक' व 'फेंक' या रूपांतराचे मुळाशीं व्यंजनविपर्यय आहे. 'उडुप' म्हणजे 'होडी' हें जलयान असल्यानें कधीं कधीं उलटतें, यामुळें तिचे संज्ञेनेंही उलटी खाल्ली असें दिसतें ! कारण 'उडुप' याचा अक्षरव्युत्क्रम होऊन 'पडाव' शब्द झाला आहे. 'लघु-लघु' याचा संस्कृतांतील अर्थ लौकर, जलदीनें; मराठींत अक्षरें उलटीं होऊन त्यापासून 'हळू हळू' हा शब्द बनला. पण मराठींत अर्थानेंही उलट खाल्ली आहे. 'उडाणटप्पू' हा शब्द 'उनाडतट्टू' या मूळच्या शब्दांत वर्णविपर्यास होऊन झालेला दिसतो. 'उनाड असा घोडा' असा मूळचा अर्थ. तसाच 'चुकार तट्टू' याचाही अर्थ आहे. 'उनाड' याचें 'उडान,' पुढें 'उडाण' झालें, आणि 'तट्टू' याचें 'टप्पू' झालें. 'फराळ' हा शब्द प्रथमतः 'फलाहार' याचें नीटपणें 'फळार' असें होऊन मग अक्षरें फिरून 'फराळ' असा झाला. आतां 'फळार' हा ग्राम्य शब्द ठरून 'फराळ' हा मात्र सभ्य ठरला आहे ! उपानह याचें उवाहन असें रूप होऊन मग वाहणा असें झालें.

क्वचित् एकाच शब्दाचे अगदीं उलट अर्थ होतात. 'पुढें' म्हणजे जवळच, समोर. 'डोळ्यांपुढें' यांत तो अर्थ आहे. पण 'रामाचें घर कुठें आहे ?' याचें उत्तर आपण 'अजून पुढें आहे' असें देतों;— म्हणजे अंतरावर आहे. इंग्रजींत hold fast आणि running fast यांमध्यें हाच प्रकार आहे. 'पुढील' म्हणजे अगदीं डोळ्यांपुढला. यापासून 'अन्य', 'दुसरा' असाही अर्थ झालेला दिसतो;—

'देखे पुढिलाचे अवगुण । आपुले न देखे दुर्गुण'.

—एकनाथ.

'नकोरे मना द्रव्य तें पुढिलाचें'. —रामदास.

कधीं कधीं निरनिराळ्या भाषांतील शब्दांचे रूपांत व अर्थांतही संबंधशून्य साम्य आढळून येतें, हें केवळ काकतालीय होय. अग्रेसर, नीट, आळी व रांग हे शब्द aggressor, neat, alley, rank' यांचीं प्रतिबिंबेंच काय असे दिसतात. पण त्यांचा परस्परसंबंध काडी-मात्र नाहीं. इंग्रजी 'अग्रेसर' आणि मराठी 'अग्रेसर' याचे अर्थही अगदीं भिन्न आहेत.

मार देणें या अर्थी चोपणें, ठोकणें, बडविणें, लंबे करणें इत्यादि शब्द आहेत. यांचे मूळ अर्थ आणि चालू अर्थ यांचा संबंध विचारणीय आहे. बडविणें हा वृध्=वाढविणें या धातू-पासून झालेलें असल्यास, लंबे करणे यांतील अर्थाशीं त्याचा संबंध उत्तम जुळतो! 'मारणें' याचा 'प्राण घेणें' हा मूळचा अर्थ कायम राहून शिवाय 'प्रहार करणें' इतका थोडका अर्थही त्या शब्दाला मिळाला आहे. इंग्रजींतल्या slay या शब्दाचा प्रकार अगदीं याच्या उलट आहे. मूळचा अर्थ strike 'प्रहार करणें', चालू अर्थ 'प्राण घेणें'. गुजराथींत वाढणें याचा अर्थ ठोक देणें. एकाद्या गुजराथी पाहुण्यास 'जिलब्या वाढा' म्हटलें असतां त्याला किती चमत्कारिक वाटेल! मराठींत 'वाढणें' म्हणजे पात्रांत पदार्थ असेल तो 'वाढविणें'. बांगड्या, कुंकू, यांच्यासंबंधानें 'वाढवणें' याचा जसा उपयोग होतो, तशाच प्रकारचा हा उपयोग दिसतो.

'छप्पर' आणि 'छपविणें' हे आरंभीं एकाच धातूपासून झालेले दिसतात. पण 'छप्पर' म्हणजे केवळ आश्रय किंवा छाया देणारें, आणि 'छपविणें' म्हणजे वाईट हेतूनें आश्रय देणें, लपविणें. इंग्रजींतला शब्द harbour याचा असाच प्रकार आहे.

'परिमल', 'वास' यांचा मूळ अर्थ वाईट-नाहीं. 'वास' याचा 'सुवास' याच अर्थी उपयोग असतो. पण मराठींत 'सकाळच्या दुधाला वास येऊं लागला', तसेंच कोकणांतील 'येथें कायसेंसें परमाळतें', यांत वाईट अर्थ आहे. 'घाण' हा शब्द मूळचा वाईट अर्थाचा असून कित्येक ठिकाणीं तो 'वास' अशा चांगल्या अर्थीही योजितात. मूळचा पदार्थ चांगला असून त्यास घाण येऊं लागल्यास आपण 'वास' हा

शब्द वापरतों. तुपास घाण येते असें न म्हणतां आपण तुपाष वा स येतो, तूप वा शे ळें आहे, असें म्हणतों.

भाकरी किंवा भाकर या शब्दाची चमत्कारिक व्युत्पत्ती सांगण्यांत येते. भाकरी म्हणजे भास्करी=सूर्याच्या आकाराची, वाटोळी; ती लहान असली म्हणजे चंद्राच्या आकाराची, चां दु क ली किंवा चां द की !

छांदिष्ट, आर्ष आणि बाष्कळ या तीन निंदावाचक शब्दांची चमत्कारिक ऐतिहासिक व्युत्पत्ती आहे. 'छंदस्' म्हणजे वेद. त्यांत पुढील संस्कृतांत नाहींत अशीं रूपें येतात, त्यांना 'छांदस' म्हणतात. यांनाच 'आर्ष' असा 'ऋषींनीं उपयोगिलेलीं रूपें' अशा अर्थाचा शब्द लावितात. यावरून अव्यवस्थित, स्वच्छंदी अशा मनुष्यांना छां दि ष्ट, आ र्ष अशीं विशेषणें योजण्यांत आलीं. सध्यां दोन्ही शब्दांचा अर्थ बराच भिन्न झाला आहे. 'छांदिष्ट' म्हणजे 'करीन तें करीन' असा वागणारा. 'छंद घेणें' असें जोडक्रियापद उत्पन्न होऊन त्याच्या आणि वर सांगितल्या अर्थाचा घोंटाळा होऊन हा अर्थ उत्पन्न झाला असावा. 'आर्ष' म्हणजे अव्यवस्थेनें, निजेल तेव्हां निजेल, उठेल तेव्हां उठेल, हवें तें किंवा हवें तितकें खाईल, अशा प्रकारें वागणारा.

पाठभेदामुळें ऋग्वेदाच्या 'शाकल' आणि 'बाष्कल' अशा दोन शाखा झाल्या आहेत. मराठी देशांतील ऋग्वेदी शाकल शाखेचे. 'बाष्कल' शाखेचे ऋग्वेदी क्वचित् अन्य प्रांतांतून इकडे येतात. त्यांची वेद म्हणण्याची तऱ्हा निराळी किंवा विलक्षण पाहून, त्यांना 'बाष्कळ' असें नांव पडलें. सध्या बा ष्क ळ याचा अर्थ विलक्षण प्रकारें, रीतिविरुद्ध, क्वचित् धर्माविरुद्ध वागणारा, असा झाला आहे. वार्षिक श्रावणीच्या वेळीं, बाष्कलांकरितां जास्त आहुती द्यावयाची असते. यामुळें श्रावणी चालविणारे आचार्य 'कोणी बा ष्क ळ आहेत काय ?' असा प्रश्न मुद्दाम विचारून हास्य उत्पन्न करीत असतात.

न व रा हा शब्द 'नव-वर' यापासून झाला. याचा उपयोग प्रथमतः वि वा हा च्या वे ळीं च होत असावा. पुढें याचा 'पती' या सामान्य अर्थी उपयोग होऊन, लग्नामध्यें 'नवरा-मुलगा' म्हणूं लागले—मग तो

'मुलगा' कोणत्याही वयाचा असो!—यापासून 'नवरी' असें स्त्रीलिंगी रूप झालें. याचा उपयोग केवळ विवाहाच्या वेळींच होतो, सामान्यतः बायको, पत्नी या अर्थी होत नाहीं. परंतु वऱ्हाड प्रांतांत असा सामान्य अर्थीही उपयोग आहे.

संस्कृतांत 'अन्य' म्हणजे 'दुसरें' अशा अर्थी 'अन्तर' शब्द पुढें येऊन समास होतात. 'भाषांतर' याचा अर्थ अन्य, दुसरी भाषा. हल्लीं मराठीमध्यें त्याचा अर्थ 'दुसऱ्या भाषेंत नेलेलें' अशा आणि 'दुसऱ्या भाषेंत नेण्याची क्रिया' असाही झाला आहे. अशाच प्रकारें 'वेषान्तर', 'रूपान्तर', 'गुणान्तर' यांचाही अर्थ झाला आहे.

धार्मिक शब्दांची व्युत्पत्तिः—विवाह या अर्थी मराठीमध्यें जे संस्कृत शब्द आहेत त्यांच्या अर्थावरून त्या धर्मसंस्काराचें स्वरूप लक्षांत येतें. विवाहास योग्य लग्नीं म्हणजे राशीला चंद्र व इतर ग्रह असले पाहिजेत. तो मुहूर्त बरोबर साधावयाचा असतो. म्हणून लग्न हा शब्द विवाहास आला. विवाह, उद्वाह या शब्दांवरून वर वधूला पित्याच्या घरून घेऊन जातो असा अर्थ दिसून येतो. विवाहहोमाच्या वेळीं वधूला घेऊन वर 'अमोऽहमस्मि सा त्वं०' या मंत्रानें अग्नीला प्रदक्षिणा घालितो. या प्रदक्षिणा लग्न कायम होण्यासाठीं जरूरीच्या आहेत. यासाठीं परिणय असें नांव पडलें. त्याचप्रमाणें वरानें वधूचा 'गृभ्णामि ते०' या मंत्रानें हस्तग्रहण करून तिचा स्वीकार करावयाचा, या कारणानें पाणिग्रहण शब्द आला.

मुंजीला उपनयन, व्रतबंध आणि मौंजिबंधन हे शब्द आहेत. गुरूजवळ नेऊन पोंचविणें यावरून 'उपनयन' हा शब्द आला. ब्रह्मचारिव्रत धारण करावयाचें यावरून 'व्रतबंध'. या वेळीं 'मुंज' नामक गवताचा कडदोरा कंबरेंत बांधावयाचा असतो, म्हणून 'मौंजिबंधन'. यावरून 'मुंज' हा लहानसा शब्द मराठींत कसा आला, हें मागें सांगितलें आहे.

वऱ्हाड हा शब्द वर-हाटक म्हणजे नवऱ्याबरोबरचा 'बाजार' म्हणजे मंडळीचा 'घोळका' यावरून झाला. तेव्हां नवरा निघाला कीं त्याच्याबरोबर खूपशी मंडळी जावयाची असें उघड दिसतें. हा शब्द

फार जुना आहे—पंचतंत्रांत सांपडतो. वन्हाड्यांपैकीं एका व्यक्तीस 'वन्हाडी' म्हणतात; त्याचें स्त्रीलिंगी रूप वन्हाडीण.

वर्षाकाळीं जैन, बौद्ध आणि ब्राह्मणधर्मी लोक एकाच ठिकाणीं राहून व्रतवैकल्यें करीत व करितात. या चार महिन्यांच्या काळाला 'वस्स' असें नांव पाली भाषेंत आहे. बायका या चार महिन्यांत जो धार्मिक नेम वगैरे पाळतात तो वसा आणि तो घेणारी ती वसोळी.

आपल्या आराध्य-देवतेपाशीं दिवसरात्र सेवा करीत राहावयाचें; त्या वेळीं देवतेपुढें पडलेलें फूल, फळ, तुळशीपत्र किंवा तीर्थ, जें सांपडेल तें भक्षण करून असावयाचें. हा उप-वास [ म्हणजे देवा-जवळ राहाणें ]. हल्लींचा आपला 'उपास' म्हणजे खूपसें गोड गोड फराळाचें करून अजीर्ण होईपर्यंत खावयाचें !

फराळ हा शब्द फल + आहार, केवळ फळें खाऊन राहाणें, असा मूळचा आहे. या शब्दाच्या अर्थाची बरीच अवनती झाली आहे. एकसारखें कांहीं तरी बका बका खात बसणें याअर्थीं 'कसलारे फराळ चालविला आहेस ?' असें आपण म्हणतों.

कांहीं खेडवळ शब्दांची व्युत्पत्तिः—उच्च प्रतीच्या लोकांच्या तोंडीं कित्येक शब्दांचीं जीं रूपें असतात, तीं वास्तवीक ठाकठीक, डौलदार घनविलेलीं असतात. त्यांचीं साधारण लोकांच्या किंवा खालच्या प्रतीच्या लोकांच्या तोंडीं असणारीं रूपेंच वस्तुतः मूळ स्वरूपाशीं अधिक जुळून असतात. यांचीं उदाहरणें व्याकरणांत आहेत. विवाहकार्यांत गुंतलेला तो विवाही. याचें साधें रूप वियाही. परंतु डौलदार रूप 'व्याही'. 'विवाही' याचें 'व्याही' बनण्यापूर्वीच 'वियाहीण' यावरून 'विहीण' हें स्त्रीलिंग बनलें. क्वचित् 'व्याहीण' असेंही कोणी म्हणतात.

'ज्योतिषी' यावरून प्रथम 'जोइशी' आणि मग टापटिपीचा 'जोशी' शब्द झाला. परंतु खालच्या लोकांच्या तोंडीं अजून 'जोइशी'च आहे. मराठा अमदानींतील दरबारी पत्रव्यवहारांत 'जोइशी' असेंच फार येतें.

वन्सें हा शब्द 'भगिनी-सम' यापासून झालेला दिसतो. याचें कुळंबी लोकांतलें रूप 'वईन्सें' [वहीण-शी], हें संस्कृतास जास्त जवळचें आहे. हा शब्द बहुमानासाठीं बहुवचनीं आहे तो ठीकच आहे. पण तो नपुंसकलिंगी कां झाला ?

'हृदय' याच्याशीं धैर्य, ताकद यांचा संबंध आहे अशी सर्व लोकांची समजूत आहे. यापासून झालेला 'हिय्या' शब्द मागें आलाच आहे. 'चेतस्' यापासून चे व असा शब्द झाला. Coeur-De-Lion म्हणजे 'सिंहाच्या हृदयाचा' म्हणजे मोठा धैर्यवान्, हें इंग्लिश इतिहासात प्रसिद्ध आहेच. ल्याटीन भाषेत cor, cordis म्हणजे हृदय. आफ्रिका आणि अमेरिका यातील नरमांसभक्षक रानटी लोक पराक्रमी शत्रूचा पराभव केल्यावर, त्याचें धैर्य आपल्यामध्यें यावें म्हणून त्याचें हृदय भक्षीत. भीमानें दुःशासनाच्या हृदयस्थ रक्ताचें पान केलें, तें याच समजुतीनें कीं काय, अशी शंका येणें साहजीक आहे.

मनुष्यास भीती वाटली असतां तो भ या भी त झाला असें आपण म्हणतों. हा शब्द वास्तविक 'भयभीत' असा असला पाहिजे. भयाभीत= भय + अभीत म्हणजे न भ्यालेला, असा भलताच अर्थ होईल.

चालू भाषेतला 'वि स्त व' आणि कुळंबी लोकातला 'वि स्तु' शब्द कसा आला याविषयीं वाद आहे. हा शब्द 'वैश्वदेव' यापासून झाला. 'वैश्वदेव' याचें 'विसदेओ' असें रूप मानभावांच्या ग्रंथात अनेक ठिकाणीं आलें आहे. त्याचें कुळंबी वगैरे लोकांत प्रथम 'विस्तु' झालें आणि मग 'विस्तव' झालें.

कां हीं कि र को ळ श ब्दः—एकाद्या गोष्टीला आळा घालणें म्हणजे थांबवणें. आ ळा हा शब्द नाम आहे, पण तो 'अलम्' या अव्ययावरून झाला आहे. एकादी गोष्ट थांबविण्यासाठीं 'अलम्' म्हणतात.

'मधुकर' म्हणजे भ्रमर. त्याच्या वृत्तीवरून घरोघर ओली भिक्षा (शिजलेलें अन्न) मागत फिरणारा तोही 'मधुकर' व त्याची वृत्ती 'मधुकरी.' पण सांप्रत त्याचें स्वरूप 'माधुकरी' झालें आहे, आणि तो जें अन्न जमवून आणितो, त्याला ही 'माधुकरी' म्हणतात.

'कलावंतीण' या शब्दांतलें 'कलावती' हें रूप पूर्ण अर्थाचें आणि स्त्रीलिंगी प्रत्यय लावलेलें असून, त्याला आणखी एक 'ईण' स्त्रीलिंगी प्रत्यय लाविला आहे, आणि एक अनुस्वारही दिला आहे. अशा रीतीनें अनुस्वारानें आणि क्वचित् जास्त प्रत्ययांनीं पोसट केलेले शब्द आढळतात.

'लांबणें' धातूवरून 'लांबे करणें' म्हणजे ठोक देणें असा शब्द झाला आहे. दुसरा एक 'लांबवणें' म्हणजे दूर नेणें, चोरून घेऊन जाणें, अशा अर्थाचा शब्द झाला आहे. इंग्रजींत अगदीं अशाच तऱ्हेनें झालेला 'Purloin' हा शब्द आहे.

'कूट' म्हणजे कोडें; त्याचा अर्थ कळायवास कठीण, असें वाक्य. त्यावरून 'खोटें' असा शब्द झाला, व त्याचा अर्थ फार निराळा झाला. खोटी गोष्ट बहुधा उलगडा होण्यास कठीण असते. यावरून असा अर्थ निष्पन्न झाला असावा.

'दारू' याचा मूळ अर्थ औषध असा आहे. प्रथमतः मद्य औषधा-करितां पिऊं लागतात, मग जास्त पिण्याची संवय होते. दारूबाज तरी दारू प्रथम औषध म्हणूनच पिऊं लागतात !

जातींतला कोणी मनुष्य अथवा जवळचा नातलग मेला असतां
कित्येक शब्दांचा जा गेल्यास मुंडन करण्याची चाल आहे. हें पवित्रीकरण
बनविलेली असतात. त्या— आहे. यावरून डोक्यावरील केस, मिशा वगैरे
प्रतीच्या लोकांच्या तोंडीं असणा 'मादरणें' असा शब्द उपयोगांत आला. त्याचा
जुळून असतात. यांची उदाहरणें व्या. साधारणतः मनुष्याच्या मुंडनास
गुंतलेला तो विवाही. याचें साधें रूप वि त्याचा पसूवे केस काढले अथवा
'व्याही'. 'विवाही' याचें 'व्याही' बनण्यापू ानें काढले, तरच त्यास 'मादरणें'
'विहीण' हें स्त्रीलिंग बनलें. क्वचित्
म्हणतात.

साहजीक इथच अर्थविपर्यास
यावरून प्रथम 'जोइशी' आ. असा अर्थ फिरलेला आहे.
ा. परंतु खालच्या लोकांच्या तों ेल्या शब्दांचा अर्थ आपणास
दानींतील दरबारी पत्रव्यवहारांत नाहीं, पण पूर्वी अशी स्थिती
नेवाडा असा आहे. आपण

ब्द —
ाला.
अनेक
स्तु' झालें

म्हणत होतों तें योग्य अथवा अयोग्य याचा निवाडा झाला, असा अर्थ होऊन 'अद्ल' घडली म्हणजे *अनुभव आला, खात्री पटली,* असा उपयोग सांप्रत होतो. मि स्कि ल याचा मूळचा अर्थ गरीब, निरुपद्रवी. हल्लीं दिसण्यांत गरीब दिसून आंतून लबाड असा अर्थ समजतात. चि ल द र याचा मूळ अर्थ 'उंच' असा आहे. हल्लीं वस्ताद, लबाड असा झाला आहे.

स मा हा र द्वं द्व स मा स घ टि त श ब्दः—एकादा शब्द घेऊन त्याच्या जवळजवळ अर्थाचा शब्द अथवा त्याचा अनुकरणवाचक शब्द पुढें *योजितात, आणि शब्द तयार करितात. या शब्दांनीं प्रथमपदानें दर्शित* पदार्थ आणि तसे आणखी पदार्थ असा, अथवा 'वगैरे' सारखा अर्थ बोधित होतो. असे शब्द मराठींत पुष्कळ तयार होतात. ते मोत्साहक, जोरदार असे असतात, आणि त्यांच्या योगानें वाक्यार्थाचें चांगलें पोषण आणि समर्थन होतें. आंधळापांगळा, म्हणजे अशा प्रकारचे पंगू लोक; सगासोयरा, कोणत्याही प्रकारचा नातेवाईक; लहानसान, बारिकसारिक—लहानसें, कसेंही असलें तरी चालण्यासारखें. अडोसी-पडोसी, भिकारीटाकारी, वईयाडा, सोयराधायरा, भाकरीचिकरी, दाणादुणा, पानपत्रावळ, मीठमिरची, इत्यादि. अशा प्रकारचे शेंकडों शब्द उपयोगात आहेत.

एकादें कृत्य एकसारखें चाललें आहे, अशा अर्थी धा तु श ब्दा ची द्वि रु क्ती करून शब्द बनवितात. असेही शब्द पुष्कळ असून त्यांचा *उपयोग चांगला असतो. जसें,—धावाधाव, पळापळ, बांधाबांध,* उडवाउडव, मारामार, तोंडातोंड, गोळागोळी, लाथालाथी, इत्यादि.

एकाद्या नामापुढें त्याचें निषेधार्थक नाम घालून संकलित अर्थाचे अथवा वि क ल्प बो ध क श ब्द बनवितात;—पानापान, न्यायान्याय, भक्ष्याभक्ष्य, ग्राह्याग्राह्य, भवतिनभवति, येरझारा, होय-ना, इत्यादि.

व्या क र णा न्त रः—एकादा शब्द किंवा कित्येक शब्द व्याकरणाच्या दृष्टीनें विवक्षित प्रकारचे असून भाषेंतल्या उपयोगावरून त्याचें चमत्कारिक रीतीचें व्याकरणान्तर बनतें, आणि उपयोगाच्या दृष्टीनें भाषेचें मोठें काम होतें. असे शब्द बरेच बनलेले आहेत:—हांजीहाजी, म्हणजे

आग्रह काय म्हणून असावा? हें मत अगदीं चुकीचें आणि भाषेच्या वाढीस प्रतिबंधक आहे. जगांतील विद्या, कला, आणि तद्विषयक वाङ्मय यांची वाढ जर एकसारखी चालली आहे, आणि तत्संबंधाच्या गोष्टी जर आपल्या भाषेंत आल्याच पाहिजेत असें आहे, तर नवीन शब्दही आलेच पाहिजेत. इंग्रजी भाषेंत नवीन शब्द घेणें, बनविणें आणि जुन्या शब्दांत कमजास्त फेरफार करून किंवा क्वचित् फेरफार न करितांही त्यांना नवीन अर्थ जोडणें, हें सारखें चालू आहे. त्या भाषेंत असे शेंकडों नवीन शब्द दरवर्षी भाषेमध्यें येतात. मराठीला नवीन शब्द हवे असल्यास संस्कृताच्या साह्यानें ते बनविण्याची उत्तम सोय आहे. शिवाय हवे तर परकी शब्दही घ्यावे. यासंबंधानें अन्यत्र जास्त चर्चा आली आहे. तेव्हां मागें सांगितल्याप्रमाणें नवीन प्रकारचीं क्रियापदें बनविण्यास वास्तविक कांहीं प्रत्यवाय नाहीं. मात्र तीं व्यवस्थितपणें बनविलीं पाहिजेत. जुन्या संस्कृतांत स्वतंत्र क्रियापदांचा उपयोग फार असे. पुढील संस्कृतांत मूळ क्रियापदाचा उपयोग कमी होऊन धातुसाधितांनीं क्रियार्थ आणण्याची चाल वाढली, आणि तोच प्रकार प्राकृतांत आणि त्यानंतर चालू देशी भाषांत आला. यामुळें मराठींत साधीं आणि धातुसाधित नामें आणि विशेषणें व साह्य क्रियापदें यांच्या जुळणीनें पुष्कळ क्रियापदें बनूं लागलीं. अलीकडे इंग्लिश भाषेचा प्रसार झाल्यावर मराठींत असलीं जोड क्रियापदें गैर-सोयीचीं आहेत असें वाटून मागें सांगितल्याप्रमाणें नामधातु जास्त करण्याची प्रवृत्ती सुरू झाली आहे. संस्कृतांत प्रातिपदिकास 'अय' वगैरे प्रत्यय लावून अथवा प्रत्यय न लावितां मूळचें प्रातिपदिक धातु समजून क्रियापदें बनवितात. तोच प्रकार पालींत आहे आणि पुढें मराठींतही आला आहे. संस्कृतांत मालाति, विषवति, सवितरति, दिनति, यामिनयति, अशीं, मूळ नामेंच धातु मानून उपयोगिलेलीं रूपें आहेत. पालीमध्यें 'वाहेति', 'येतेति', 'परियोसानति', 'सारज्जति', 'सत्तरारति', 'उपक्कमालति', अशा तऱ्हेचीं नामधातूंचीं रूपें आहेत. उत्तरणें–उत्तर देणें, उद्धारणें–उद्धार काढणें, उपयोगिणें–उपयोग करणें, प्रमाणणें–प्रमाण सांगणें, आमंत्रणें–आमंत्रण देणें, बोलाविणें,

( आवंतणें–बोलावणें असा जुना उपयोग आहे.) आनंदणें–संतोषणें, अशा प्रकारचे धातू सांप्रत बनवितात आणि अधिकाधिक बनविले जाण्याचा संभव आहे. याविषयीं असा नियम ठरविणें इष्ट दिसतें कीं नाम किंवा विशेषणें आणि साह्य क्रियापद यांच्या जुळणीनें जीं जोडक्रियापदें सांप्रत भाषेमध्यें उपयोगांत आहेत, त्यांच्या जागीं अशीं क्रियापदें केलेलीं नीट दिसतात. जसें, उत्तर देणें, उत्तरणें; उपयोग करणें, उपयोगिणें; पारख करणें, पारखणें; झोंप घेणें, झोंपणें; इत्यादि. तथापि यासंबंधानें कांहीं नियम घालण्याचें कारण नाहीं. हा भाषेच्या सोयीचा प्रकार आहे. तसेंच, असले नवीन प्रकार हवा तो मनुष्य करण्यास धजावणार नाहीं. कसलेला लेखकच असा नवीन शब्द करूं धजावेल; आणि असा शब्द लोकांना बरा वाटला तरच उपयोगांत येईल नाहींतर गळेल हें उघडच आहे.

# भाग चौथा



# वाङ्मयघटना–पूर्वार्ध

## १–वाङ्मयाचें साधारण स्वरूप

प्रस्तुत विभागामध्यें मराठी वाङ्मय–घटना कशी होत गेली आणि त्या घटनेला कोणीं कशा प्रकारचें साह्य केलें, हें सांगावयाचें आहे. त्यासाठीं प्रथमतः वाङ्मयाचें स्वरूपवर्णन थोडक्यांत केलें पाहिजे. वास्तवीक पाहिलें तर वाङ्मयासंबंधीं विचार करणें हें प्रस्तुत ग्रंथाच्या मर्यादेच्या बाहेरचें आहे. तें वाङ्मयाच्या इतिहासाचें काम आहे. तथापि मराठींत तसा इतिहास अद्यापि लिहिला गेला नाहीं; आणि भाषेच्या घटनेला कोणीं कसें साह्य केलें, हें सांगतांना वाङ्मयाच्या निरनिराळ्या अंगांचा उल्लेख येणार; त्याकरितां एकंदर वाङ्मयाची साधारण स्वरूपमर्यादा दृष्टीपुढें रेखाटून ठेविली पाहिजे. ह्मणून प्रथमारंभीं थोडें विषयांतर करणें जरूर आहे.

मागें सांगण्यांत आलें आहे कीं, मराठी भाषेच्या शब्दांची आणि रूपांची घटना संस्कृतावरून झालेली आहे, त्याचप्रमाणें तिचें वाक्यरचनेचें मूळधोरणही संस्कृतावरूनच ठरलें आहे. तथापि संस्कृत ही चालू भाषा नाहीं; मराठीला इंग्रजी या सर्वमान्य चालू भाषेची संगती प्राप्त झाली आहे, यामुळें मराठीच्या वाङ्मयाची वाढ इंग्रजी वाङ्मयाच्या धोरणानें होत आहे. संस्कृत वाङ्मयाकडे पाहिलें तर त्या भाषेंत काव्यें, नाटकें, पुराणें, वेदान्तादि तत्वज्ञानविषयक ग्रंथ, वगैरे वाङ्मय विपुल आहे, आणि तत्संबंधीं विचारांचे साहित्यादि शास्त्रावरील ग्रंथही आहेत. परंतु ते केवळ एकांगी आणि कायम ठशांचे बनलेले

असून, मराठीसारख्या रात्रंदिवस वाढती असणाऱ्या भाषेच्या उन्नतीला आणि प्रगतीला फारसे साह्यभूत होण्यासारखे नाहींत. संस्कृतांतील या वाङ्मयसाहित्याचें मराठीला म्हणण्यासारखें साह्य झालेलें नाहीं. संस्कृत साहित्याचे ज्ञाते जे संस्कृत पंडीत त्यांना मराठीचा तिटकारा असे. त्यांनीं मराठींत ग्रंथरचना केली नाहीं. आमचे मराठी कवी साधुसंत पडले. त्यांना साहित्याच्या साह्याची परवा नव्हती. त्यांनीं अथवा मुक्तेश्वर, श्रीधर, वामन यांच्यासारख्यांनींही साध्या उपमा, दृष्टांत, रूपकें, यांपलीकडे साहित्याचें साह्य घेतलें नाहीं. मोरोपंतानें मात्र आपली कवितावधू अलंकारांनीं सजविण्याचा उत्तम प्रयत्न केला आहे व तो चांगला साध्यही झाला आहे. मोरोपंतानें या जुन्या मृतवत साहित्य-सामग्रीला नवीन जीव भरला आहे असें दिसून येईल. सांप्रत मराठी भाषा इंग्रजीच्या साह्यानें फैलावत आहे. इंग्रजीच्या धोरणानेंच तिची वाढ आणि उन्नती होणार आहे. तेव्हां इंग्रजीच्या गद्य-पद्य-रचनेचे प्रकार कोणते आहेत हें पाहूं. हें विवेचन केवळ इंग्रजी भाषेच्या संबंधानें करावयाचें नसून, तें मराठी भाषेच्या जुन्या आणि चालू वाङ्मयाला आणि त्याच्या उन्नतीला जुळेल असें करावयाचें आहे.

विवेचनाच्या सोयीसाठीं मराठी वाङ्मयाचे प्राचीन व अर्वाचीन असे दोन प्रकार समजूं. प्राचीन म्हणजे इंग्रजी राज्यस्थापनेच्या अगोदरचें आणि अर्वाचीन म्हणजे नंतरचें. त्यांतही आणखी पद्यवाङ्मय आणि गद्यवाङ्मय असे भाग प्रत्येकीं मानिले पाहिजेत. इंग्रजी राज्य होण्या-पूर्वी आपल्या समाजाची एक प्रकारची स्थिती होती, आणि त्यानंतर अगदीं दुसऱ्या प्रकारची होत गेली आहे, आणि भाषेचे पद्य आणि गद्य हे दोन प्रकार रचनेच्या दृष्टीनें बरेच भिन्न आहेत.

कोणत्याही लोकांच्या विचारांचे धार्मिक आणि व्यावहारिक असे दोन प्रकार असतात. तसे ते वाङ्मयाचेही असतात. अगदीं आरंभींचें वाङ्मय धार्मिक होतें. पुढें इंग्रजी राज्यस्थापनेच्या अगोदरच त्याला धार्मिक आणि व्यावहारिक अशीं दोन निरनिराळीं स्वरूपें प्राप्त झालीं होतीं. आमच्या लोकांनीं धर्म आणि व्यवहार या गोष्टी अगदीं भिन्न मानलेल्या नाहींत. तसेंच वाङ्मय म्हटलें कीं तें पद्यमय असावयाचें,

अशी एक समजूत, आणि कविता म्हटली की ती अध्यात्मविषयपर असावी अशी दुसरी समजूत. यामुळें हे दोन प्रकार प्रथमतः तितके भिन्न नव्हते. ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ, यांचें काव्य धार्मिक आहे. मुक्तेश्वराचें काव्य केवळ व्यावहारिक आहे. वामन आणि मोरोपंत हे सन्तकवी नव्हत, तरी त्यांच्या काव्यांमध्यें धार्मिक विचार पुष्कळ आहेत. सांप्रत हे दोन प्रकार अगदीं निराळे झाल्यासारखे आहेत. इंग्रजी वाङ्मयाचीही प्रथमारंभीं अशीच स्थिती होती. युरोपांतील भिन्न भिन्न देशांत प्रथमतः ख्रिस्तीधर्माच्या प्रसाराबरोबर वाङ्मय सुरू झालें. तें सर्व धर्मोपदेशकांच्या हातीं होतें. त्याची बनावट करणारेही धर्मगुरूच असत. पृथ्वी फिरते कीं स्थीर आहे, या गोष्टीपासून तों मनुष्याच्या आत्म्यास मरणानंतर कोणती स्थिती प्राप्त होणार, येथपर्यंतचे सर्व निर्णय धर्मगुरू करीत. हा प्रकार तिकडेही आमच्या इकडच्या सारखाच पदलून इंग्रजी वाङ्मय सुमारें पंधराव्या शतकानंतर धर्मापासून अलग होत गेलें; आणि मुद्रणकला उत्पन्न झाल्यानंतर तें अगदीं निराळें झालें, आणि त्याची वाढही अपरंपार झाली.

मराठी वाङ्मय पद्यमय आणि गद्यमय आहे. पद्यमय म्हणजे ज्यांतील वाक्यरचना नियमित अक्षरांची व शब्दांची असते, असें वाङ्मय. गद्य म्हटलें म्हणजे त्यांत अशा प्रकारचा ठरलेला नियमितपणा नसतो. पद्याला कविता असेंही म्हणतात. परंतु कविता अथवा काव्य हें अगदीं निराळें. काव्य म्हणजे सरस, मनोहर असें वाङ्मय. काव्य याची शास्त्रीय व्याख्या अनेक ठिकाणीं केलेली आहे. तिचें आणखी विवेचन येथें करण्याची जरूरी नाहीं. पद्य, कविता आणि काव्य यांतला भेद मात्र स्पष्ट केला पाहिजे. कविता हा शब्द पद्याला लावितात आणि काव्यालाही लावितात. वाङ्मयसंबंधीं चर्चेत ह्या शब्दाचे भिन्न अर्थ लक्षांत ठेविले पाहिजेत. हरीभाऊ आपटे यांनीं काव्याचे घटकावयव तीन सांगितले आहेत. नाद, अर्थ आणि ध्वनी. चांगलें काव्य होण्यास या तीन घटकावयवांची अथवा गुणांची योग्य घटना असावी लागते. नाद म्हणजे वाक्यांतील शब्दांची यथायोग्य जुळणी. ही कानाला गोड लागली पाहिजे आणि त्यांत अर्थमाधुर्य ही

पाहिजे. अर्थात् वर्णावयाच्या विषयाला जुळेल असे शब्द वाक्यामध्यें घातलेले पाहिजेत. त्याचप्रमाणें शब्दांना विषयानुरोधानें य था यो ग्य अ र्थ अ स ला पाहिजे. वाक्य ऐकिलें कीं भावार्थ ध्यानांत यावा. अशा गुणाला प्र सा द असेंही म्हटलें तरी चालेल. तिसरा गुण ध्व नी; म्हणजे काव्यरचनेमध्यें कांहींतरी विशेष अर्थ मनांत उत्पन्न झाला पाहिजे, अथवा वाचकाची हृदयस्थ सं वे द ना जागृत झाली पाहिजे. या गुणाला संस्कृत अलंकारशास्त्रांत व्यं ग्य असेंही म्हटलें आहे; आणि हें व्यंग्य जाणण्याचा किंवा कवीच्या भावनेशीं तन्मय होण्याचा जो वाचकाचा धर्म त्याला स हृ द य ता असें म्हणावें. काव्य हें पद्यमयच असावें असें नाहीं. काव्याचे हे जे गुण, ते त्यांत साधले आहेत अशी रचना गद्यमय किंवा पद्यमय कशीही असली तरी तें काव्य होय. तथापि काव्य हें पद्यमय असतें अशी साधारण समजूत आहे आणि सांप्रत आपला एकमेकांचे विचार एकमेकांस कळविण्याचा व्यवहार गद्यमार्गेत चालतो, यामुळें गद्य हें पद्यापासून अगदीं निराळें झालें आहे; आणि गद्य कितीही सरस आणि मनोवेधक असलें तरी त्याला सहसा कोणी 'काव्य' म्हणत नाहीं.

आमचें प्राचीन मराठी वाङ्मय पद्यमय आहे, ज्यांत काव्य नाहीं अशा प्रकारची—के व ळ ग द्या ला शो भ ण्या सा र खी—ग्रंथरचनाही पद्यमय आहे. अर्वाचीन वाङ्मय इंग्रजीच्या धोरणावर होत आहे. त्यांतलें काव्यही इंग्रजी काव्यरचनेच्या धर्तीवरच बनत आहे. काव्य याची आमची जुनी संस्कृत व्याख्याही आधुनिक इंग्रजी व्याख्येहून निराळी आहे. संस्कृतांत किंवा मराठींत कांहींतरी रस उत्पन्न झाला कीं का व्य झालें. इंग्रजी साहित्याप्रमाणें काव्य होण्यास जास्त गुण लागतात. वर्डस्वर्थ कवी काव्य याची व्याख्या अशी करितो:–"आपण शांतपणें बसलों असतां आपल्या मनांत उद्भवणाऱ्या प्रबळ संवेदनांचा जो सहजोत्सेक तें का व्य", अशी काव्याची पाश्चात्य व्याख्या दृष्टीपुढें घेतली म्हणजे तिकडली कविता आपल्या कवितेपेक्षां अगदींच भिन्न दिसूं लागते.

इंग्रजी साहित्यांत प्रथमतः काव्याचे Subjective आणि Objective असे दोन विभाग करितात. पहिल्यांत कवी स्वतांच्या विचारांतच गुग असतो. त्यानें जरी वर्णनासाठीं बाह्यवस्तू घेतल्या, तरी त्यांचें विवरण तो आपल्या स्वतांच्या मनोभावनेप्रमाणें करितो, आणि काव्याचें सर्व पर्यवसान कवीच्या मनोवृत्तीप्रमाणें आणि विचारांप्रमाणें होत असतें. दुसऱ्या प्रकारांत कवी बाह्यवस्तूंस किंवा व्यक्तींस प्राधान्य देऊन, त्यांची जशी स्थिती मानलेली असेल तशीच, अथवा त्या स्थितीच्या धोरणानेंच त्याचा परिवार कल्पून, वर्णन करितो. या दोन प्रकारच्या काव्यरचनेस आपण भावनात्मक काव्य आणि वर्णनात्मक काव्य अशीं अनुक्रमें नांवें देऊं. आमच्या इकडे हे दोन स्वतंत्र भेद मानलेले नाहींत. तसेंच प्राचीन मराठी काव्य पौराणीक कथांवर रचलेलें आहे, यामुळें तें मुख्यतः वर्णनात्मक आहे. अर्वाचीन काव्य मात्र पुष्कळसें पहिल्या प्रकारचें होत आहे. प्राचीन काव्यांतही कवींनीं प्रसंगानुरूप आपल्या मनोभावनांप्रमाणें वर्णनें केलीं आहेत, आणि भावनात्मक जुनी कविताही निर्माण झाली आहे. मात्र ती स्वतंत्र निवडून काढण्यासारखी नसून केवळ प्रासंगीक किंवा गर्भित आहे.

आमचे मराठी कवी स्वभाषेमध्यें संस्कृतांतील ज्ञान आणावयाचें या अभिमानानें प्रेरित झाले होते. त्यांनीं स्वतांची सृष्टी फारशी निर्माण केली नाहीं. त्यांनीं ज्ञान, कथा, चरित्रें, चरित्रनायक, वर्णनें वगैरे सर्व सामुग्री संस्कृतांतून घेतली आहे आणि जशीच्या तशीच उठवून दिली आहे.

भावनात्मक कवितेमध्यें Sonnet, Ode आणि Lyric असे तीन प्रकार असतात. Sonnet हें वास्तविक रचनेवरून किंवा छंदावरून पडलेलें नांव आहे. चौदा ओळींचा एक छंद असतो, त्यास Sonnet म्हणतात. Sonnet हें नियमबद्ध Lyric च होय. Ode म्हणजे स्तोत्र. एकाद्या देवतेचें, भावनेचें, वस्तूचें अथवा व्यक्तीचें स्तुतिमय वर्णन, तें Ode. Lyric म्हणजे एकाद्या वस्तूचें, व्यक्तीचें, प्रसंगाचें तत्त्वाचें अथवा भावनेचें मनोवेधक वर्णन. ते असें सुंदर असावें कीं तें कवी किंवा गायक वारंवार गुणगुणत असतो आणि त्यामध्यें सत्याचा विजय, नीतिबद्ध सच्चरित इत्यादि ग्रथित असतात. मराठी-

पाहिजे. अर्थात् वर्णावयाच्या विषयाला जुळेल असे शब्द वाक्यामध्यें घातलेले पाहिजेत. त्याचप्रमाणें शब्दांना विषयानुरोधानें यथायोग्य अर्थ असला पाहिजे. वाक्य ऐकिलें कीं भावार्थ ध्यानांत यावा. अशा गुणाला प्रसाद असेंही म्हटलें तरी चालेल. तिसरा गुण ध्वनी; म्हणजे काव्यरचनेमध्यें कांहींतरी विशेष अर्थ मनांत उत्पन्न झाला पाहिजे, अथवा वाचकाची हृदयस्थ संवेदना जागृत झाली पाहिजे. या गुणाला संस्कृत अलंकारशास्त्रांत व्यंग्य असेंही म्हटलें आहे; आणि हें व्यंग्य जाणण्याचा किंवा कवीच्या भावनेशीं तन्मय होण्याचा जो वाचकाचा धर्म त्याला सहृदयता असें म्हणावें. काव्य हें पद्यमयच असावें असें नाहीं. काव्याचे हे जे गुण, ते ज्यांत साधले आहेत अशी रचना गद्यमय किंवा पद्यमय कशीही असली तरी तें काव्य होय. तथापि काव्य हें पद्यमय असतें अशी साधारण समजूत आहे आणि सांप्रत आपला एकमेकांचे विचार एकमेकांस कळविण्याचा व्यवहार गद्यभाषेंत चालतो, यामुळें गद्य हें पद्यापासून अगदीं निराळें झालें आहे; आणि गद्य कितीही सरस आणि मनोवेधक असलें तरी त्याला सहसा कोणी 'काव्य' म्हणत नाहीं.

आमचें प्राचीन मराठी वाङ्मय पद्यमय आहे, ज्यांत काव्य नाहीं अशा प्रकारची–केवळ गद्याला शोभण्यासारखी—ग्रंथरचनाही पद्यमय आहे. अर्वाचीन वाङ्मय इंग्रजीच्या धोरणावर होत आहे. त्यांतलें काव्यही इंग्रजी काव्यरचनेच्या धर्तीवरच बनत आहे. काव्य याची आमची जुनी संस्कृत व्याख्याही आधुनिक इंग्रजी व्याख्येहून निराळी आहे. संस्कृतांत किंवा मराठींत कांहींतरी रस उत्पन्न झाला कीं काव्य झालें. इंग्रजी साहित्याप्रमाणें काव्य होण्यास जास्त गुण लागतात. वर्डस्वर्थ कवी काव्य याची व्याख्या अशी करितोः–"आपण शांतपणें बसलों असतां आपल्या मनांत उद्भवणाऱ्या प्रबळ संवेदनांचा जो सहजोत्सेक तें काव्य", अशी काव्याची पाश्चात्य व्याख्या दृष्टीपुढें घेतली म्हणजे तिकडली कविता आपल्या कवितेपेक्षां अगदींच भिन्न दिसूं लागते.

उदात्त चरित अथवा वीरचरित अशीं नांवेंही चालतील. जुन्या कवितेंतल्या सारख्या लहान लहान कथा यांना 'आख्यानें' असें म्हणावें आणि मोठालीं काव्यें असल्यास त्यांना 'महाकाव्यें' असें म्हणावें.

इंग्रजींत Elegy म्हणजे शोकमय काव्य असतें. असलें काव्य संस्कृतांतही पुष्कळ आहे. भामिनीविलासामधील करुणमय प्रकरणाचें आणि रघुवंशांतील आठव्या सर्गाचें भाषांतर मराठींत झालें आहे. अर्वाचीन वाङ्मयामध्यें असलीं काव्यें बरींच झालीं आहेत. याला मराठींत शोकगीत असें म्हणावें.

इंग्रजींत काव्याचे Tragedy आणि Comedy असे दोन भेद करीत असतात. ज्या काव्यात करुणरस प्रधान असतो त्याला Tragedy आणि ज्यांत विनोद, हास्य हे सुखदायी रस प्रधान असतात त्याला Comedy असें म्हणतात. यांमध्यें कथासंबंध असा असतो कीं त्याच्या ओघानेंच गोष्टींचा अंत करुणेमध्यें अथवा सुखामध्यें व्हावा. असलीं काव्यें बहुधा नाटकें असतात. मराठींत Tragedy यास करुणान्त काव्य आणि Comedy यास सुखान्त काव्य अशीं नांवें द्यावीं. संस्कृतांत काव्याचा किंवा नाटकाचा अन्त शोककारक असू नये असा नियम आहे. अर्थात् मराठींत संस्कृतांतून आलेलीं असलीं काव्यें किंवा नाटकें नाहींत, आणि 'करुणान्त काव्य' असू नये, अशीच समजूत झालेली आहे. परंतु इंग्रजीच्या सहवासानें यापुढें मराठींत 'करुणान्त' आणि 'सुखान्त' अशीं दोन्ही काव्यें आणि नाटकें उत्पन्न होणें साहजीक आहे, आणि तसें होतही आहे. Comedy याचा अगदीं शब्दार्थ करू गेल्यास त्याला प्रहसन हा संस्कृत शब्द जुळेल. पण तो Comedy या शब्दाच्या चालू अर्थाशीं जुळणार नाहीं. प्रहसन म्हणजे हास्यरसोत्पादक अल्पकथा. पण Comedy म्हणजे ज्याचा अन्त सुखदायक आहे असें सर्वांगपूर्ण आख्यान. हे बरेंच विस्तृत असें 'काव्य' अथवा 'नाटक' असावें लागतें.

आता काव्य आणि नाटक याच्या स्वरूपामधील भेद सांगितला पाहिजे. काव्य म्हणजे कवीनें आपल्या भाषेनें एखादी कथा सांगणें. यामध्यें संवाद असतात. पण ते कविवर्णितच असतात. नाटक म्हणजे

मध्यें ode म्हणजे स्तोत्र sonnet म्हणजे पद किंवा पद्य आणि lyric म्हणजे गीत अशीं नावें योजावीं. या तिन्ही प्रकारच्या कविता बहुधा थोडक्यांत लहान लहान असतात.

हे तिन्ही प्रकार प्राचीन कवितेंत विपुल आहेत. तुकारामाचे शेकडों अभंग या तिन्ही प्रकारांमध्यें येतील. त्याचप्रमाणें निरनिराळ्या कवींचीं अनेक पदें आहेत. मोरोपंताची केकावली हें एक सुंदर स्तोत्र आणि गीत-मालिका आहे. मोरोपंताचीं साधूंच्या व देवतांच्या स्तुतीपर अनेक स्तोत्रें ( Odes ) आहेतच. मराठींत शृंगारपर आणि वैराग्यपर पदें आणि लावण्याही पुष्कळ आहेत.

आमच्या कवींचीं पौराणिक आख्यानें ही वर्णनात्मक कविता होय. मुक्तेश्वर, श्रीधर, महिपती, वामन, रघुनाथ पंडित व मोरोपंत यांचा सर्व भर आख्यानांवर आहे. मधून मधून यांनीं सहजवृत्त्या भावनात्मक काव्यही विपुल निर्मिलें आहे.

पाश्चात्य काव्यांत Epic म्हणून एक काव्याचा प्रकार आहे. हीं काव्यें बहुधा विस्तृत असून त्यांत ट्रोजन वार, ख्रिस्तीशास्त्रांतली सैतान आणि देव यांची स्पर्धा, आपलेकडील भारतीय युद्ध आणि रामकथा, असे लांब विषय असतात. Epic यामध्यें एक अथवा अनेक वीर किंवा पराक्रमी पुरुष यांचें उदात्त चरित मुख्यत्वें वर्णिलेलें असतें. पाश्चात्य Epic याच्या लक्षणाशीं अगदीं बरोबर जुळणारें असें Epic काव्य आमच्या इकडे संस्कृतांत आणि मराठींत जरी नाहीं, तरी त्याच्याशीं जवळ जवळ जुळणारें काव्य पुष्कळ आहे. तिकडील Epic आणि आमच्याकडलें Epic यांमध्यें जो भेद आहे, तो केवळ राष्ट्र-भिन्नतेचा परिणाम आहे, असेंच मानिलें पाहिजे. संस्कृतांतील महाभारत आणि रामायण हीं प्राचीन महाकाव्यें, निरनिराळ्या पुराणांचा पुष्कळ भाग व रघुवंश इत्यादि अर्वाचीन महाकाव्यें हीं Epic होत. प्राचीन मराठींत असलीं विस्तृत काव्यें नाहींत, पण आपलीं आख्यानें हीं लहान लहान Epic आहेत. अर्वाचीन मराठींत राजा शिवाजी, यशवंतराव अशीं कांहीं महाकाव्यें झालीं आहेत. Epic यास संस्कृतांत महाकाव्य असें नांव आहे, तेंच मराठींत योजिलें आहे.

उदात्त चरित अथवा वीरचरित अशीं नांवेंही चालतील. जुन्या कवितेंतल्या सारख्या लहान लहान कथा यांना 'आख्यानें' असें म्हणावें आणि मोठालीं काव्यें असल्यास त्यांना 'महाकाव्यें' असें म्हणावें.

इंग्रजींत Elegy म्हणजे शोकमय काव्य असतें. असलें काव्य संस्कृतांतही पुष्कळ आहे. भामिनीविलासामधील करुणमय प्रकरणाचें आणि रघुवंशांतील आठव्या सर्गाचें भाषांतर मराठींत झालें आहे. अर्वाचीन वाङ्मयामध्यें असलीं काव्यें बरींच झालीं आहेत. याला मराठींत शोकगीत असें म्हणावें.

इंग्रजींत काव्याचे Tragedy आणि Comedy असे दोन भेद करीत असतात. ज्या काव्यांत करुणरस प्रधान असतो त्याला Tragedy आणि ज्यांत विनोद, हास्य हे सुखदायी रस प्रधान असतात त्याला Comedy असें म्हणतात. यांमध्यें कथासंबंध असा असतो कीं त्याच्या ओघानेंच गोष्टीचा अंत करुणेमध्यें अथवा सुखामध्यें व्हावा. असलीं काव्यें बहुधा नाटकें असतात. मराठींत Tragedy यास करुणान्त काव्य आणि Comedy यास सुखान्त काव्य अशीं नांवें द्यावीं. संस्कृतांत काव्याचा किंवा नाटकाचा अन्त शोककारक असूं नये असा नियम आहे. अर्थात् मराठींत संस्कृतांतून आलेलीं असलीं काव्यें किंवा नाटकें नाहींत, आणि 'करुणान्त काव्य' असू नये, अशीच समजूत झालेली आहे. परंतु इंग्रजीच्या सहवासानें यापुढें मराठींत 'करुणान्त' आणि 'सुखान्त' अशीं दोन्ही काव्यें आणि नाटकें उत्पन्न होणें साहजीक आहे, आणि तसें होतही आहे. Comedy याचा अगदीं शब्दार्थ करूं गेल्यास त्याला प्रहसन हा संस्कृत शब्द जुळेल. पण तो Comedy या शब्दाच्या चालू अर्थाशीं जुळणार नाहीं. प्रहसन म्हणजे हास्यरसोत्पादक अल्पकथा. पण Comedy म्हणजे ज्याचा अन्त सुखदायक आहे असें सर्वांगपूर्ण आख्यान. हें बरेंच विस्तृत असें 'काव्य' अथवा 'नाटक' असावें लागतें.

आतां काव्य आणि नाटक यांच्या स्वरूपांमधील भेद सांगितला पाहिजे. काव्य म्हणजे कवीनें आपल्या भाषेनें एकादी कथा सांगणें. यामध्यें संवाद असतात. पण ते कविवर्णितच असतात. नाटक म्हणजे

तीच कथा त्यांत गुंतलेल्या भिन्न भिन्न पात्रांच्या संवादाच्या रूपानें प्रत्यक्ष पुढें आणून हुबेहूब घडत आहे असें दाखविणें. काव्य म्हटलें कीं तें संथपणें बसून वाचावयाचें किंवा वाचलेलें ऐकावयाचें. नाटक म्हणजे प्रत्यक्ष दाखविलेलें पाहावयाचें. संस्कृतांत यांना श्राव्य आणि दृश्य अशीं नांवें पडलीं आहेत. अर्थात् नाटक हें भावनात्मक आणि वर्णनात्मक काव्याचें मिश्रण असतें. नाटककार एकादी पौराणिक कथा घेतो, आणि मग तींत आपल्या भावनेप्रमाणें प्रसंग कल्पून नाटकाची रचना करितो. यामुळें नाटकांत स्तोत्र, पद, गीत, करुणान्त अथवा सुखान्त काव्य, या सर्व प्रकारांना स्थान मिळतें. संस्कृतांत नाटकाला एक प्रकारचें उच्चतरूप प्राप्त झालेलें होतें. तथापि आपल्यामध्यें पाश्चात्य संसर्गानें जी नवीन आवड उत्पन्न झाली आहे, तिच्या कसाला उत्तम संस्कृत नाटकही पुरें पडणार नाहीं. पाश्चात्य देशांत नाटक पूर्ण दशेस पोंचलेलें आहे. नाटक म्हणजे मनुष्यस्वभावाचें आणि संसाराचें चित्र; आणि प्राच्य आणि पाश्चात्य देशांतील जनस्वभाव राष्ट्रीय उलाढाली आणि समाज-परिस्थिती या फार भिन्न, यामुळें दोन्हींकडील नाटकांची रचनाही पुष्कळ भिन्न झाली आहे. ऐश्वर्यसुखांत आणि शांततेंत असणारा आमचा कालिदास कोणीकडे, आणि जगाच्या नानाप्रकारच्या उचनीच दशांच्या फेऱ्यांत आणि घालमेलींत असलेला शेक्सपीअर कोणीकडे ? अशा दृष्टीनें पाहिल्यास तिकडील नाटकें आणि आमचीं नाटकें यांमध्यें फार अन्तर आहे असें दिसून येईल. तथापि एकादी कथा प्रत्यक्ष घडत आहे असें दाखवून तिच्या परिणामाच्या द्वारें प्रेक्षकांस सुबोध करणें हा नाटकाचा मूळ हेतु दोन्हींकडे एकच असतो. मराठींत संस्कृत नाटकांचीं भाषांतरें झालीं आहेत, व त्या भाषेंतील धर्तीवर मराठी नाटकें होत आहेत. त्याचप्रमाणें मराठींत इंग्रजी नाटकांचीं भाषान्तरें आणि त्यांच्या नमुन्यावर नाटकें झालीं आहेत व होत आहेत. यामुळें दोहींमधील भेद आपणास उत्तरोत्तर जास्त कळत चालला आहे.

मराठींतले पोवाडे सर्वांस माहीत आहेत. इंग्रजीमध्यें अशा तऱ्हेचें कवित्व म्हणजे *Ballads* हें होय. एकाद्या शूर पुरुषाचें, त्याच्या

पराक्रमाचें अथवा एकाद्या युद्धाचें, अथवा मन वेधून टाकणाऱ्या अथवा अन्तःकरण उचंबळून जावयाजोग्या प्रत्यक्ष घडलेल्या प्रसंगाचें डफावर अथवा तुणतुण्यावर गातां येण्याजोगें साधें परंतु चटकदार वर्णन तो पो वा डा. पोवाड्यांतील गोष्ट काल्पनिकही असते; पण ती घडलेली आहे असा विश्वास असतो, किंवा तशी समजूत असते. पोवाड्यामध्यें अशा एकाद्या प्रसंगाची लहानशी कथा म्हणजे आख्यान ग्रथिलेलें असतें. मराठेशाहींत असले पोवाडे पुष्कळ झाले आहेत. तसेंच उत्तरेकडे रजपूत लोकांत आणि हिंदी भाषेंत तशी कविता पुष्कळ आहे. आमच्या इकडले पुष्कळ पोवाडे, यांची साधी पण जोरदार आणि केवळ रेडवळ लोकांत सांपडणारी भाषा आणि उत्तेजनपर आणि मनें उल्हसीत करणारें असें ऐतिहासिक प्रसंगाचें अथवा कथेचें वर्णन, यामुळें फार मनोवेधक आहेत. परंतु पोवाड्यांना आमचे इकडे सुशिक्षित लोकांत पाश्चात्य लोकांतल्यासारखा मान नाहीं.

पोवाड्याची उत्पत्ती फार प्राचीन आहे. आपल्या लोकांनीं अथवा आपल्यापैकीं एकाद्या पुरुषानें केलेल्या विशेष पराक्रमाची आठवण राहून, त्याच्या श्रवणानें इतरांस उत्तेजन यावें, अथवा एकाद्या स्मरणीय प्रसंगाची आठवण चिरकाल राहावी या उद्देशानें मुळारंभीं पोवाडे रचून ते म्हणण्याचा प्रघात प्रत्येक राष्ट्रांत सुरू झालेला दिसतो. युद्धास जावयाचे वेळीं सैन्यामध्यें पोवाडे गाण्याचा धंदा करणारे लोक असत. देवावरोबर ग घ र्व पोवाडे म्हणण्याचें काम करीत असें पौराणीक वर्णन आहे. रजपुतामधले भा ट आणि आमच्या इकडले शा ही र प्रसिद्धच आहेत. आमच्या मराठे लोकांत स्वारींतून आल्यावर पावसाळ्याच्या आरंभीं—आषाढ श्रावण महिन्यांत—पोवाडे ऐकण्याची चाल असे. त्या वेळीं नुकत्या झालेल्या युद्धादिकांवर पोवाडे होत. आपल्या अतिप्राचीन ऋग्वेद ग्रथांत इंद्रादि देवांनीं केलेल्या पराक्रमांचीं वर्णनें गायिलेलीं आहेत. त्यांचींच पुढे सूक्तें व स्तोत्रें बनलीं आणि आर्यलोक युद्धास जात, तेव्हां तीं गात असत, असे उल्लेख आढळतात. या लहान प्राचीन पोवाड्यांचीं किंवा सूक्तांचींच पुढें आख्यानें आणि पुराणें बनलीं. मधल्या संस्कृतात असले पोवाडे नाहींत. त्यांचें

स्थान पौराणीक कथांनीं आणि आख्यानांनीं घेतलें. तरी लोकभाषेंत अशीं कवनें रचून तीं साधारण लोकांमध्यें तोंडींच म्हणण्याची चाल निरनिराळ्या प्रांतांत चालू होती असें दिसतें; आणि मराठीराज्य-स्थापनेबरोबर हीं कवनें पोवाड्यांच्या रूपानें पुनरुद्भूत झालीं.

गद्यवाङ्मयाचा मुख्य प्रकार प्रबंध किंवा कादंबरी हा होय. नाटक आणि कादंबरी (कल्पित कथा) हीं कोणत्याही वाङ्मयाचीं अगदीं उन्नत स्वरूपें होत. या दोन्ही प्रकारच्या रचनेला फार कौशल्य लागतें. इंग्रजींत नाटकाप्रमाणेंच Novel उच्चप्रतीला पोंचलेलें आहे. नाटक आणि Novel यांच्या स्वरूपांची आणि त्यांच्या रचनेच्या प्रकारांची तुलना करणें फार मनोरंजक होईल. परंतु तो विषय येथें अप्रस्तुत आहे. Novel यास मराठींत कादंबरी हा शब्द ठाम झाला आहे. तो संस्कृतांतील एका प्रबंधग्रंथाच्या नांवावरून योजिला आहे. यापेक्षां नवल-कथा, प्रबंध हीं नांवें अधिक युक्त होतील. तूर्त आपण प्रबंध हें नांव घेऊं. संस्कृतांत प्रबंध पुष्कळ आहेत. ते जरी सांप्रत इंग्रजीमध्यें अत्युच्च प्रतीस पोंचलेल्या प्रबंधांच्या बरोबरीला येणार नाहींत, तरी कित्येक चांगल्या प्रकारचे आहेत. मराठींत संस्कृत प्रबंध व इंग्रजी Novel या दोन्हीं नमुन्यांवर प्रबंधरचना होऊं लागली आहे. अलीकडे सुमारें वीसपंचवीस वर्षांत इंग्रजी Novel रचनेला जें उत्कृष्ट स्वरूप आलें आहे, तसें जरी मराठींत अद्यापि झालें नाहीं, तरी गेल्या तितक्याच वर्षांत बरेच मराठी प्रबंधही नांवाजण्यासारखे आणि कांहीं उत्तमांपैकीं निर्माण झाले आहेत. प्रबंधांमध्यें कित्येक ऐतिहासिक असतात. त्यांत एकादा घडलेला प्रसंग घेऊन, अथवा एकादा ऐतिहासिक पुरुष घेऊन त्या कालास व प्रसंगास जुळेल अशी गोष्ट सांगितलेली असते. प्रबंधाचा दुसरा प्रकार कल्पित गोष्ट रचून त्यांत अद्भुत अथवा असामान्य गोष्टी आणणें. याला इंग्रजींत Romance म्हणतात. अशा गोष्टींना मराठींत अद्भुत कथा असें म्हणावें. तिसरा प्रकार कल्पित कथेच्या द्वारें संसारांत नेहमीं घडणाऱ्या गोष्टी ग्रथित करावयाच्या. आपल्या भाषेंतील आजकालच्या गोष्टी या तऱ्हेच्या आहेत. सध्यां मराठी गद्यवाङ्मयामध्यें प्रबंधरचनेवरच फार भर आहे.

संस्कृतामध्यें गद्यवाङ्मय पुष्कळ आहे. खुद्द वेदग्रंथांतही गद्यमय-भाग बराच आहे. वेदकालीन मन्त्रमय वाङ्मय होऊन गेल्यावर गद्यवाङ्मयाचा स्वतंत्र काळ आला होता असें दिसतें. परंतु त्या वेळीं आणि त्यानंतर कित्येक शतकें लांब लेख लिहून ठेवण्याची सामग्री नसल्यामुळें हें वाङ्मय सूत्रमय म्हणजे सांकेतिक संक्षिप्त गद्यांत लिहिलें आहे. म्हणजे मूळ सिद्धांत सूत्रांत लिहावयाचा आणि मग त्यावर तोंडीं व्याख्यान करावयाचें. त्यानंतर ब्रह्मसूत्रें, उपनिषदें वगैरे निरनिराळ्या धर्मदर्शनावरील प्रस्थानत्रय यावर विस्तृत भाष्यें व टीका लिहून झाल्या. हें संस्कृत गद्य फार विस्तीर्ण आणि नामांकित आहे. मात्र हें सर्व आध्यात्मिक आणि तत्त्वज्ञानविषयक आहे. याच्या आधारें मराठींत सोप्या ओवीवृत्तांत असंख्य ग्रंथरचना झाली आहे. परंतु त्या ग्रंथकाराचें शिक्षण तितपतच असल्यामुळें ती नावाजण्यासारखी नाहीं, आणि त्याच्यापासून मराठी भाषेला कांहीं फायदाही झाला नाहीं. या आध्यात्मिक ग्रंथकारांपैकीं ज्यांनीं भाषेचें कार्य साधलें आहे, त्याचा उल्लेख पुढें येईल. एवढें मात्र खरें आहे कीं, हें संस्कृत आणि मराठी धार्मिक वाङ्मय आणि त्याची त्या त्या सांप्रदायी लोकांमध्यें होणारी श्रोत्यांना समजेल अशी स्वभाषेंतली चर्चा, या योगानें मराठी भाषेला वळण लागलें, आणि तिचा प्रसारही पुष्कळ झाला. तसेंच, सर्व ज्ञान संस्कृतांत असणें युक्त नाहीं, मराठीमध्यें, म्हणजे लोकांना कळेल अशा मार्गानें ग्रंथरचना झाली पाहिजे, असेंही लोकांना वाटू लागलें.

रोमान्स म्हणजे अद्भुत वस्तुमय काव्य. हें संस्कृतांतही आहे व मराठींतही पुष्कळ झालें आहे. इंग्रजींत याचें अगदीं अलीकडचें स्वरूप म्हणजे अद्भुतवर्णनात्मक ग्रंथ. अशा ग्रंथांत अस्वाभाविक गोष्टी असल्यामुळें त्यांना तितका मान नसतो. आमच्या इकडे मागील काळांत लोकांना जसें अद्भुत वर्णन आवडत असे तसें अलीकडे आवडत नाहीं, असें म्हटलें तरी चालेल. आमच्या पुराणांत अद्भुत वर्णनें आहेत आणि मराठी कवींच्या आख्यानांतूनही तीं आहेत. प्रथमारंभीं कित्येक अद्भुतवर्णनात्मक ग्रंथ मराठींत झाले आहेत.

परंतु अलीकडे रचल्या जाणाऱ्या गोष्टींत अद्भुत, अर्थात् असंभवनीय गोष्टी फारशा नसतात.

मराठी जुन्या कवितेंत आमच्या कवींचाच विशेष अशा प्रकारचा 'रोमान्स' आहे. नामदेव, तुकाराम, एकनाथ वगैरे भक्तकवी आपल्या आराध्यदेवतेशीं इतके तल्लीन होतात कीं, ते आपण आणि देव यांसंबंधाचीं अद्भुत वर्णनें करूं लागतात. असलें 'रोमान्टिक' काव्य मराठी संतमंडळाच्या कृतींत असंख्य आहे. त्यांतलें पुष्कळ काव्य अत्युत्तम असें असून त्याची ईश्वरभक्तीच्या संबंधानें ख्याती झाली आहे व होत आहे. अशा प्रकारच्या रोमान्टिक कवितेला *अद्भुत-भक्तिरस* म्हणावें.

प्राचीन संस्कृतामध्यें लहान लहान कथांच्या रूपांचें वाङ्मय होतें. पंचतन्त्र, हितोपदेश, सिंहासनबत्तिशी, शुकबाहात्तरी, दशकुमारचरित, भोजप्रबंध, बृहत्कथा इत्यादि प्रकारचे कांहीं ग्रंथ प्रसिद्ध आहेत. हें असलें वाङ्मय पुष्कळ असावें, परंतु त्याला उच्च प्रकारचें स्वरूप येऊन त्याचा समावेश पुराणांतील आख्यानांमध्यें झालेला दिसतो. लोकांच्या तोंडीं अशा प्रकारच्या गोष्टी असल्यास त्या जनभाषेंत असावयाच्या. बौद्धधर्माच्या अगोदर आणि मागाहून पुष्कळ वर्षें पाली ही जनभाषा होती. त्या भाषेंतल्या असंख्य जातककथा ग्रंथांचें स्वरूप पावल्या आहेत. तसेंच पैशाचीमध्यें बृहत्कथा म्हणून मोठा ग्रंथ होता, अशी आख्यायिका आहे. मराठीमध्येंही लोकांच्या तोंडीं असलें वाङ्मय आरंभीं असलें पाहिजे. परंतु तें ग्रथित झालें नाहीं. इंग्रजींतही असें गोष्टींचें वाङ्मय आहे. इंग्रजी प्रख्यात आद्यकवी चासर याचा 'कँन्टरबरी टेल्स' हा ग्रंथ प्रसिद्ध आहेच. तो पद्यरूप असला तरी कथामयच आहे. त्या भाषेंत शेक्सपीयरचीं नाटकें व स्कॉटच्या कादंबऱ्या जुन्या दन्तकथांवरच रचल्या असून, त्यानंतर त्यांच्या संक्षिप्त गोष्टी झाल्या आहेत. इंग्रजींत या मूळच्या कथा व त्यांना आलेलें नंतरचें स्वरूप अशीं दोन्हीं उपलब्ध आहेत. संस्कृत भाषेंतील मुख्य मुख्य नाटकेंही पौराणिक गोष्टी आणि लोकांत चालू असलेल्या दन्तकथा यांच्या आधारें रचिलेलीं आहेत. मराठीमध्यें कित्येक संस्कृत

गोष्टींची भाषांतरें झालीं आहेत. आणि नाटकातील कथानकेंही पण गोष्टींच्या रूपानें लिहिलीं गेलीं आहेत. आरबी आणि फारशी भाषें तील सुरस व चमत्कारिक गोष्टी सुप्रसिद्ध आहेत. सांप्रत इंग्रजी भाषेत असल्या *लोकमान्य* (Popular) *गोष्टींना नवीन स्वरूप* आलें आहे. उपयुक्त शास्त्रीय सिद्धान्त साधारण लोकांना आणि अल्पवयी मुलांना सहज माहीत व्हावे म्हणून त्यांना मनोरंजक गोष्टींचे स्वरूप देऊन, त्या गोष्टी विशेषतः शाळांत चालणाऱ्या पुस्तकांमध्यें घालितात. अशा प्रकारच्या नीतिपर आणि बोधपर, ऐतिहासिक आणि ज्ञानमय गोष्टीही असतात. हा प्रकार मराठींतही येत आहे, *आणि त्याचा शिक्षण* प्रसाराच्या दृष्टीनें मोठा उपयोग होईल. जुन्या वाचनपुस्तकातील तीन राक्षस ही कथा सुप्रसिद्ध आहे.

*संस्कृतातील सुभाषित हा शब्द प्रसिद्ध आहे.* मराठीमध्येंही तो आला आहे. त्याचा मूळ अर्थ चांगलें वचन किंवा बोलणें. पण चांगलें वचन म्हणजे काय हा विचार करण्याजोगा प्रश्न आहे. चांगलें म्हणजे युक्तीदार, कोटिबाज, चातुर्यांचें भाषण. नुसतें गोड, सुंदर भाषण असलें कीं सुभाषित झालें नाहीं. त्यांत कांहीं तरी युक्ती, कोटी किंवा चातुर्याची छटा पाहिजे, अथवा कांहीं तरी विनोदात्मक पाहिजे. इंग्रजी वाङ्मयांत विनोदाला उच्चस्थान आहे. इंग्रजी वाङ्मयांत Wit म्हणजे कोटी किंवा चातुर्याचें भाषण, चतुरालाप, आणि Humour म्हणजे विनोद, हे प्रकार विशेषतः गद्याच्या उत्तमपणाचे कारणीभूत मानलेले आहेत. हे प्रकार आमच्या जुन्या वाङ्मयांत फारसे नाहींत. संस्कृतांतील कोट्या म्हणजे एकप्रकारें कूटें किंवा शब्दच्छल. तसेंच विनोदही संस्कृतांत तितका भारदस्तपणाचा नाहीं. संस्कृत काव्यांत आणि नाटकांतही अलंकारावर भिस्त फार, आणि ती भाषा बहुतेक ठरीव झाल्यामुळें अलंकाराची रचनाही केवळ कृत्रीम बनली आहे. *तिच्यामध्यें भाषेचा स्वाभाविकपणा बहुतेक नाहींच.* नाटकांतून वगैरे विनोदास स्थान आहे. पण तो विनोद कसा असावा हें साहित्य शास्त्रांत ठरवून टाकलें आहे. त्याच्या बाहेर जरा गेलें तरी लगेच काव्यदोष झाला. असला विनोद आणि इंग्रजी वाङ्मयातील

विनोद यांमध्यें फार भेद आहे. इंग्रजी भाषेंत एकप्रकारचा सभ्य विनोद असतो. त्याच्या योगानें एखाद्या पुरुषाची, संस्थेची, अथवा गोष्टीची अथवा प्रसंगाची थट्टा केलेली असते. पण ती थट्टा विकोपास जाऊन तिला अति प्रसंगाचें स्वरूप न येईल, अशी काळजी घेतलेली असते. अशा थट्टेच्या योगानें जनतेच्या मनांत एकाद्या गोष्टीची साहजिकरीत्या नावड उत्पन्न करण्यास साह्य होतें; आणि विनोदाच्या योगानें विमार्गवर्ती जनांस सोप्या रीतीनें ताळ्यावर आणतां येतें. अशी थट्टा त्या लोकांच्या आंगवळणींच पडलेली आहे, आणि असला विनोद राजापासून रंकापर्यंत कोणाचाही केला, तरी कोणीही रागावत नाहीं. पाश्चात्य विनोदी पत्रांतून किंवा पुस्तकांतून लेख व चित्रें यांच्या साह्यानें केलेला अशा प्रकारचा विनोद आपण वाचतों. असला विनोद मराठींत येत आहे. याचा प्रारंभ झाला त्या वेळीं त्याचें विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं वर्णिलेलें महत्त्व लक्षांत घेण्यासारखें आहे. या प्रकारच्या कोट्या, चतुरालाप आणि विनोद यांचा वाङ्मयांत फार उपयोग आहे हें सांगावयास नकोच.

थट्टा आणि विनोद यांची मर्यादा वाढली, आणि त्यांत बराचसा उपहास असला, कीं त्यास Satire म्हणतात. हें विनोदाचें दुष्ट स्वरूप आहे. तथापि त्यास इंग्रजी वाङ्मयांत योग्य मर्यादा घातली आहे, आणि मग तें चांगल्या वाङ्मयांत गणिलें आहे. केवळ विनोदानें सुधारणेचें किंवा ताळ्यावर आणण्याचें इच्छित कार्य होणार नाहींसें वाटलें, म्हणजे त्यामध्यें अवहेलनेचें मिश्रण केलेलें असतें. Satire हें मनाला जास्त लागतें, आणि लोकांतही विशेष हंशा होतो. यामुळें इष्टहेतू साधण्याच्या कामीं याचा केवळ विनोदापेक्षां अधिक उपयोग होतो. तथापि ही अवहेलनाही फार मर्यादित, सभ्यपणाची असावी. तिला द्वेष, मत्सर किंवा निंदा यांचें स्वरूप येऊं नये. तिचा हेतू केवळ कोणास तरी ताळ्यावर आणण्यापुरताच असावा. मराठींत Satireचा प्रादुर्भाव पुष्कळ होत आहे आणि तो इष्टही आहे. Satire यास मराठींत अवहेलन किंवा उपहास असें म्हणावें.

विनोद करून कोणास ताळ्यावर आणण्यासाठीं अथवा एकाद्या वाईट गोष्टीचें स्वरूप जनतेच्या लक्षांत आणून देण्याकरितां त्या गोष्टीमध्यें, मनुष्यामध्यें अथवा त्याच्या वर्तनामध्यें जो निंद्य किंवा अयोग्य प्रकार असेल त्याची अतिशयोक्ती करून आणि त्याचें वाईट प्रकारचें अनुकरण केलेलें दाखवून अथवा त्यास वेडावून उपहास करितात. यास इंग्रजीमध्यें Parody असें नांव आहे. हा विनोदात्मक निंदेचा आणि वेडावून दाखविण्याचा प्रकार अलीकडे मराठींत फार आला आहे. अलीकडल्या कित्येक नाटकांत, इतर गद्य लेखांत आणि पद्यांत तो आढळतो. Parody चे कित्येक उत्तम नमुने अर्वाचीन मराठींत दाखवितां येतील. Parody चा वाङ्मयास फार उपयोग आहे. ज्या व्यक्तीची किंवा व्यक्तींच्या वर्तनाची अशा तऱ्हेची निंदा केली असेल, त्या व्यक्तीस किंवा मनुष्यास लोकांमध्यें आपणास वेडावून दाखवितात असें वाटून त्या योगानें सुधारणा होण्याचें इष्टकार्य होतें. अशा तऱ्हेच्या विनोदास म्हणजे Parodyस मराठींत विडंबन असें नांव द्यावें.

कोटी, विनोद, अवहेलना, विडंबन हे वास्तविक गद्याचे अंगभूत प्रकार होत. पद्यामध्येंही ते आढळले तरी पद्याच्या संक्षिप्त आणि नियमबद्ध स्वरूपामुळें त्यामध्यें त्यांना प्रशस्त स्थळ मिळण्यास कठीण पडतें. अशा प्रकारचीं पुष्कळ पद्यें एकसारखीं वाचावयास कंटाळवाणीं वाटतात. मोगरे यांच्या पदवीचा पाडवा या चांगल्या काव्याची अशी गत झाली आहे. गद्यवाङ्मयाचा प्रघात वाढून त्याचा प्रसार होत चालल्यामुळें हे रचना-प्रकार मराठींत पुष्कळ येत आहेत.

गद्यास फार उपयोगाचा असा आणखी एक प्रकार मराठींत अलीकडे फार येत आहे. एकादी गोष्ट सिद्ध करावयाची असल्यास वक्ता श्रोत्यांस अगोदर माहीत असलेल्या गोष्टींची प्रश्नांच्या द्वारें आठवण करून देऊन, 'असें नाहीं का?', 'असेंच ना?' अथवा 'हें तुम्हांस माहीत नाहीं का?' असें हटकून विचारतो. या प्रश्नाचें होय किंवा नाहीं असें उघड उत्तर वक्त्यास आणि श्रोत्यांस दोघांनाही अगोदर मान्य व माहीत असतें. तें त्या वेळीं आठवून दिलें कीं पुरतें. या योगानें वक्त्यास एकादी गोष्ट सिद्ध करण्यास किंवा

श्रोत्यांच्या मनांत भरवून देण्यास मोठें साह्य होतें. याला इंग्रजींत Erotesis अथवा Question of Appeal असें म्हणतात. आपल्या वाङ्मयांतही हा प्रकार आहे. त्याचा प्रश्ननामक अलंकार कल्पिला असून त्याचा मराठींत कवितेमध्यें पुष्कळ उपयोग आहे. मोरोपंतानें हा प्रश्नालंकार पुष्कळ ठिकाणीं आणिला आहे. परंतु याला गद्यामध्यें आणि विशेषेंकरून व्याख्यानांत विशेष अवसर असल्यामुळें, आणि गद्य-लेख व भाषणें हीं वाढत्या प्रमाणांवर आहेत यामुळें, त्याचा उपयोग फार वाढत आहे. याला मराठींत प्रमाण-प्रश्न असें म्हणावें.

इंग्रजी भाषेंत गद्यवाङ्मय फार मोठें आहे, आणि तें दिवसेंदिवस वाढत आहे, हें कोणास सांगावयास नको. धर्म, तत्वज्ञान, राजनीती, इतिहास, प्रवास, चरित्रें, शास्त्रीय विचार, वगैरे विषयांवर त्या भाषेंत हजारों ग्रंथ आहेत, व होत आहेत. वरील सर्व विषयांतील भागांचें साधारण लोकांना ज्ञान व्हावें, यासाठीं थोडक्यांत सुलभ भाषेंत लहानें ग्रंथ लिहिण्याची तऱ्हा त्या भाषेंत अलीकडे निघाली आहे. असे ग्रंथ तर अलीकडे पंचवीस वर्षांत फारच झाले आहेत. आपल्या भाषेंत सर्व प्रकारच्या इंग्रजी गद्य ग्रंथांचीं भाषांतरें, रूपान्तरें अथवा त्यांच्या आधारें ग्रंथरचना होत आहे. या कार्याला आपणांस उत्तेजन आणि संधी अगदीं मर्यादित असल्यामुळें ग्रंथ फार थोडे होतात. तथापि त्यांच्या रचनेला आणि भाषेला सर्वस्वी इंग्रजीचें वळण लागणार हें उघड आहे. तेव्हां असले गद्यग्रंथ इंग्रजी वाङ्मयांत कोणत्या धोरणावर रचतात, नवीन शब्द, नवीन वाक्यरचना वगैरे कशी कारितात, यासंबंधानें ज्यांत चर्चा आहे, असा एकादा वाङ्मय-साहित्य-चर्चेचा आधारभूत लहानसा ग्रंथ ( Manual ) मराठींत अवश्य झाला पाहिजे. त्या योगानें भिन्न भिन्न ग्रंथकारांनीं निरनिराळ्या प्रकारचें अनुकरण केल्यामुळें गोंधळ माजण्याचा जो संभव दिसत आहे, तो नाहींसा होऊन नवीन होणाऱ्या मराठी वाङ्मयास व्यवस्थित वळण लागेल.

इंग्रजी वाङ्मयास लोकव्यवहार आणि समाजांतील हालचाली यांच्या अनुरोधानें अगदीं स्वाभाविक स्वरूप येण्याचें मुख्य कारण तिकडे

झालेला छापी पुस्तकाचा प्रसार हें आहे. आपण लिहिलेलें कोणी तरी खास वाचील अशी जाणीव तिकडील ग्रंथकाराना असते. कारण ग्रंथ छापला म्हणजे त्याच्या पुष्कळ प्रती होऊन त्याचा फैलाव होतो. आमचे इकडे इंग्रजी राज्य होईपर्यंत मुद्रणकलेचें साधन नसल्या-मुळें संस्कृत ग्रंथकार आणि मराठी ग्रंथकार यांनीं ग्रंथ लिहून ठेवावयाचे, आणि 'कालो ह्ययं निरवधिर्विपुला च पृथ्वी' या आशेवर राहावयाचें. यामुळें मराठी ग्रंथाना फार दिवसापासून जें एकलकोंडेपणाचें वळण लागलें आहे, तें मुद्रणकला इकडे पसरल्यावर, इंग्रजी ग्रंथरचनेच्या साह्यानें नुकतेंसें कोठें सुटत चाललेलें आहे. तेव्हा आपल्या वाङ्मयाचें संवर्धन होण्यास अजून वेळ लागेल हें उघड आहे.

कोणत्याही भाषेचें वाङ्मय म्हटलें म्हणजे तें विवक्षित काळाच्या लोकस्थितीचें आदर्शरूप असतें. धार्मिक, नैतिक, राजकीय, सामाजिक वगैरेसंबंधानें लोकस्थिती जशी असेल, तसे एकंदर लोकांचे विचार असावयाचे, आणि विचार जसे असतील, त्याप्रमाणें ते वाङ्मयरूपी आदर्शामध्यें प्रतिबिंबीत व्हावयाचे. तेव्हा राष्ट्राची लोकस्थिती ही वाङ्मयाची आणि भाषेची घटना होण्यास कारणीभूत होत असते. इंग्रजी भाषेच्या संबंधानें ही गोष्ट चागली लक्षात येण्यासारखी आहे. इंग्रजी लोकस्थितीचा इसवी सनाच्या नवव्या शतकापासूनचा इतिहास आहे, त्याचप्रमाणें तेव्हापासूनचें वाङ्मयही विद्यमान आहे. अलीकडे सुमारें पाच शतकें तर इंग्रजी लोकस्थिती आणि वाङ्मय याचा इतिहास उत्तम प्रकारचा असून मान्य ग्रंथकारांनीं त्याची जागोजाग तुलना केली आहे. इकडे आमचे मराठी राष्ट्र आणि मराठी भाषा यांच्या संबंधानें पाहिलें असता तसा प्रकार दिसून येत नाहीं. ज्ञानदेवापासून मोरोपंतापर्यंतचें सर्व वाङ्मय पाहिलें तर त्याच्यामध्यें विवक्षित कवींच्या भाषेच्या संबंधानें जो काय थोडाफार फरक आहे, त्याशिवाय सगळी तऱ्हा अगदीं एकसारखी आहे. त्यावरून लोक-स्थितीचें अनुमान यत्किंचितही काढता येत नाहीं. त्यात राष्ट्रीय गोष्टींची छाया काय ती धार्मिक विचाराच्या संबंधानें थोडीशी दृष्टीस पडते. वेदान्त आणि आत्मान्तर आध्यात्मिक विषय

तसेंच विठोबाची भक्ती अथवा महाराष्ट्रांतला भागवत धर्म आणि राममक्ती यांचें थोडें प्रतिबिंब या वाङ्मयांत आहे. परंतु त्याचाही म्हणण्यासारखा विकास झालेला दिसून येत नाहीं. ज्ञानदेवाच्या वेळचा वेदान्त आणि अध्यात्मविद्या आणि वामनाच्या वेळच्या त्याच गोष्टी, अद्वैत आणि द्वैत या फरकानें, भाषेच्या दृष्टीनें बहुतेक सारख्याच आहेत. तसेंच नामदेवाच्या वेळचें भक्तिप्रेम आणि तुकारामाच्या वेळचें भक्तिप्रेम यांच्यामध्यें त्या त्या पुरुषांच्या संबंधानें थोडा भेद दिसतो तेवढाच. एरव्हीं तात्विकदृष्ट्या त्यांत भेद नाहीं. त्याचप्रमाणें निरनिराळ्या कवींच्या उद्गारांमध्यें जो वेदान्तविषय आढळतो, त्यामध्येंही म्हणण्यासारखा भेद नाहीं. सर्वांच्या उद्गारांची एक ठरीव तऱ्हा आहे. मग ते उद्गार चौदाव्या शतकांतल्या नामदेवाचे असोत अथवा अठराव्या शतकाच्या अखेरच्या मोरोपंताचे असोत.

ज्ञानदेवापासून पेशवाईच्या अखेरपर्यंत सुमारें पांचशें वर्षांचा काळ गेला. या काळांत आपल्या प्रांतांत अनेक राजकीय व सामाजिक उलाढाली झाल्या. प्रथमतः मुसलमानी सत्ता स्थापित झाली. त्यानंतर किंवा त्याबरोबरच विजयानगरचें बलाढ्य राज्य भरभराटीस येऊन लयासही गेलें. त्यामागून मराठी राज्याच्या उलाढाली झाल्या. एवढ्या काळांत अनेक राजकारस्थानी व पराक्रमी पुरुष होऊन गेले आणि त्यांनीं अनेक मोठालीं कामें केलीं. परंतु या गोष्टी आमच्या मराठी कवींच्या गांवींही नाहींत. त्यांचें जग अगदींच निराळें होतें. आपण, आपला वेदान्त, आपलें आराध्यदैवत, आपली भक्ती, आपले जुने पौराणिक ग्रंथ आणि आपला संप्रदाय अथवा शिष्यमंडळ, यांच्या-वांचून बाहेर कांहीं चाललें आहे, याची या लोकांना दाद देखील नव्हती. या आपल्या गोष्टी साधारणतः निर्वेध चालल्या म्हणजे मग एकंदर जगाचें कांहीं होवो, त्याची त्यांनीं परवा केली नाहीं.

या काळांतलें बहुतेक सर्व वाङ्मय कविताबद्ध आहे. कविता म्हटली कीं ती वेदान्तावर अथवा पौराणिक कथांवरच असली पाहिजे, अशी आपल्या कवींची दृढ समजूत असल्यामुळें त्या वेळच्या लोकस्थितीचा वाङ्मयाशीं मुळींच संबंध आलेला नाहीं. ज्ञानदेवापासून शिवाजीपर्यंत

झालेले साधुसंत आणि कवी यांनीं मराठी राज्यसंस्थापनेची जमीन नांगरून तयार केली, असें कोणी प्रतिपादीत असतात. परंतु हें म्हणणें मुळींच योग्य वाटत नाहीं. या साधुसंतांनीं आणि कवींनीं वैराग्यपर आणि भाविक उपदेशानें आणि तशा तऱ्हेच्या कवनांनीं लोकांना केवळ अल्पसंतोषी आणि परमार्थपर किंबहुना अजागळ बनवून सोडलें. अशा लोकांचा मराठी राज्यसंस्थापनेला यत्किंचितही उपयोग झाला नाहीं, इतकेंच नव्हे, तर उलटपक्षीं त्यांनीं जनतेचीं मनें आणि समजुती राजकीय उचल होण्यास अगदीं अयोग्य करून सोडलीं होतीं असेंच म्हणावें लागतें. शिवाजीचा समकालीन रामदास हा त्या धामधुमीच्या वेळीं प्रत्यक्ष असल्यामुळें त्याच्या दासबोधामध्यें मात्र मधून मधून राजकीय गोष्टींचे उल्लेख आढळून येतात. पण तेही अगदीं अल्प आहेत.

या काळांत गद्यवाङ्मय प्रथमारंभीं मुळींच नव्हतें. त्याला शिवाजीपासून थोडा आरंभ झाला. त्यानंतर भटपेशव्यांच्या वेळीं मराठी राज्य बरेंच कायमचें झाल्यावर गद्यवाङ्मय नांवारूपास येऊं लागलें. तेव्हांपासून नाना फडणीस यांच्या कारकीर्दीपर्यंत गद्यवाङ्मय निदान पत्रव्यवहार, हकीगती, बखरी इत्यादि रूपानीं थोडें फार उत्पन्न झालें आणि पुढें वाढूं लागलें. या वेळापासून वाङ्मयांत राजकारणें, लोकस्थिती, लोकांच्या समजुती आणि विचार, यांचें अल्प स्वल्प प्रतिबिंब पडत चालल्याचें दिसतें. पटवर्धनांच्या पत्रव्यवहारांत सामाजिक आणि घरगुती गोष्टींचे उल्लेख बरेच आढळून येतात. परंतु त्या वेळच्या लोकस्थितीवर अथवा इतिहासावर ग्रंथ किंवा लेखही तयार झाले नाहींत.

लोकस्थितीचा वाङ्मयघटनेवर जसा परिणाम होतो, तसा उलट पक्षीं वाङ्मयाचा लोकस्थितीवरही होत असतो. याचें उत्कृष्ट प्रमाण आपणास इंग्रजी राष्ट्राच्या इतिहासांत सांपडेल. इंग्लंडच्या इतिहासांत ग्रंथकाराच्या लिहिण्याचा लोकांच्या सामाजिक आणि राजकीय विचारांवर परिणाम झालेला आपणास अनेक प्रसंगीं आढळून येईल. येथें एडमंड बर्क याचें केवळ एकच उदाहरण घेतलें तरी पुरे आहे. फ्रान्समधील राज्यक्रांतीचा इंग्लंड देशावर जो परिणाम होण्याचा संभव

होता, तो परिणाम केवळ एडमंड बर्क यांच्या लेखांमुळें झाला नाहीं. इतकेंच नव्हे तर त्याच्या लेखांमुळें इंग्रजी राष्ट्राचें बहुमत फ्रेंच लोकांच्या विरुद्ध झालें. त्याचप्रमाणें अगदीं आरंभापासून सर्व कवींच्या विचारांचा जनतेच्या विचारांवर परिणाम झालेला इंग्रजी वाङ्मयाचे टीकाकार दाखवितात. असें होण्यास वाङ्मयप्रसाराचीं साधनें हवीं असतात. मुख्य साधन म्हटलें म्हणजे छापखाना, आणि दुसरीं साधनें म्हटलीं म्हणजे वर्तमानपत्रें आणि मासिकपुस्तकें, आणि त्यांत येणाऱ्या नव्या नव्या पुस्तकांवर टीका. आमच्या इकडे हे प्रकार नसल्यामुळें असे परिणाम झाले नाहींत, हें उघडच आहे. आमच्या कवींचे वेदान्तपर आणि भक्तीपर ग्रंथ आणि अभंग, पदें, कवनें यांचा मराठी राष्ट्रावर त्या काळाच्या आणि साधनांच्या मानानें परिणाम झालेला आपणांस स्पष्टच दिसत आहे. राजकीय आणि सामाजिक परिस्थितीवर परिणाम होण्यास प्रथमतः तसे लेख नव्हते; आणि पुढें तसे लेख झाल्यानंतर त्यांच्या प्रसाराचीं साधनें नव्हतीं. आध्यात्मिक ग्रंथांच्या लोकांनीं प्रती करून घेतल्यानें आणि त्यांचें वाचन भाविक लोकांत चालू असल्यानें प्रसार होई, तसें राजकीय लेखांचें होण्याला मार्ग नव्हता. यामुळें या पांचशें वर्षांत आपल्या राजकीय, सामाजिक आणि व्यावहारिक लोकस्थितीवर वाङ्मयाचा परिणाम फारसा झालेला दिसत नाहीं.

---

## २—प्राचीन पद्यवाङ्मय

कोणत्याही प्रकारची ग्रंथरचना करणें झाल्यास ती संस्कृतभाषेंत करावी, अशी जुनी चाल होती. यामुळें विद्वत्ता म्हटली म्हणजे संस्कृत जाणणारांच्याच हातीं असे. एकंदर जनसमूहास संस्कृत जाणणारे अर्थ सांगतील तेवढें ज्ञान व्हावयाचें. ही पद्धत मोडून लोकांना स्वभाषेंत ज्ञानप्राप्ती करून देण्याचा प्रयत्न बौद्धधर्मानें केला. परंतु त्या धर्माबरोबरच या गोष्टीचाही अंत होऊन पुन्हा विद्वत्ता आणि ज्ञान संस्कृतांतच राहिलें. ही स्थिती मोडण्याची आणखी एकदां उचल

ज्ञानदेवाच्या वेळेच्या सुमारास झाली; आणि तीमुळें मराठी वाङ्मयाचा पाया पडला.

आमचे लोक अध्यात्मज्ञानाचे मोठे भोक्ते होते. परंतु तें सर्व ज्ञान संस्कृतांत. इसवी सनाच्या नवव्या शतकांत पहिले शंकराचार्य झाले, त्यांनीं बौद्ध आणि जैन या धर्मांच्या चळवळीनें वैदिक किंवा जुन्या धर्मावर चढलेला गंज काढून टाकून नवीन धर्मज्योती निर्माण केली. पण ती संस्कृतांत होती. शंकराचार्यांनें स्थापित केलेलीं धर्ममतें एका विशिष्ट तऱ्हेचीं असून तीं सर्वमान्य झालीं नाहींत. तथापि आमच्या प्रांतांत शंकराच्या मताचा प्रसार होता आणि आम्ही लोक आपल्यास निदान नावाला तरी त्या आचार्यांचे अनुयायी मानतो. शंकरानंतर तीन चार शतकांत अन्य आचार्य होऊन अन्य मतें निघालीं. पण तींही संस्कृतांत निघालीं. या भिन्न मतांमध्यें होणाऱ्या वादविवादानें त्या वेळीं सर्व भारत देश दुमदुमून गेला असेल. परंतु त्याची मौज काय ती संस्कृत जाणणारांनाच प्राप्त होत होती. एकदर जनतेस त्यांच्या तोंडाकडे पाहून समाधान मानून घेण्यापलीकडे अथवा ते कृपा करून सांगतील तें मान्य करून घेण्याबाहेर लाभ होत नव्हता. ही स्थिती अत्यंत चीड येण्यासारखी होती. अर्थात् ज्ञानदेवासारखे अथवा एकनाथ-नामदेवासारखे थोर पुरुष निपजून, त्यांना हें ज्ञान एकदर जनसमूहास स्वभाषेंत कां प्राप्त न व्हावें, असें वाटलें; आणि त्यांनीं तें ज्ञान अध्यात्मपर, वेदान्तपर आणि पौराणिक व्याख्यानविषयक ग्रंथ स्वभाषेंत लिहिण्याची चाल पाडून जनतेस हस्तगत करून दिलें. ज्ञानदेवापासून मोरोपंतापर्यंतच्या सर्व कवींनीं "ग्रंथरचना संस्कृतांतच कां असावी, देशभाषेंत कां असू नये, देशभाषा हलक्या आहेत काय!" असे स्वभाषेच्या अभिमानानें पूर्ण असे उद्गार काढले आहेत. यांतले कित्येक उद्गार तर फार रागाचे आहेत. यावरून ह्या वेळीं मराठी ग्रंथरचना निंदास्पद मानीत असें दिसतें. अशा प्रकारें मराठी वाङ्मयाचा पाया पडला आणि मराठी भाषेच्या उन्नतीला आरंभ झाला. मागें सांगण्यांत आलेंच आहे कीं, मराठींतला अगदीं पहिला संपूर्ण ग्रंथ ज्ञानेश्वरी हाच

होता, तो परिणाम केवळ एडमंड बर्क याच्या लेखांमुळें झाला नाहीं. इतकेंच नव्हे तर त्याच्या लेखांमुळें इंग्रजी राष्ट्राचें बहुमत फ्रेंच लोकांच्या विरुद्ध झालें. त्याचप्रमाणें अगदीं आरंभापासून सर्व कवींच्या विचारांचा जनतेच्या विचारांवर परिणाम झालेला इंग्रजी वाङ्मयाचे टीकाकार दाखवितात. असें होण्यास वाङ्मयप्रसाराचीं साधनें हवीं असतात. मुख्य साधन म्हटलें म्हणजे छापखाना, आणि दुसरीं साधनें म्हटलीं म्हणजे वर्तमानपत्रें आणि मासिक पुस्तकें, आणि त्यांत येणाऱ्या नव्या नव्या पुस्तकांवर टीका. आमच्या इकडे हे प्रकार नसल्यामुळें असे परिणाम झाले नाहींत, हें उघडच आहे. आमच्या कवींचे वेदान्तपर आणि भक्तीपर ग्रंथ आणि अभंग, पदें, कवनें यांचा मराठी राष्ट्रावर त्या काळाच्या आणि साधनांच्या मानानें परिणाम झालेला आपणांस स्पष्ट दिसत आहे. राजकीय आणि सामाजिक परिस्थितीवर परिणाम होण्यास प्रथमतः तसे लेख नव्हते; आणि पुढें तसे लेख झाल्यानंतर त्यांच्या प्रसाराचीं साधनें नव्हतीं. आध्यात्मिक ग्रंथांच्या लोकांनीं प्रती करून घेतल्यानें आणि त्यांचें वाचन भाविक लोकांत चालू असल्यानें प्रसार होई, तसें राजकीय लेखांचें होण्याला मार्ग नव्हता. यामुळें या पांचशें वर्षांत आपल्या राजकीय, सामाजिक आणि व्यावहारिक लोकस्थितीवर वाङ्मयाचा परिणाम फारसा झालेला दिसत नाहीं.

---

## २—प्राचीन पद्यवाङ्मय

कोणत्याही प्रकारची ग्रंथरचना करणें झाल्यास ती संस्कृतभाषेंत करावी, अशी जुनी चाल होती. यामुळें विद्वत्ता म्हटली म्हणजे संस्कृत जाणणारांच्याच हातीं असे. एकंदर जनसमूहास संस्कृत जाणणारे अर्थ सांगतील तेवढें ज्ञान व्हावयाचें. ही पद्धत मोडून लोकांना स्वभाषेंत ज्ञानप्राप्ती करून देण्याचा प्रयत्न बौद्धधर्मानें केला. परंतु त्या धर्माबरोबरच या गोष्टीचाही अंत होऊन पुन्हा विद्वत्ता आणि ज्ञान संस्कृतांतच राहिलें. ही स्थिती मोडण्याची आणखी एकदां उचल

ज्ञानदेवाच्या वेळेच्या सुमारास झाली, आणि तीमुळें मराठी वाड्मयाचा पाया पडला.

आमचे लोक अध्यात्मज्ञानाचे मोठे भोक्ते होते. परतु तें सर्व ज्ञान सस्कृतात. इसवी सनाच्या नवव्या शतकात पहिले शकराचार्य झाले. त्यानीं बौद्ध आणि जैन या धर्मांच्या चळवळीनें वैदिक किंवा जुन्या धर्मावर चढलेला गज काढून टाकून नवीन धर्मज्योती निर्माण केली. पण ती सस्कृतात होती. शकराचार्यानें स्थापित केलेलीं धर्ममतें एका विशिष्ट ठऱ्हेचीं असून तीं सर्वमान्य झालीं नाहींत. तथापि आमच्या प्रातात शकराच्या मताचा प्रसार होता आणि आम्ही लोक आपल्यास निदान नावाला तरी त्या आचार्यांचे अनुयायी मानतों. शकरानतर तीन चार शतकात अन्य आचार्य होऊन अन्य मतें *निघालीं*. पण तींही सस्कृतात निघालीं. या भिन्न मतामध्यें होणाऱ्या वादविवादानें त्या वेळीं सर्व भारत देश दुमदुमून गेला असेल. परतु त्याची मौज काय ती सस्कृत जाणणारानाच प्राप्त होत होती. एकदर जनतेस त्याच्या तोंडाकडे पाहून समाधान मानून घेण्यापलीकडे अथवा ते कृपा करून *सागतील तें मान्य करून घेण्याबाहेर लाभ होत नव्हता. ही* स्थिती अत्यत चीड येण्यासारखी होती. अर्थात् ज्ञानदेवासारखे अथवा एकनाथ नामदेवासारखे थोर पुरुष निपजून, त्याना हें ज्ञान एकदर जनसमूहास स्वभाषेंत का प्राप्त न व्हावें, असें वाटलें, *आणि त्यानीं* तें ज्ञान अध्यात्मपर, वेदान्तपर आणि *पौराणिक* व्याख्यानविषयक ग्रथ स्वभाषेंत *लिहिण्याची* चाल पाडून जनतेस हस्तगत करून दिलें. ज्ञानदेवापासून मोरोपतापर्यंतच्या *सर्व कवींनीं* "ग्रथरचना सस्कृतातच का असावी, देशभाषेंत *का असू नये*, देशभाषा हलक्या आहेत काय?" असे *स्वभाषेच्या अभिमानानें पूर्ण* असे उद्गार काढले आहेत. *यातले कित्येक उद्गार तर फार रागाचे* आहेत. यावरून ह्या वेळीं मराठी *ग्रथरचना निदान मानीत असें* दिसतें. अशा प्रकारें मराठी *वाड्मयाचा पाया पडला* आणि मराठी भाषेच्या उन्नतीला आरभ झाला *मागें सागण्यात आलेंच आहे* कीं, मराठींतला *अगदीं पहिला सपूर्ण ग्रथ ज्ञानेश्वरी हाच*

सांपडतो सन १२९० ]. त्याच्या अगोदर मराठीचें मूळ वाङ्मयाच्या दृष्टीनें उपलब्ध नाहीं. यासाठीं आपल्या वाङ्मयाच्या इतिहासाचा आरंभ या ग्रंथापासूनच धरला पाहिजे. सुदैवेंकरून या ग्रंथाचा विषय श्रेष्ठ मानलेला, ग्रंथकार विद्वान आणि ग्रंथही फार विस्तृत व उत्तम झालेला असल्यामुळें मराठीचा पाया चांगला भक्कम पडला, असें म्हणण्यास चिंता नाहीं. तथापि या ग्रंथाची भाषेच्या संबंधानें अगदीं त्या वेळची स्थिती कशी होती, हें समजण्यास मार्ग नाहीं. कारण, खुद्द ज्ञानदेवाच्या वेळची ज्ञानेश्वरीची प्रत उपलब्ध नाहीं. आज ज्या प्रती उपलब्ध आहेत, त्यांवरून तारतम्यानें त्या वेळच्या भाषेची कल्पना करावयाची आहे. असें आहे तरी ज्ञानदेवाच्या वेळीं मराठी भाषा चांगल्या स्वरूपांत असावी असें वाटतें.

कारण—

'माझा मऱ्हाठा बोल कौतुकें—
परी अमृतातें पैजा जिंके,
ऐशीं अक्षरें रसिकें—
मेळवीन.'

आणि—

'देशीकार-लेणें, मराठीस लेववीन.'

असें स्वतां ज्ञानदेवानेंच म्हटलें आहे.

ज्ञा न दे व हा जातीचा देशस्थ ब्राह्मण. पैठणाजवळील आपेगांव येथें राहाणारा. याचा काळ १२७५ ते १२९६ असा दिलेला आहे. याचा गुरु नि वृ त्ति ना थ. हा त्याचा वडील भाऊ, असेंही सांगतात. याला सो पा न दे व आणि मु क्ता बा ई अशीं आणखी दोन भावंडें होतीं. हींही संतमालिकेंतलीं असून त्यांनीं कविता केली आहे. ज्ञानदेवाचा जन्म पुण्याजवळील आळंदी येथें झाला, आणि त्याचा पिता मागाहून संसारी झालेला असा संन्यासी होता. यामुळें या मुलांना ब्राह्मणांनीं जातीबाहेर टाकलें होतें. पुढें त्यांनीं कित्येक अलौकीक

चमत्कार करून दाखविले, तेव्हां त्यांच्यावर लोकांची श्रद्धा बसली, वगैरे दंतकथा आहेत. पुढें ज्ञानदेव आळंदीस येऊन वारला, तेथें त्याची समाधी आहे, अशी लोकांची समजूत असून, आळंदी हें त्यामुळें पूज्यस्थान झालें आहे. याचा ग्रंथ ज्ञानेश्वरी हा मराठी वाङ्मयाचा पाया आहे, यासाठीं त्याचें सर्वांग परीक्षण झालें पाहिजे. चांगल्या साधनांच्या अभावीं असें परीक्षण अजून झालें नाहीं. अर्धवट परीक्षण करून अनुमानें काढणें आणि पूर्वग्रह करीत बसणें, यांत कांहीं अर्थ नाहीं. यासाठीं वाङ्मयाच्या चर्चेमध्यें तूर्त त्या ग्रंथाचें केवळ जरूरीपुरतें अवलोकन करून काम चालविलें पाहिजे. ज्ञानेश्वरीचा भाषेच्या दृष्टीनें विचार केला तर असें दिसून येतें कीं, ज्ञानदेवाच्या वेळीं म्हणजे इ. स. १२९० सालीं मराठी भाषा वेदान्तासारख्या गहन विषयाच्या प्रतिपादनास योग्य झाली होती. तींत सर्व प्रकारचीं शब्दरूपें करितां येत होतीं. आणि शब्दांचा भरणाही चांगला होता. ज्ञानदेवानें एकादी कथा किंवा एकादें पौराणिक आख्यान सांगितलेलें नसून गहन अशा अध्यात्मिक विषयाचें उदाहरणें, उपमा, रूपकें, दृष्टान्त, लौकिकांतील अनेक गोष्टींचे हवाले, इत्यादिकांनीं युक्त असें विस्तृत प्रतिपादन केलें आहे. या प्रतिपादनास भाषा पूर्णपणे पुरी पडली आहे. तसेंच या भाषेंत संस्कृत शब्द पुष्कळसे घ्यावे लागले नसून तेव्हां मराठींत चालू असलेल्या आणि त्या वेळीं सहज लोकांना समजतील अशा तद्भव आणि चालू भाषेंतल्या शब्दांनीं काम भागवितां आलें आहे. यावरून ज्ञानदेवाच्या अगोदर पुष्कळ वर्षें मराठी भाषा लोकव्यवहारांत चालू असावी.

ज्ञानेश्वरीच्या अगदीं ज्ञानदेवाच्या वेळच्या अथवा नंतरच्या थोड्या वर्षांतल्या प्रती मिळाल्या पाहिजेत. पुढें तीनशें वर्षांनीं एकनाथानें ती शोधिली, त्या काळांतल्या आणि एकनाथानें शुद्धीकरण केलेल्या प्रती उपलब्ध झाल्या पाहिजेत. सांप्रत बऱ्याच जुन्या प्रती मिळाल्या आहेत. त्या परस्परांशीं जुळत नाहींत. शुद्धीकरणानंतरच्या प्रतींमध्येंही फार पाठभेद झाले आहेत. तेव्हां अशा प्रकारच्या सर्व प्रती मिळवून त्या जुळवून पाहिल्या पाहिजेत, आणि ज्ञानदेवास कोणता अर्थ हवा होता हें लक्षांत

सांपडतो सन १२९० ]. त्याच्या अगोदर मराठीचें मूळ वाङ्मयाच्या दृष्टीनें उपलब्ध नाहीं. यासाठीं आपल्या वाङ्मयाच्या इतिहासाचा आरंभ या ग्रंथापासूनच धरला पाहिजे. सुदैवेंकरून या ग्रंथाचा विषय श्रेष्ठ मानलेला, ग्रंथकार विद्वान आणि ग्रंथही फार विस्तृत व उत्तम झालेला असल्यामुळें मराठीचा पाया चांगला भक्कम पडला, असें म्हणण्यास चिंता नाहीं. तथापि या ग्रंथाची भाषेच्या संबंधानें अगदीं त्या वेळची स्थिति कशी होती, हें समजण्यास मार्ग नाहीं. कारण, खुद्द ज्ञानदेवाच्या वेळची ज्ञानेश्वरीची प्रत उपलब्ध नाहीं. आज ज्या प्रती उपलब्ध आहेत, त्यांवरून तारतम्यानें त्या वेळच्या भाषेची कल्पना करावयाची आहे. असें आहे तरी ज्ञानदेवाच्या वेळीं मराठी भाषा चांगल्या स्वरूपांत असावी असें वाटतें.

कारण—

'माझा मऱ्हाठा बोल कौतुकें—
परी अमृतातें पैजा जिंके,
ऐसीं अक्षरें रसिकें—
मेळवीन.'

आणि—

'देशीकार-लेणें, मराठीस लेववीन.'

असें स्वतां ज्ञानदेवानेंच म्हटलें आहे.

ज्ञा न दे व हा जातीचा देशस्थ ब्राह्मण. पैठणाजवळील आपेगांव येथें राहाणारा. याचा काळ १२७५ ते १२९६ असा दिलेला आहे. याचा गुरु नि वृ त्ति ना थ. हा त्याचा वडील भाऊ, असेंही सांगतात. याला सो पा न दे व आणि मु क्ता बा ई अशीं आणखी दोन भावंडें होतीं. हीं दोघें संतमालिकेंतलीं असून त्यांनीं कविता केली आहे. ज्ञानदेवाचा जन्म पुण्याजवळील आळंदी येथें झाला, आणि त्याचा पिता मागाहून संसारी झालेला असा संन्यासी होता. यामुळें या मुलांना ब्राह्मणांनीं जातीबाहेर टाकलें होतें. पुढें त्यांनीं कित्येक अलौकीक

चमत्कार करून दाखविले, तेव्हां त्यांच्यावर लोकांची श्रद्धा बसली, वगैरे दंतकथा आहेत. पुढें ज्ञानदेव आळंदीस येऊन धारला, तेथें त्याची समाधी आहे, अशी लोकांची समजूत असून, आळंदी हें त्यामुळें पूज्यस्थान झालें आहे. याचा ग्रंथ ज्ञानेश्वरी हा मराठी वाङ्मयाचा पाया आहे, यासाठीं त्याचें सर्वांग परीक्षण झालें पाहिजे. चांगल्या साधनांच्या अभावीं असें परीक्षण अजून झालें नाहीं. अर्धवट परीक्षण करून अनुमानें काढणें आणि पूर्वग्रह करीत बसणें, यांत कांहीं अर्थ नाहीं. यासाठीं वाङ्मयाच्या चर्चेमध्यें तूर्त त्या ग्रंथाचें केवळ जरूरीपुरतें अवलोकन करून काम चालविलें पाहिजे. ज्ञानेश्वरीचा भाषेच्या दृष्टीनें विचार केला तर असें दिसून येतें कीं, ज्ञानदेवाच्या वेळीं म्हणजे इ. स. १२९० सालीं मराठी भाषा वेदान्तासारख्या गहन विषयाच्या प्रतिपादनास योग्य झाली होती. तींत सर्व प्रकारचीं शब्दरूपें करितां येत होतीं. आणि शब्दांचा भरणाही चांगला होता. ज्ञानदेवानें एकादी कथा किंवा एकादें पौराणिक आख्यान सांगितलेलें नसून गहन अशा अध्यात्मिक विषयाचें उदाहरणें, उपमा, रूपकें, दृष्टान्त, लौकिकांतील अनेक गोष्टींचे हवाले, इत्यादिकांनीं युक्त असें विस्तृत प्रतिपादन केलें आहे. या प्रतिपादनास भाषा पूर्णपणें पुरी पडली आहे. तसेंच या भाषेंत संस्कृत शब्द पुष्कळसे घ्यावे लागले नसून तेव्हां मराठींत चालू असलेल्या आणि त्या वेळीं सहज लोकांना समजतील अशा तद्भव आणि चालू भाषेंतल्या शब्दांनीं काम भागविलें आलें आहे. यावरून ज्ञानदेवाच्या अगोदर पुष्कळ वर्षें मराठी भाषा लोकव्यवहारांत चालू असावी.

ज्ञानेश्वरीच्या अगदीं ज्ञानदेवाच्या वेळच्या अथवा नंतरच्या थोड्या वर्षांतल्या प्रती मिळाल्या पाहिजेत. पुढें तीनशें वर्षांनीं एकनाथानें ती शोधिली, त्या काळांतल्या आणि एकनाथानें शुद्धीकरण केलेल्या प्रती उपलब्ध झाल्या पाहिजेत. सांप्रत बऱ्याच जुन्या प्रती मिळाल्या आहेत. त्या परस्परांशीं जुळत नाहींत. शुद्धीकरणानंतरच्या प्रतींमध्येंही फार पाठभेद झाले आहेत. तेव्हां अशा प्रकारच्या सर्व प्रती मिळून त्या जुळवून पाहिल्या पाहिजेत, आणि ज्ञानदेवास कोणता अर्थ द्यावा होता हें लक्षांत

घेऊन त्यावरून खुद्द ज्ञानदेवाचे पाठ कोणते असावे, हें शक्य तेवढें बरोबर ठरविलें पाहिजे. त्याचप्रमाणें त्या ग्रंथांतले सध्या उपयोगांतून गेलेले, अर्थ फिरलेले इत्यादि शब्द, व्याकरणरूपें, नानातऱ्हेचे लौकिक आणि व्यावहारिक उद्गार, यांची तपासणी झाली पाहिजे. त्याचप्रमाणें ज्ञानेश्वरींतील उपमा, दृष्टान्त आणि प्रासंगिक उल्लेख यांवरून, त्या वेळची लोकस्थिती कशी होती याचा शोध केला पाहिजे. असा कांहीं उद्योग प्रो॰ भागवत यांनीं सुरू केला होता. शब्द आणि व्याकरणरूपें हीं त्या काळापासून आतांपर्यंत फिरत असतां त्यांचें झालेलें अर्थान्तर व रूपान्तर यांच्या इतिहासाचाही शोध झाला पाहिजे. इतका उद्योग सध्याच्या काळांत शोधक दृष्टीनें सांगोपांग झाल्यास ज्ञानेश्वरीचें वाङ्मयाच्या दृष्टीनें खरेंखुरें उद्घाटन होईल. तें करण्याची तयारी झाली नसतांना अर्धवट उद्योग करीत बसण्यांत अर्थ नाहीं. अशा उद्घाटनाचा मराठी वाङ्मयाला फार मोठा उपयोग होईल. यासंबंधाचे आतांपर्यंत जे मुख्य उद्योग झाले आहेत, त्यांचें येथें थोडक्यांत दिग्दर्शन करूं.

प्रथमतः मुंबईंतील गणपत कृष्णाजी यांच्या छापखान्यानें देवस्थळी शास्त्री यांच्या साह्यानें ज्ञानेश्वरीची एक आवृत्ती शब्दकोश जोडून छापिली. हींत पाठभेदाचा विचार फारसा नाहीं. पुण्याचे गोडबोले शास्त्री यांनीं कवितेंतील जुन्या शब्दांचा हंसकोश तयार केला. त्यांत ज्ञानेश्वरींतलेच पुष्कळ शब्द स्थलनिर्देशासह सार्थ दिले आहेत. पुण्यांतील जगद्धितेच्छूचे मालक गोंधळेकर यांनीं ज्ञानेश्वरीची चांगली आवृत्ती छापली आहे. या आवृत्तीमध्यें थोडे पाठभेद दिले आहेत; आणि प्रत्येक अध्यायाच्या शेवटीं परिभाषा असून तींत कठीण शब्दांचे अर्थ आहेत. शास्त्रीमंडळींच्या साह्यानें निघालेल्या आवृत्या शब्दार्थांच्या आणि पुढील उद्योगाच्या संबंधानें विशेष उपयोगाच्या समजल्या पाहिजेत. निर्णयसागरानें डा॰ कुंटे यांजकडून एक आवृत्ती तयार करविली. हींत पाठभेदांचा बराच विचार केला असून शब्दार्थ-कोशही दिला आहे. माडगांवकर यांनीं ज्ञानेश्वरीची चांगली प्रत तयार करण्याचा फार उद्योग केला. त्यांनीं अनेक प्रती मिळवून पुष्कळसे

पाठभेद दिले आणि शब्दांचीं रूपें वगैरे गोष्टींची बरीच छाननी केली. त्यांनीं कोशही चांगला तयार केला आहे. परंतु त्यांचें काम अर्धवटच राहिलें. *तथापि त्यांची समग्र आवृत्ती* ज्ञा न दे वी *या नांवानें छापली* आहे आणि नवीन तऱ्हेचा अभ्यास करणारास हीच आवृत्ती पसंत पडण्यासारखी आहे. ज्ञानेश्वरीचा जुन्या पद्धतीनें अभ्यास करण्याचे अनेक सांप्रदाय ठिकठिकाणीं आहेत. त्यांतील पुण्याचे सांप्रदायी सा ख रे यांनीं आपल्या मताप्रमाणें प्रत्येक ओवीचा अर्थ देऊन एक आवृत्ती तयार केली आहे. ही सांप्रदायिक लोकांत मान्य आहे. यानंतर यासंबंधानें चांगला उद्योग केरळकोकिळकर्ते आ ठ ल्ये (महाराष्ट्रभाषाचित्रमयूर) यांनीं केला. यांनीं मागील सर्व छापी प्रती नजरेपुढें ठेवून प्रत्येक ओवीचा गद्यमय अर्थ लिहिला आहे; प्रत्येक पृष्ठाखालीं शब्दार्थ दिले आहेत; ज्ञानेश्वरीमध्यें दृष्टान्त, उदाहरणें वगैरे यांमध्यें जे लोकव्यवहाराच्या गोष्टींचे उल्लेख आले आहेत, ते निवडून काढून त्यांची एक मोठी याद *आणि ग्रंथात आलेल्या सर्व मुख्य मुख्य* विषयांची याद दिली असून ज्ञानेश्वरीच्या काळापासून अर्थ न फिरतां उपयोगांत असलेल्या कोचीन मलयार प्रांतांतील मराठी शब्दांचीही एक याद दिली आहे. याप्रमाणें आठल्ये यांनीं चांगले परिश्रम केले आहेत. *तथापि आधुनिक दृष्टीनें अजून पुष्कळ गोष्टी व्हावयास पाहिजेत. त्या-* वेळीं उपयोगांत असून हल्लीं उपयोगांतून गेलेले आणि अर्थ फिरून उपयोगांत असलेले असे शब्द निवडून काढून इतर ग्रंथाच्या तुलनेनें त्यांच्या इतिहासाचा छडा लाविला पाहिजे. आठल्ये यांनीं पाठांतरांचा विचार केला नाहीं. याचें कारण पाठभेद फार असून सांप्रदायिक आणि जुन्या समजुतीच्या दृष्टीनें त्या अभ्यासाचा उपयोग फारसा नाहीं असें वाटण्यासारखें आहे, हें असावें. तसेंच पुष्कळ पाठांतरें अजाणत्या *लेखकांच्या हस्तदोषपरंपरेनें अथवा गैरसमजानें उत्पन्न झालेलीं आहेत.* असें असलें तरी पाठांतरांचें नीट परीक्षण होऊन ज्ञानदेवाचा मूळ अर्थ काढण्याचा प्रयत्न अवश्य झाला पाहिजे. तसेंच भिन्न भिन्न प्रांतांतील सांप्रदायिकांच्या भिन्न भिन्न अर्थांचाही विचार व्हावयास पाहिजे.

सरते शेवटीं यासंबंधाच्या राजवाड्यांच्या उद्योगाचा विशेष उल्लेख केला पाहिजे. राजवाडे यांस ज्ञानेश्वरीची एक फार जुनी प्रत उपलब्ध झाली. ही खुद्द ज्ञानदेवाच्या वेळची असें राजवाड्यांचें म्हणणें आहे. तें पुष्कळांस मान्य नाहीं. तथापि त्यांनीं केलेला ती प्रत छापण्याचा उद्योग महत्त्वाचा आहे. त्यांनीं या प्रतींतल्या रूपांचा छडा लावण्याचा फार प्रयत्न केला आहे आणि ज्ञानेश्वरीचें व्याकरणही लिहिलें आहे. अशा प्रकारें राजवाडे यांनीं फार परिश्रम करून या अभ्यासाची दिशा दाखवून दिली, यामुळें त्यांचें ज्ञानेश्वरीसंशोधनाच्या भावी उद्योगाला मोठेंच साह्य होणार आहे.

ज्ञानदेवाचे अमृतानुभव, स्वात्मसुख, योगवासिष्ठ, पंचीकरण, हरिपाठ इत्यादि आणखीही लहान लहान ग्रंथ प्रसिद्ध आहेत. यांची भाषा ज्ञानेश्वरीपेक्षां निराळी वाटते. ज्ञानेश्वरीची अत्यंत लोकप्रियता आणि त्या कारणानें तींत झालेले फेरफार हें याचें कारण असेल. अथवा यांतले कांहीं ग्रंथ ज्ञानेश्वरीकर्त्या ज्ञानदेवाचे नसतील. या सर्वांमध्यें अध्यात्मविषय आहे. ज्ञानदेवाचे पुष्कळ अभंगही आहेत. ते विठ्ठलभक्तीपर आहेत. हे मात्र ज्ञानेश्वरीकर्त्या ज्ञानदेवाचे खास नव्हत. ज्ञानेश्वरी रचणारा ज्ञानदेव विठ्ठलभक्त नव्हता. ज्ञानेश्वरीमध्यें जरी तसें स्पष्ट सांगितलें नाहीं, तरी तो शंकराचार्यांचा अनुयायी म्हणजे अद्वैत वेदान्तवादी होता, असें त्याच्या विवेचनावरून दिसून येतें. त्याच्या वेळीं विठ्ठलभक्तीचा उद्भवही झालेला नव्हता. असें असून ज्ञानेश्वरी हा ग्रंथ वारकरीपंथाच्या मंडळीनें आपला मुख्य ग्रंथ मानलेला आहे. ह रि पा ठ हें प्रकरण वारकरी मंडळीच्या नित्यपाठांतलें आहे, पण त्यांतही विठ्ठलाचें नांव नाहीं. यांतले अमृतानुभवाशिवाय बाकीचे ग्रंथ आणि अभंग हे दुसऱ्या ज्ञानदेवाचे—त्याच्या पंथांतल्या दुसऱ्या एकाद्या वारकरी झालेल्या सांप्रदायिकाचे—असतील, अथवा निरनिराळ्या अनेक लोकांनींही केलेले असतील.

प्राचीन पद्यवाङ्मय विपुळ आहे. परंतु तें ज्या स्थितींत आपणास उपलब्ध झालें आहे, त्या स्थितींत फार अव्यवस्थित आणि अविश्वसनीय आहे. प्रथमतः कवींचे काळ अगदीं बरोबर असे ठरवितां येत

नाहींत. साधारणत. अनुक्रम ठरविता येतो. परतु त्यासबधानेंही आरभीं थोडा मतभेद आहे. मुकुदराज हा ज्ञानदेवाच्या अगोदरचा असें समजतात. परतु त्याच्या भाषासरणीवरून तो बराच मागूनचा—नामदेव आणि एकनाथ याच्याही मागूनचा—असें वाटतें. ज्ञानदेव आणि नामदेव यानाही कोणी समकालीन समजतात. परतु भाषेवरून नामदेव बराच मागूनचा ठरतो. ज्ञानदेवाच्या वेळीं पढरीच्या विठोबाचा आणि त्याच्या भक्तीचा मागमूसही नव्हता, पण नामदेवाच्या वेळीं विठोबाची भक्ती फार जोरात होती. कर्नाटकातील विठ्ठल देव पढरपुरास तेथील जुन्या शिवाच्या देवळात चौदाव्या शतकाच्या मध्याच्या सुमारास स्थापित झाला, त्या वेळीं नामदेव झाला. नामदेवाचें कवन म्हणजे त्याचे अभग होत. याची त्याच्या वेळची भाषा जशीच्यातशी टिकलेली नाहीं. तिला वारकऱ्यानीं बरेंच नवीन स्वरूप दिलेलें आहे. नामदेव ज्ञानदेवानतर सुमारे दोनशें वर्षांनीं, आणि एकनाथ नामदेवानतर शभर वर्षांनीं झाला असें साधारणत म्हणता येतें. यानतरच्या कवींचा अनुक्रम आणि त्याचे काळ पुढें सागितलेले आहेत. परतु बहुतेक सर्वांचे काळ अनुमानाचे आहेत रामदास, मोरोपत, वगैरे अगदीं अलीकडल्या कवींचे काळ मात्र विश्वसनीय म्हणता येतील.

एकादा कवी अथवा ग्रथकार म्हटला कीं त्याचें चरित्र, त्याचा स्वभाव, भोंवतालची परिस्थिती, त्याचीं जगातील निरनिराळ्या गोष्टींच्या सबधाचीं मतें, इत्यादि गोष्टींचा त्याच्या ग्रथातील प्रतिपादनावर परिणाम अवश्य झालाच पाहिजे. परतु आमच्या जुन्या कवींच्या ग्रथावर यातला कसलाही परिणाम झालेला दाखविता येत नाहीं. एकतर कवींच्या चरित्र वगैरे गोष्टी उपलब्ध नाहींत. जी अल्प माहिती मिळते, ती अद्भुत, असभवनीय आणि निराधार गोष्टींनीं मिसळलेली आहे. शिवाय मागें सागण्यात आलेंच आहे कीं, आमचे कवी सभोंवतालच्या जगाविषयीं उदासीन असत, आणि जुनीं शास्त्रें, पुराणें आणि चाली रीती, हींच आमच्या कवींचीं मतें, असा प्रकार होता. नवीन विचार कधीं कोणी केलाच नाहीं. तेव्हा आमचें हें जुनें वाङ्मय कसें आहे, याची कल्पना होईल.

भाषेच्या घटनेचा विचार करितांना ग्रंथांच्या अस्सलपणाचें महत्त्व फार आहे. मोरोपंताखेरीज कोणत्याही कवीचे अस्सल ग्रंथ उपलब्ध नाहींत. ज्ञानेश्वरीपासून शेवटपर्यंतचे सर्व मराठी काव्य-ग्रंथ वाचक, वारकरी, सांप्रदायी, लेखक, हरदास, इत्यादिकांच्या तावडीला सांपडून त्यांनीं त्यांत वाटतील तसे फेरफार केले आहेत; त्यांत पाहिजे तितकें जास्त घुसडून दिलें आहे व हवें तें कमी केलें आहे. इतकेंच नव्हे, तर कित्येक ग्रंथ आणि कविता एकाद्या नामांकित कवीच्या नांवावर मोडतात; परंतु भाषेवरून आणि आंतील विषयावरून त्या त्या नांवाचे निरनिराळे कवी झाले असावे असें, किंवा अमुक एका ग्रंथावर कवीचें नांव खोटेंच घातलें असावें असें, दिसून येतें. ज्ञानदेव किंवा ज्ञानेश्वर दोन, नामदेव दोन, वामन तीन, अशीं अनुमानें काढावीं लागतात. अत्यंत लोकप्रिय असे तुकाराम आणि रामदास यांच्या कवित्वांतही मतलबी लोकांनीं त्यांचें खास नव्हे असें कवित्व दडपून दिलें आहे. अशी स्थिती असल्यामुळें हे काव्यग्रंथ तूर्त जसे आहेत तसे घेऊन त्यांवर आपलें काम भागवावयाचें आहे. तें काम पूर्ण होण्यासाठीं अस्सल ग्रंथ शक्य तितके उपलब्ध झाले पाहिजेत, आणि कवींच्या संबंधाची खरी माहिती मिळाली पाहिजे. या सर्व अडचणींतून वाट काढण्याचें काम फार कठीण आहे. यासंबंधानें शोध होऊन विश्वसनीय गोष्टी प्रसिद्ध झाल्या पाहिजेत. तसेंच प्रत्येक कवीचे ग्रंथ घेऊन त्यांची भाषा, विषयप्रतिपादन आणि इतर गोष्टी यांचें पूर्ण उद्घाटण झालें पाहिजे. तसें होण्यास तूर्त वर सांगितलेल्या अडचणी असून, शिवाय असल्या अभ्यासाची कोणास फारशी हौसही नाहीं. सांप्रदायिक चर्चा बरीच होते, पण वाङ्मयात्मक चर्चा होत नाहीं. परंतु तसें होईपर्यंत स्वस्थ बसण्यांतही अर्थ नाहीं. कोणीं तरी आरंभ केलाच पाहिजे, आणि आपल्यास योग्य वाटेल तें निर्भीडपणें स्पष्ट बोललें पाहिजे. अशा स्थितीमध्यें प्रत्येक प्रख्यात कवीचे जे ग्रंथ आपल्यापुढें आहेत, ते आहेत त्याच स्थितींत घेऊन, प्रत्येकानें भाषा-घटनेची काय कामगिरी केली आहे, हें पाहूं.

आमचे मराठी कवी दोन प्रकारचे आहेत. एक संत कवी. नामदेव, एकनाथ, तुकाराम हे साधू असून त्यांचा उद्देश आपली कवी म्हणून कीर्ती व्हावी असा नव्हता. ईश्वरभक्तीच्या स्फूर्तीनें निघालेले त्यांचे उद्गार कवितामय आहेत. मुक्तेश्वर, श्रीधर, वामन महिपती, मोरोपंत हे कीर्ती व्हावी म्हणून कविता करणारे होत. रामदासाची कविता लोकांना नीती आणि सुव्यवहार शिकविण्याच्या उद्देशानें लिहिलेली आहे. ज्ञानदेव आणि वामन यांचें वेदान्त विषयाचे प्रतिपादन करण्याकडे लक्ष विशेष. पण वामनपंडितानें केवळ काव्य अशीही पुष्कळ रचना केली आहे. मराठी कवितेचें एकंदर स्वरूप अशा प्रकारचें आहे. सर्व ज्ञान संस्कृतामध्यें भरलेलें आहे, तें मराठींत आणावें हा मात्र सर्व कवींचा मुख्य उद्देश दिसून येतो.

आपल्या प्रांतांत कवी आणि साधू हे दोन शब्द परस्परांचे पर्याय होऊन बसले आहेत. प्रथमतः साधुत्वास कांहीं तोटा नसे, आणि अजूनही नाहीं. आणि अशा प्रकारचें साधुत्व स्वीकारिलें म्हणजे मग लोकांना उपदेश करण्याचा अधिकार आलाच. मग तो अधिकार कांहीं तरी आणि कशी तरी कविता करून चालविलाच पाहिजे. इकडून तिकडून पैदा केलेला गीतेचा अर्थ, शिळोप्याच्या गप्पांमध्यें सजविलेला विसंगत आणि वेडावाकडा वेदान्त, हरदासी गप्पा आणि पौराणिक आख्यानें यांचेवर मराठींत भाराभर कविता आहे. आमच्या जुन्या पौराणिक कथा मूळच्याच अद्भुत, विसंगत आणि बऱ्याचशा पोरकट अशा आहेत. त्यांत आणखी कवींनीं, आणि विशेषतः आपलें वक्तृत्व लोकांना मनोरंजक आणि प्रसंगीं हास्यास्पदही करण्याचा प्रयत्न करणाऱ्या हरदासमंडळीनें या गुणांत फार भर घातली आहे. शिवाय जुन्या संशोधनाचा आमचा हव्यास अलीकडे इतका अमर्यादित झाला आहे कीं, एकाद्याच्या पांचचार ओव्या, एकादुसरें पद अथवा एकादी मोडकीतोडकी आरती दृष्टीस पडली कीं, त्या प्राचीन कवीचा शोध लावण्याची आमची धडपड सुरू असते. अशा प्रकारच्या कवित्वानें भाषेचें कितपत हित झालें आहे, याचा निर्णय करीत बसण्याची जरूर नाहीं.

भाषेच्या घटनेचा विचार करितांना ग्रंथांच्या अस्सलपणाचें महत्त्व फार आहे. मोरोपंताखेरीज कोणत्याही कवीचे अस्सल ग्रंथ उपलब्ध नाहींत. ज्ञानेश्वरीपासून शेवटपर्यंतचे सर्व मराठी काव्य-ग्रंथ वाचक, वारकरी, सांप्रदायी, लेखक, हरदास, इत्यादिकांच्या तावडीला सांपडून त्यांनी त्यांत वाटतील तसे फेरफार केले आहेत; त्यांत पाहिजे तितकें जास्त घुसडून दिलें आहे व हवें तें कमी केलें आहे. इतकेंच नव्हे, तर कित्येक ग्रंथ आणि कविता एकाद्या नामांकित कवीच्या नांवावर मोडतात; परंतु भाषेवरून आणि आंतील विषयावरून त्या त्या नांवाचे निरनिराळे कवी झाले असावे असें, किंवा अमुक एका ग्रंथावर कवीचें नांव खोटेंच घातलें असावें असें, दिसून येतें. ज्ञानदेव किंवा ज्ञानेश्वर दोन, नामदेव दोन, वामन तीन, असे अनुमानें काढावीं लागतात. अत्यंत लोकप्रिय असे तुकाराम आणि रामदास यांच्या कवित्वांतही मतलबी लोकांनीं त्यांचें खास नव्हे असें कवित्व दडपून दिलें आहे. अशी स्थिती असल्यामुळें हे काव्यग्रंथ तूर्त जसे आहेत तसे घेऊन त्यांवर आपलें काम भागवावयाचें आहे. तें काम पूर्ण होण्यासाठीं अस्सल ग्रंथ शक्य तितके उपलब्ध झाले पाहिजेत, आणि कवींच्या संबंधाची खरी माहिती मिळाली पाहिजे. या सर्व अडचणींतून वाट काढण्याचें काम फार कठीण आहे. यासंबंधानें शोध होऊन विश्वसनीय गोष्टी प्रसिद्ध झाल्या पाहिजेत. तसेंच प्रत्येक कवीचे ग्रंथ घेऊन त्यांची भाषा, विषयप्रतिपादन आणि इतर गोष्टी यांचें पूर्ण उद्घाटण झालें पाहिजे. तसें होण्यास तूर्त वर सांगितलेल्या अडचणी असून, शिवाय असल्या अभ्यासाची कोणास फारशी हौसही नाहीं. सांप्रदायिक चर्चा बरीच होते, पण वाङ्मयात्मक चर्चा होत नाहीं. परंतु तसें होईपर्यंत स्वस्थ बसण्यांतही अर्थ नाहीं. कोणीं तरी आरंभ केलाच पाहिजे, आणि आपल्यास योग्य वाटेल तें निर्भीडपणें स्पष्ट बोललें पाहिजे. अशा स्थितीमध्यें प्रत्येक प्रख्यात कवीचे जे ग्रंथ आपल्यापुढें आहेत, ते आहेत त्याच स्थितींत घेऊन, प्रत्येकानें भाषा-घटनेची काय कामगिरी केली आहे, हें पाहूं.

आमचे मराठी कवी दोन प्रकारचे आहेत. एक संत कवी. नामदेव, एकनाथ, तुकाराम हे साधू असून त्यांचा उद्देश आपली कवी म्हणून कीर्ति व्हावी, असा नव्हता. ईश्वरभक्तीच्या स्फूर्तीनें निघालेले त्यांचे उद्गार कवितामय आहेत. मुक्तेश्वर, श्रीधर, वामन महिपती, मोरोपंत हे कीर्ति व्हावी म्हणून कविता करणारे होत. रामदासाची कविता लोकांना नीती आणि सुव्यवहार शिकविण्याच्या उद्देशानें लिहिलेली आहे. ज्ञानदेव आणि वामन यांचें वेदान्त-विषयाचें प्रतिपादन करण्याकडे लक्ष विशेष. पण वामनपंडितानें केवळ काव्य अशीही पुष्कळ रचना केली आहे. मराठी कवितेचें एकंदर स्वरूप अशा प्रकारचें आहे. सर्व ज्ञान संस्कृतामध्यें भरलेलें आहे, तें मराठींत आणावें हा मात्र सर्व कवींचा मुख्य उद्देश दिसून येतो.

आपल्या प्रांतांत कवी आणि साधू हे दोन शब्द परस्पराचे पर्याय होऊन बसले आहेत. प्रथमतः साधुत्वास काहीं तोटा नसे, आणि अजूनही नाहीं. आणि अशा प्रकारचें साधुत्व स्वीकारिलें म्हणजे मग लोकांना उपदेश करण्याचा अधिकार आलाच. मग तो अधिकार काहीं तरी आणि कशी तरी कविता करून चालविलाच पाहिजे. इकडून-तिकडून पैदा केलेला गीतेचा अर्थ, शिळोप्याच्या गप्पामध्यें सजविलेला विसंगत आणि वेडावाकडा वेदान्त, हरदासी गप्पा आणि पौराणिक आख्यानें यांचेवर मराठींत भाराभर कविता आहे. आमच्या जुन्या पौराणिक कथा मूळच्याच अद्भुत, विसंगत आणि बऱ्याचशा पोरकट अशा आहेत. त्यांत आणखी कवींनीं, आणि विशेषतः आपलें वक्तृत्व लोकांना मनोरंजक आणि प्रसंगीं हास्यास्पदही करण्याचा प्रयत्न करणाऱ्या हरदासमंडळीनं या गुणांत फार भर घातली आहे. शिवाय जुन्या संशोधनाचा आमचा हव्यास अलीकडे इतका अमर्यादित झाला आहे कीं, एकाद्याच्या पांचचार ओव्या, एकादुसरें पद अथवा एकादी मोडकीतोडकी आरती दृष्टीस पडली कीं, त्या प्राचीन कवीचा शोध लावण्याची आमची धडपड सुरू असते. अशा प्रकारच्या कवित्वानें भाषेचें कितपत हित झालें आहे, याचा निर्णय करीत बस-ण्याची जरूर नाहीं.

भाषेच्या घटनेचा विचार करितांना ग्रंथांच्या अस्सलपणाचें महत्त्व फार आहे. मोरोपंताखेरीज कोणत्याही कवीचे अस्सल ग्रंथ उपलब्ध नाहींत. ज्ञानेश्वरीपासून शेवटपर्यंतचे सर्व मराठी काव्य-ग्रंथ वाचक, वारकरी, सांप्रदायी, लेखक, हरदास, इत्यादिकांच्या तावडीला सांपडून त्यांनीं त्यांत वाटतील तसे फेरफार केले आहेत; त्यांत पाहिजे तितकें जास्त घुसडून दिलें आहे व हवें तें कमी केलें आहे. इतकेंच नव्हे, तर कित्येक ग्रंथ आणि कविता एकाद्या नामांकित कवीच्या नांवावर मोडतात; परंतु भाषेवरून आणि आंतील विषयावरून त्या त्या नांवाचे निरनिराळे कवी झाले असावे असें, किंवा अमुक एका ग्रंथावर कवीचें नांव खोटेंच घातलें असावें असें, दिसून येतें. ज्ञानदेव किंवा ज्ञानेश्वर दोन, नामदेव दोन, वामन तीन, अशीं अनुमानें काढावीं लागतात. अत्यंत लोकप्रिय असे तुकाराम आणि रामदास यांच्या कवित्वांतही मतलबी लोकांनीं त्यांचें खास नव्हे असें कवित्व दडपून दिलें आहे. अशी स्थिती असल्यामुळें हे काव्यग्रंथ तूर्त जसे आहेत तसे घेऊन त्यांवर आपलें काम भागवायवयाचें आहे. तें काम पूर्ण होण्यासाठीं अस्सल ग्रंथ शक्य तितके उपलब्ध झाले पाहिजेत, आणि कवींच्या संबंधाची खरी माहिती मिळाली पाहिजे. या सर्व अडचणींतून वाट काढण्याचें काम फार कठीण आहे. यासंबंधानें शोध होऊन विश्वसनीय गोष्टी प्रसिद्ध झाल्या पाहिजेत. तसेंच प्रत्येक कवीचे ग्रंथ घेऊन त्यांची भाषा, विषयप्रतिपादन आणि इतर गोष्टी यांचें पूर्ण उद्घाटण झालें पाहिजे. तसें होण्यास तूर्त वर सांगितलेल्या अडचणी असून, शिवाय असल्या अभ्यासाची कोणास फारशी हौसही नाहीं. सांप्रदायिक चर्चा बरीच होते, पण वाङ्मयात्मक चर्चा होत नाहीं. परंतु तसें होईपर्यंत स्वस्थ बसण्यांतही अर्थ नाहीं. कोणीं तरी आरंभ केलाच पाहिजे, आणि आपल्यास योग्य वाटेल तें निर्भीडपणें स्पष्ट बोललें पाहिजे. अशा स्थितीमध्यें प्रत्येक प्रख्यात कवीचे जे ग्रंथ आपल्यापुढें आहेत, ते आहेत त्याच स्थितींत घेऊन, प्रत्येकानें भाषा-घटनेची काय कामगिरी केली आहे, हें पाहूं.

आमचे मराठी कवी दोन प्रकारचे आहेत. एक संत कवी. नामदेव, एकनाथ, तुकाराम हे साधू असून त्यांचा उद्देश आपली कवी म्हणून कीर्ती व्हावी, असा नव्हता. ईश्वरभक्तीच्या स्फूर्तीनें निघालेले त्यांचे उद्गार कवितामय आहेत. मुक्तेश्वर, श्रीधर, वामन महिपती, मोरोपंत हे कीर्ती व्हावी म्हणून कविता करणारे होत. रामदासाची कविता लोकांना नीती आणि सुव्यवहार शिकविण्याच्या उद्देशानें लिहिलेली आहे. ज्ञानदेव आणि वामन यांचें वेदान्त विषयाचें प्रतिपादन करण्याकडे लक्ष विशेष. पण वामनपंडितानें केवळ काव्य अशीही पुष्कळ रचना केली आहे. मराठी कवितेचें एकंदर स्वरूप अशा प्रकारचें आहे. सर्व ज्ञान संस्कृतामध्यें भरलेलें आहे, तें मराठींत आणावें हा मान सर्व कवींचा मुख्य उद्देश दिसून येतो.

आपल्या प्रांतांत कवी आणि साधू हे दोन शब्द परस्परांचे पर्याय होऊन बसले आहेत. प्रथमतः साधुत्वास कांहीं तोटा नसे, आणि अजूनही नाहीं. आणि अशा प्रकारचें साधुत्व स्वीकारिलें म्हणजे मग लोकांना उपदेश करण्याचा अधिकार आलाच. मग तो अधिकार कांहीं तरी आणि कशी तरी कविता करून चालविलाच पाहिजे. इकडून-तिकडून पैदा केलेला गीतेचा अर्थ, शिळोप्याच्या गप्पामध्य सजविलेला विसंगत आणि वेडावाकडा वेदान्त, हरदासी गप्पा आणि पौराणिक आख्यानें यांचेवर मराठींत भाराभर कविता आहे. आमच्या जुन्या पौराणिक कथा मूळच्याच अद्भुत, विसंगत आणि बऱ्याचशा पोरकट अशा आहेत. त्यांत आणखी कवींनीं, आणि विशेषतः आपलें वक्तृत्व लोकांना मनोरंजक आणि प्रसंगीं हास्यास्पदही करण्याचा प्रयत्न करणाऱ्या हरदासमंडळीनें या गुणांत फार भर घातली आहे. शिवाय जुन्या संशोधनाचा आमचा हव्यास अलीकडे इतका अमर्यादित झाला आहे कीं, एकाद्याच्या पांचचार ओव्या, एकाददुसरें पद अथवा एकादी मोडकीतोडकी आरती दृष्टीस पडली कीं, त्या प्राचीन कवीचा शोध लावण्याची आमची धडपड सुरू असते. अशा प्रकारच्या कवित्वानें भाषेचें कितपत हित झालें आहे, याचा निर्णय करीत बसण्याची जरूर नाहीं.

आतां मुख्य मुख्य महाराष्ट्र-कवी घेऊन प्रत्येकानें मराठी भाषेची घटना करण्याच्या संबंधानें काय काय कामगिरी केली आहे हें थोडक्यांत पाहूं. प्रत्येक कवीच्या नांवापुढें त्याचा आज मान्य असलेला काळ दिला आहे. मात्र तो अगदीं खरा असेलच असें सांगतां येत नाहीं. पुढील चर्चेमध्यें ज्यांच्या ग्रंथांचा अभ्यास चालतो, आणि ज्यांची भाषा घटनेच्या संबंधाची कामगिरी दाखवितां येईल असे प्रमुख व निवडक कवी तेवढेच घेतले आहेत.

ज्ञानदेवाच्या भाषेचें स्वरूप मागें सांगण्यांत आलेंच आहे. तींत आपणास फार जुने वाटणारे अथवा ज्यांना कोणी गांवढळ म्हणतील असे शब्द फार. नामें, क्रियापदें यांचीं आणि इतर प्राचीन रूपें आहेत. तीं भिन्न भिन्न प्रकारचीं आहेत. त्या वेळीं भाषेंत ज्या प्रकारच्या रूपांचा प्रचार होता, तीं त्यानें उपयोगिलीं आहेत. प्रथमेच्या अकारान्त एकवचनाच्या अन्तीं 'ऊ' घातलेला असतो. हा 'ऊ' पुष्कळदां अकारान्त क्रियापदरूपांना, कृदन्तांना आणि अव्ययांनाही लाविला आहे. विषयप्रतिपादन अगदीं सुलभ आणि उपदेशपर आहे. दृष्टान्त, उपमा, विपूल आहेत. अगदीं व्यवहारांतील गोष्टींचीं उदाहरणें अथवा दृष्टान्तादि घेऊन विषय समजेसा केला आहे. कित्येक ठिकाणीं एकाच गोष्टीचे प्रतिपादनांत हे दृष्टान्त किंवा उपमा इतक्या पुष्कळ आलेल्या आहेत कीं, वाचकांस कंटाळा येईल. तथापि, असल्या विषयाचें प्रतिपादन प्रथमतःच करावयाचें असल्यामुळें आणि मराठी भाषेंत याच्या अगोदर ग्रंथच नसल्यामुळें असा पाल्हाळ करणें त्या वेळीं इष्ट वाटलें असेल. ज्ञानदेवाची मराठी भाषा संस्कृतास धरून नाहीं. तिला स्वतांचें स्वतंत्र स्वरूप लावून देण्याचा त्याचा प्रयत्न आहे. तथापि त्याच्या भाषेंत सुमारें शेंकडा पंचवीस शुद्ध संस्कृत (तत्सम) शब्द येतात.

ज्ञानदेवानें मराठी वाङ्मयाचा, अर्थात् ग्रांथिक मराठीचा, पाया घालून भाषेची घटना होण्यास उपयोगी पडण्यासारखे सर्व प्रकार एकत्र जुळविले. त्याची विद्वत्ता, देशभाषेंत ज्ञान आणण्याची त्याची कळकळ आणि आस्थापूर्वक सर्वांना विषय समजून देण्याची त्याची हातोटी, यांमुळें या कामांत त्याला चांगलें यश आलें आहे. असा उत्तम

अथ आपल्या हातून मराठींत निर्माण झाला याचें ज्ञानदेवानें आपलें आपणच कौतुक केलें आहे:—

" मजलागीं ग्रथाची स्वामी,
दुजी सृष्टी जे हे केली तुम्हीं,
ते पाहुनी हासों आम्ही,
विश्वामित्रातें ही. " ज्ञा. अ. १८.

मुकुंदराजः—याचा काल अद्यापि ठरला नाहीं. त्याच्या ग्रथात कित्येक राजाची नावें आहेत, पण तीं निश्चित करिता येत नाहींत. त्याची भाषाही ज्ञानदेवाच्या भाषेपेक्षा बरीच मागूनची भासते. याच्या भाषेची तऱ्हा बरीचशी एकनाथाच्या भाषेसारखी आहे. तो मराठी लोकात विठोबाची भक्ती उत्पन्न होण्याच्या अगोदर झाला असावा, असें मात्र अनुमान करिता येतें. याचे काहीं सस्कृत ग्रथ सापडले आहेत. यामुळें मूळ ग्रथ सस्कृतात असून मागाहून तेच कोणीं मराठी बनविले कीं काय, अशीही शका उत्पन्न होते. तेव्हा या कवीची जास्त माहिती मिळेपर्यंत त्याचें भाषाघटनेचें काम सागता येत नाहीं.

नामदेव —हा चौदाव्या शतकाच्या पूर्वार्धानतर झाला असावा, असें मागें सागितलेंच आहे. याचें काव्य म्हणजे विठ्ठलभक्तिपर आणि उपदेशपर अभग. नामदेवानें विठ्ठलभक्तीचा प्रसार करण्याचें मोठेंच काम केलें. या भक्तिभरामध्यें त्यानें अभग रचिले. ते फार लोकप्रिय असून, तेव्हापासून आतापर्यंत वारकरी लोकाच्या पाठात निरतर आहेत. यामुळें ते अभग नामदेवानें जसे आरभीं रचले तसे नाहींत. त्याची भाषा अगदीं नवीन भासते. या अभगाचें नामदेवाचा काळ ठरविण्याच्या कामात साह्य होत नाहीं. या अभगानीं अजजनास विठ्ठलभक्तीच्या नादास आणि सुमार्गास लावण्याचें काम झालें असलेंच पाहिजे, आणि हें काम साध्य होण्याजोगी शक्ती भाषेच्या अगीं आणण्याची म्हणजे भाषा मनोवेधक करण्याची कामगिरी नामदेवान केली आहे.

नामदेवानें काव्यरचनेची एक नवीन तऱ्हा उपयोगात आणिली. भक्त हे परमेश्वरास आपला प्रेमळ मित्र असें समजत, आणि त्याच्याशीं

अगदीं बरोबरीच्या नात्यानें आणि अत्यंत सलगीनें आणि लडिवाळ-पणानें बोलत. अशा प्रकारची भक्तांची भाषा नामदेव, तुकाराम आणि इतर संत किंवा भक्त कवी यांच्या कवितेंत आहे. प्रसंगीं हीं कवनें करण्यांत आणि गाण्यांत हे भक्तकवी इतके तल्लीन होत असत कीं, त्यांना त्या वेळीं भोंवतालच्या लौकिक गोष्टींचें, अथवा आपण म्हणतों काय आणि करतों काय याचें भानही नसे. अशा प्रकारची जी कवितेची तऱ्हा तिला केवळ भ क्ति र स असें म्हणतां येणार नाहीं. त्यांत अ द्भु त प णा ही फार आहे. भक्तीच्या भरांत देव आपल्याबरोबर हवे ते व्यवहार करितो असेंच केवळ वर्णिलेलें नाहीं; तर प्रसंगीं हे भक्त-कवी देवाला हव्या त्या भाषेंत बोलण्यास किंवा शिव्या देण्यासही कमी करीत नाहींत. अशा प्रकारचा अ द्भु त भ क्ति र स, ज्याला इंग्रजींत Romantic Devotion असें म्हणतां येईल तो, मराठी भक्तकवींच्या काव्यांत, विशेषतः नामदेव आणि तुकाराम आणि त्यांचे नातेवाईक भक्त यांच्या उद्गारांत, जागोजाग आहे. इंग्रजी भाषेंत Romantic काव्य पुष्कळ आहे. स्काट, बायरन, शेले, वर्डस्वर्थ या कवींना अद्भुत वर्णनें केलीं आहेत. परंतु तीं पशुपक्षी, वृक्षपर्वतादि आणि इतर वस्तू सजीव कल्पून केलीं आहेत. देव आपला सखा कल्पून त्याच्याशीं लडिवाळपणा केल्याचा अद्भुत भक्तिरस हा आमच्या कवींचाच विशेष आहे. ही तऱ्हा मोरोपंताच्या काव्यांतूनही आढळते.

अशा प्रकारच्या भक्तिरसास कित्येक टीकाकार नांवें ठेवितात. परमेश्वर एवढा थोर, त्याशीं यःकश्चित् माणसानें इतकी सलगी कशी करावी, असें या टीकाकारांचें म्हणणे पडतें. विशेषतः खिस्ती मिशनरी-लोक या भक्तीला अयोग्य म्हणतात. त्यांच्या अनुकरणानें आमच्यांतील टीकाकारांनींही असल्या काव्यास नांवें ठेविलीं आहेत. रानडे यांनीं आपल्या पूर्ववयांत यासंबंधानें मोरोपंताविषयीं बरीच टीका केली आहे, परंतु पुढें त्यांचें मत असल्या भक्तिप्रेमाचे संबंधानें फिरलेलें दिसतें. आमचे भक्त-कवी परमेश्वर मूर्तिमंत मानीत, आणि त्याला आपला प्रेमळ मित्र समजत. तेव्हां त्यांच्या समजुतीप्रमाणें केलेल्या त्यांच्या वर्णनास नांवें ठेवणें रास्त नाहीं. खिस्ती लोक देवाला प्रेमळ मित्र

समजत नाहींत. परंतु तो कडक पिता, पक्षपाती, रागावणारा आणि सूड घेणारा आहे, असें त्याच्या ग्रंथांतून दाखविलेलें आहे. आमच्या लोकांच्या—निदान भक्त आणि संत यांच्या—अशा समजुती नाहींत. तेव्हां ख्रिस्ती टीकाकारांनीं आपल्या धर्मग्रंथाची कसोटी लावून आमच्या कवींची तपासणी करणें चुकीचें आहे. खरोखर पाहिलें तर आमच्या कवींच्या या प्रेमाच्या जोरावर मराठींत उत्तम काव्य निर्माण झालें आहे, आणि ख्रिस्ती मिशनरींना चांगलें मराठी कळत असलें तर, त्यांना आमच्या संतकवींचें भक्तिरसमय काव्य आवडतें असा अनुभवही आहे. आमचे अर्वाचीन मराठी कवी रे० टिळक हे ख्रिस्तधर्मी असून त्यांची कविता आपल्या संतकवींच्या तोडीची असते, हें कोणालाही दिसून येईल.

एकनाथ [१५२८–१५९९] —यानें वैष्णवभक्तिपर व आध्यात्मिक ज्ञानविषयक ग्रंथ लिहिले आहेत. याचा मुख्य विस्तृत ग्रंथ भागवत एकादशस्कंधावरची टीका. हिची तऱ्हा ज्ञानेश्वरीसारखी आहे. मूळचा श्लोक घेऊन त्यावर लौकिक भाषेंत उपमा दृष्टान्तांच्या साह्यानें लोकांना नीट कळेल असें विस्तृत प्रतिपादन केलेलें आहे मराठी भाषा लिहिण्याचे कामांत ज्ञानदेव हा एकनाथाचा गुरू आहे परंतु एकनाथाच्या भाषेंत ज्ञानदेवाच्या भाषेनंतर पुष्कळ सुधारणा झालेली दिसून येते. या दोन कवींची भाषेच्या संबंधानें येथें तुलना केली पाहिजे. ही तुलना करितांना, मराठी कवींचे ग्रंथ ज्या वेळीं रचिले, त्या वेळच्या त्यांच्या स्वरूपांत आपणास उपलब्ध झालेले नाहींत, हें लक्षांत ठेवावें.

ज्ञानदेवानें गीतेसारख्या कठीण विषयाचा अध्यात्मविषयक ग्रंथ मराठींत रूपांतर करण्यास घेतला आहे, त्यांतील विषय त्यास चांगला समजला आहे, आणि त्याचें मराठी रूपांतर उत्तम बनलें आहे यावरून, आणि त्यानें शांकरभाष्यादि ग्रंथांचा उपयोग केला आहे यावरून, तो *विद्वान होता असें उघड दिसतें.* ज्ञानदेवीच्या *विरुद्ध मतें असलीं,* तरी तीं ज्ञानदेवास विषय कळला नाहीं अशा समजुतीचीं नसून भिन्न-सांप्रदायप्रदर्शक आहेत. एकनाथही विद्वान ग्रंथकार होता. परंतु दोघांचें मराठी भाषेच्या घटनेच्या संबंधाचें काम भिन्न प्रकारचें आहे.

समजत नाहींत. परंतु तो कडं विषयांचे उद्गार सुप्रसिद्ध आहेत त्यांवरून, घेणारा आहे, असें त्यांच्या ज्ञानेश्वरीच्या प्रती उपलब्ध आहेत, लोकांच्या–निदान भक्त आणिप्रमाणें आहेत. त्यांमध्यें भाषेच्या सबंधाचे तेव्हां खिस्ती टीकाकारांनीसेच राखलेले दिसतात. कारण, खुद्द आमच्या कवींची तपासण जुने प्रकार कमी आहेत. त्याची भाषा तर आमच्या कवींच्या यांच्या भाषेपेक्षां अधिक सरळ आणि सुबोध निर्माण झाले आहे; आणि तीनशें वर्षांत मराठी भाषा ग्रंथरचनेच्या असलें तर, त्यांना आम लागली हेंच आहे. दुसरी एकनाथाच्या असा अनुभवही आहोंत ठेवण्याची गोष्ट अशी आहे कीं, त्याच्या खिस्तधर्मी असून त्यांच्या भाषेपेक्षां भावार्थ रामायण, रुक्मिणी-हे कोणालाही त्कियाविषयक ग्रथांची भाषा अधिक जुनाट दिसते.

एकनाथ अर्थात् विषयभिन्नता हें आहे. अध्यात्मविषयाच्या प्रतिपादनार्थ शब्द आणि भाषेची रचना प्रौढ पाहिजे, आणि कथाविषय साधारण लोकांनाही कळावा म्हणून साध्या भाषेंत असला पाहिजे. तसेंच ज्ञानदेवापासून एकनाथापर्यंतच्या काळांत अध्यात्मविषयक चर्चा हें विद्वत्तेचें काम म्हणून गणण्यांत येऊं लागलें आणि त्या चर्चेची भाषा पांडित्यप्रचुर असूं लागली हें उघड दिसतें. तेव्हां ज्ञानदेव हा मराठी भाषेचा पाया घालणारा होय. त्याचा पाया प्रथमारंभीं बराच ओबडधोबड आहे. त्याच्यानतर एकनाथ हा तो पाया साफसूफ करून त्याला सुस्वरूप आणणारा होय. एकनाथानें मराठी भाषा व्यवस्थित घडविण्यास आरंभ केला असें म्हटलें पाहिजे.

एकनाथाच्या काळापर्यंत ज्ञानेश्वरी आणि एकनाथीभागवत हे केवळ आध्यात्मिक ग्रंथ झाले. यांतही विषयाच्या संबंधानें फरक आहे. ज्ञानेश्वरीचा अद्वैत ईश्वरीज्ञान हा प्रधान विषय असून त्याला भक्तीची थोडीशी जोड आहे. त्यानंतरच्या तीनशें वर्षांत भक्तिमार्गाचा जास्त प्रसार झाला. यामुळें एकनाथीभागवताचा भक्तिमहिमा सांगणें किंवा भागवतधर्माचा प्रसार करणें हा प्रधान विषय आहे. याशिवाय एकनाथानें नवीन ग्रंथरचनेचा पाया घातला आहे. ही ग्रंथरचना

म्हणजे आख्यानें होत. हीं आख्यानें एकनाथानें जरी फार लिहिलीं नाहींत, तरी त्यानें त्यांचा आरंभ करून दिला, ही गोष्ट खरी.

कोणत्याही भाषेचें आद्यस्वरूप कथामय असतें. परंतु मराठींत प्रथमतःच आध्यात्मिक ग्रंथ झाले. याचें कारण ज्ञानेश्वरी हा जरी मराठी वाङ्मयाचा आद्यग्रंथ असला तरी एकंदर आर्य-वाङ्मयाचा आद्यग्रंथ नव्हे. संस्कृत, प्राकृत या भाषा आमच्या लोकांच्याच भाषा समजलेल्या आहेत. त्या वेळीं संस्कृत वाङ्मयाचा आध्यात्मिक विषयावर भर होता. ते ग्रंथ एकंदर जनतेस समजावे यासाठीं प्रथमतः त्यांचीं रूपांतरें मराठींत होऊं लागलीं. पण पुढें लौकरच मराठींत योग्य क्रमाप्रमाणें कथामय वाङ्मयही होऊं लागलें.

संस्कृतांत साधारणतः गद्य रचनेबद्दल अनुष्टुप् या साध्या छंदामध्यें रचना असते. लिहिण्याचीं साधनें अल्प असल्यामुळें ग्रंथ टिकावे म्हणून ते तोंडपाठ करीत. त्याला पद्यरचना जास्त सोयीची, यामुळें संस्कृतांत अनुष्टुप् छंदांत वाङ्मय झालें. तोच प्रघात मराठींत येऊन ओवी हा छंद उत्पन्न झाला. ज्ञानदेवापासून मोरोपंतापर्यंत सर्व ग्रंथकारांनीं आध्यात्मिक अथवा वेदान्त या विषयाच्या प्रतिपादनार्थ ओवी छंदाचा उपयोग केला आहे. ओवीबद्ध वाङ्मय हें गद्यवाङ्मयच होय. तसेंच आध्यात्मिक ओवी-वाङ्मयास काव्य असेंही म्हणतां येणार नाहीं. विषयप्रतिपादनाच्या भरांत उपमा दृष्टान्तांनीं युक्त अशी जागोजाग मनोहर रचना जरी ज्ञानदेव, एकनाथ यांनीं केली आहे, तरी ती ग्रंथरचना म्हणजे श्रेष्ठ प्रतीचें गद्य असेंच म्हटलें पाहिजे. तशी चाल असती तर त्यांनीं आपले ग्रंथ गद्यमार्गेंतच लिहिले असते. मराठी वाङ्मय हें काव्य आहे कीं नाहीं, आणि ओवीबद्ध वेदान्त-वाङ्मय याला काव्य म्हणावें कीं नाहीं, असले प्रश्न कोणी उत्पन्न करितात. परंतु त्याचा विचार येथें अप्रस्तुत होय. ज्ञानदेव आणि एकनाथ यांचे ग्रंथ जरी विषयानुरोधानें गद्यासारखे आहेत, तरी त्यांनीं अनेक ठिकाणीं मनोहर रचना करून काव्य उत्पन्न केलें आहे. त्याचप्रमाणें असें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, त्यांचे ग्रंथ अध्यात्मविषयपर असल्यामुळें त्यांत खरें काव्य असावें असें आपल्यास वाटण्याचें कारणही नाहीं.

मुक्तेश्वर, श्रीधर, रघुनाथपंडित, वामन, मोरोपंत, हे खरी काव्यरचना करणारे, यामुळें त्यांच्या ग्रंथांतून रसभरीत आणि मनोहर स्थळें आहेत. तसेंच ओवी या साध्या छंदांतही काव्य निर्माण होतें, असें एकनाथ, मुक्तेश्वर आणि श्रीधर यांच्या आख्यानरूप काव्यांवरून दिसून येईल. मराठींतला काव्यरस प्रथमतः एकनाथानें उत्पन्न केला असें म्हटलें पाहिजे. त्याच्या आख्यानांत प्रसंगानुसार रसभरीत वर्णनें आहेत. तसेंच त्याच्या अध्यात्मिक ग्रंथांतही ईश्वरविषयक प्रेम आणि भक्तिरस यानीं पूर्ण अशी काव्यमय रचना पुष्कळ आहे.

एकनाथानें ज्ञानेश्वरी शुद्ध केली अशी जी आख्यायिका आहे, तिचा खरोखरी अर्थ काय हें पाहिलें पाहिजे. सांप्रदायिक लोक, साधारण वाचक आणि लेखक यांच्या सपाट्यांत ग्रंथाच्या भाषेची काय दशा होते, हें मागें सांगण्यात आलेंच आहे. ज्ञानदेवाच्या वेळीं संस्कृतांत लोकप्रिय झालेलें अध्यात्मज्ञान आपणास प्राप्त व्हावे म्हणून भाषेसबधानें खरोखरी अशिक्षित पण भाविक मंडळी अगदीं हपापलेली होती. त्या ज्ञानानें परिपूर्ण अशा भगवद्गीतेसारख्या लोकप्रिय ग्रंथावरील स्वभाषेंतला ग्रंथ हातीं आल्यावर त्याचा फारच प्रसार झाला असेल. अर्थात् ग्रंथाच्या शेंकडों प्रती झाल्या आणि त्याचें वाचन आणि त्यावर चर्चा सुरू झाली. यामुळें तीनशें वर्षांत निरनिराळ्या प्रतींत फार पाठभेद दिसू लागले आणि ज्ञानदेवाचें खरें इंगीत काय हेंही कळेनासें झालें. तेव्हां एकनाथासारख्या विद्वानानें ग्रंथ सुधारून द्यावा असें लोकांना वाटल्यावरून त्यानें ज्ञानेश्वरी सुधारून तयार केली असावी. भाषाज्ञानासंबधाचे आधुनिक विचार त्या वेळीं असणें शक्य नाहींच. यामुळें ज्ञानदेवानें मुळारंभीं जसा ग्रंथ लिहिला, तसा पुन्हा हुबेहूब बनविण्याचा प्रयत्न करण्याचा विचारही एकनाथाच्या मनांत आला नसेल. तर ज्ञानदेवानें जें विषयप्रतिपादन केलें होतें, तें यथायोग्य टिकलें आहे कीं नाहीं हें एकनाथानें पाहिलें, आणि अशा धोरणानें त्यानें ग्रंथ तपासून शुद्ध केला, असें अनुमान आपण केलें पाहिजे. एकनाथानें ग्रंथ शुद्ध केला ही गोष्ट तरी दुसऱ्याच कोणीं ज्ञानेश्वरीच्या शेवटीं लिहिली आहे, आणि यांत आतां कोणीं फेरफार करू नये अशी द्वाही

घातली आहे. तेव्हां या आख्यायिकेवरही कितपत विश्वास ठेवावा हा प्रश्नच आहे. तसेंच ही हाहीही कोणी मानलेली दिसत नाहीं. तेव्हां खुद्द ज्ञानदेवाच्या वेळची प्रत, त्यानंतरच्या साडेतीनशें वर्षांतल्या निरनिराळ्या प्रांतांतल्या कांहीं प्रती, एकनाथानें शुद्ध केलेली प्रत, आणि या आख्यायिकेच्या संबंधाचा आणखी कांहीं विश्वसनीय पुरावा, इतकी सामग्री साध्य होईपर्यंत याविषयीं जास्त तर्क करीत बसण्यांत कांहीं अर्थ नाहीं.

ज्ञानदेव, मुकुंदराज आणि एकनाथ यांनीं आध्यात्मिक ग्रंथ केले. नामदेवानें एकादा स्वतंत्र ग्रंथ लिहिला नसून भक्तिपर, नीतिपर आणि उपदेशपर अभंगच केले. त्याचीं कांहीं घोटक आख्यानेंही आहेत. वाङ्मयघटना सांगतांना प्रत्येक ग्रंथकाराच्या ग्रथांची याद येथें देण्याचें कारण दिसत नाहीं. ग्रंथांचीं नांवें इतरत्र आहेत. येथें कोणत्याही ग्रंथाचा जरूरीपुरता उल्लेख केला म्हणजे पुरे. एकनाथानें प्रथमतः आख्यान-वाङ्मयाचा पाया घातला. भा वा र्थ रा मा य ण आणि रु क्मि णी स्व यं व र हे त्याचे आख्यानमय चांगले ग्रंथ आहेत.

चिं ता म णि नामक कवीचें दिंडीवृत्तांतलें ध्रु व च रि त्र नांवाचें लहानसें गोड काव्य आहे. हा एकनाथानंतर लगेच झाला असें समजतात. भाषा तितकी जुनी भासत नाहीं. हें स्तोत्र लोकांच्या नेहमीं पाठांत असल्यामुळें भाषा बरीच बदलली असावी. या ग्रंथांत दिंडी हें निवळ मराठीवृत्त प्रथमतःच उपयोगिलें आहे. तें त्या वेळच्या हरदास वगैरे यांच्या उपयोगांत आणि संतांच्या भजनांत येत असावें असें अनुमित होतें.

खि स्त पु रा णः—पंधराव्या आणि सोळाव्या शतकांत गोवा येथें पोर्तुगीज अंमल जोरांत असतां ख्रिस्तीधर्माचा प्रसार करण्याचे प्रयत्न फार झाले. त्या वेळीं कोंकणी भाषा म्हणजे गोवा आणि कारवार या प्रदेशांतली मराठीची शाखा, हीमध्यें ख्रिस्ती धर्मविषयक कित्येक पुराणें म्हणजे ओवीबद्ध ग्रंथ लिहिण्याचे प्रयत्न रोमन क्याथोलिक मिशनरी यांनीं केले. धर्मग्रंथांची, आणि प्रार्थना, उपदेश यांची भाषा ल्याटिनच असावी, असा क्याथोलिक धर्माचा आग्रह असल्यानें, या प्रयत्नांना

पुष्कळ अडथळा आलेला दिसतो. परंतु त्यांतला एक चांगला ग्रंथ ह्यात आहे. हा ग्रंथ खिस्तपुराण होय. हा थामस स्टिफेन नांवाच्या इंग्लिश क्याथोलिक खिस्ती मिशनरीनें लिहिला. याचा जन्म सन १५४९ सालांत झाला. याचें इग्लंडांत उत्तम शिक्षण होऊन तो सन १५८२ या सालीं गोव्यास धर्मखात्यांत आला. त्याची साष्टी येथें धर्मखात्यांत नेमणूक झाली. त्यानें उत्तर कोंकणांतली मराठी भाषा आपलीशी केली असावी, आणि ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ, यांची कविता चांगलीच वाचली असावी. तसेंच त्याचा तत्कालीन शास्त्रीपंडित आणि सतमंडळी व साधूंचे सांप्रदाय यांच्याशीं पुष्कळ संबंध आलेला असावा, असें त्याच्या ग्रंथावरून दिसून येतें. खिस्तपुराण हें बायबलाचे आधारें, परंतु मिल्टनच्या काव्याच्यां धर्तीवर महाकाव्य रचिलें आहे. भाषा 'कोंकणी' असें कोणीं म्हटलें आहे. परंतु ती त्या वेळची अस्सल मराठी आहे. मात्र तीमध्यें गोव्याकडील भाषेंतील रूपें व शब्द बरेच आहेत. "हें सर्व मराठी भासेनें लिहिलें आहे" असें स्वतां कवी प्रस्तावनेंत म्हणतो. या पुराणांत संस्कृत शब्द पुष्कळ आहेत. यावरून या खिस्तीकवीनें मराठी पंडितांचें साह्य मिळविलें होतें, असें दिसून येतें. स्टिफेन्स हा एकनाथाचा समकालीन, किंवा थोडा मागूनचा आहे. याचा ग्रंथ सन १६१६ सालीं प्रथम छापला. हा कवी सन १६१९ या वर्षी मृत्यु पावला. याची भाषा एकनाथापेक्षां सोपी आहे. याचें कारण विषय कथामय आहे, आणि ग्रंथ साधारण लोकांकरितां लिहिला आहे. हा ग्रंथ सध्या रोमन लिपींत छापला आहे. तो देवनागरींत छापून झाल्यास मराठी वाङ्मयास उत्तम जोड होईल. मासल्यासाठीं कांहीं ओंव्या येथें देतों:—

ग्रंथरचनेचा उद्देश—

"परमशास्त्र जगीं प्रगटावया,
बहुतां जनां फळसिद्धी व्हावया,
भाषा वांधोनी मराठिया,
कथा निरोपिली."

मराठी भाषेचें महत्त्वः—

"जैसी हरळांमाजी रत्नकुळा,
कीं रत्नांमाजी हिरा निळा,
तैसी भाषांमाजी चोखळा,
भाषा मराठी."

"जैसी पुष्पांमाजी पुष्प मोगरी,
कीं परिमळांमाजी कस्तुरी,
तैसी भाषांमाजी साजिरी,
मराठिया."

"पखियांमध्यें मयोरू,
वृखियांमध्यें कल्पतरू,
भाषांमध्यें मानू थोरू,
मराठियेसी."

"तारांमध्यें बारा राशी,
सप्तवारांमध्यें रवी, शशी,
या द्वीपींचिया भाषांमध्यें तैसी,
मराठिया."

आरंभींचें मंगलाचरणः—

"वो (ओम्‌प्रमाणें) नमोजी विश्वभरिता,
देवा बापा सर्वसमर्था,
परमेश्वरा, सत्यवंता,
स्वर्गपृथ्वीचिया रचणारा.
तूं रिद्धीसिद्धीचा दातारू,
कृपानिधी करुणाकरू,
तूं सर्व सुखाचा सागरू,
आदि-अंतू नाथुडे.
तूं परमानंदू सर्वस्वरूपू,
विश्वव्यापुकू ज्ञानदीपू,

तू सर्वगुणीं निर्लेपू,
निर्मळो, निर्विकारी, स्वामिया
तू अदृष्टु, तू अव्यक्तु,
सम दयाळू, सर्वप्राप्तु,
सर्वज्ञान, सर्व नीतिवंतु,
एकुची देवो तू.
तू साक्षात परमेश्वरू,
अनादिसिद्ध अपरंपरु,
आदि, अनादि, अविनाशी अमरू,
तुझें स्तवन त्रिलोकीं.
स्वर्गू सृष्टी तुवा हेळामात्रें,
केलीं सूर्यचंद्रनक्षत्रें,
तुझेनि एके शब्दें पवित्रें,
केली सर्व रचना."

कवीनें आपल्या वृत्ताला 'अभंग' असें म्हटलें आहे. यावरून त्या काळीं अभंग आणि ओव्या यांत भेद मानलेला नसावा. कवीनें मराठी भाषा अगदीं स्वभावप्रमाणें लिहिली असून, या काव्यांत अनेक रम्य स्थळें आहेत. जलप्रलय, मेरीचें वर्णन, येशूचा जन्म, बालयेशूच्या क्रीडा, जोसेफ याचा उपदेश, मानवी दुःख, ख्रिस्ताचें रोग्यास बरें करणें, जरूसालेमचा विध्वंस, इत्यादि प्रसंगांचीं वर्णनें चित्तवेधक आहेत. हें काव्य मराठी ख्रिस्ती लोक मागें मोठ्या भावीकपणानें फार वाचीत असत, असें ग्रंथाच्या उपोद्घातांत लिहिलें आहे. सांप्रतची स्थिती माहीत नाहीं. हा ग्रंथ आरंभींच छापला गेल्यामुळें यांत फेरबदल कमी झालेला आहे. या कवीच्या गद्याचा नमुना पुढें दिला आहे.

हा ग्रंथ मराठी जुन्या वाङ्मयाच्या अभ्यासाच्या संबंधानें फारच उपयोगी आहे. कारण हा रोमन लिपींत असून आमच्या लोकांच्या वाचनांत नव्हता, आणि छापी होता, म्हणून लेखकांच्या तावडीला न सांपडतां जसाच्या तसाच राहिला आहे. यामुळें सोळाव्या शतकाच्या

अखेरीच्या मराठीचा हा अस्सल नमुना आहे. आपले ग्रंथ लेखकांच्या तावडीत सांपडून त्यांनीं त्यांत लोकांच्या भाषेंत जसे फेरफार होत गेले तसे फेरफार केले आहेत; तसे फेरफार यांत नाहींत. उदाहरणार्थ, पंचमीचा प्रत्यय जो आतां 'हून', 'ऊन' झाला आहे, तो या ग्रथामध्यें मूळचा 'होऊन' [ होउनि, होउनु ] असाच सर्वत्र आहे. ज्ञानेश्वरीमध्यें आणि एकनाथाच्या ग्रंथांत तो वास्तविक असाच असला पाहिजे; पण लेखकांनीं तो आपल्या काळाला जुळेसा फिरविला आहे, असें स्पष्ट दिसून येतें. आमच्या कवींच्या ग्रंथांत आणि कित्येक गद्य लेखांतही 'होऊन' असें रूप क्वचित् चुकून उरलेलें आढळतें. दुसऱ्या कित्येक रूपांच्या संबंधानेंही असेंच म्हणतां येईल. या ग्रंथाचें वाङ्मयाच्या दृष्टीनें पूर्ण परीक्षण होण्याची आवश्यकता आहे.

मुक्तेश्वर [जन्म १६०९]:—हा एकनाथाच्या मुलीचा मुलगा असें म्हणतात. एकनाथाचीं आख्यानें पाहून त्याचा कित्ता यानें घेतला. यानें संपूर्ण महाभारत मराठींत संक्षेपानें केलें अशी समजूत आहे. ह्यांतील पहिलीं चार आणि सौतिकपर्व हीं उपलब्ध आहेत. शिवाय त्यानें श्लोकरामायण, हरिश्चंद्राख्यान, मूर्खांचीं लक्षणें इत्यादि किरकोळ काव्यें लिहिलीं आहेत.

मुक्तेश्वरास कविता लिहिण्यास वेदान्ताची अथवा भागवतभक्तीची, वारकरीपंथाची अथवा दुसरी कसली आवड, हें कारण नव्हतें. तो मराठी भाषेचा खराखुरा कवी होय. लोकशिक्षणविषयक किंवा मनोरंजक विचार किंवा कथा स्वयंस्फूर्तीनें गौरवून सांगणें हें कवीचें मुख्य काम. असे विचार मनोरंजक मार्गेत लोकांच्या अंतःकरणास येऊन मिळतील असे वर्णिले म्हणजे तो उत्तम कवी झाला. ज्ञानदेव आणि एकनाथ यांनीं हें काम केलें नाहीं असें नाहीं. पण त्यांनीं घेतलेले विषय कठीण आणि कांहीं नियमित मंडळीसच आवडणारे, यामुळें त्यांचें कवित्व मर्यादित होतें. मुक्तेश्वराचा कविताविषय मनोरंजक आणि बोधप्रद अशा पौराणिक कथा हा झाला, यामुळें त्याची कविता लोकांना अधिक आवडणारी बनली.

मुक्तेश्वर आपल्या काळच्या मानानें चांगला विद्वान व रसिक कवी होता. त्याची भाषासरणी प्रौढ, मनोरम आणि व्यवस्थित अशी आहे. नानातऱ्हेचीं वर्णनें आमच्या एकदर कविवर्गामध्यें जशीं घरीं बसल्या केलीं आहेत तशीं आहेत. परंतु तीं उदात्त आणि प्रसादमय आहेत. कथाप्रसंगांत संवाद व भाषणें आलीं आहेत तींही मनोवेधक आणि प्रसंगास व व्यक्तीस शोभेशीं आहेत. शब्दभरणा विपुल असून शब्द योग्य रीतीनें उपयोगिलेले आढळतात. आपल्या वाङ्मयामध्यें गद्यास साजतील असे शब्द निराळे आणि पद्यास शोभतील असे शब्द निराळे अशी घाटणी झालेली उघड दिसून येते, तिला मुक्तेश्वरापासून आरंभ झालेला दिसतो.

मुक्तेश्वराची जी कविता उपलब्ध आहे, तिच्यावरूनच त्यानें मराठी भाषेची मोठी कामगिरी केलेली दिसून येते. तेव्हांपासून मराठी भाषा वाङ्मयरंगणामध्यें निर्भयपणें पुढें सरसावली. पुढील सर्व कवी मुक्तेश्वराचें थोडेंफार अनुकरण करणारे आहेत. तथापि ते त्याच्यापुढें अगदीं फिक्के पडतात. त्याच्या तोडीचा कवी मोरोपंतापर्यंत बहुतेक झालाच नाहीं असें म्हटलें तरी चालेल. मुक्तेश्वर हा अगदीं प्रथमारंभींच उत्तम मराठी कवी झाला. त्याचें सर्व महाभारत ज्याअर्थी लिहिलें गेलें असेल आणि तें आपल्या सुदैवानें आपल्यास उपलब्ध होईल, तर मराठी वाङ्मयाला त्याची मोठी जोड होईल.

मुक्तेश्वराचें मुख्य वृत्त ओवी आहे. त्यानें श्लोकबद्ध रामायण रचिलें, आणि श्लोकवृत्तें त्यानेंच प्रथमतः मराठीमध्यें उपयोगांत आणिलीं. मुक्तेश्वराची भाषा तींतील शब्दरूपाच्या संबंधाचा विचार केला तर एकनाथाच्या भाषेपेक्षा अलीकडील भासते. परंतु शब्दाचा जुनेपणा कदाचित् एकनाथापेक्षा जास्तच आहे. एकनाथाच्या आध्यात्मिक ग्रंथांत जुनाट शब्द कमी, पण आख्यानांत जास्त आहेत. हेंच विषयभेदाचें कारण मुक्तेश्वराच्या भाषेसंबंधानें मानिलें पाहिजे. 'नें' हा तृतीयेचा प्रत्यय मुक्तेश्वराच्या अगोदर फक्त सर्वनामांना आढळतो, पण मुक्तेश्वराच्या वेळीं तो नामानाही आलेला आहे. हा प्रत्यय सन १५७३ मधील एका जुन्या पत्रांत आहे. हा प्रथम गद्य

भाषेंत येऊन मग पद्यांत येऊं लागला. ' अनेकवचनीं 'नीं' हा प्रत्यय त्यानंतर लगेच उपयोगांत आलेला दिसतो. एकनाथापेक्षां मुक्तेश्वराची वाक्यसरणी लांबट किंवा विस्तृत आहे. याचें कारण मुक्तेश्वर वर्णनें जास्त करितो. 'ज' घालून केलेलीं कर्मणिरूपें कमी असून 'ल' प्रत्ययान्त कर्मणिभूत जास्त येत चालला आहे. नामें आणि विशेषणें यांपासून क्रियापदें [ आलुडणें, लांवणें, प्रबोधणें, अरिष्टावणें, इत्यादि ] बनविण्याचा मुक्तेश्वरानें बराच प्रयत्न केला आहे. परंतु हा प्रकार पुढील कवींमध्यें तितका आढळत नाहीं. मुक्तेश्वर हा खरा कवी असून त्याचे ग्रंथ म्हणजे मराठी काव्य आहे. मुक्तेश्वराचा मराठींत ग्रंथरचना करण्याचा उद्देश ज्ञानदेव आणि एकनाथ यांच्याप्रमाणेंच जनतेसाठीं त्यांच्या भाषेंत ग्रंथ करणें हाच आहे, असें त्यानें दोनतीन ठिकाणीं स्पष्ट सांगितलें आहे. फरक इतकाच कीं, पहिल्या दोन कवींनीं फक्त अध्यात्मविषय सांगितला, आणि मुक्तेश्वरानें कथा सांगण्यास आरंभ केला; अथवा एकनाथानें आरंभिलेलें काम यानें पुढें चालविलें. अर्थात् मुक्तेश्वराच्या ग्रंथांत कवित्वाला जास्त अवसर आणि आश्रय मिळाला.

ज्ञानदेव आणि एकनाथ यांनीं गहन अध्यात्मविषयास मराठी योग्य आहे असें ज्याप्रमाणें दाखवून दिलें, त्याप्रमाणें मुक्तेश्वरानें कथा सांगण्यास मराठी भाषा सर्वप्रकारें योग्य आहे असें सिद्ध केलें. अध्यात्म-विषयानंतर ग्रंथरचनेला पौराणिक कथेचा विषय योग्यच मिळाला. ती वाङ्मयाची पुढील पायरीच होय. मुक्तेश्वरानें पहिल्या दोन कवींची उपमा, दृष्टांत, रूपकें, वगैरे गोष्टींची तऱ्हा घेतलीच आहे. पण विषयानुरोधानें इतर भाषालंकारही उपयोगांत आणिले आहेत. त्याच्या कवितेंत रूपकें फार असतात, आणि त्यांतलीं कित्येक फार लांबटही आहेत. अलंकारांच्या उपयोगामुळें त्याची कविता वाचणारांस गोड व रसभरीत वाटते. याची भाषेची घाटणी साधी पण उदात्त, सोपी व मनोहर आहे. त्यानें तद्भव शब्दांपेक्षां तत्सम शब्द म्हणजे जसेच्या तसेच संस्कृत शब्द जास्त घेतले आहेत. यानें ग्रंथरचना करितांना संस्कृत महाभारत आपल्या पुढें ठेविलेलें दिसतें. यामुळें त्या ग्रंथांतील विचार, शब्द आणि भाषारचनेचा किता मुक्तेश्वराच्या ग्रंथांत प्रतिबिंबित

झालेला आढळतो. याच्या भाषेमध्ये महाकाव्य किंवा आख्यान [Epic] आहे तसेंच ठिकठिकाणीं स्वतंत्र आणि सुंदर गीतें [Lyrics] ही जागोजाग आहेत.

मुक्तेश्वराच्या भाषेचे मुख्य गुण माधुर्य, मनोरमपणा, कोमलता आणि शब्दसौष्ठव हे आहेत. भाषा शुद्ध असून ऱ्हस्वदीर्घांकडेही बरेंच लक्ष दिलें आहे. मधून मधून जुने शब्द पुढील कवींच्या मानानें जास्त आढळतात, पण तें स्वाभाविकच आहे. कित्येकांनीं त्याला सर्व मराठी कवींत श्रेष्ठत्व दिलें आहे, तें अगदींच गैरवाजवी नाहीं. कारण कविता सहज समजत जाणें हा गुण त्याच्या भाषेंत आहे, आणि कृत्रीमपणा अगदीं कमी आहे.

आख्यानरूप ग्रथरचना करण्याचें मुक्तेश्वराचें काम पुढे श्रीधर, महिपती, रघुनाथ पंडित वगैरे कवींनीं चालविलें, आणि त्यानीं सर्व-प्रकारें मुक्तेश्वराच्या भाषेचें अनुकरण केलें आहे. यासाठीं त्याच्या कामाचा उल्लेख प्रथम करून मग इतर कवींकडे वळू.

*श्रीधर* (सन १६७८–१७२८):—*यानें ओवीवृत्तामध्यें* भारत, रामायण आणि कृष्णकथा यावर, आणि आणखी कित्येक ग्रंथ लिहिले आहेत, त्यापैकीं नावें सुप्रसिद्ध आहेत. त्याचा हरिविजय ग्रंथ फार चांगला आहे. पांडवप्रताप, रामविजय आणि शिवलीलामृत हे ग्रंथही *चांगल्यापैकीं असून लोकप्रिय आहेत. याच्या भाषेपेक्षा* मुक्तेश्वराची भाषा जरी थोडी जुनाट आहे, तरी ती अधीक प्रौढ आणि मनोरम आहे. याचें कारण मुक्तेश्वराची योग्यताच अधीक आहे. श्रीधराच्या काव्यात उपमा, रूपकें, दृष्टान्त, वगैरे मुक्तेश्वरापेक्षा जास्त आहेत. तो रूपकें फार करितो आणि तीं क्वचित् कंटाळवाणींही भासतात. श्रीधराचें काव्य मुक्तेश्वराच्या काव्यापेक्षा अधीक लोकप्रिय आहे. त्याचे ग्रंथ लोक पुराणासारखे वाचतात आणि वाचवितात. यानें कारण मुक्तेश्वराचीं आख्यानें लांब असून श्रीधराचीं लहान लहान आहेत, हें होय. विस्तृत कथेपेक्षा थोडक्यात सांगितलेल्या कथा वाचकांना जास्त आवडतात, आणि त्या वाचावयास आणि ऐकावयास जास्त सोयीस्कर असतात. दुसरें कारण, साधुकवींचे संप्रदाय असतात, आणि त्याचे

ग्रंथ कोणी तरी वाचून त्यांवर व्याख्यान करावें आणि श्रोत्यांनीं जमून ऐकावें असा प्रघात असतो. मुक्तेश्वर असा सांप्रदायिक कवी नव्हे. श्रीधराचे ग्रंथ पुराणांसारखे वाचण्याची चाल अजून आहे; आणि यामुळें त्यांपासून भाषाघटनेचें काम फार झालें आहे. त्याच्या ग्रथरचनेवरून तो संतकवी होतासें वाटत नाहीं. परंतु त्यास जन्मापासून संन्यासी बनविलेला आहे. अलीकडे मिळालेल्या माहितीवरून असें कळतें कीं, तो प्रथमपासून सन्यासी नव्हता आणि त्याचा प्रत्यक्ष वंशही आहे.

महिपती ( सन १७१५–१७९० ):—या कवीचे संतमंडळीच्या चरित्रांवर भक्तिविजय, संतलीलामृत आणि इतर बरेच ओवीबद्ध ग्रंथ आहेत. त्यांची याद नवनीतांत आहे. आपण प्रत्येक साधुपुरुषाच्या घराण्यामध्यें जाऊन, त्यांच्या जीवनवृत्तांतांचा शोध करून ग्रंथ लिहिले, असें त्यानें म्हटलें आहे. यानें मुक्तेश्वर आणि श्रीधर यांचेंच अनुकरण केलें आहे. याच्या काव्यांतही उपमा, रूपकें, दृष्टान्त यांचेवर पुष्कळ भर आहे; आणि याच्या वर्णनाचे विषय लोकांमधलेच आणि लोकप्रिय साधुपुरुष असल्यामुळें याचे ग्रंथ मनोरम झाले आहेत. याची भाषा बरीच अलीकडली असून, कवितेंतले विशेष म्हणून जे रचनेचे प्रकार आहेत, ते सोडून दिले तर व्यावहारिक लोकभाषेसारखीच आहे. यामुळें याच्या भाषेंत पेशवाईच्या अखेरच्या लोकभाषेचें उत्तम स्वरूप दिसून येतें. मात्र लोकांचा अद्भुतावर विश्वास असल्यामुळें याच्या ग्रंथांतील साधुपुरुषांचीं चरित्रें अद्भुतरसभरित आहेत. यानें प्रख्यात मराठी संतांचीं चरित्रें वर्णिलीं आहेत; आणि त्यांवरून त्या त्या वेळच्या लोकस्थितीचें आणि समजुतींचें चांगलें अनुमान करितां येतें. हा संतकवी नसून त्या वेळचा सुखवस्तू गृहस्थ होता. हा कीर्तनकारही होता.

रघुनाथपंडितः—याचा काळ बरोबर कळत नाहीं. याच्या भाषेवरून आणि कित्येक दंतकथांवरून तो शिवाजीचा बाप शहाजी याच्या वेळीं होता असें वाटतें. तो कर्नाटकांत गेलेल्या दक्षिणी ब्राह्मणांपैकीं असून, स्वतां हरदास असावा किंवा कीर्तनाचा शोकी असावा. याचें नलोपाख्यान फार प्रसिद्ध आहे. हें काव्य मनोहर, सरस आणि

अलंकारिक असें आहे. भाषा चांगली आहे. 'ज' लाऊन केलेलीं कर्मणि-रूपें याच्या भाषेंत आढळतात, आणि आणखी थोडे जुने वाक्यरचनेचे प्रकार आढळतात. यामुळें हा कवी यापेक्षां जुना असावा, असें भासतें. यानें हा ग्रंथ संस्कृत नैषधकाव्याच्या आधारें रचिला आहे आणि त्यांतील अद्भुत वर्णनें आणि अलंकार त्यानें घेतले आहेत. हें काव्य नानावृत्तमय असून शिवाय त्यांत पदें वगैरे गाण्यास योग्य असे छंद आणि दिंड्या, साक्या पुष्कळ आहेत, यावरून हें आख्यान कीर्तनास उपयोगीं पडण्यासारखें रचिलेलें दिसतें. यामध्यें प्रास, यमकें, श्लेषही बरेच आहेत. अगोदरच नलदमयंतीकथा लोकप्रिय. त्यांत या काव्याच्या माधुर्यामुळें तें पुष्कळ लोकप्रिय झालें आहे; व यामध्यें क्लिष्टता, फाजील *अतिशयोक्ती आणि अश्लील वर्णनें असतांही तीं गाळून* हें आख्यान त्याच्या उत्तम भाषेमुळें विद्यार्थ्यांना वाचावयास देतात. या काव्यावरून शिवाजीच्या वेळीं मराठी भाषा चांगली प्रौढ आणि उत्तम काव्यास साजेशी झुळली होती असें दिसतें; आणि एका लहानशा काव्यावरून हा कवी प्रख्यात झाला आहे. हें काव्य विद्यार्थ्यांना भाषाविषय पढविण्याच्या कामांत फार उपयोगी आहे. कारण याच्या लहानशा मर्यादेंत निवडक संस्कृत शब्द आणि मराठी शब्द यांचे उपयोग, रस, अलंकार, प्रासंगिक आणि चातुर्याचीं अशीं संभाषणें, निरनिराळीं वृत्तें आणि भाषेला जुळेल अशी सुव्यवस्थित वाक्यरचना, हे प्रकार अगदीं साहजिक रीतीनें आलेले आहेत. रघुनाथपंडिताचें ग जें द्र मो क्ष *हें लहानसें काव्य आणि* रा म दा स व र्ण न *नामक* अकरा श्लोकांचें स्तोत्र हीं अलीकडे आढळलीं आहेत. पैकीं पहिलें नलोपाख्यानासारखें आहे. दुसरें मात्र भाषेवरून या कवीचें असेलसें वाटत नाहीं.

आ न दं त न यः—हा रघुनाथपंडिताचा समकालीन होता, असें म्हणतात. मोरोपंतानें 'हा अरणीचा कवी आपलें काव्य यमकांनीं शोभवितो', असें म्हटलें आहे. यावरून हा कर्नाटकांतील दक्षिणी ब्राह्मणापैकीं होता असें दिसतें. याचें काव्य कीर्तनायोग्य असें आहे. भाषा साधी, सोपी आणि काव्यरचना मध्यम प्रतीची आहे. भाषा

तितकी शुद्ध किंवा प्रौढ नाहीं. ठिकठिकाणीं छंदोभंगही आहेत. याचीं आख्यानें बरींच आहेत.

अमृतराय (मृत्यू १७५३):—हा कटाव रचणारा कवी चांगल्यापैकीं आहे. याची भाषा चटकदार आणि मनोहर असून तींत संस्कृत शब्द विपुल असतात. वर्णनाची शैली चांगली आहे. याचीं कटावमय लहान लहान आख्यानें असून तीं कीर्तनास उपयोगी आहेत. याच्या कटावांची वाक्यरचना आणि याच्या कवनांतील शब्दाचा उपयोग आणि भरणा हीं पाहिलीं असतां याच्या वेळीं मराठी भाषा चांगली प्रौढदशेस पोंचलेली दिसते. उत्तम हरदास याचा एकादा कटाव कथेच्या भरांत तालसुरावर म्हणूं लागला असतां श्रोतृमंडळी तल्लीन होऊन, सुंदर कटावांतील वर्णनाच्या ओघाबरोबर सपाट्यानें चालली आहे असा भास होतो.

तुकाराम (१६०८-१६४९):–हा संत कवी आहे. त्याचा एकादा स्वतंत्र ग्रंथ नसून सर्व कविता भक्तिपर, नीतिपर आणि उपदेशपर स्फुट अभंगमय आहे. तुकाराम हा इतर संत कवींसारखा धंदेवाईक साधू नसून कुलीन, सुशिक्षित, प्रमुख वारकरी म्हणून साधू झाला होता; आणि साधू म्हटला कीं त्यानें ओघीबद्ध ग्रंथ केलाच पाहिजे, अशा प्रकारची त्याची कविता नसून, त्याचे अभंग म्हणजे स्वयंस्फूर्तीनें वारकरी मंडळींत बसून भजन आणि उपदेश करीत असतां प्रगट झालेले उद्गार आहेत. यामुळें त्याची वाणी पूर्ण प्रसादमय आहे, आणि त्याची ईश्वराबद्दल निष्ठा व प्रेम हीं तींत प्रतिबिंबित झालीं आहेत. त्याची भाषा लोक त्याच्या वेळीं घरीं दारीं जी भाषा बोलत व व्यवहारांत तीच आहे. ती विशेष रीतीनें सजविण्याचा प्रयत्न त्यानें केला नाहीं. तिच्यामध्यें अगदीं लौकिकांत येणारे शब्द आहेत. अमुक शब्द किंवा वाक्य ग्राम्य म्हणून टाकावयाचें अथवा त्यास चांगलें रूप लावयाचें असें कवी मुद्दाम करीत असतात, तसें तुकारामानें केलेलें नाहीं. यामुळें त्याची अगदीं साधी अशी निराळीच भाषासरणी झाली आहे. सामान्यरूपानें विभक्ती दाखविणें वगैरे त्या वेळच्या भाषेंतले रूढप्रकार त्याच्या भाषेंत जागोजाग आहेत. संस्कृत शब्द जे थोडेफार

आहेत ते मुद्दाम वेंचून घेतलेले नसून त्या वेळीं लोकव्यवहारात असतील असेच दिसतात. तसेच लोकरूढींत असलेले केवळ मराठी आणि केवळ ग्राम्य शब्दही पुष्कळ आहेत. यामुळें अर्थात् तुकारामाची भाषा ही त्याच्या वेळच्या मध्यम स्थितींतल्या लोकांच्या भाषेचा नमुना आहे.

तुकाराम थोडा मुक्तेश्वराच्या मागूनचा आहे. परंतु त्याची भाषासरणी मुक्तेश्वराच्या भाषासरणीपेक्षा बरीच जुनी भासते. त्याच्या उद्गारामध्ये भक्तिरसाचा ओघ सारखा वाहात आहे. अभंगात जागोजाग असलेला सुनीतीचा उपदेश अंतःकरणापासून असल्यामुळें त्याचा ठसा मराठ्यावर कायमचा उठलेला आहे. त्याचे अभंग महाराष्ट्रांतील हजारों लोक गेलीं तीनशे वर्षे रात्रंदिवस घोकीत आहेत. यामुळें त्यातील शब्द आणि भाषासरणी याचा मराठी भाषेवर पूर्ण पगडा आहे. त्याची कविता भाषेचा अभ्यास करणाराना फार उपयोगी आहे. तुकारामाचे अभंग हे त्याचे अगदीं तात्काळिकपणें निघालेले अकृत्रीम प्रेमळ उद्गार असल्यामुळें ते पुष्कळदा अगदीं तोकडे, संक्षिप्त, असे भासतात. त्याचा अर्थ उकलण्यासाठीं बाहेरचें साह्य घ्यावें लागतें आणि जास्त अर्थ कल्पावा लागतो. पुष्कळदा एकाच अभंगात अगोदरचे आणि मागूनचे उद्गार याचा अन्वय जुळविण्यासही कठीण पडतें. तसेंच आज आपल्यास त्याचा अर्थ कळेनासा झाला आहे असे शब्द आणि वाक्योद्गार वारवार येतात. याचें कारण तुकारामानें आपल्या वेळची लोकसमाजात रूढ असलेली चालू भाषा उपयोगिली आहे, हें आहे. यामुळें त्याच्या अभंगावरून शिवाजीच्या उत्कर्षाच्या आरंभकाळीं भाषा, लोकसंस्कृती आणि साधारणतः लोकस्थिती कोणत्या प्रकारची होती याचें अनुमानही प्रयत्नानें बांधिता येईल. तुकारामाची भाषा त्याच्या काळानुरूप शुद्ध आहे. त्यानें अगोदर होऊन गेलेल्या कवींचें फारसें अनुकरण केलें नसून त्याच्या भाषेला आणि उद्गाराना एक प्रकारचें स्वातंत्र्य आहे. हलगर्जीपणाचीं किंवा मुद्दाम केलेलीं अशुद्धें नाहींत. आज आपल्याला अशुद्ध वाटतील असे प्रयोग आढळलेच तर ते त्याच्या वेळीं लोकाच्या उपयोगातच असावेत. भाषा साधी, भक्तिपर, कळकळीची आणि जोरदार, प्रसंगविशेषीं मनाला भारून सडीन

करून सोडणारी आहे. उद्गार अगदीं स्वयंस्फूर्तीनें अन्तःकरणापासून निघालेले, असे आहेत. त्याचा प्रेमळपणा तर अप्रतिम आहे. नीतिपर आणि उपदेशपर अभंग पुष्कळ. अनेक अभंगांत वाईट गोष्टींची निर्भर्त्सना आणि त्यांवर निर्भीडपणें कडक टीका केलेली आढळते. यामुळें त्याला पुष्कळ शत्रू झाले होते, आणि त्यांपासून त्याला त्रासही सोसावा लागला, असें स्पष्ट दिसून येतें. आपल्या पंथाच्या संबंधाचे पूर्ण अभिमानाचे आणि प्रसंगीं आढ्यतेचेही पुष्कळ अभंग आढळतात. ईश्वरी कृपेच्या जोरावर आम्ही कोणास जुमानीत नाहीं, असे उद्गार पुष्कळ ठिकाणीं आहेत. त्याचे अभंग वाचतांना भावीक व प्रेमळ वारकरीच नव्हत तर सहृदय वाचकही तन्मय आणि तल्लीन होऊन जातात. हें अमूल्य सामर्थ्य दुसऱ्या कोणत्याही मराठी कवीच्या वाणींत आढळत नाहीं. तुकारामाचा एकनाथाचे ग्रंथ आणि नामदेवाचे अभंग यांचा व्यासंग होता, असें दिसतें. त्यानें भक्तिविषयक विचार आणि मतें यांच्यासंबंधानें त्यांचें अनुकरण केलें आहे. नामदेवाच्या अभंगांतील बरेच उद्गार आणि पुष्कळ ठिकाणीं सबंध चरणही तुकारामाच्या अभंगांत सांपडतात.

तुकारामाचे म्हणून सुमारें पांच हजार अभंग प्रसिद्ध आहेत. एकेक अभंग म्हणजे एकेक स्वतंत्र विचारच आहे. एकाद्या अभंगांत तर इतका गूढ विचार असतो कीं, त्यावर सबंध कीर्तनाचें व्याख्यान करितां येईल. कित्येक अभंग सुंदर स्तुतीपर गीतें आहेत. कित्येकांमध्यें अद्भुत भक्तिरस ओथंबत आहे. तुकारामाचें काव्य ही मराठी भाषेची अमोल जोड आहे. लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, सर्वच अभंग तुकारामाचे नाहींत. त्यांत भेसळ करून दिलेली आहे. कित्येक अभंग तुकारामाचे असतील; पण भाषा आणि विषय यांचा विचार केला तर अगदींच भिकार आहेत. रोजच्या सवयीमुळें त्यानें सहजीं अभंगाच्या भाषेंत काढलेले उद्गार त्याच्या कवनांतच कोणीं घालून दिले आहेत; परंतु त्यांचा संग्रह करण्याची गरज नव्हती. तुकारामाचे एकंदर अभंग चाळून काळजीपूर्वक निवड केलेल्या अभंगांची आवृत्ती निघाली पाहिजे. त्याच्या अभंगांचा नीट अर्थ करण्याचा कित्येक मंडळीनें पुण्याच्या

प्रार्थनासमाजांत सुप्रयत्न चालविला आहे. त्या योगानें हें कार्य साध्य होईल.

वामन पंडित (मृत्यु सन १६७३):—याची कविता श्लोकबद्ध आणि ओवीबद्ध अशी पुष्कळ आहे. हा संस्कृत पंडित आणि वैष्णवपंथी होता. त्यानें आपल्या मताप्रमाणें गीतेचा अर्थ करण्यासाठीं ज्ञानेश्वरी-(भावार्थ दीपिके)प्रमाणें यथार्थदीपिका नामक ओवीबद्ध विस्तृत टीका लिहिली आहे. परंतु भाषासौष्ठवाच्या संबंधानें ज्ञानेश्वरीपुढें ती फिकी पडते. त्याची वेदान्तपर कविताही म्हणण्यासारखी प्रतिभायुक्त नाहीं, परंतु त्यानें श्लोकबद्ध पौराणिक आख्यानें रचलीं आहेत, तीं मात्र चांगलीं रसभरीत आहेत. वामनाचा मराठी कवी म्हणून लौकिक या आख्यानांवरूनच आहे. त्यानें रामायण, भारत, भागवत आणि पुराणें यांतून वेंचक आख्यानें घेतलीं आहेत. त्याची वाणी जोरदार, ओजस्वी आणि प्रौढ आहे. त्याचीं वनसुधा, वेणुसुधा, भामाविलास, रुक्मिणीविलास, इत्यादि कृष्णलीलापर आख्यानें गोड भाषा व माधुर्यगुण यांनीं युक्त अशीं आहेत. यथातथ्य वर्णन अथवा स्वभावोक्ती त्याच्या काव्यांत विपुल असतात. तसेंच वीररसाचे प्रसंगही त्यानें योग्य अशा जोरदार भाषेंत वर्णिलेले असतात. संवादांचे प्रसंगीं बोलणाराच्या योग्यतेप्रमाणें भाषा दिसून येते. त्याच्या भाषेंत संस्कृत शब्दांचा जास्त उपयोग आहे. या सर्व गुणांनीं त्यानें मराठीला प्रौढ वळण लाविलें आहे. परंतु त्याच्या भाषेंत पुनरुक्ती फार असतात. मागल्या पुढल्या संदर्भजुळणीचें आणि अर्थव्यक्तीचें धोरण असावें तसें नसतें. तसेंच आपल्यास जें म्हणावयाचें आहे, तें उघड झालें म्हणजे झालें, अशी त्याची भाषासरणी असते, असें ठिकठिकाणीं दिसून येतें. भाषेच्या व्यवस्थितपणाकडे आणि शुद्धतेकडे त्याचें लक्ष्य नसतें.

वामन काव्यरचनेच्या भरांत आला असतां प्रसंगविशेषीं वर्णनाचा खळखळाट एखाद्या पूर आलेल्या नदीच्या प्रवाहाप्रमाणें जोरानें चाललेला आढळतो. तसेंच विषयानुरूप शब्दयोजना किंवा ध्वनि-स्वारस्याची हातोटी वामनास चांगली आहे. पण काळजीपूर्वक शब्द-

योजना आणि वाक्ययोजना तो करीत नाहीं. त्याच्या कवितेचा ओजस्विता हा मुख्य गुण आहे. तसेंच त्याच्या भाषेंत शब्दांची ओढाताण, विषमयोजना व रूढीविरुद्ध प्रयोग फार. विचारांची आणि वाक्यांची जुळणी, आणि एकंदर रचना विस्खळीत आणि अव्यवस्थित असते. वामनाचा शृंगारपर वर्णनावर भर नाहीं. जेथें प्रसंग आला तेथें असलीं वर्णनें फार जपून लिहिलेलीं आहेत. तरी अत्यंत अश्लील शृंगाराचीं आणि इतर प्रकारच्या अश्लील वर्णनाचीं कांहीं स्थळें आणि कित्येक संबंध आख्यानेंही आहेत. वामनाचा मुख्य भर संस्कृतांतील श्लोकवृत्तांवर आहे. त्यांचा उपयोगही त्यानें स्थलानुरूप आणि प्रसंगानुरूप यथायोग्य केला आहे. हा संस्कृत पंडित होता असें म्हणतात; पण त्याच्या पांडित्याचा मराठी भाषेला व्हावा तितका उपयोग झालेला दिसून येत नाहीं. वामन कवी तीन झाले, असें विद्वानांचें मत आहे; आणि त्यांच्या नांवांवर कविता मोडते. प्रस्तुत विवरण यथार्थदीपिकाकार सर्वमान्य वामन कवी व त्याचेच असे ठरलेले ग्रंथ यांना अनुलक्षून आहे.

रामदास (१६०५-१६७८):—याचें दासबोध आणि मनाचे श्लोक हे दोन ग्रंथ आणि अभंग, हें काव्य प्रसिद्ध आहे. हा सांप्रदायी असून त्यानें दक्षिणेंत रामभक्तीचा प्रसार केला. शिवाजीच्या वेळीं हा होता. त्याचें शिष्यमंडळ मोठें असे. अजूनही जागोजाग त्याचे मठ आणि भजनीपंथ आहेत. शिवाजीच्या राज्यस्थापनेस त्याची मदत होती, इतकेंच नाहीं, तर शिवाजीनें आपलें कार्य रामदासाच्या साह्यानें आणि कृपेनें केलें असें सांगण्यांत येतें., पण हें अगदीं खोटें आहे. त्या वेळच्या राजकीय चळवळींवर ज्याचा परिणाम व्हावा असें त्याच्या ग्रंथांत कांहीं नाहीं. उलट शिवाजीच्या राज्यसंस्थापनेच्या प्रयत्नांमुळेंच त्यास या प्रांतांत येऊन आपला पंथ उभारण्याची आणि त्याचप्रमाणें आपले ग्रंथ लिहिण्याची स्फूर्ति झाली असावी असें उघड दिसून येतें. त्याचे उपदेशपर मनाचे श्लोक चांगले असून त्यांत काव्यही आहे. कांहीं अभंगही चांगले आहेत. दासबोध हा ग्रंथ त्यानें नीत्युपदेश आणि व्यवहारोपदेश करण्याच्या उद्देशानें लिहिलेला दिसतो. तसेंच,

त्यात वेदान्त आणि आध्यात्मिक विवरणही जागोजाग पुष्कळ आहे. परंतु सर्व ग्रंथ अत्यंत अव्यवस्थित आहे. त्यांत एकंदर काय सांगितलें आहे हेंच सांगणें कठीण आहे. हा समग्र ग्रंथ रामदासाचा नसून तो त्याच्या शिष्यमंडळानें पाहिजे तसा लांबविला आहे. रामदास मोठासा पढीक होतासें दिसत नाहीं. तो ब्राह्मण असूनही त्याची भाषा शुद्ध व व्यवस्थित नाहीं. आणि त्याच्या ग्रंथानीं मराठी भाषेच्या घटनेस म्हणण्यासारखें साह्य केलेलें दिसत नाहीं. रामदास हा निस्पृह ब्रह्मचारी वृत्तींत डोंगरामध्यें राहून काळ घालवी आणि जवळ येऊन राहील त्यास उपदेश करी असें दिसतें. सांप्रदायी बनल्यावर एखादा ओवीबद्ध ग्रंथ केलाच पाहिजे अशा प्रकारचे जे ग्रंथ झाले आहेत, त्यातला दासबोध आहे. तथापि त्यांत मधून मधून बराच चांगला व्यवहारोपयोगी नीत्युपदेश आहे, आणि त्यातलें चांगलें तेवढें निवडून काढून बोधपर असा ग्रंथ बनविता येईल.

मोरोपंत ( १७२९-१७९४ ):—हा मराठी राज्याच्या ऐन भर भराटीच्या काळीं झाला. त्याची भाषा मराठी भाषेला त्या वेळच्या मानानें प्राप्त झालेलें उन्नत स्वरूप आहे. प्रथमतः समाधानाची गोष्ट अशी आहे कीं, त्याचे ग्रंथ त्यानेंच स्वतः अथवा त्याच्या चाहाल्या मंडळीनें लिहून ठेवलेले आपणास प्राप्त आहेत. तसेंच त्याचें काव्य वाङ्मय दृष्टीनें निरनिराळ्या तऱ्हेचें आणि विपुलही आहे. त्याची कविता अशी आहे कीं तींत महाकाव्य, आख्यानें, गीतें, भक्ती, उपदेश, सर्व-कांहीं आहे. निरनिराळ्या मराठी कवींनीं जें भाषाघटनेचें कार्य केलें आहे, तें मोरोपंतानें एकट्यानें करून जसा काय त्या घटनेचा उपसंहार केला आहे. मोरोपंताच्या कवितेस नांवें ठेवणारे पुष्कळ आहेत. कित्येकांनीं तर तो कवीच नव्हे, शब्दजुळव्या, असें प्रतिपादिलें आहे. या वादविवादांत शिरण्याचें आपल्यास कारण नाहीं. आपल्यास भाषा संवर्धनाच्या दृष्टीनें बघावयाचें आहे. या धोरणानें पाहिलें तर प्राचीन कवींत मोरोपंतासारखा मराठी भाषेवर उपकार करणारा ग्रंथकार झालाच नाहीं असें म्हणण्यास बिलकूल दिक्कत वाटत नाहीं. मोरोपंता पर्यंतचे कवी जुन्या कथावर एकाच तऱ्हेचें कवित्व करीत आले.

मोरोपंतानें त्याच कथा अगदीं नव्या तऱ्हेनें वर्णिल्या. त्यानें मूळ ग्रंथांतील उत्तम रचनेचीं स्थानें आपल्या काव्यांत आणलींच आहेत. शिवाय नव्या कोट्या आणि नवे विचार ही त्यांत भरपूर आहेत. ज्या संस्कृत ग्रंथांतून त्यानें मूळ विचार घेतले आहेत त्यांतील मूळच्या भाषणांवर, कोट्यांवर आणि अलंकारादिकांवर त्यानें अनेक ठिकाणीं ताण केली आहे. त्यानें महाभारतादि मूळच्या विस्तृत ग्रंथांतलि कथा संक्षेपानें सांगितल्या आहेत. पण त्या सद्यप्रकारें सांगतांना फार कुशलता दाखविली आहे. मुक्तेश्वर, वामन, यांचीं कित्येक आख्यानें मोरोपंती आख्यानांहून श्रेष्ठतर वाटण्यासारखीं आहेत. पण अशी किरकोळ तुलना करावयाची नाहीं. आपणास प्रत्येकाची एकंदर कविता पाहावयाची आहे. मोरोपंताचीं शंभर रामायणें म्हणजे उगाच कांहींतरी ग्रंथरचना नसून प्रत्येकाचें रचनास्वरूप निरनिराळ्या प्रकारचें आहे, यामुळें भाषावृद्धीच्या दृष्टीनें तीं महत्वाचीं आहेत. त्यांतलीं कांहीं तर उत्कृष्ट काव्यें आहेत. एवढें मात्र म्हणतां येईल कीं, रामायणांच्या ऐवजीं त्यास निराळेंच काव्य रचण्याची बुद्धी झाली असती तर भाषेचें फार मोठें कार्य झालें असतें. पण हा अगदीं निराळा विचार आहे. मोरोपंतांच्या कवितेंत संस्कृत शब्द फार, म्हणून तिला लोक नांवें ठेवितात. परंतु हेच लोक मराठींत अनुरूप शब्द नाहींत म्हणून कुरकुरतात! सांप्रत संस्कृताचा अभ्यास पुष्कळ वाढला आहे. यामुळें आतां लोकांना संस्कृत शब्द दुर्बोध वाटणार नाहींत. शिवाय मोरोपंतानें मराठींत ठिकठिकाणीं योग्य संस्कृत शब्दांचा उपयोग कसा करावा याचा सुरेख कित्ता घालून दिला आहे. विद्यार्थ्यांस संस्कृत ग्रंथ वाचून अनेक संस्कृत शब्द ठाऊक होतील, परंतु त्याचा मराठींत योग्य उपयोग करण्याची कला मोरोपंताच्या कवितेवरून कळेल. आपण कवी आहों आणि त्या दृष्टीनें कर्तव्य केलें पाहिजे ही जाणीव चित्तीं धरून त्यानें काव्यरचना केल्यामुळें आणि कविता करण्याची हातोटी त्यास चांगली होती यामुळें, त्याचे भाषा सजविण्याचे प्रयत्न चांगलेच सफल झाले आहेत. त्यानें भाषेची अनास्था मुळींच केली नाहीं. तर उलट त्यानें भाषा सुधारण्याचा आणि तिला संस्कृत भाषेचें वळण

लावण्याचा सक्त प्रयत्न केला आहे आणि तो त्यास चांगला साधलाही आहे. कवितेच्या अंगचे बरेवाईट सर्व गुण आपल्या काव्यात प्रगट करण्याचा त्याचा उद्देश दिसतो. कारण त्याने उदात्त अर्थालंकाराप्रमाणेंच प्रसंगविशेषीं क्लिष्ट शब्दालंकाराचाही पुष्कळ उपयोग केला आहे. पण हे शब्दालंकारही यमकें आणि अनुप्रास यांच्या पलीकडे नाहींत. वरच्या ओळींतल्या अन्त्य शब्दाशीं खालच्या ओळींतला शब्द जुळावा अथवा अनुप्रासपरंपरा मिळावी म्हणून त्यानें 'ट'ला ट 'प'ला 'प' जुळवून दिला आहे, असें कित्येक म्हणतात. पण अर्थहानी तर नव्हेच, तर उत्तम अर्थयोजना साधून अनुरूप शब्दयोजना करणें काहीं सोपें नाहीं. उलट त्याला चांगली कुशलता लागते. एवढ्या मोठ्या कवितासमुद्रामध्यें प्रसंगविशेषीं सांप्रत आपल्या दृष्टीने अयोग्य वाटण्या सारखे प्रकार आले आहेत. पण एकंदरींत विशेषत भाषासंवर्धनाच्या दृष्टीनें मोरोपंताच्या कवितेनें मराठी भाषेचें मोठें कार्य केलें आहे. अनुप्रास हा केवळ शब्दालंकार आहे, पण तोच भाषा सजविण्यास व प्रसंगविशेषीं तिला चटकदार आणि भारदस्त स्वरूप आणण्यास फार उपयोगी पडतो. असले प्रसंग मोरोपंताने अगदीं जाऊ दिले नाहींत. त्याच्या कवितेंत योग्य शब्द घालून आणि प्रसंगानुसार वाक्यें आणि विचार यांचा उपयोग करून केलेलीं रसभरीत वर्णनें, अलंकार आणि मराठी कवितेचें मुख्य प्रशंसनीय अंग जें स्वभावोक्ती याचा भरणा फार आहे. मोरोपंताच्या काळापासून आता पर्यंत हरदासमंडळीला आपला कीर्तनाचा थाट मनोहर वनविण्यास त्याची आर्या फार उपयोगी पडली आहे. शब्दगौरव, भाषेची प्रौढी, आणि प्रसंगानुसार रस, अलंकार यांचा भरपूर उपयोग, काळ, व्यक्ती, प्रसंग यांना अनुसरून वर्णनें, थोडक्यात पुष्कळ अर्थ आणणें, आणि प्रसंगाची मुख्य खुबी जाऊ न देणें, वर्णित पुरुषाचा आणि नायकाचा स्वभावविकास दाखविण्याची शैली, परिणामाचा परिपोष झालेला दाखवून नीतिविषयक पर्यवसानावर कथा आणणें, हे मोरोपंताच्या कवितेचे मुख्य गुण आहेत. याच्या कवितेंत नीतिबोध, उपदेश आणि सावधगिरीच्या सूचना, चांगल्या गोष्टीचे सुपरिणाम आणि वाइटाचे

दुष्परिणाम, या गोष्टी दाखविण्याचे प्रसंग बहुधा वायां जाऊं दिलेले नाहींत. दहापांच पद्यें झालीं कीं, एकादा तरी व्यावहारिक दृष्टांत, दाखला किंवा अर्थान्तरन्यास दाखल करून उपदेश केलेला असावयाचा. मोरोपंताचें भाषाशुद्धीकडे आणि शब्दयोजना, वाक्यें आणि मागला पुढला संदर्भ यथायोग्य जुळविणें यांकडे पूर्ण लक्ष दिसून येतें. त्यानें ठिकठिकाणीं संस्कृत तऱ्हेची शब्दरचना आणि वाक्यरचना केली आहे; पण या गोष्टीची मराठी भाषेच्या विकासाला त्याला जरूर वाटली म्हणून केली आहे. मोरोपंताचा शृंगारावर फार भर नाहीं. कित्येक ठिकाणीं ग्राम्य शब्दप्रयोग आणि विचार आढळतात. पण अशीं स्थळें फार नाहींत. चाळीसपन्नास वर्षांपूर्वीं मोरोपंताच्या भाषेला बोजड म्हणत; पण सांप्रत संस्कृतशिक्षणाचा फैलाव होऊन त्या बरोबर मराठी काव्यांचेंही वाचन होत असतें, यामुळें मोरोपंताच्या भाषेची खरी योग्यता जास्त कळूं लागली आहे. कवितेची जुळणी, सुंदर भाषासरणी आणि स्वतांचे नवे विचार या गोष्टींत मोरोपंत सर्व मराठी कवींमध्यें श्रेष्ठ आहे. अर्थगौरव, पदलालित्य आणि माधुर्य हे त्याच्या कवितेचे मुख्य गुण आहेत; पण ओजस्विता व प्रसाद हेही गुण कमी नाहींत.

मोरोपंताच्या कवितेंत इतर मराठी कवींहून विशेष असा एक गुण आहे. इतर कवींनीं आपल्या आख्यानांतून वीर, नायक, नायिका आणि इतर पुरुष, स्त्रिया, यांचें चित्र जसें जुन्या ग्रंथांतून असतें तसें रेखाटलें आहे. त्यांत त्यांनीं स्वतांची करामत फारशी कोठें दाखविली नाहीं. मुक्तेश्वरानें क्वचित् अशीं गुणवर्णनें चांगली केलीं आहेत. उदाहरणार्थ, शकुन्तला दुष्यन्ताच्या राजसभेंत आली असतां राजानें तिचा प्रत्यादेश केल्यावर तिनें केलेलें स्वाभिमानाचें भाषण अगदीं योग्य असें आहे. वामनकवीचें भरताचें स्वभाववर्णन या दृष्टीनें उच्च प्रकारचें आहे. मोरोपंत आपल्या नायकांचें योग्य प्रकारें स्वभावाविष्करण व स्वभावपरिपोष करून दाखविण्याचा चांगला प्रयत्न करितो. भीष्म, कृष्ण, अर्जुन, अभिमन्यू, द्रौपदी, राम, सीता, मारुती, बिभीषण इत्यादि सत्पक्षीय पात्रांचें त्यानें ठिकठिकाणीं योग्य वर्णन केलें आहेच.

पण कर्ण, दुर्योधन, रावण, इत्यादिकांचें स्वभाववर्णनही त्यानें उत्तम रीतीनें केलें आहे. कर्ण आणि दुर्योधन हे तर त्याचे आवडते योद्धे होते. कर्णाचें शौर्य, स्वामिभक्ती, मित्रप्रेम व औदार्य आणि दुर्योधनाचा दिलदारपणा हे गुण मोरोपंतानें उत्तम दाखविले आहेत. आर्याबद्ध भारतांत कर्णपर्व हें अप्रतिम आहे असें पुष्कळांस वाटतें. मुख्यत भीष्मभक्तिभाग्य आणि केकावली या काव्यांत मोरोपंतानें स्वतः भक्त नगृन भक्तिरस मूर्तिमंत उभा केला आहे, आणि त्याच्या सहज मनोहर भाषेमुळें तुकारामाचे उत्कृष्ट अभंगही क्षणमात्र फिके वाटू लागतात. हा मोरोपंताच्या स्वताच्या भाषास्वामित्वाचा आणि काव्य रचनासामर्थ्याचा परिणाम आहे.

मोरोपंत हा प्राचीन वाङ्मयाचा मुख्य कवी, ग्रंथकार आणि घटनाकार आहे, यासाठीं त्याच्या कार्याचें विस्तारेंकरून वर्णन केलें. त्यानें आपल्या काव्यांत संस्कृतांतील सर्व साहित्यसामुग्रीचा आणि सर्व प्रकारच्या छंदाचा आणि वृत्ताचा उपयोग केला आहे. श्लोकवृत्त प्रसंगाप्रमाणें निरनिराळीं जोडण्याची संस्कृतांतील पद्धत वामनाप्रमाणें मोरोपंतानेंही राखिली आहे. आख्यानास त्याचें आर्या हें ओवीपेक्षा लाघट वृत्त सुरेख जुळलें आहे. आर्या हें त्याचें मुख्य वृत्त आहे, तरी त्याची सुमारें एक चतुर्थांश कविता श्लोकवृत्तमय आहे. मोरोपंताची कविता सुमारें पाऊण लाख आहे. मुख्य मराठी कवींच्या एकदर कवितेहून ती जास्त भरेल.

मोरोपंताचें बरेंच काव्य प्रथमतः सर्वसंग्रहामध्यें छापून निघालें त्यानंतर राहिलेलीं बहुतेक काव्यप्रकरणें काव्येतिहास संग्रहामध्यें प्रसिद्ध झालीं मध्यंतरीं तेंडूलकर याची एक आवृत्ती प्रसिद्ध झाली. पुढें निर्णयसागरच्या काव्यसंग्रहांत पंताचे सर्व ग्रंथ मोडक, ओक वगैरे मंडळीच्या उत्तम टिपांसहीत प्रसिद्ध झाले. शेवटीं मोरोपंताचे वंशज पराडकर यानीं कवीच्या घरच्या विश्वसनीय हस्तलिखित प्रतीवरून आवृत्ती छापली. या आवृत्तीमधील बरींच प्रकरणें खुद्द कवीच्या हातचीं लिहिलेलीं असून जागोजाग कवीनें स्वतः अर्थद्योतक टिपा ही दिल्या आहेत या आवृत्तीच्या निरनिराळ्या विभागाच्या

ग्रंथांस परांजपे, केळकर, इत्यादि विद्वान् गृहस्थांनीं चांगले उपोद्घात लिहिले आहेत. मोरोपंतावर विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं लिहिलेला निबंध आणि त्यांचा आणि ओक यांचा झालेला तद्विषयक मार्मिक वादविवाद, हे लेख पंतांच्या काव्याचा अभ्यास करणारांस फार उपयोगी आहेत. हंस यांचा मोरोपंतावरील निबंध चांगला आहे. पांगारकर यांनीं मोरोपंतांचें चरित्र आणि काव्य यांच्यावर सर्वांगसुंदर विस्तृत ग्रंथ लिहून चांगलीच कामगिरी केली आहे, आणि काव्य-विवरणात्मक विवेचन कसें असावें, हें भावी ग्रंथकारांस दाखवून दिलें आहे. हा ग्रंथ बराच पाल्हाळिक झाला आहे; आणि पांगारकर हे साधुवृत्तीचे असल्यामुळें त्यांत जुन्या भाविक समजुतीही बऱ्याच आहेत. परंतु अशा तऱ्हेचा ग्रंथ मराठींत अगदीं प्रथमचाच असल्यामुळें या गोष्टी क्षम्य आहेत. याप्रमाणें मोरोपंताच्या कवितेच्या साह्यानें व्हावयाचें मराठी भाषेच्या घटनेचें काम आतांपर्यंत पुष्कळ झालें आहे, आणि हा कवी व त्याची समग्र कविता अभ्यासाच्या बहुतेक साधनांसह विद्यार्थ्यांच्या पुढें तयार आहे, असें समजण्यास चिंता नाहीं.

ज्ञानेश्वर, एकनाथ, मुक्तेश्वर, तुकाराम, वामन आणि मोरोपंत हे मराठींचे प्रतिभावान कवी होत. वाचक कोणत्याही प्रकारचा असला तरी त्याला पटेल आणि तो त्यांत रमेल असें जें काव्य तें प्रतिभायुक्त काव्य होय. उत्कृष्ट कल्पना, विविध उपमा आणि दृष्टांत, नाना अलंकार, चमत्कृतिजनक विचार, हृदय उचंबळून सोडणारी संवेदना, इत्यादि उत्तम काव्यगुण जींत प्रगट झालेले असतील, ती खरी प्रतिभायुक्त कविता. ज्ञानेश्वर आणि एकनाथ यांचा विषय आध्यात्मिक व गंभीर असल्यामुळें ते कवी निराळेच घेतले पाहिजेत. तुकारामही सर्व कवींहून भिन्नच होय. हे तिघेही आपापल्यापरी स्वतंत्र प्रतिभावान आहेत. मुक्तेश्वर, वामन आणि मोरोपंत यांचा वर्णनात्मक काव्यावर भर असल्यामुळें त्यांची परस्पर तुलना करितां येते. या तिघांत मोरोपंत श्रेष्ठ आहे. वामनाचीं प्रतिभायुक्त वर्णनें प्रसंगीं मुक्तेश्वराच्या वर्णनांहून श्रेष्ठ भासतात. परंतु मुक्तेश्वराच्या भाषेचा साधा व प्रसादांत ओघ वामनाच्या खळखळाटापेक्षां श्रेष्ठ वाटतो. रघुनाथपंडितही या कवींबरोबर घेण्या-

सारखा आहे. परंतु त्याच्या काव्याचा क्लिष्टपणा आणि त्यातील अतिशयोक्ती यामुळे तो मागें पडतो.

लावण्या —मोरोपंतानंतर पेशवाईच्या अखेरीस आणि इंग्रजी राज्याच्या आरंभीं लावण्या रचणारे कित्येक कवी झाले आहेत. त्यांत रामजोशी, परशराम, अनंतफंदी, होनाजी बाळ, प्रभाकर, हे मुख्य होत. होनाजी बाळ हा गवळी होता. आणखीही कित्येक लावण्या रचणारे ब्राह्मणेतर कवी आहेत. ब्राह्मणेतर कवींचे पोवाडे फार आहेत. या पांच कवींचे पुरेच पोवाडेही आहेत. रामजोशी यानें मनोहर मराठी भाषेंत भक्तिपर, उपदेशपर आणि देवादिकांवर पुष्कळ लावण्या केल्या आहेत त्याच्या शृंगारिक लावण्याही आहेत. छेकापन्हुती या अलंकाराचा उपयोग करून, आणि दुसऱ्या सुंदर शृंगारिक अशा बऱ्याच लावण्या त्यानें रचिल्या आहेत त्याची भाषासरणी चांगली आहे. त्यानें मोरोपंताच्या भाषेचें अनुकरण केलें आहे. हा कीर्तनकारही होता यानें मोरोपंतांचें कवन कीर्तनासाठीं उपयोगांत घेऊन त्याचा प्रसार केला. अनंतफंदीनें दुसऱ्या राजी रावाच्या राज्यस्थापनेची धामधूम आणि त्या वेळची राज्यक्रांती आणि भयंकर दुष्काळ यावर माधवग्रंथ ह्मणून ओवीबद्ध ऐतिहासिक काव्य केलें आहे त्याचे सहा अध्याय उपलब्ध आहेत मराठींत इतिहासात्मक असें एवढेंच लहानसें काव्य आहे. लावण्या करणारे कवी यांच्या देवांवर आणि उपदेशपर व आध्यात्मिक लावण्या चांगल्या आहेत. यांच्या शृंगारपर लावण्या अश्लील आहेत त्यांतल्या कित्येक जरी विद्यार्थी आणि अल्पवयी मंडळी व स्त्रिया यांना वाचावयास योग्य नाहींत, तरी पोक्त लोकांनीं वाचावयास योग्य आहेत, आणि शृंगारिक असून अश्लील नाहींत अशा लावण्याही आहेत मराठींत लावण्यांचें कवन पुष्कळ असून मुख्यतः या पांच कवींच्या लावण्या भाषेच्यासंबंधानें सर्व प्रकारें चांगल्या आहेत लावण्या हें गाण्याचें वाङ्मय आहे, आणि कित्येक बोधपर, देवादिकांच्या लावण्या आणि शृंगारिक लावण्या फार गोड भाषेंत आणि उदात्तवर्णनपर आहेत. लावण्यांच्या रूपांत असणाऱ्या वाङ्मयावरून पेशवाईच्या अखेरीस आणि

इंग्रजी राज्याच्या आरंभीं लोकस्थिती कशी चैनीची बनली होती, हें दिसून येतें. पौराणिक कथांवरही पुष्कळ लावण्या आहेत. त्या विशेषतः जंगम लोक भिक्षा मागतांना म्हणत असतात. पुष्कळ लावण्या छापलेल्या आहेत. भाषेच्या धोरणानें निवड करून आणि अत्यंत शृंगारिक लावण्या गाळून लावण्यारूपी काव्याचा संग्रह कोणीं श्रमपूर्वक तयार केल्यास तो मराठी वाङ्मयाचा एक उत्तम ग्रंथ होईल.

पो वा डे:—पोवाडे मराठी राज्यस्थापनेच्या आरंभापासून इंग्रजी-राज्यस्थापनेपर्यंत अनेक झाले आहेत, व ते लोकप्रियही आहेत. *अगदीं अलीकडला उमाजीनाईकाचा पोवाडा* लोक नेहमीं औत्सुक्यानें ऐकतात. पोवाडे करणारे कवी किंवा शाहीर मराठे वगैरे आहेत. कित्येक अगदीं खालच्या जातींचेही आहेत. वीररसप्रधान, ऐतिहासिक प्रसंगांचे वर्णनावर आणि ऐतिहासिक पुरुषांवर अनेक पोवाडे झाले आहेत. पोवाड्यांची भाषा अगदीं साधारण लोकांतली असून ते मराठी ऐतिहासिक वाङ्मयाचा उत्तम भाग आहे. *मराठी पद्यवाङ्मयाला राजकीय उलाढालींची वार्ताही नाहीं.* पण ही उणीव पोवाड्यांनीं थोडीशी तरी भरून निघाली आहे, असें म्हणतां येतें. *हा लि ग्रा म* यांच्या उद्योगानें बरेचसे पोवाडे छापले आहेत, परंतु पोवाडे *प्रसिद्धीस आणण्याचा चांगला प्रयत्न अजून झाला नाहीं.* तसा प्रयत्न होईल तर वाङ्मयांत चांगली भर पडेल. कित्येक पोवाडे अगदीं त्या त्या वेळचे आहेत, यामुळें त्यांची ऐतिहासिक योग्यता मोठी आहे. *सिंहगडचा पोवाडा, नानाफडनिसांचा पोवाडा, हरीपंत, परशुरामभाऊ यांवरील पोवाडे, पाणिपतचा पोवाडा, खर्ड्यांच्या लढाईवरील पोवाडा,* हे चांगल्यांपैकीं आहेत. पुष्कळ पोवाड्यांची भाषा साधी, गांवढळ असूनही जोरदार, ईर्षाजनक आणि वीरश्रीची आहे. अर्वाचीन कवींनींही कित्येक चांगले पोवाडे रचिले आहेत. परंतु त्यांची भाषा प्रौढ आणि संस्कृतशब्दप्रचुर असल्यानें ते पो वा डा या नांवाला शोभण्यासारखे नाहींत. पोवाडा साध्या—अगदीं गांवढळ—भाषेंतच असावा. *तसेंच तो लांब असूनही उपयोगी नाहीं.* आपटे यांच्या *गड आला पण सिंह गेला* या प्रबंधांतील नवीन पोवाडा त्या

कवनाला योग्य अशा मार्गाने रचिला असल्यामुळें तो गोड आणि ओजस्वी झाला आहे.

पदें:—पदें म्हणजे गाण्यामध्यें बसविलेल्या लहान लहान कविता. त्याचा मुख्यतः कीर्तनात आणि मनोरंजनार्थ गाण्यामध्यें फार उपयोग होतो. यात देवादिकांचीं वर्णनें, स्तुती, उपदेश, इत्यादि अभंगाप्रमाणेंच असतात. असलीं पदें मराठींत पुष्कळच आहेत. सर्व मराठी कवींनीं थोडीं फार पदें केलींच आहेत. त्याच्याशिवाय पदें करणारे स्वतंत्र कवी देवनाथ, शिवरामस्वामी, केशवस्वामी, उद्धवचिद्घन, शिवदिनकेसरी, मध्वमुनीश्वर, सोयरोबा वगैरे आहेत. मापेच्यासप्रघानें पुष्कळ पदें चांगलीं आहेत. मराठींत बायकांचीं गाणीं पुष्कळ आहेत. देवादिकांचीं, स्थलवर्णनपर, ऐतिहासिक पुरुषांवर आणि प्रसंगावर अशीं शेंकडों मनोहर गाणीं बायकांच्या पाठांत आहेत. गाणीं हीं लांब पदेंच होत; तीं गाऊन म्हणावयाचीं असतात. भूपाळ्या आणि आरत्या हीं एक प्रकारचीं देवांच्या स्तुतीपर पदेंच आहेत. असलीं बरींच चांगल्यापैकीं कवनें आहेत.

मराठीवाङ्मयाच्या घटनेची भिस्त आरंभीं जुन्या कवींवरच असल्यामुळें पेशवाईच्या अंतापर्यंतच्या मुख्य कवींच्या वाङ्मयाचें हें बरेंच विस्तृत स्वरूपवर्णन लिहिलें आहे. एथपर्यंत सांगितलेल्या मराठी ग्रंथाशिवाय ओवीबद्ध वाङ्मय फार मोठें आहे. एखादा साधु पुरुष होऊन त्यानें शिष्यपरिवार जमवावा, आणि त्याचा एक सांप्रदाय बनून त्यानें उपदेश करावा, अशी चाल होती. प्रत्येक सांप्रदायाचा मुख्य यानें ओवीबद्ध ग्रंथ लिहिलाच पाहिजे असें असे. हा ग्रंथ बहुधा ह्या गुरूचीं जीं मतें असत त्यांचा द्योतक असा परमार्थपर असे. असें वाङ्मय विपुल आहे. तें प्रसिद्ध होणें शक्य नाहीं, आणि लोकांना आवडणेंही शक्य नाहीं. मराठींतलें अशा प्रकारचें अर्धवट आध्यात्मिक आणि वेदान्तिक वाङ्मय नष्ट होईल. ज्ञानदेव, एकनाथ, वामन यांचेही आध्यात्मिक ग्रंथ हल्लींच्या स्वरूपांत टिकण्याची आशा नाहीं. तथापि कांहीं आध्यात्मिक आणि वेदान्तपर जुन्या ग्रंथांचे त्यांतील

गाबाळ वर्जून आणि भाषेला नवीन स्वरूप देऊन तयार केलेले ग्रंथ होतील, तर ते लोकप्रिय होतील आणि भाषेच्या अभ्यासाच्या कामीं उपयोगीं पडतील. उदाहरणार्थ, ज्ञानदेवाचा ग्रंथ ज्ञानेश्वरी अगोदरचाच चांगला असल्यामुळें त्याची अशी लहान आवृत्ती निघाल्यास ती भाषेच्या अभ्यासास उपयुक्त आणि लोकसंग्रहास योग्य होईल. कथामय वाङ्मय हें शिक्षणोपयोगी आणि साधारण लोकांना वाचण्यास योग्य असल्यामुळें तें नष्ट होण्याची तितकी भीती नाहीं. त्यांतला गचाळ भाग नष्ट झाला तरी ती गोष्ट सृष्टिक्रमास अनुसरूनच आहे.

मराठींतलीं वृत्तें:—संस्कृतवाङ्मयांत सर्वसाधारण उपयोगाचें वृत्त अनुष्टुप् छंद. त्यापासून मराठींत ओवी उत्पन्न झाली. हिचा ज्ञानेश्वरी या प्रथमग्रंथांत उपयोग झाला. ज्ञानदेवाची ओवी लहान, आटोपसर आहे. पहिल्या तीन चरणांमध्यें प्रत्येकीं साधारणतः आठ नऊ अक्षरें असून चौथ्या चरणांत चार किंवा पांच अक्षरें असतात. एकनाथी ओवी लांब, ज्ञानदेवाच्या साडेचार किंवा पांच चरणांची आहे. हें ओवीचें एकनाथानें लांबविलेलें स्वरूप पुढें टिकलें नाहीं. मुक्तेश्वर, श्रीधर, वामन, यांची ओवी जरी ज्ञानदेवाच्या ओवीपेक्षां लांब असते, तरी ती एकनाथाच्या ओवीएवढी नसते. त्यांतले त्यांत महिपतीची ओवी थोडी मोठी असते. क्याथोलिक कवी स्टिफेन याची ओवी ज्ञानदेवाच्या ओवीपेक्षा मोठी पण एकनाथाच्या ओवीपेक्षां लहान असते. तिचा चौथा चरण अगदीं आंखूड असतो. या सर्व कवींच्या ग्रंथांवरून ओवीच्या प्रत्येक चरणांत नऊ ते अकरा अक्षरें असावीं, आणि शेवटच्या चरणांत एकाददुसरें अक्षर कमी असावें, असा साधारण नियम दिसतो.

अभंग हा छंद नामदेवाच्या वेळीं उत्पन्न झाला. ओवी चार चरणांची असते. ती वारकऱ्यांच्या टाळमृंदगाच्या ओबडधोबड गाण्याबर हरहुन्नर पुष्कळांनीं जमून म्हणण्याची म्हणजे चरण जास्त पाहिजेत आणि चरणांत अक्षरेंही अधिक हवींत. यामुळें कांहीं ओव्या अथवा ओवीचे चरण एकत्र घेऊन अभंग बनविला. अभंग

म्हणण्याच्या चालीमुळें आणि यमकाच्या स्थानावरून त्याचे तीनचार प्रकार झाले आहेत. कित्येक ओव्यांचा मिळून एक अभंग होतो. त्या अभंगांत अमुकच चरण असावे असा नियम नाहीं. ओवी आणि अभंग हीं शुद्ध मराठी वृत्तें होत. खिस्ती कवी ओवीला अभंगच म्हणतो. यावरून प्रथमतः हीं दोन नांवें समानार्थक असावींसें वाटतें. ओव्यांनीं झालेलें घनाक्षरी म्हणून एक वृत्त असतें. चार ओव्यांची एक घनाक्षरी होते. घनाक्षरी तालावर म्हणण्याची असते, यामुळें अधीक व्यवस्थीत असते.

कटावः—कटावामध्यें त्याला वृत्त असें म्हणण्याजोगा नियमितपणा नाहीं. हें तालसुरावर म्हण्याचें लांब गद्य अथवा दण्डक असतें. प्रथमतः पहिल्या आणि पुढें प्रत्येक सहाव्या अक्षरावर विराम (यती) असतो. साधारणतः दहा किंवा बारा अक्षरांची ओळ करून, चार अथवा चतुर्गुणक ओळींच्या अंतीं यमक असतें. तरवारीप्रमाणें लांबट, तीक्ष्ण, असें हें वृत्त म्हणतांना भासतें, आणि सहा अक्षरांच्या विरामावर, शस्त्राचा घाव घातल्यासारखें थांबून म्हणावयाचें असतें, म्हणून यास खड्ग असें संस्कृत नांव आहे. याला कटिबंध असेंही म्हणतात. हें वृत्त जुन्या संस्कृतांत उपयोगिलेलें आढळत नाहीं. सत्राव्या शतकांतल्या एका दाक्षिणात्य कवीनें भारतकथांवर संस्कृत खड्ग रचिले आहेत. तथापि हें वृत्त कानडीमध्यें नाहीं. तेव्हां हें मराठी कवींनीं किंवा हरदासांनीं निर्मिलें आणि संस्कृतांत गेलें असावें. कटाव रचणारा मुख्य मराठी कवी अमृतराय. शिवाय रामजोशी यानें आणि अलीकडले विठोबा अण्णा यांनीं व पुष्कळ हरदासांनीं कटाव रचिले आहेत. हरदासांच्या म्हणण्याच्या योगानें कटाव लोकप्रिय झाले आहेत. रजपूत लोकांतले भाट आजिवरोवर वर्णनात्मक काव्य म्हणूं लागतात, त्याप्रमाणें आपले हरदास कीर्तनांत केवळ स्फूर्तीनें कटाव म्हणतात, आणि ते श्रोत्यांना ही फार उद्बोधक असतात. विठोबा अण्णाचा 'हरि हा आनंदाचा कंद' हा प्रख्यात सुंदर कटाव कीर्तनप्रसंगीं धुवाख्यान चालू असतां रचिल्याची आणि तो ऐकतांना श्रोतृजन थक झाल्याची प्रसिद्धी आहे. अलीकडे संगीताची प्रवृत्ती झाल्यापासून नवीन हरदास

कटाव फारसे म्हणत नाहींत. आगाशे यांचें हरदासांना उपयोगीं पडेलें सावित्री आख्यान मनोरंजनांत प्रसिद्ध झालें आहे, त्यांतला त्यांनीं नवीन रचलेला कटाव चांगला झाला आहे.

श्लोक-वृत्तें प्रथमतः मुक्तेश्वरानें मराठींत घेतलीं. मानभावी पंथाच्या ग्रंथांत कांहीं मराठी श्लोक आहेत. परंतु या पंथाचा काळ अद्यापि निश्चित न झाल्यामुळें त्यांविषयीं कांहीं म्हणतां येत नाहीं. मुक्तेश्वरानंतर वामन, आनंदतनय, विठ्ठल, रघुनाथ पंडित, यांनीं श्लोकवृत्तांचा फार उपयोग केला. रामदासानें मनाच्या श्लोकांसाठीं भुजंगप्रयात हें एकच वृत्त घेतलें आहे. त्याचे आणखीही कांहीं स्फुट श्लोक क्वचित् आढळतात. मोरोपंतानें बहुतेक सर्व संस्कृत श्लोक-वृत्तें घेतलीं आहेत. मोरोपंतानें गीती हें मात्रावृत्त मुख्यतः घेतलें आहे.

दिंडी आणि साकी हीं गायनानुरोधानें बसविलेलीं मात्रावृत्तें आहेत. गायनाचीं वृत्तें तालाशीं जुळण्याकरितां मात्रागणात्मकच असतात. हीं शुद्ध मराठी वृत्तें आहेत. हीं मुळारंभीं कोणीं उत्पन्न केलीं हें अजून कळलेलें नाहीं. पण तीं कीर्तनाच्या सुरवातीपासून निघालीं असावीं. कटावासारखेंच चूर्णिका हें तालसुरावर बसविलेलें गद्यवृत्त आहे. मोरोपंतानें साकीवृत्त पुष्कळ उपयोगिलें आहे. त्यानें त्यास आर्येसारखेंच प्रौढस्वरूप आणिलें आहे.

नाना प्रकारचीं पदें हीं गायनांतीलच वृत्तें होत. त्यांची व्यवस्था ताल आणि म्हणण्याची चाल यांवर असते. संस्कृतांत पदें आढळत नाहींत. संस्कृत नाटकांतून गाण्याचीं पदें असतात, तीं बहुधा 'महाराष्ट्री' या प्राकृत भाषेंत असतात. शुद्ध संस्कृतांत 'गीतगोविंद' हें पदांचें काव्य आहे. यावरून मुळारंभीं अशीं पदें असतील. लावण्या म्हणजे वास्तविक लांब लांब अथवा पुष्कळ चरणांचीं पदेंच होत. पोवाडे हेही लांब लांब पदेंच होत; मात्र ते डफावर आणि तुणतुण्यावर म्हणावयाचे असल्यामुळें ओबडधोबड असतात. शुद्ध मराठी वृत्तें कोणीं, कशीं आणि केव्हां तयार केलीं, आणि संस्कृत वृत्तें निरनिराळ्या मराठी कवींनीं कशीं उपयोगांत आणिलीं, तसेंच मोरोपंत, वामन, इत्यादि कवींनीं आपल्या काव्यांत वृत्तांचा उपयोग

कथाप्रसंगानुसार कसा केला आहे, इत्यादि विषयावर एकादा शोध पूर्वक लिहिलेला ग्रंथ होण्याची जरूरी आहे.

मराठी कवितेत नेहमीं अन्त्ययमक असतें. ओवीच्या पहिल्या तीन ओळींचीं, श्लोकाच्या एक दोन आणि तीन चार ओळींचीं, आणि आर्येच्या दोन चार चरणांचीं शेवटचीं अक्षरें जुळलीं पाहिजेत, हा प्रकार अगदीं आरंभापासून आहे. *अभंग, पदें, यांत कांहीं निराळ्या* प्रकारचीं यमकें असतात. दिंडी, साकी, यांनाही यमक असतें. संस्कृत किंवा प्राकृत कवितेंत असें नियमित यमक नाहीं. मराठींत ही पद्धत कशी उत्पन्न झाली, याचा शोध करणें अवश्य आहे. यमकी कविता निर्यमक कवितेहून कांहीं विशेष सुंदर असते असातला भाग नाहीं. पण यमक हा मराठी कवितेचा स्वभावच बनून राहिला आहे.

एथपर्यंत मुख्य मुख्य मराठी कवी, त्यांचीं काव्यें, आणि त्यांचें कार्य यांचें विवरण झालें. पण या काळांत छापखाने नव्हते, विद्यालयें नव्हतीं, पंडित लोक मराठीचा द्वेष करीत, आणि एकंदर जनता राजकीय उलाढालींमध्यें अस्थीर स्थितींत होती, अशा देशस्थितींत या वाङ्मयाचा प्रसार झाला कसा, आणि त्यापासून भाषाघटनेस साह्य झालें कसें, असा प्रश्न साहजीक उत्पन्न होतो. यासाठीं त्याचा विचार केला पाहिजे. आपल्या देशांत पुरातन काळापासून एकादा संस्कृत, *पाली, प्राकृत ग्रंथ घेऊन त्यांतील मूळ श्लोक वाचावे आणि त्याच्या* वर व्याख्यान करावें, व तें पुष्कळ श्रोते जमून त्यांनीं ऐकावें अशी चाल चालत आली आहे. मराठी कवींनीं आध्यात्मिक आणि वेदान्त विषयक ज्ञान स्वभाषेंत आणल्यावर त्या ग्रंथावरचीं व्याख्यानें मराठींत सुरू झालीं. प्रत्येक संताचा पंथ किंवा संप्रदाय असे, आणि असे संप्रदाय देशभर ठिकठिकाणीं असत. तेथें मराठी ग्रंथ वाचून त्यावर व्याख्यान आणि चर्चा चाले. ते ग्रंथ, ज्यांना वाचतां येत असे, ते आणखी घरीं वाचीत. पोर्तुगीज अमलातील खिस्ती मिशनरींनींही मराठी भाषा आणि ग्रंथ यांचा अभ्यास करून स्वतः *मराठी ग्रंथ लिहिल्याचें मागें* सांगितलें आहे. यावरून सर्व मराठी प्रांतभर वाङ्मयाचा प्रसार कसा होत होता हें दिसून येईल. ग्रंथाच्या प्रती होऊनही त्याचा प्रसार होई.

अर्धवट सुशिक्षित मंडळींनें ग्रंथांच्या कशावशा प्रती करून ते बिघड-विले; पण त्यांनीं त्यांच्या प्रसारास साह्य केलें. लिहितांवाचतां येणाऱ्यानें एकादा तरी ग्रंथ लिहून घ्यावा अशी पूर्वी चाल होती. नामदेवापासून पंढरीचा वारकरीपंथ साऱ्या मराठी देशभर वावरत आहे. या वारकऱ्यांत जो सुशिक्षित असे, तो प्रवासांतही संधी सांपडेल तेव्हां नामदेवाचा अथवा तुकारामाचा अभंग अथवा दुसरें एकादें मूळ घेऊन त्यावर व्याख्यान करी. अशीं व्याख्यानें वारकरी मंडळींत अजूनही चालतात. वारकरी लोक अभंगांना वेदासारखा मान देतात आणि त्यांना अभंग पाठ असतात. या वारकरी लोकांच्या उपदेशाच्या पद्धती-वरूनच कीर्तनाची चाल निघाली. व्याख्यानासमवेत भजन आणि गायन असलें, म्हणजे तें कीर्तन झालें. कीर्तनांत ग्रंथांतील विषयावर, मूळ ग्रंथांतील ओव्या, अभंग, पदें वगैरे म्हणून त्यांच्यावर व्याख्यानें होत. हा कीर्तनाचा प्रकार आमच्या प्रांतांत सुमारें चारपांचशें वर्षे उत्तम स्थितींत असून अनेक विद्वान आणि वक्ते हरदास होऊन गेले आहेत. अगदीं अलीकडे मात्र संगीताच्या नादानें मूळची कीर्तनाची पद्धत बिघडली आहे. या हरदासांनीं मराठी ग्रंथप्रसारास आणि मराठी भाषेच्या आणि वाङ्मयाच्या घटनेस फार मोठें साह्य केलें आहे. हरदासाच्या कीर्तनात जे ग्रंथ पुढें येत ते सुशिक्षित लोक आणि त्यांची खासगी मंडळी घरीं वाची. तिसऱ्या प्रहरीं आणि रात्रीं विश्रांतीच्या अगोदर मराठी ग्रंथ वाचण्याची चाल सर्वत्र होती. श्रीधर आणि महिपती यांचे हरिविजय, पांडवप्रताप, रामविजय, पंढरीमहात्म्य, भक्तिविजय, संतलीलामृत, हे ग्रंथ अजूनही असे वाचले जातात. जरा अधीक सुशिक्षित लोकांमध्यें अशा वेळीं विशेष गहन अशा आध्यात्मिक ग्रंथांचें वाचन आणि चर्चा होत. ज्ञानेश्वरी, एकनाथी-भागवत, दासबोध वगैरे ग्रंथांचें अशा प्रकारचें वाचन अजूनही चालतें. ब्राह्मण वगैरे उच्च वर्णांचे आणि संस्कृताचे अभिमानी यांच्या-मध्यें संस्कृत ग्रंथांचें पुराण चाले. हीं पुराणें संस्कृत ग्रंथांचीं असत. परंतु मूळ ग्रंथाचा अर्थ सांगून, त्यावर श्रोत्यांस कळेल असें व्याख्यान करणें, हें मराठींत होई. यामुळें अर्थातच मराठी भाषेच्या घटनेस साह्य

झालें आहे आणि हरदासाप्रमाणें पुराणीकही साह्यकर्ते आहेत. मराठी ग्रथावरील साप्रदायिक व्याख्यान आणि पुराणें हीं चातुर्मास्यात, इतर नियमित वेळीं, आणि क्वचित् नेहमीं व्हावीं अशी चाल मागेपासून अजूनपर्यंत चालत आली आहे.

देशात राजकारणे आणि मुलुखगिऱ्या चालू झाल्यावर त्यात गुतणारे लोक स्वारीवर असता जशी फुरसत मिळे त्याप्रमाणें कर्मणुकीकरिता कथा, पुराणें, पोवाडे, लावण्या, पदें, वगैरे ऐकत असत. तसेंच, हे लोक थोडे दिवस घरीं विश्रातीसाठीं येत तेव्हा या सर्व गोष्टी मोठ्या प्रमाणावर चालत. प्रत्येक लहान खेड्यातसुद्धा सध्याकाळीं विश्रातीची वेळ होईपर्यंत सर्वांनीं नियमित जागीं जमून अशीं सभापणें अथवा पोवाड्याचे, लावण्याचे जलसे करावे, अशी चाल होती. ठिकठिकाणीं होणारे देवाचे उत्सव जयत्या आणि जत्रा यांचेंही या कार्यास साह्य होत असे. अशा प्रकारें या काळात वाङ्मयप्रसारास आणि भाषाघटनेस साह्य झालें आहे

अशुद्ध भाषा —मागील विवेचनात अमुक कवी अशुद्धें करितो, अमुक कवीचें भाषेच्या व्यवस्थितपणाकडे लक्ष नसतें, असे उद्गार आले आहेत कवींच्या आणि ग्रथकाराच्या ग्रथरचनेच्या योगानें भाषा वृद्धीस कसकसें साह्य होत गेलें हें आपण पाहात आहों, आणि ज्याची भाषापद्धती व्यवस्थेशीर, आणि ज्यानें भाषेला काहीं नवीन, चागलें वळण लाविलें, त्यानें भाषासवर्धनाचे विशेष काम केलें, हें खरें. पण ज्याची भाषा तितकी नियमबद्ध नाहीं, तो नावें ठेवण्यास कितपत पात्र आहे, हें पाहिलं पाहिजे साप्रत भाषेमध्ये छापील पुस्तकें असतात, वाचणारे फार असतात, लोकाची भाषासरणी व्याकरणादिकानीं निगडित झाली आहे, लोकामध्ये टीकाकार आहेत, आणि भाषेचा अभ्यास करणारे आहेत, ते बऱ्यावाईटाची चर्चा करितात, चागल्या भाषेचें महत्व आपणास वाटतें, आणि या सर्व कारणानीं आपली सध्याची दृष्टी निराळी आहे. परतु या कवींच्या काळीं यातलें काहींच नव्हतें. लोक पुढें आपल्या काव्याचा अभ्यास करतील असं त्याच्या ध्यानींमनींही नसेल. तेव्हा आपण आपल्या सध्याच्या टीकाविषयक

दृष्टीनें त्यांच्याकडे पाहात बसणें योग्य नाहीं. आतां अभ्यास करतांना जें बरेंवाईट दिसेल, त्याची चर्चा झालीच पाहिजे. परंतु तसें करितांना ग्रंथकारांना दोष देऊं नये. तसेंच, ग्रंथांमधून सांपडणारीं अशुद्धें, यांतलीं खुद्द ग्रंथकारांचीं कोणतीं आणि प्रती करणारांचीं कोणतीं, याचा ही शोध व्हावयास पाहिजे. कवी आणि ग्रंथकार यांचा स्वच्छंदीपणा सार्वकालिक, सर्व देशांमध्यें आहे. जुन्या संस्कृत ग्रंथांतूनही ऱ्हस्वदीर्घांची अनास्था, छंदोभंग, शब्दांचा कसाबसा उपयोग, वगैरे दोष असलेले मागें दाखविण्यांत आले आहेत. एकनाथ, मोरोपंत, यांनीं भाषेस सुव्यवस्थित करण्याचा प्रयत्न केला, याबद्दल त्यांचे आपण ऋणी आहों. वामन, रामदास यांनीं अव्यवस्थितपणा केला असला, तर तो विचारांत घेऊन, असें करणें रास्त नाहीं, यानें भाषा बिघडते, वास्तविक रचना अशी असावी, असें म्हणण्याचा आणि शिकणारांस वळण लावण्याचा आपणास पूर्ण अधिकार आहे, परंतु त्यासाठीं जुन्या कवींना नांवें ठेवण्याचा विशेष अधिकार आपण घेणें रास्त नाहीं.

---

## ३–अर्वाचीन पद्यवाङ्मय

इंग्रजी राज्याची स्थापना झाल्यानंतर पुण्यांतील शास्त्रीमंडळी कृष्णशास्त्री चिपळूणकर, कृष्णशास्त्री राजवाडे आणि परशुरामपंत गोडबोले यांनीं मुख्य मुख्य संस्कृत नाटकांचीं चांगलीं भाषांतरें केलीं, आणि कांहीं काव्येंही लिहिलीं. हे त्या काळचे उत्तम पंडीत असून त्यांना इंग्रजी भाषाही येत होती. यामुळे यांच्या वेळेपासूनच मराठी कवितेला नवीन वळण लागण्यास आरंभ झाला, असें म्हणण्यास चिंता नाहीं. कृष्णशास्त्री चिपळूणकर यांचें मराठी भाषेवरील स्वामित्व प्रसिद्धच आहे. त्यांचें साकीबद्ध मेघदूत व विरहीविलाप, अन्योक्ती, वगैरे कविता जरी भाषांतररूप आहे, तरी ती उत्तम प्रकारची आहे. विद्याधनप्रशंसा हें त्यांचें लहानसें स्वतंत्र काव्य सुंदर आहे. मेघदूत वाचतांना मराठी मेघदूत मूळचें किंवा संस्कृत मूळचें असें वाटूं लागतें. नाशिकचे लेले शास्त्री यांनीं रघुवंशाचें भाषांतर

केलें आहे, आणि पाळंदे यांची नवीन तऱ्हेची रचलेली बरीच ईश्वरभक्तिपर कविता व नरहरींची गंगारत्नमाला झाली. ह्या कवींनीं संस्कृताचा आणि जुन्या कवींचा नमुना सोडलेला नाहीं. विचार नवीन प्रकारचे घेतले आहेत.

यानंतर लौकरच इंग्लिश तऱ्हेवर मराठी कविता सुरू झाली. इंग्रजी राज्य झाल्यानंतर आपलें राष्ट्र हें अगदीं निराळेंच राष्ट्र बनत चाललें व त्याची परिस्थिती सर्वतोपरी बदलत चालली. राजकीय स्थिती, सामाजिक स्थिती, आचारविचार, विद्या, कला, उद्योगधंदे, सर्वांतच पुष्कळ फरक पडला आहे व पडत आहे; अर्थात् वाङ्मयामध्येंही फरक झालाच पाहिजे. पूर्वींचे कवितेचे विषय अध्यात्मज्ञान, वेदान्त व पौराणिक कथा हेही बदलले. आपलीं मनें निवृत्तिपर होतीं तीं प्रवृत्तिपर झालीं. पाश्चात्य धर्मविचार, तत्वज्ञानविचार, शास्त्रें वगैरे याची माहिती होऊन, त्याचें मनन करावयाचें व ज्यांवर लिहावयाचें ते सृष्टिविषयक विषय अपरंपार झाले. पूर्वींची आपली राष्ट्रकल्पनाही बदलून आतां फार मोठें राष्ट्र आपलें म्हणून आपल्या दृष्टीपुढें आलें, आणि स्वदेश, स्वजन, राष्ट्रहित, लोककल्याण, अशा कांहीं गोष्टी आहेत असें आपण मानूं लागलों. तेव्हां हल्लींचे कवी भिन्न विचारांचे झालेच पाहिजेत. पूर्वीं ईश्वरप्राप्ती आणि मोक्ष, हेंच कायतें मनुष्याचें ध्येय मानलें होतें. याशाठीं सुमारें पांचशें वर्षें समोंवार इतक्या उलाढाली चालल्या असून ग्रंथकारांचे वेदान्ताखेरीज विचार नव्हते. त्याचप्रमाणें अगदीं थोड्या उलाढाल्या लोकांखेरीज जगातल्या राजकीय वगैरे व्यवहाराकडे कोणी पाहात नसे. आख्यानरूपी काव्य झालें तरी पौराणिक अवतारी पुरुष आणि त्यांतील कथा यांशिवाय दुसरे काव्याचे विषय नसत. शिवाजीचें एवढें महत्त्व आज आपण समजतों, पण थोड्या अशिक्षित पोवाडे रचणाऱ्यांशिवाय त्याच्या चरित्राकडे कोणी यत्किंचितही लक्ष दिलें नाहीं. संसारत्याग, अरण्यवास, संन्यास, साधुवृत्ती हेंच कायतें उत्तम ध्येय पूर्वींच्या काळीं होतें. आतांचे कवी या सर्व गोष्टींच्या विरुद्ध आहेत;—निदान मानवी ध्येय काय तें एवढेंच, असें तरी ते समजत नाहींत.

पूर्वी आमची सर्वच सृष्टी आणि तदनु[illegible]ार विषयमर्यादा लह
होती; आतां ती फार मोठी झाली. यामुळे [illegible] मनाला संतुष्ट करण्या
गोष्टीही वाढल्या आहेत. तेव्हां आपले का[illegible]यविषय वाढणार
नवेनवे होणार; परंतु आपल्या विचारांची [illegible]यांच[illegible] पूर्वपरंपरा सुटून
काव्यग्रथित गोष्टी आपणांस आवडूं लागत[illegible]नहीं [illegible]यंत कांहीं तरी
जाणारच. तसेंच जुनें तेवढें चांगलें, नवें वाईट [illegible]रे दो[illegible] ही दृढ
समजूत आपल्या लोकांच्या हाडीं खिळलेली अ[illegible] यांनीं पूर्वे. आम
कवी तर अगदींच नवे विचार आपल्या कवितेंत अ[illegible] आपण [illegible]णतात.
शेक्सपिअर, बायरन, शेले, कीट, वर्डस्वर्थ, ब्राउनि[illegible]ला, तर तो [illegible]
भिन्न स्वभावांच्या पाश्चात्य कवींचे अगदीं नवीन वि[illegible] बिघडते,
कल्पना आमच्या लोकांना प्रथमारंभीं कशाशा वाटणारच. [illegible]रांस

आमचीं जुनीं घरबसल्या केलेलीं शिळीं काल्पनिक सृष्टि[illegible]
आणि पाश्चात्य कवींचीं प्रत्यक्षज्ञानाचीं वर्णनें यांत मोठाच फरक.
जुन्या मराठी कवींमध्यें मुक्तेश्वर यानें कांहीं सृष्टिवर्णनें केलीं आहेत.
वामनाचींही तशीं कांहीं वर्णनें आहेत. त्याचीं नवनीतांत घेतलेलीं
'वनसुधा' आणि 'वेणुसुधा' हीं दोन लहान प्रकरणें सुंदर गीतें
आहेत. त्यांत आणि 'कालियामर्दन' यांत स्वभावोक्ती सुरेख आहेत.
पण अशीं स्थळें फार थोडीं; आणि आधुनिक कवी नरहरी, चिंतामणी-
पेठकर, रे० टिळक, यांचीं पाश्चात्य नमुन्यावरचीं प्रत्यक्ष सृष्टिवर्णनें
त्यांपेक्षा श्रेष्ठ होत, हें कोणीही कबूल करील.

नवीन कविता भाषा आणि रचना यासंबंधानेंही थोडी अप्रिय
होण्याला कारणें आहेत. कवितेची भाषा गद्यभाषेहून बरीच निराळी
असली पाहिजे अशी आपली समजूत आहे. तशीच पाश्चात्य ग्रंथ-
कारांचीही आहे. परंतु इंग्रजी गद्यभाषा आणि पद्यभाषा यांतला फरक
आमच्या इतका नसतो. पूर्वी आमच्याकडे गद्यच फारसें नव्हतें,
आणि होतें तें भाषेच्यासंबंधानें बरेंचसें पद्यासारखेंच असे. यामुळें
हा फरक तितका दृष्टीपुढें नव्हता. आतां गद्यवाङ्मय पुष्कळ निर्माण
झालें, आणि जुनें पद्यवाङ्मयही प्रसिद्धीस आलें. नवीन पद्यवाङ्मय
गद्याकडे जास्त वळलेलें असतें. तेव्हां 'ही हो कसली कविता!'

असे म्हणून पुष्कळ वाचक नाकें मुरडतात. कुव्याचें राजा शिवाजी काव्य आणि कीर्तिकराचें इंदिरा काव्य प्रसिद्ध झालें, तेव्हा त्यावर अशाच प्रकारच्या टीका आल्या तसेंच आधुनिक कवींनीं वृत्तरचनाही पूर्वीची सोडून नवीन स्वीकारली आहे. आमच्या कवितेचे जे छंद आहेत, त्यामध्यें गोड ध्वनीचें आणि शब्दरचनेचें माहात्म्य असतें. पाश्चात्य छंदामध्यें ताल, ठेका आणि शब्दातील अक्षरावरील जोर किंवा स्वराघात यांचें माहात्म्य जास्त तसेंच आधुनिक कवी जुनीं वृत्तें सोडून पदें, गाणीं इत्यादिकांत पुष्कळ कविता करीत असतात. जुने श्लोक, आर्या, अभंग, साक्या, दिंड्या, इत्यादि वृत्तें लोकांना गुणगुणता येतात, तशीं नवीन गाण्यातील वृत्तें किंवा चाली येत नाहींत. नवीन कविता तर पवीचशी नव्या वृत्तांत, यामुळें ती अजून अप्रिय वाटते. आणखी एक प्रकार असा आहे कीं, पाश्चात्य नमुन्यावर कविता करणें ही एक नवीन गोष्ट आपल्याकडे आली आहे. संगीत नाटक व त्यातील अनेक चालींचीं लोकप्रिय झालेलीं पदें आणि गाणीं रात्रंदिवस सर्वांच्या तोंडीं असतात. तेव्हा जो उठला तो पाच चार गीतें रचून आणि तीं कोठें तरी प्रसिद्ध करून कवी बनू पाहातो. तेव्हा खरा जातिवंत कवी कोण आणि उगाचच्या उगाच बनलेला कवी कोण, याचा निर्णय अजून होत नाहीं. लहानसें गाणें अथवा वेडावाकडा श्लोक हवा त्यास रचता येईल, पण खरें काव्य करणें पोरखेळ नव्हे. कवी विद्वान म्हणजे एक प्रकारचा सर्वज्ञ असावा लागतो. निदान आपल्याला इतरांपेक्षा कांहीं जास्त कळतें, असा त्याला अहंभाव तरी हवा असतो ज्ञानदेव, एकनाथ, मुक्तेश्वर, वामन, मोरोपंत, हे प्राचीन कवी आपापल्या काळाप्रमाणें विद्वान होते. तुकाराम आपल्या पद्यामध्यें विद्वान होताच, पण निस्सीम आणि प्रेमळ भक्त या दृष्टीनें फारच श्रेष्ठ होता. आताच्या कविमंडळींत कांहीं थोडे विद्वान असतील.

सांप्रत नवीन कवी आणि त्यांच्या कृती यांच्या सुळसुळाटात कोणाच्या प्रयत्नानीं भाषाघटनेस आणि वाङ्मयसंवर्धनास खरें खरें साह्य होत आहे हें सांगणें कठीण आहे. योग्य काळ गेल्यानंतर

चांगलें तें टिकून वाईट नष्ट होईल हा सृष्टिनियम खरा आहे; पण तसें होण्यास कालावधी लागेल. आतांच्या काळीं खरा कवी होणें म्हणजे सध्यांच्या विविधविषयांचें शक्य तितकें पूर्ण ज्ञान आणि बहुश्रुतपणा आंगीं पाहिजे; तसेंच आतां लोकरंजन कसें होईल त्याचेंही ज्ञान पाहिजे. सध्यांच्या चौकस आणि चवढाळ लोकांना पटेल अशा नवीन गोष्टी प्रकट करितां आल्या पाहिजेत. तसेंच सध्यां जगांत जीं अनेक तत्वें जागृत आहेत, त्यांतील एखाद्या गहन तत्वामध्यें त्याचें मन गढलेलें असलें पाहिजे. एखादा हुषार आणि प्रतिभावान मनुष्य थोड्या चांगल्या कविता करून अल्पकालिक कवी होईल; पण महाकवी या संज्ञेस पात्र होण्यास त्याची प्रतिभा व योग्यता मोठी असली पाहिजे. तसेंच त्यानें प्राचीन संस्कृत आणि मराठी काव्याचें आणि इंग्रजी मुख्यमुख्य कवींच्या कृतींचें आलोडन आणि अवलोकन अवश्य केलें पाहिजे.

जुन्या कवितेंत भरपूर रस, अलंकार, पदलालित्य, थोडक्यांत पुष्कळ अर्थ आणणें इत्यादि गोष्टी असतात, आणि त्या काव्याला अत्यंत जरूरीच्या अशी अजून समजूत आहे. अर्वाचीन कवी अगदीं साधें, सरळ वर्णन करितात, त्यांना असली कांहीं सामग्री फारशी लागत नाहीं, यामुळें पुष्कळदां त्यांच्या कृतींत काव्य आहे असें वाचकांना वाटत नाहीं.

नवीन कवींमध्यें अजून कोणी महाकवी म्हणजे सर्व काव्यगुणांनीं युक्त असें विस्तृत काव्य रचणारा झाला नाहीं. गीतें [ Lyrics ] म्हणजे ज्याना वीणाकाव्यें असें चमत्कारिक नाव कोणी दिलें आहे, अशीं अल्प काव्यें, गाणीं, पदें वगैरे यांवरच भर फार. यांतील कित्येक फार उत्तम आहेत असें अर्वाचीन कविता चाळल्या असतां दिसून येईल. परंतु या तुटपुंज्या कवितेनें भागणार नाहीं. सध्यां कवी कसे उत्पन्न होतात हें मागें सांगण्यांत आलेंच आहे. त्यांच्यामध्यें सर्वांगसुंदर महाकाव्य रचण्याची योग्यता अजून आलेली नाहीं. कित्येकांचीं सुंदर अल्प काव्यें वाचून हे महाकाव्यें लिहिण्याचा यत्न कां करीत नाहींत, असा प्रश्न मनांत उद्भवतो. परंतु महाकाव्य अजून आपल्या

आवांक्यांत आलेले नाहीं, तुकाराम, वामन, मुक्तेश्वर, मोरोपंत, यांच्या काव्यांची त्यांना इतके वर्षे गोडी लागलेली आहे, त्या वाचकांना अगदीं नवीन गोडी लावून देणें सोपें काम नाहीं, असें त्यांना सहजीं वाटत असावें. दुसरी गोष्ट अशी आहे कीं महाकाव्य रचण्यास शांतता आणि फुरसूत पाहिजे. आमचे बहुतेक अर्वाचीन कवी पोटाच्या पाठीमागें लागलेले असतात. लहान सहान काव्यें केलीं, तरी तीं लोकापुढें आणण्यास कोणा तरी मासिक पुस्तकाची मनधरणी करावी लागते. मग महाकाव्य रचिलें तरी तें प्रसिद्ध व्हावें कसें!

नवीन कवितेमध्यें जुन्या वाङ्मयांत अगदीं नव्हत्या किंवा असूनही ज्यांना मान्यता मिळाली नाहीं अशा अनेक गोष्टी आहेत. या भागाच्या आरंभीं पाश्चात्य कवितेच्या सबंधाचे रचनाप्रकार सांगितले आहेत. ते जरी कवितेंत असावयाचेच, तरी त्यांची आमच्या जुन्या कवितेस ओळख नव्हती. तेव्हां रचनेचा आणि हेतूचा नवीनपणा हेंही नवीन कवितेच्या अप्रियतेचें कारण आहे.

आणखी एक नवीन प्रकार असा आहे कीं, आधुनिक कवी इंग्रजी कवींच्या नमुन्यावर कवितेमध्यें काल्पनिक विचार आणून त्याच्यावर तात्त्विक सृष्टी निर्मितात. एखादी क्षुल्लक गोष्ट असली तरी तिच्या मुळाकडे जाऊन तीपासून एखादें मोठें नीतिपर अथवा बोधप्रद तात्पर्य काढावयाचें, असा प्रयत्न नवीन कवी करितात. हा प्रकार अजून वाचकास आवडू लागला नाहीं. वर्डस्वर्थसारख्या इंग्रजी कवींनीं क्षुद्र विषयावर सुंदर कवनें केलीं आहेत. आपला कवी तुकाराम याच्या स्फुट अभंगातही अशा प्रकारच्या क्षुद्र गोष्टींवर प्रौढ विचार रचलेले आहेत. ठोमरे यांनीं, रे० टिळकांनीं व केशवसुतांनीं अशीं कवनें पुष्कळ रचिलीं आहेत. परंतु जुन्या ठरीव गोष्टींमधून अजून आपण सुटलों नाहीं, यामुळें ही नवीन कविता पुष्कळांस अप्रिय वाटते. तिचें सौंदर्य कळून ती मान्य होण्यास वेळ लागेल.

साप्रमाणें आधुनिक कविता अप्रिय असण्याचीं कित्येक कारणें आहेत. तथापि ती अनेकांना प्रियही आहे; आणि तिच्यावरील प्रेम उत्तरोत्तर वाढत आहे. तसेंच कवींनाही अनुभव येऊन, लोकांना प्रिय

काय व अप्रिय काय हें त्यांस कळूं लागेल, आणि ते आपली कविता तदनुसार करतील.

मराठीमध्यें पाश्चात्य नमुन्यावर काव्य करण्याचा आदीं पहिला प्रयत्न कुंटे यांनीं केला. राजा शिवाजी हें त्यांचें महाकाव्य चांगल्यापैकीं आहे. परंतु कित्येकांनीं त्या काव्याची केवळ नवीन म्हणून फजिती उडविल्यामुळें त्यांचें काव्य पुरें प्रसिद्धीसही आलें नाहीं. त्यांनीं मन म्हणून तात्विक विषयावर नवीन तऱ्हेचें काव्य लिहिलें. परंतु त्याचीही तीच अवस्था झाली. 'आतां हे कविमन्य तत्वज्ञानी बनले!' म्हणून त्यांच्यावर खरमरीत टीका आली. खरोखरी पाहिलें तर कवी हा तत्त्वज्ञानी असावाच लागतो. तत्वज्ञान याचा सहज अर्थ प्रत्येक गोष्टींत खरें काय हें पाहणें किंवा निदान तसा प्रयत्न करणें. सृष्टिक्रमामध्यें खरें काय याचा शोध लावून तें लोकांच्या मनांत आपल्या गोड आणि मनोवेधक भाषेच्या द्वारें भरविणें, हें कवीच्या उद्योगाचें खरें इंगीत. आतां एकादवेळ हें तत्वज्ञान चुकेल; पण कवीच्या दृष्टीनें तें खरें असावयाचेंच. असें तत्व जर कवीच्या बोलांत नाहीं तर ते बोल काय कामाचे? जुन्या कवींनीं जुनें ठरीव तत्वज्ञान घेऊन त्यावरच काम भागविलें. स्वतांचे शोध फारसे कोणीं लाविले नाहींत. त्या काळीं या तत्वज्ञानावर लोकांचा विश्वास होता. पण आतां तो काळ फिरला आहे. आतां लोकांचा श्रद्धाळूपणा कमी होऊन जुन्या धार्मिक किंवा पौराणिक मानीव सत्यांवर लोक अंधपरंपरेनें विश्वसत नाहींत. आतां 'काय?' आणि 'कसें?' हे प्रश्न पुढें उभे राहातात, आणि त्यांचें उत्तर द्यावें लागतें. अर्थात् आतां नवीन प्रकारचीं तत्त्वें पुढें आलींच पाहिजेत.

दुसरी गोष्ट अशी आहे कीं प्राचीन कवी भिन्नभिन्न मनुष्य अथवा पुरुष यांचें वर्णन करीत आले. त्यांचे स्वभाव, कृत्यें, आणि तसेंच त्यांचा एकंदर सृष्टीशीं संबंध ह्या गोष्टी जशा पुराणादिकांनीं अथवा दन्तकथांनीं ठरलेल्या होत्या तशा त्यांनीं वर्णिल्या आहेत, आणि श्रद्धाळू लोकांनीं हीं वर्णनें मान्य केलीं आहेत. पण आतां मनुष्य आणि सृष्टी दोन्हींही अगदीं नव्या स्वरूपानें आपल्यासमोर येऊन उभीं राहिलीं आहेत. तेव्हां यापुढें कवींची तत्वमीमांसाही बदलणारच.

आताच्या काळीं कवी जें सत्य सांगणार तें आपल्या आधुनिक समजुतींशीं आणि जिची सृष्टी वाढली आहे अशा आपल्या दृष्टीशीं जुळतें असलें पाहिजे, तरच तें आपल्यास पटेल आणि आवडेल.

लोकमान्यतेच्या संबधानें प्राचीन कवी आणि अर्वाचीन कवी याच्या स्थितींत मोठा फरक आहे. बहुतेक सर्व प्राचीन कवी निरिच्छ साधुसंत होते अथवा चांगल्या स्थितींतले गृहस्थ होते. तसेंच काव्य केलें कीं तें छापून प्रसिद्ध झालें पाहिजे, आणि त्यास लोकाश्रय मिळाला पाहिजे, नाहीं तर चरितार्थ चालावयाचा नाहीं, अशी त्याची स्थिती नव्हती. त्यानीं फुरसुतीप्रमाणें काव्य लिहून ठेविलें आहे, आणि अध्यात्मपर व भक्तिपर काय असेल तें लिहून काढावें आणि वाचावें अथवा वाचलेलें ऐकावें अशी भावीक लोकाची स्थिती असल्यामुळें त्याचे ग्रंथ प्रसिद्धीस आले आहेत एकनाथ, मुक्तेश्वर, वामन, मोरोपंत यासारख्याची गृहस्थिती तर चांगलीच होती, आणि त्याच्या सांप्रदायिकानीं अथवा चाहत्यानीं त्याचीं काव्यें तेव्हांच्या तेव्हांच प्रसिद्धीस आणिलीं, त्याचा प्रसार केला आणि तीं लोकमान्यतेस पात्र केलीं हल्लींच्या केवळ व्यावहारिक लोकस्थितींत काव्य केलं तर तें प्रसिद्ध झालें पाहिजे, त्याला लोकानीं चागलें म्हटलें पाहिजे, त्यास लोकाश्रय मिळाला पाहिजे, आणि छापखान्याचा खर्च तरी निघाला पाहिजे. केवळ कवी म्हणून कोणाचा संसार चालत नाहीं, यामुळेंही अद्यापि नवीन काव्यरचनेची सुस्थिती नाहीं. इंग्लंडमध्येंही पुष्कळ दिवस, एकुणिसाव्या शतकाच्या अर्धापर्यंत, अशीच स्थिती होती एवढा प्रख्यात कवी वर्ड्स्वर्थ यालाही 'आपणास काव्यप्रसिद्धीपासून जुदाचे जद विकत घेण्यापुरतेही पैसे मिळत नाहींत' असे उद्गार प्रथमारंभीं काढावे लागले आहेत.

तेव्हां कुंटे याचा नवीन कवितेचा उद्योग यथाकालच होता. त्याला ज्या प्रकारचीं नावें ठेविलीं, तशीं ठेवण्याचें कारण नव्हतें कुंटे याचा प्रयत्न वाईट नव्हता, आणि त्याचा चरितार्थ लोकाश्रयावर अवलंबून नव्हता. परंतु कुंटे हे शांतपणें लोकापवाद सोसून घेणारे नसल्यामुळें त्यानीं आपला ग्रंथ पुरा प्रसिद्ध केला नाहीं. 'राजा शिवाजी' याचा

आमचेकडे कां नसावी असें साहाजिक वाटून, त्यापैकीं ज्यांना कवित्वाची स्फूर्ती होती ते नवीन कविता लिहूं लागले, आणि त्यांचें पाहून इतरही लिहूं लागले. काव्य लिहिलें तरी तें लोकांपुढें आलें पाहिजे, तसेंच त्याचा प्रसार होण्यास लोकांना वाचण्याची आवड पाहिजे. ही आवड आमच्या लोकास,कितपत आहे, हें सर्वांस ठाऊकच आहे. या कारणांनीं कविता थोड्या प्रमाणांत बाहेर येऊं लागली. इंग्रजी 'गोल्डन ट्रेझरी'मधील लहान लहान काव्यांचीं भाषांतरें प्रथमतः बरींच प्रसिद्ध झालीं आहेत. समर्थ हायकोर्ट वकील यांनीं असली बरीच कविता लिहिली असून ती चांगली आहे. ही भाजी निबंधचंद्रिका, विविधज्ञानविस्तार यामध्यें आणि इतरत्र प्रसिद्ध झाली आहे. प्रथमारंभीं विविधज्ञानविस्तार वगैरे कित्येक मासिक पुस्तकांनीं असल्या कवितास स्थळ दिलें. पुढें जळगांव येथील फडणीस यांचें काव्यरत्नावली हें पुस्तक केवळ या कामासाठींच उदयास आलें. हें कसेंबसें चोवीस वर्षें चाललें आहे. पुस्तकास फारसा आश्रय नसतां फडणीस यांनीं पुस्तक नेटानें चालविलें आहे, आणि त्यात पुष्कळ नवीन कविता प्रसिद्ध झाली असून अनेक कवी उदयास आले आहेत. फडणीस यानीं मराठीवाङ्मयाचें हें मोठेंच काम चालविलें आहे. याशिवाय विविधज्ञानविस्तारामध्यें नवीन कविता पुष्कळ आली आहे. अलीकडील नव्या मासिक पुस्तकांत कवितांना स्थळ असतें. अशा प्रकारें नवीन कविता पुष्कळ प्रसिद्ध होत आहे. नवीन कवितेंतून वेंचे घेऊन कित्येक स्वतंत्र पुस्तकेंही झालीं आहेत. केशवसुत, मोगरे, रे० टिळक याची कविता स्वतंत्र प्रसिद्ध झाली आहे. तसेंच 'अभिनवकाव्यमाला' या नांवाचीं तीन पुस्तकें प्रसिद्ध झालीं आहेत, त्यांतही अर्वाचीन कवींच्या काव्यांतील उतारे घेतले आहेत. परंतु प्रत्यात इंग्रजी कवींचे काव्यग्रंथ स्वतंत्रपणें प्रसिद्ध होतात तसे ग्रंथ आमच्या इकडे अजून फारसे प्रसिद्ध झाले नाहींत. केवळ कवित्वाचा उद्योग करणारे असे लोक आमच्या इकडे अजून नाहींत. फायद्या वेळीं हा उद्योग करावयाचा. प्रसिद्धी-करणाचीं साधनेंही थोडीं आणि उत्तेजन देणारा वाचकसमुदायही तात्पुरताच. यामुळें नवीन कविता महाकाव्यमय कमी होते. खंड-

काव्यमय आणि मध्यम काव्यमय पदें, गाणीं, प्रेमोद्गार, दुःखोद्गार, अशा प्रकारचेंच पुष्कळ. तथापि अशी कविता बरीच होऊन मराठी वाङ्मय वाढत आहे, एवढी गोष्ट खरी.

अर्वाचीन काव्यांत पहिली गोष्ट भावनात्मक काव्य, वर्णनात्मक काव्य, पदें, गीतें, स्तोत्रें, महाकाव्य, सुखान्त काव्य, करुणान्त काव्य, उपहास, विनोद, विडंबन वगैरे प्रकार स्पष्टपणें निराळे करून काव्यरचना होत असते. या व्यवस्थेमुळें वाचकाची जशी आवड असेल, तशी त्यास निवड करितां येते. त्याचप्रमाणें आधुनिक कवी जुने शिळे विचार न घेतां अगदीं नवीन विचार घेतात. उदाहरणार्थ, आपण एकच सौंदर्याची कल्पना घेऊ. ही संस्कृतामध्यें आणि जुन्या मराठीमध्यें सर्वत्र एका ठरीव प्रकारची आढळते. पण हीच आतां नवीन प्रकारची व भिन्न तऱ्हेची दृष्टीस पडते; उदाहरणार्थ रघुनाथ पंडिताचें दमयंतीचें वर्णन, तसेंच मुक्तेश्वराचें शकुन्तलेचें वर्णन, आणि टिळक यांची 'अमेरिकन मुलगी' या कविता पाहाव्या. जुन्या कवींचें वर्णन केवळ शृंगारमय असतें. नवीन कवींच्या बोलांमध्यें निष्काम सौंदर्यभावना आणि वर्णनाचा प्रत्यक्षपणा असतो. दुसरी गोष्ट, जगाच्या संबंधाच्या प्राचीन समजुती नष्ट होऊन नवीन समजुती उत्पन्न झाल्या आहेत. यामुळें हा सर्व टाकाऊ पसारा आहे असें वाटत नाहीं. अर्थात् आधुनिक कवी सृष्टीकडे नव्या दृष्टीनें आणि नवीन प्रेमानें पाहातात, आणि यामुळें सृष्टिशोभा हा काव्याचा नवीन विषय झाला आहे. आतां आपण सर्व सृष्टी नवीन दृष्टीनें पाहू लागलों, त्याबरोबर वैराग्यमय दृष्टीचा क्षुल्लकपणा गेला; त्याबरोबर सृष्टींतील क्षुल्लक गोष्टीही महत्त्वाच्या वाटूं लागून, त्यांतही घेण्यासारखें आणि विचार करण्यासारखें पुष्कळ आहे असें वाटूं लागलें. यामुळें क्षुद्र विषयांवरही कविता होतात आणि त्यांच्या द्वारें नीतिबोध व सुविचार सांगण्यास सोय होते.

कवित्वसंबंधाच्या अनेक बाबतींत प्राचीन कवींच्या ठरीव कल्पना असत. त्या अर्थात् फंदाळवाण्या व्हावयाच्याच. अर्वाचीन कवी हा एकांगीपणा सोडून नवीन कल्पना आणि विचार घेत आहेत व प्रगट

करीत आहेत; आणि नवीन शास्त्रीय शोधांच्या योगानें या कल्पना अतोनात वाढल्यामुळें आणि ही वाढ सतत चालू असल्यामुळें यांचा नवीनपणाही सतत कायम राहील. एका प्रख्यात इंग्रजी ग्रंथकारानें असें दुष्ट अनुमान काढिलें होतें कीं, काव्य हें कल्पनामय असणार. तेव्हा या नवीन युगांतल्या खऱ्या गोष्टींपुढें कल्पनामय गोष्टी नष्ट होऊन काव्याचा ओघ खुटणार. आमच्या इकडल्याही एका प्रसिद्ध विद्वानानें या भविष्याचा अनुवाद केला होता. पण हा तर्क आतां अगदीं खोटा ठरून, नवीन शास्त्रीय शोधांनीं काव्यकल्पनांना उलट जास्तच भरतें आलें आहे असें दिसत आहे. इतकेंच नव्हे तर राजकीय, सामाजिक, शास्त्रीय, व्यावहारिक वगैरे आपल्या सर्व संसाराचें सार, पर्यवसान व जीवित काव्यच आहे, असेंच इंग्रजी टीकाकार प्रतिपादितात.

तसेंच, पाश्चात्य टीकाकारांच्या समजुती आमच्या जुन्या समजुतींहून बऱ्याच विस्तृत आहेत. काव्य म्हटलें कीं तें प्रथमारंभीं रजविणारें पाहिजे. यासाठीं पहिली गोष्ट, कवीला मनोरम शब्दरचना साधली पाहिजे. ही गोष्ट साधली असता निम्मेंअर्धक काम होतें. मोदकपणांत आमच्या नवीन कवींत मोगरे श्रेष्ठ होत. दुसरा गुण कवी स्वतांच्या गोष्टींपासून अगदीं अलग असावा. काव्यामध्यें त्याचे स्वताचे गुण-दोष, सुखदुःखें अथवा सांसारिक गोष्टी फारशा प्रतिबिंबित होऊं नयेत. असें असल्यानें तो जो विषय घेईल त्याच्याशीं त्याचें तादात्म्य होईल. इंग्लिश कवी शेक्सपियर याची अशी हातोटी दिसून येते कीं, तो जो विषय घेतो व जो स्वभाव वर्णितो त्यात त्याची एकतानता होते; यामुळें निरनिराळीं वर्णनें करणारे भिन्न भिन्न शेक्सपियर होते कीं काय, असें भासतें! आमचे इकडे केशवसुत यांना ही गोष्ट साधलेली दिसते. यांनीं स्वतांच्या गोष्टी अगदीं सर्व वाचकांना आपल्याच असें वाटायाजोग्या बदलून टाकल्या आहेत. मोगरे यांच्या-मध्येंही हा गुण दिसून येतो. तिसरी गोष्ट कवीनें घेतलेल्या विषयामध्यें *कांहीं तरी स्वताची कल्पना घातली पाहिजे. एखादी गोष्ट पद्यांत किंवा साध्या भाषेंत केवळ सुंदर रितीनें वर्णिल्यानें कविता होत नाहीं.* तर तींत कवीच्या कल्पनेचें असें नवीन कांहीं तरी असावें लागतें. हा

गूण टिळक यांच्या कवितेंत दिसतो. चौथी गोष्ट कवितेंत गंभीरपणा आणि एकादें प्रौढ तत्त्व पाहिजे. ही चौथी गोष्ट, जींत असेल तीच कविता या ज्ञानयुगांत चिरस्थायी होईल. या गुणाच्या अभावीं एखादी कविता जरी क्षणभर मनोरम वाटली, तरी तिचें प्रतिबिंब मनोमुकुरावर कायमचें उठणार नाहीं. सांप्रत संस्कृतांतील जुनें साहित्यच केवळ पुरें पडणार नाहीं. इंग्लिश भाषेच्या साह्यानें जे साहित्यविषयक नवीन प्रकार आपणास माहीत झाले आहेत, त्यांचाही भरपूर संग्रह करण्याकडे आपल्या कवींचें लक्ष असावयास पाहिजे.

प्राचीन कवींचे जुन्या ठरीव वेदान्ताचे आध्यात्मिक आणि तात्विक विचार असत. हल्लीं या विचारांचें निराशेचें स्वरूप नाहींसें होऊन त्यांना नवीन जीवित प्राप्त झालें आहे. यामुळें ईश्वरी गूण आणि ईश्वरस्वरूप यांचें निराळ्या प्रकारचेंच वर्णन येऊं लागलें आहे. तसेंच परमेश्वराचें पूर्वीचें सगुण स्वरूप आतां मागें पडून सकलसृष्टी हें परमेश्वराचें मूर्तिमंत स्वरूप दृष्टीपुढें उभें राहात आहे, व भक्तिभावना जास्त विस्तृत आणि निराळ्या स्वरूपाची भासत आहे. जुनी धर्मभावना आणि श्रद्धा ह्या गोष्टी निराळ्या प्रकारच्या असल्यामुळें नवीन धर्मभावना आणि श्रद्धा वाचकांस अजून प्रिय नाहींत. तथापि मो ग रे यांची धर्मश्रद्धा आणि ईश्वरी प्रेम व टिळक हे ख्रिस्ती असूनही त्यांच्या ईश्वरसंबंधी आणि भक्तिविषयक भावना तुकारामादि भक्तांपेक्षां कांहीं कमीप्रतीच्या नाहींत. आतां जुनी निराशेची बुद्धी जाऊन आशामय नवीन विचार उत्पन्न झाले आहेत. अशा रीतीनें अर्वाचीन कवितेचें स्वरूप अगदीं निराळें बनत आहे. अर्वाचीन काव्यांत विषयविविधता, भाषाशुद्धी आणि भाषाप्रौढी, नव्या प्रकारचें सृष्टिप्रेम, नवीन सौंदर्यरती, सूक्ष्मावलोकन, नवीन कौतुक, नवीन भक्तिभावना आणि ईश्वरी प्रेम, इत्यादि गोष्टी उत्पन्न झाल्या आहेत. याचें प्रत्यंतर नवीन काव्यांच्या वाचनानें तेव्हांच दिसून येईल. हे जे नवीन काव्याचे गूण सांगितले, हे आधुनिक काव्यांत प्रचुर आहेत असें सांगण्याचा हेतु नाहीं. तर सांप्रत हे गूण उद्भूत झाल्यामुळें एकंदर काव्यरचनेस नवीन प्रकारचें जीवित

आणि वळण प्राप्त झालें आहे, हें मुख्यतः सांगावयाचें आहे. त्याचा प्रभाव कवींच्या तोलाप्रमाणें अधिकाधिक दिसून येईल हें उघडच आहे.

अर्वाचीन कवींचा भरणा मोठा आहे. परंतु त्यांमध्यें थोडीशी कविता आणि कांहीं लहान काव्यें लिहून बनलेले कवी पुष्कळ आहेत. ज्यांनीं काव्यरचनेंतच मन घालून पुष्कळ पद्य लिहिलें आहे, आणि काळजीपूर्वक सुरचना केली आहे असे कवी वास्तविक थोडेच आहेत; आणि कविताही अजून संख्येनें पुष्कळ झाली आहे असें नाहीं. तसेंच जी कविता प्रसिद्ध झाली आहे व होत आहे, त्यांतली टिकेल कोणती हेंही अजून सांगतां येत नाहीं. यासाठीं अर्वाचीन कवितेनें वाङ्मयाच्या आणि भाषेच्या घटनेस कसें साह्य झालें आहे, आणि हें साह्य कोणीं केलें हें पूर्णपणें सांगावयास अजून अवकाश आहे. नवीन कवींनीं पाश्चात्य तऱ्हेची कविता व तीबरोबर तत्त्वबंधाचे या भागाच्या आरंभीं सांगितलेले प्रकार भ.षेंत आणिले; त्यांची वाढ वाङ्मयात पुष्कळ होत आहे. या दृष्टीनें त्यांनीं बरेंच काम केलें व करीत आहेत.

प्राचीन विचार आणि प्राचीन वृत्तांची आणि रचनेची पद्धत बरीचशी कायम ठेवून रचना करणारे कवी मोगरे [ १८८१–१९०४ ] हे होत. यांची कविता चांगल्या प्रकारची आहे. तसेच यांचे लहान चुटके नसून बरींच लांब काव्यें असतात. यांनीं नवीन विषयांवर विशेषतः श्लोकवृत्तांत कविता लिहिली आहे. सुबोध व मधुर शब्दरचना हा मोगरे यांच्या कवितेचा मुख्य गुण आहे. त्यामुळें वाचकांचें मन सहज मोहून जातें. मोगरे यांच्या कवितेचे विषय कठीण, डौलदार नसतात; आणि भाषाही साधी, शुद्ध, व्यवस्थीत अशी असते. त्यांनीं अवहेलन या काव्यपद्धतीचा प्रथमतःच उपयोग करून कांहीं चांगलीं काव्यें लिहिलीं आहेत. त्यांनीं आर्यावृत्तांत कादंबरीसार या नांवाचें बरेंच मोठें काव्य लिहिलें आहे. तसेंच त्यांचें दयानंद काव्य ही सरस आहे. यांची कविता पुस्तकरूपानें 'मोगऱ्याचीं फुलें' म्हणून चार भागांत प्रसिद्ध झाली आहे. यांच्या चरित्रावर आणि त्यांच्या काव्यनिरूपणावर आपटे यांनीं त्यांच्या कवितेच्या तिसऱ्या भागात आणि मद्यनाळकर यांनीं विविधज्ञानविस्तारांत चांगले निबंध लिहिले आहेत.

केशवसुत [कृ० के० दामले, १८६६–१९०५]:—हेही उत्तम कवी झाले. यांची कविता अगदीं नव्या तऱ्हेची आणि गीतमय आहे. भाषा सरळ, मृदु, ओजस्वी आणि गोड असून क्षुद्र वस्तूंकडे तात्विकदृष्ट्या पाहून त्यांतूनही बोधामृत काढण्याची त्यांची प्रवृत्ती आहे. यांचीं काव्यें लहानच परंतु बरींच आहेत. सुमारें दीडशें चुटके प्रसिद्ध झाले असून आणखी कित्येक असावे असें दिसतें. कारण अलीकडे आणखी कांहीं गीतें प्रसिद्ध झालीं आहेत. यांच्या कवितेचे विषय अगदीं स्वतंत्र आणि नानाविध आहेत. काव्य रचतांना अगदीं क्षुल्लक वस्तूंबरोबरही जसे कवी तल्लीन झालेले दिसतात, तसे वाचकही कविता वाचतांना गुंग होतात. त्यांची कविता साधारणतः सोपी आहे, परंतु तुकारामाप्रमाणें थोडक्या शब्दांत पुष्कळ आशय आणण्याची त्यांची तऱ्हा असल्यामुळें, आणि पुष्कळदां कवी गूढ विचारांत शिरल्यामुळें अर्थ उकलण्यास विचार करावा लागतो. यांचें भाषेच्या ठाकठिकीकडे लक्ष बरेंच कमी असतें. यांची कविता पुस्तकरूपानें प्रसिद्ध झाली आहे; आणि त्यांचें चरित्र व काव्य-निरूपण यांवर रहाळकर कवी यांचा मनोरंजनामध्यें विस्तृत लेख आला आहे. पाश्चात्य निबंधकारांच्या धर्तीवर एकाद्या कवीच्या कृतीचें चिकित्सात्मक विवेचन कसें करावें, याचा हा रहाळकर यांचा लेख उत्तम नमुना आहे.

रे० टिळकः—हे प्रेमळ कवी आहेत. यांचीं अल्प काव्यें पुष्कळ आहेत. मराठी भाषा त्यांच्या पूर्ण कह्यांत आहे, यामुळें हे कवी जणूं काय आपल्या कवितामय भाषेत नित्याप्रमाणें सहज भाषणें करीत आहेत असें वाटतें. क्षुद्र, निर्जीव वस्तु, झाडें, पानें, फुलें हीं त्यांची जशीं काय मित्र आहेत. त्यांच्याबरोबरचा कवीचा काव्यमय संवाद वाचतांना वाचकही सहज तन्मय होऊन जातो. त्यांचीं कित्येक लांब काव्यें आहेत. यावरुन टिळक हे महाकाव्य रचण्यास योग्य आहेत, असें वाटतें. टिळक हे अगदीं नव्या तऱ्हेचे कवी होत. तथापि त्यांनीं जुनें सोडलेलें नाहीं, आणि त्यांतून ते नवीन कल्पना काढीत असतात. यांचीं खंडकाव्यें पुष्कळ आणि विषयाची विविधता फार. यांनीं गीतें

(Lyrics) व गाणीं, पदें वगैरे अनेक रचिलीं आहेत. पाश्चात्य तऱ्हेच्या गीतें वगैरे लहान कविता आणि इग्रजी कवितेच्या नमुन्यावरील नवीन वृत्तें प्रथमतः टिळक यानींच मराठीमध्यें उपयोगात आणिलीं. त्यावें अनुकरण आता पुष्कळ होत आहे. यानीं नवीन प्रकारचें भक्तिपर आणि अध्यात्मपर वळण कवितेस लाविलें आहे. त्याच्या वाणींत प्रसाद असून तींत विपुल प्रेमभाव असतो. हे ख्रिस्तधर्मी असूनही त्याच्या भक्तिपर कविता आपल्या लोकाना आवडण्यासारख्या आहेत. कित्येक वेळा ते स्वता तत्वज्ञानात्मक किंवा आध्यात्मिक कल्पनात असे गुगून जातात कीं, वाचकास त्याच्याबरोबर जाता येत नाहीं, आणि त्याच्या कित्येक सरस गीताचा विरस होतो. यानीं कित्येक मोठीं काव्येंही केलीं आहेत. 'वनवासी फूल' हें तत्वविचारात्मक सुदर काव्य आहे. अशा प्रकारचीं तात्विक विचारमय आणखीही गीतें आहेत. याची बरीच कविता स्वतत्रपणें प्रसिद्ध झाली आहे.

नवीन कवींचीं विस्तृत काव्यें नाहींत, तरी लहान काव्यें आणि गीतें, यावरून ज्याना पहिल्या प्रतीचे कवी म्हणता येईल, असे अर्वाचीन कवी बरेच आहेत. विनायक करंदीकर हे उत्तम कवी होऊन गेले. याच्या 'जोहार', 'शिवसदेश', 'पुरुष आणि स्त्री', 'स्त्री रत्नें' या चागल्या कविता आहेत. ठोमरे याची थोडीच कविता सरस आहे. याची वाणी सोपी आणि मधूर असते. तसेंच याचें सृष्टिवर्णन मनोहर असते. गोविंदाग्रज (गडकरी) हे चागले कवी आणि नाटककार आहेत. 'राजहस' हें याचें मनोहर काव्य आहे. ता वे यार्चा 'वियोगिनी' व 'राजकन्या आणि दासी' हीं अल्प काव्यें चागलीं आहेत. याचप्रमाणें राहाळकर, मुजुमदार, घाटे, लेंभे, अनततनय, चद्रशेखर, हे चागल्यापैकीं कवी आहेत. लोंढे याची बरीच साधी, सोपी, बालबोध कविता आहे. याना 'मुलाचे कवी' असें नाव देणें अगदीं योग्य आहे. मुबईचे पाध्ये, पुण्याचे आगाशे आणि जनलपूरचे फणसे याची चागल्या प्रकारची बरीच कविता आहे.

या तीन कवींची मुख्य गोष्ट ही आहे कीं, हे महत्वाच्या सामाजिक गोष्टींवर टीकात्मक काव्यें लिहितात. आगाशे यांचीं कित्येक मृत्युलेखमय पद्यें आहेत. फणसे यांची श्लेष आणि अनुप्रास जुळविण्याची प्रवृत्ती फार आहे. हे शब्दालंकार जरी फारसे इष्ट नसले, तरी ते रचण्याची फणसे यांची कुशलता चांगली आहे. केसरी, आठल्ये, लिमये (राधारमण), पांगारकर, निरसुरे, हेही चांगले कवी आहेत. सौ० लक्ष्मीबाई टिळक, सिंधुसुता आणि सौ० मनोरमा रानडे या चांगल्या कवयित्री आहेत.

आमच्या मोठ्या विद्वान् मंडळींतलेही कित्येक कवी आहेत. त्यांनीं थोड्याच परंतु चांगल्या कविता केल्या आहेत. यांतले उभयतां ओक महाजनी, गोविंदराव कानिटकर, शं० मो० रानडे, हे मुख्य होत. मोडक आणि भांडारकर यांचीं ईश्वरभक्तिपर आणि ध्यानपर व नीतिपर मधुर पद्यें प्रार्थनासंगीतामध्यें पुष्कळ आहेत.

याप्रमाणें पुष्कळ कवी सध्या मराठीच्या घटनेचें काम करीत आहेत. यांच्या कामगिरीचा आपल्या समाजावर, लोकांच्या विचारांवर आणि एकंदर वाङ्मयावर काय परिणाम होतो हें चांगल्या प्रकारें कळून येण्यास अजून अवकाश आहे. यासाठीं येथें थोडक्यांत सामान्य-विवरण करून त्यांची रजा घेतों.

# भाग पांचवा



# वाङ्मयघटना-उत्तरार्ध

## १-प्राचीन गद्य

प्राचीन गद्याचा आरंभ बाराव्या शतकाच्या अखेरीस होऊं लागला. मराठी भाषा लोकांच्या बोलण्याच्या व्यवहारात याच्या अगोदर पुष्कळ वर्षें असली पाहिजे, पण ती ग्रथस्थितींत याच्या अगोदर दाखवितां येत नाहीं. त्या वेळचे जे शिलालेख आढळतात, ते संस्कृतांत किंवा प्राकृतांत असून कांहीं शिलालेखांत अखेरीस एकादुसरें वाक्य मराठींत असतें. एवढ्यावरूनही त्या वेळीं मराठी भाषा चांगली प्रचारांत होती असें समजण्यास चिंता नाहीं. कर्नाटकातल्या एका देवळातील शके ९०५ मधील एका शिलालेखात 'श्री चामुंडरायें करविय़लें' असें शेवटीं एक मराठी वाक्य आहे. त्याच्याच खालीं 'श्री गगराजें सुत्तालें निरमियलें' असें वाक्य असून त्याचा १००५ हा शक आहे. या एकेका वाक्यावरून त्या काळीं भाषा व्यवस्थीत स्वरूप पावली होती, असें अनुमान करिता येतें. कदाचित् हीं दोन्हीं वाक्यें एकाच वेळीं मागूनच्या वर्षांत लिहिलीं असतील. श्रीपतिकृत 'रत्नमाला' हा ज्योतिष-ग्रंथ सन १०३९ तला असें त्यात लिहिलें आहे. याची टीका मराठींत आहे. परळचा शिलालेख सन ११८५ तला आणि पाटण येथील शिलालेख सन १२०७ मधला आहे. मराठी पंचतंत्र या लेखांच्या नंतरचें आणि ज्ञानेश्वरीच्या अगोदरचें आहे.

ज्योतिषग्रंथाच्या मार्फत विभक्तींचें काम सामान्यरूपानें फार केलेलें आहे. ल-भविष्य नसून भविष्यकाळ वर्तमानानें दर्शविला आहे. परळचा शिलालेख आणि पाटणचा शिलालेख यांतही ल-भविष्य नाहीं. पाटणच्या शिलालेखामध्यें विभक्ती सामान्यरूपमय आहेत. पंचतंत्रामध्यें सामान्यरूपमय विभक्तिरूपेंच पुष्कळ आहेत. ह्या ग्रंथाचा बराच मोठा

भाग उपलब्ध असल्यामुळें प्रत्यय लागून झालेलीं विभक्तिरूपेंही आहेत. मी, तूं, आम्हीं, हीं सर्वनामें ज्योतिषग्रंथांत आणि पंचतंत्रांत मिं, तुं, आम्हि, तुम्हि, अशीं असून 'मिं' आणि 'आम्हि', 'तुम्हि', यांच्या अंतीं अनुस्वार आहेत. ज्ञानेश्वरीच्या फार जुन्या प्रतींतून अशींच रूपें जागोजाग आढळतात. ज्योतिषग्रंथांत 'ला' हा चतुर्थीप्रत्यय लागून 'यांला' असें झालेलें सर्वनामरूप आहे. दोन्ही शिलालेखांत 'ते हा चा' रूप असून ज्योतिषग्रंथांत 'ते या चा' असें आहे. परळच्या लेखांत 'तेंच्या' असेंही रूप आहे. या शिलालेखांत 'ही' या अव्ययाच्या अर्थाचें 'हुवि' असें रूप आहे. हें बहुधा 'ह्यपि' (हि + अपि) याचें 'ह्यवि' असें होऊन झालें, आणि पुढ त्याचें 'ही' झालें. ज्योतिषग्रंथांत अकारान्त शब्दांना उकार आणि इकार आहेत. सांधितलें, सांधेन, 'तेवेळे' याबद्दल 'तेव्हळीं', अशीं रूपं पंचतंत्रासारखीं आहेत. 'या'बद्दल 'इया' आहे. 'होई'बद्दल 'होए' आणि 'होती'बद्दल 'होएती' 'गाई'बद्दल 'गाए', दैत्यांनीं, दैत्यांहीं, आचार्यांहीं यांबद्दल दैत्यें, आचार्यें अशीं रूपें आहेत.

पहिला पद्यग्रंथ जसा ज्ञानेश्वरी तसा पहिला गद्यग्रंथ पंचतंत्र होय. आणखी एकादा गद्यग्रंथ उपलब्ध नाहीं, आणि हा ग्रंथही थोटक आहे. तथापि या वेळीं गद्य चांगलें लिहू लागले होते, असें स्पष्टपणें म्हणतां येतें. पंचतंत्राची भाषा कोंकणप्रांतांतली असावीसें वाटतें. मात्र कोंकणप्रांतांतली याचा अर्थ कारवाराकडली कोंकणी नव्हे. पंचतंत्रांत ल-भविष्याचा उपयोग जेथें भविष्याचा अर्थ आला आहे तेथें सर्वत्र नाहीं. कित्येक ठिकाणीं वर्तमानानें भविष्य दाखविलें आहे. ज्ञानेश्वरींत बहुतेक सर्वत्र ल-भविष्य आहे. पंचतंत्रांत भविष्यकाळच्या रूपांच्या अंतीं इकार, उकार आहेत. ज्ञानेश्वरींत नाहींत. यासाठीं पंचतंत्र ज्ञानेश्वरीच्या अगोदरचें आहे. आरंभींच्या मराठी गद्याचें स्वरूप कसें होतें हें कळण्यासाठीं पंचतंत्राचें शब्दांच्या रूपांच्यासंबंधानें थोडक्यांत अवलोकन करूं.

पंचतंत्रांत अकारान्त शब्दांना—क्रियापदरूपांना आणि अव्ययांनाही उकार आहेत. असेल, करील, या भविष्य रूपांना असेलि, करीलि, असे

इकार आहेत. सुमारें सोळाव्या शतकाच्या अखेरपर्यंतच्या गद्य लेखामध्यें पुष्कळ ठिकाणीं भविष्यकाळीं विशेषतः प्रथमपुरुषीं उकार असतो. यावरून ज्ञानेश्वरीमध्येंही तो असावा. ज्ञानेश्वरीत 'आता' हें अव्यय आहे. पचतत्रात त्याबद्दल दाणि ( स०–इदानीं ) आहे. 'बस' या धातूचीं रूपें सर्वत्र बैस, बैसतो, बैसला, बैसेल, बैसेलि, अशीं, आणि तशींच फिटैल, असैल, निघौनि, म्हणौनि, निघौन, अशीं रूपें आहेत. 'भ्याला'बद्दल 'बिहाला' येतें. कोंकणात अद्यापि 'भियाला' असें रूढ आहे. 'ऊन' ह्या धातुसाधित प्रत्यया बद्दल 'उ' आढळतो ( उदा०–हालउ, हाल्उ = हालवून हालवून ). हरवलें या अर्थी 'साडलें' किंवा 'सडलें' असा उपयोग या काळापासून चालू आहे. 'वस्तु' हा संस्कृत नपुसकलिंगी शब्द पचतत्राच्या वेळीं स्त्रीलिंगी झाला होता. पाली मार्गेत 'वस्तु' शब्द स्त्रीलिंगीच आहे, तसाच तो मराठींत आला. स्त्रीलिंगी, 'येत आहे', 'जात आहे', 'होत आहे', याबद्दल येती असे, जाती असे, होतिये, अशीं रूपे येतात. 'आहे' याबद्दल 'असे' फार. अशा रूपावरूनच पुढें येति आहे, येतिये, येत्ये, जातिये, जात्ये, इत्यादि रूपें झालीं. अप्राणिवाचक नामाच्या सप्रत्यय आणि अप्रत्यय अशा दोन्ही प्रकारच्या द्वितीया आहेत. ( उदा०–'तो वानर मृत्यातें पावला' ). तृतीयेचा 'न' प्रत्यय असून 'नें' 'नीं' हेही आहेत. ( उदा०–देवान, देवानें, देवानीं ). यातला 'न' प्रत्यय जुना, त्यासच पुढें दुसरा प्रत्यय 'ए' एकवचनीं आणि 'ई' अनेकवचनीं होऊं लागला. ती, हो, जी, हीं सर्वनामें पुढील कवितेंत येतात त्याप्रमाणें ते, हे, जे अशीं आहेत. 'कार' प्रत्यय लावून तें काम किंवा तत्संबधीं काम करणारा अशा अर्थाचीं नामें पुष्कळ आहेत, जसें, दारवठाकार ( द्वारपाळ ), काठिकार ( चोपदार ) गोठिकारी ( गोष्टी सागणारा ), केरसुणीकार, सादुकार (शब्द करणारा) इत्यादि. हल्लीं कोंकणामध्यें उपयोगात आहेत असे शब्द आणि रूपें पुष्कळ आढळतात, उदाहरणें—आल्येत. ( आले आहेत ), आवतणें, दादुला, थाईल, देशावर ( परदेश–देशावराला, परदेशाला जाणें ), फटवणें, चेळणी ( एक भाडें ), पैलाडी ( पाण्याच्या पलीकडील काठ ),

अड, आड ( विहीर ), वऱ्हाड ( लग्न—यापासून वऱ्हाडी ), वारीक ( न्हावी ), वाडवेळ ( फार वेळपर्यंत ), इत्यादि. कित्येक मासलेवाईक समास—तणखाईर ( गवत खाणारा प्राणी ), जांबुळबूड ( जांबळीच्या झाडाचें बुंध ). नामाचें सामान्यरूप करून पुढें स्वरादि शब्दयोगी निराळें घातलें आहे. [ उदा०—वना-आंततु = वनांतून ]. अकारान्त नामाचें एकारान्त सामान्यरूप, कोल्हेनें खायला = खावयालागीं; हेंच चतुर्थीच्या ला प्रत्ययाचें मूळ होय. 'लुगडें' याचा गुजराथींतल्याप्रमाणें कोणतेंही वस्त्र अशा अर्थी उपयोग आहे. असा उपयोग मुक्तेश्वराच्या कवितेंतही केलेला आहे. कित्येक चमत्कारीक शब्द व उपयोगः— पुंसा = पोपट; पुंसी = स्त्रीलिंग, पुंसेन = पोपटानें; रागेंकरून रागानें; दारवंट = दाराजवळ; पर्वतिकोन-कोनि = पर्वताजवळून; आळसिणी म्हणजे आळशी स्त्री. मुरडियां शिंगाचा ( वांकड्या शिंगाचा ); उपसहाणें, क्षमा करणें; कणव, कृपा; दिसवडी-प्रत्येक दिवशीं; सिक्षा; शिष्य; ढेंगा-सोंटा; खेंवों, क्षणींच; ( बोलतखेवों=बोलतांक्षणींच ), सुवास, सुआस ( सैपाकीण ); बोंव, बोभात—ओरड; चेतें, जागें होणें. जाणितलें, म्हणितलें, जाणितिलें, म्हणितिलें, इत्यादि. कऱ्हा, ( उंट ), मनणें = मानणें, इत्यादि. पंचतंत्राचा उपलब्ध भाग जरी छापलेला आहे, तरी तो पुष्कळ वाचकांना पाहावयास मिळणें अशक्य आहे. यासाठीं भाषेच्या मासल्याकरितां एक उतारा येथें देतों:—

" *पिंगलकु पुसे, दमनकु सांघे. म्हणे, कोणे एके नगरीं यज्ञदत्तु* नामें ब्राह्मणु असे. तो दुर्बलु. तयातें ब्राह्मणीनें म्हणितलें, तुम्हि कांहि उदीम न करा. आम्हि अवघे भुकें मरत असों. तंव तो वहूकडे हिंडों निघाला. वाटेस जातां येके अरण्यि पातला. तयासि तृषा लागलि. म्हणौनि उदकाकारणें हिंडतां. तंव एकु अड देखिला. तणें झांकिला असे. तयाआंत पाहे, तंव देखिले, व्याघ्रु, सर्पु, वानरु, सोनारू. ऐसे चौघे तया अडामध्यें पडिले असति. ते तया यज्ञदत्तु ब्राह्मणें देखिले. येहिं तो ब्राह्मणु देखिला. मग चौघेहि तयातें म्हणति, 'आमुतें या अडांतुनि बाहेरि काढि'. तंव तो विचारि, म्हणे, 'यांसि

बाहिर काढिता पुण्य होईल'. म्हणौनि तेणें आधि व्याघ्रु काढिला. तेणें म्हणितलें, 'तु माझा प्राणदाता, मिं मथुरेचे डोंगरिं असें, तेथें तु आलिया, मिं तुझे उपकाराचा प्रत्युपकार करीन. परि या सोनारा तु बाहिर काढु नको'. तव तो सर्पु आणि वानरु ही काढिले. तव ते म्हणति, 'तु सोनारु बाहिर काढु नको, आणि आमुतें अवघड वेळेसि स्मरावें'. मग पाठिं तो सोनारु हीं काढिला. तव तो सोनारु ही म्हणे, 'मजपासीं सुवा याव, तुझें मिं उत्तीर्ण होईन'. तव तो ब्राह्मणु हिंडतु हिंडतु मथुरेसि गेला. तव तेथें वानरु भेटला. तेणें त्या ब्राह्मणासि स्वागत केलें बरविं फळ दिव्य आणौनि दिधलें. ते डोंगरिं व्याघ्रुहि भेटला तेणें त्या ब्राह्मणासि सोनियाचे अलंकार दिधले. ते अलंकार घेउनि त्याच सोनारापासि गेला. तव तो तया ब्राह्मणासि नोळखेचि. ब्राह्मणें खुण सांगितली. मग वोळखिलें. ब्राह्मणासि बैसों घातलें, आणि पुसे, काय काज? तव तया ब्राह्मणें अलंकार दाखविले. तव ते अलंकार तयाच नगरीच्या राजकुवराचे त्याच सोनारें घडिले होते. ते नेमस्त ओळखिले. मग मनि विचारि, 'व्याघ्रें राजकुवरु मारिला अलंकार ठेविले होते तें या ब्राह्मणासि प्रत्योपकाराकारणें दिधले' तव तो सोनारु जाउनि राउळीं सांघे, म्हणे, 'जि, राजकुवरु जेणें मारिला, तो चोरु मिं दाखविन' म्हणौनु तो ब्राह्मणु सोनारें राजदूतापासिं दाखविला. म्हणें, 'एणें राजपुत्र मारिला, आणि अलंकार घेउनि आला असे' तो ब्राह्मणु राजदूतीं धरुनि बहु बडविला, आणि धरुनि रायापासीं नेला. तव रायें म्हणितलें, 'यासि उदैक सुळि द्या'. म्हणौनि बंधन करौनि ठेविला. तव त्या ब्राह्मणें रात्रिं सर्पु स्मरिला. तव तो तत्काळ आला म्हणे, 'कायि आज्ञा?' तव तेया ब्राह्मणें अवघा वृत्तांतु सांघितला. तव तो सर्प म्हणे, 'मिं रायाचे राणिस डसीन तुजवाचुनि नुतरें. तु हात लाविताचि उतरेन'. ऐसें सांगौनु सर्पे ते राणि डसिलि. तया सर्पाचें विष कांहिं केल्या नुतरे. तव तया ब्राह्मणें म्हणितलें, 'मिं उतरीन'. मग तो ब्राह्मणु रायें सोडिला. तयाचा हात लागताचि सर्पु उतरला. मग रायें तया ब्राह्मणासि सन्मानु केला. मग रायें लेणियाचें वृत्त

पुसिलें. ब्राह्मणें आद्यापासुनि अवघें सांगितलें. मग तो सोनारु नेउनि गांवाबाहिरि घातला, आणि तया ब्राह्मणासि धन-गांव दिधलें. मग तेणें आपलें कुटुंब आणविलें. सुखें असों लागला. म्हणौनि कोण्हाचा विश्वास न करावा."

पंचतंत्र तेराव्या शतकाच्या आरंभींचें धरलें तर त्यानंतर सतराव्या शतकाच्या आरंभापर्यंत महत्त्वाचें गद्य आढळत नाहीं. कांहीं पत्रें किंवा त्यांच्या नकला आहेत. सन १४०५च्या एका पत्रांत तृतीयेच्या अनेकवचनीं 'नीं' प्रत्यय नामाला लाविलेला आहे. हें पत्र जुन्याचें नवें केलेलेंही असेल. तथापि तृतीयेचा एकवचनीं 'नें' आणि अनेकवचनीं 'नीं' हे प्रत्यय 'न' प्रत्यय कमी होऊन त्याबद्दल नामांना लागलेले पंधराव्या शतकापासून आढळतात; एँ व हीं हे जुने प्रत्यय सतराव्या शतकाच्या आरंभापासून गद्यांत आणि पद्यांतही कमी होत गेले आहेत, आणि त्यांच्या जागीं 'नें' आणि 'नीं' हे आले आहेत. सन १४२८ मधील एक पत्र आहे. त्यांत 'तळयाची' अशी षष्ठी आहे; आणि 'म्या'बद्दल 'मियां' 'त्वां'बद्दल 'तुवां', तसेंच कर्मणि 'लाईजे' अशीं रूपें आहेत. या तीनचारशें वर्षांतील पत्रांत, या वेळीं मुसलमानी अंमल सुरू झाल्यामुळें फारशी शब्द फार येतात. कित्येक पत्रांत तर क्वचित विभक्तिप्रत्यय, क्रियापदरूपें आणि कांहीं धातुसाधितें मात्र मराठी, बाकीचे शब्द फारशी, अशी स्थिती आहे. विजापूरचें राज्य मराठी मुलखांत कायम झाल्यावर तेथचे कारभारी, मुत्सद्दी, सरदार, जमीनदार हे मराठे असत, यामुळें दरबारी भाषा मराठी झाली. तोच प्रकार अहमदनगरींही झाला होता असें दिसतें.

पंचतंत्राचें गद्य बऱ्या प्रकारचें आहे असें दिसून येतें. त्यानंतरचें सन १६१६ तलें ख्रिस्तपुराणाच्या प्रस्तावनेचें गद्यही बरें आहे. मध्यंतरीं शिवाजीपर्यंत चांगलें गद्य नाहीं. पत्रें वगैरे आहेत, त्यांची भाषा फार वाईट आहे. सरासरी मतलब समजावितां येईल, इतकी तिची योग्यता दिसते. तीमध्यें बहुतेक सर्व फारशी शब्द. प्रत्यय तेवढे मराठी. पुढें शिवाजीपासून मार्षेत त्वरेनें सुधारणा होऊं लागली.

येथून उत्तरोत्तर मराठीचा फारशीपणा कमी होत गेला आहे. सोळाव्या शतकाच्या अखेरचीं आणि सतराव्या शतकातलीं पत्रें बहुतेक मराठी स्वरूपातच आहेत. पुढें शिवाजीच्या अमदानीपासून त्याना शुद्ध मराठी स्वरूप प्राप्त होत चाललें आहे.

खिस्तपुराण सन १६१६ त प्रथम छापलें. त्याची प्रस्तावना गद्यात आहे. हें मराठी गद्य अनेक कारणानीं महत्त्वाचें आहे. एकतर तें पाश्चात्य गद्याच्या घाटणीवर आहे. आमच्या इकडे ग्रांथिक गद्याचें वळण नव्हतेंच. यात फारशी शब्द नाहींत. हा ग्रंथ छापलेला असल्यामुळें आणि त्याचें वाचन कमी असल्यामुळें व त्याच्या लेखी प्रती होत नसत यामुळें मूळचा ग्रंथ फारसा बदललेला नाहीं. ग्रंथकारानें आपली भाषा साधारण लोकाना कशी काय कळेल याचा विचार केला होता. तसेंच त्यानें याच वेळीं मराठीचें व्याकरणही लिहिलें होतें, यावरून त्यानें शुद्धाशुद्धतेचा विचार त्या काळाच्या मानानें केलेला असलाच पाहिजे. अर्थात ही मराठी भाषा सतराव्या शतकाच्या आरंभींच्या मराठी भाषेचा उत्तम नमुना आहे. या ग्रंथाच्या प्रस्तावनेंतून कांहीं उतारे घेऊः—

( १ ) "भावाथिया ररवेया खिस्तावानो, ह्या पुराणातु स्वामिया जेसुखिस्ता तारकाची कथा लिहिली आहे तो कैसा मनुष्य होऊन ससारीं आला, आणी कवण कार्यासि आला, त्या योगाचा विवेकु केला. हे कथेचे दोन भाग अथवा दोनी पुराणें केलीं आहाती. पहिलिया पुराणातु ससाररचनेसाठीं आरंभु करूनु उदडी उत्तमी करणिया देवा स्वामियान आपुला येकुची पुत्रु पाठविण्याचें आदीं केलिया, त्या करणीयाची येवस्ता निरोपितों. दुसरिया पुराणातु जेसु तारकाचें येणें सागुनु तो मनुष्यु होऊनु जन्मला तोंवेरी व स्वर्गप्रवेशु करीपर्यंत तयाची एकनी कथा केली आहे. तिथे कथेवरुनु समस्तासी सत्यवत परमेश्वरा व तयाचिया एकचि पुत्र जेसु खिस्ताची ओळखी होआवेया, ज्या जेसुाचोनु आणी एक जियाचें नाव वर्णुनु प्राणियासि मुक्ति जोडे ऐसें स्वर्ग सालुतें न मेळे."

(२) " हें सर्व मराठिये भासेन लिहिलें आहे. ह्या देसींच्यां भाषांभितूर ही भास परमेश्वराच्या वस्तू निरोपूंसी योग्य ऐसी दिसली, म्हणउनु पण शुद्ध मराठी मधिमा लोकांसि न कळे देखुनु, ह्या पुराणाचाफळु बहुतां जनांसि सुफळु होऊंस, काय केलें, मागल्यां कवीश्वरांचीं बहुतेकें अवघडें उत्तरें सांडुनु सांपुचेयां [सांप्रतच्या] कवेश्वरांचियें रितुप्रमाणें आणियेकें सोपीं ब्राह्मणाचे भाषेचीं उत्तरें ठाई ठाई मिश्रीत करूनु कवित्व सोपें केलें. यापरी परमेश्वराचे कृपेस्तव उदंडा लोकांचें आरत पूर्ण होईलु; आणी जे कवण एकादे वेळां पूर्विल्यां कवित्वांचा शृंगारु या बरवी भास अद्यापि आठवताती, ते हें कवित्व वाचुनु संतोषु मानिती आणी फावे तो फळु भोगिती; कां मागिल्यां कवित्वांच्या स्थानीं आणियेक कवित्व देतों तयां होऊनु फळरस सुफळ. आणी मागल्यां कवेश्वरांच्या लटक्यां उत्तरां या स्वप्नां वारिये सत्यवंता परमेश्वराचें सत्यवंत शास्त्र या परम सुखाचा मार्गु परम भक्ति शिकवितों, जिंयें शिकविणें निमित्तीं तयांच्या आणी आमच्या शास्त्राभितरि केवडें अंतर आहे तें समास्तांसि ठाऊकें होईल, तितुकें अंतर उजुवाडा या अंधारासि, सत्या या लटिकासि, वैकुंठा या यमकोंडासि, परमेश्वरा या देवचारासि आहे."

खिस्तपुराणाच्या पद्यांमध्यें संस्कृत शब्द जास्त असून प्रस्तावनेच्या गद्यभागांत त्यांचीं लौकिकांतलीं रूपें अथवा साधे शब्द घातले आहेत. (जसें,—भाषा–भासा–भास). विशेष्यास विभक्तिरूप झालें असतां विशेषणाचें बहुतेक सर्वत्र सामान्यरूप केलें आहे. 'आणी' हें अव्यय दीर्घान्त आहे. 'कृपा' याबद्दल 'क्रुपा' आहे. खुद्द तुकारामाच्या वेळीं लिहिलेल्या अभंगांच्या बाडांत 'कृ' याबद्दल 'क्रु' आणि या उताऱ्यांतल्यासारखीं कांहीं रूपें आढळतात. खिस्ती कवीनें स्वतांच म्हटलें आहे कीं, मध्यम लोकांना जुन्या कवींची भाषा कठोण वाटते म्हणून मी सोपी, ब्राह्मणी भाषा वापरतों. जुने कवी कोण! या काळचे आणि अगोदरचे ज्ञानदेव, मुकुंदराज, दासोपंत आणि एकनाथ हे चार कवी तूर्त प्रसिद्ध आहेत. आणखीही कवी या परदेशी कवीला माहीत

असावेत. खिस्तपुराणाच्या ओव्यांत आणि प्रस्तावनेच्या गद्यांत फारशी शब्द मुळींच नाहींत असें आढळून आलें. पण 'व' हें अव्यय फारशी आहे, असें समजतात, तें प्रस्तावनेंत बरेच वेळां आलें आहे. याच सुमाराचें शहाजीनें विजापूरच्या बादशहास पाठविलेलें एक बरेंच लांब राजकारणी पत्र प्रसिद्ध आहे; त्यांत फारशी शब्द फार आहेत. शब्दाचे शेवटचे उकार आहेत. म्हणौनु, करौनु, अशीं रूपें आहेत, पण बरींच कमी आहेत. यांत आणखी जुने प्रकारही कमी आहेत. याचें कारण अर्थात् विषय आणि स्थल हीं अगदीं भिन्न आहेत.

यानंतर मराठीसत्तेचा उद्भव होऊन भाषेचा व्यवहार वाढत गेला, यामुळें भाषेंत झपाट्यानें फरक होत चालला, आणि भाषेला नवीन स्वरूप येत चाललें. पुढील दोनशें वर्षांतल्या राजकीय उलाढाली फार, त्यांचा व्याप मोठा, आणि त्या करणारे पुरुषही पुष्कळ असल्यामुळें, सन १८२० सालापर्यंत भाषा अगदीं निराळी होऊन तिचें संवर्धनही फार झालें व घटनाही निराळी बनली. हें सर्व उपलब्ध वाङ्मय छापून निघालें आहे, म्हणून येथें उतारे दिले नाहींत. याचें विवरण करितांना मुख्यतः तीन गोष्टी पाहावयाच्या आहेत—(१) हें गद्यवाङ्मय कोणत्या प्रकारचें आहे. (२) भाषेची घटना आणि संवर्धन हीं कोणत्या प्रकारें होत गेलीं आणि (३) घटना करणारे कोण आणि कोणत्या योग्यतेचे होते.

मराठीचें पद्यवाङ्मय केवळ अध्यात्मविषयपर आणि आख्यानपर आहे. कवितेंत येणारे इतर सर्व विषय त्याच्या अंगभूत आहेत. कोणत्याही गद्यवाङ्मयांत पुष्कळ निरनिराळे विषय असावयाचे. परंतु मराठी गद्यवाङ्मयांत राजकीय उलाढालींचीं आणि मुत्सद्दिगिरीचीं पत्रें, हकीगती, बखरी आणि कांहीं निवाडे, सनदा वगैरे किरकोळ लेख, एवढेच विषय आहेत. ग्रंथ तर मुळींच नाहींत. राजकीय वाङ्मयाचा शिवाजीच्या काळाच्या सुमारें आरंभ झाला आहे. नंतर उलाढाली फार झाल्या आणि त्या करणारे पुरुषही पुष्कळ होऊन गेले, यामुळें हें वाङ्मय फार मोठें बनलेलें आहे. सुमारें पन्नास वर्षांच्या पूर्वीं यासंबंधाचे कागदपत्र फारसे उपलब्ध

नव्हते. परंतु त्यानंतर शोधनाचे निरनिराळे उद्योग सुरू होऊन बरेंच वाङ्मय छापून ही निघालें आहे. तथापि अजून प्रसिद्ध न झालेले लेख पुष्कळ आहेत; आणि अस्तित्वांत असून उजेडास आणणारांस प्राप्त झाले नाहींत असेही पुष्कळ आहेत. प्रथमतः 'विविधज्ञानविस्तार' या मासिकपुस्तकांत कांहीं लेख प्रसिद्ध झाले. ऐतिहासिक बखरी मिळवून त्यांच्या साह्यानें मराठी इतिहासाचा शोध केला पाहिजे, या गोष्टीकडे प्रथमतः निळकठराव कीर्तने यांनीं लोकांचें लक्ष लाविलें. पुढें चिपळूणकर, साने आणि मोडक यांनीं चालविलेल्या 'काव्येतिहाससंग्रह' या पुस्तकांत बखरी आणि लेख छापून निघाले. त्या-नतर पारसनीस यांचें 'इतिहाससंग्रह' हें मासिक पुस्तक, खरे यांचे 'ऐतिहासिक लेख' आणि राजवाडे यांचीं 'ऐतिहासिक लेखांचीं खंडें' यांत पुष्कळ लेख प्रसिद्ध झाले. या तीन गृहस्थांनीं या संबंधाची मोठी कामगिरी केली आहे आणि त्यांचें काम अजूनही चालू आहे.

मराठी गद्याचें आद्य स्वरूप पंचतंत्र आणि खिस्तपुराणाची प्रस्तावना यांतच कायतें दृष्टीस पडतें. त्यावरून असे दिसतें कीं गद्यरचना त्या वेळच्या पद्यरचनेहून फारशी भिन्न नसे. शब्दांचीं करौनी, म्हणौनी,—चेनि वगैरे कठीण रूपें आणि उकार, इकार वगैरे प्रकार विपुल होते. वाक्य अगदीं लहान असे. त्यामध्यें धातुसाधित अथवा विधिविशेषण यानें अर्थद्योतनाचें कार्य होत असल्यास क्रियापदही नसे. पुढें करौनि, म्हणौनि वगैरे कठीण रूपें आणि उकार वगैरे गोष्टी लांब गद्यरचनेस अडचणीच्या वाटूं लागून कमी झाल्या, परंतु पूर्ण क्रियापदाविरहित लहान वाक्यांची तऱ्हा बरेच दिवस चालू होती. बाळाजी बाजीराव पेशवा प्रथमच उत्तर हिंदुस्थानांत गेला, तेव्हांचें सन १७४२ सालांतलें तिकडील एकंदर स्थितीचें वर्णनपर असें एक पत्र छापलेलें आहे, त्यांत वाक्यांची स्थिती हीच आहे, पण क्रियापदें फार कमी आहेत. 'येत नाहींत', 'करीत नाहीं' यांबद्दल 'न येती', 'न करी' असें थोडक्यांत आहे. विषयजुळणी चांगली आहे; संस्कृत शब्द बरेच असून फारशी शब्द बहुतेक नाहींत; आणि लिहिणारानें आपलें अंतरंग वाचणाराच्या पुढें पूर्ण मांडिलें आहे.

जुन्या पत्रामध्यें भाषेची जुनी तऱ्हा शिवाजीच्या काळापर्यंत कायम आहे. एकनाथापासून शिवाजीपर्यंतच्या दीडशें वर्षांत पत्रव्यवहार वाढला. भाषा मराठीच पण तींत फारशी शब्द फार तथापि या वेळीं भाषेला वाक्यरचनेचें फारशी वळण पुष्कळसें लागलेलें दिसत नाहीं. फारशी शब्द मात्र फार आहेत. शहाजीच्या प्रसिद्ध पत्रात फारशी शब्द आणि मायने पुष्कळ आहेत, पण शुद्ध मराठी मजकूरही पुष्कळ आहे. या पत्रात भाषेचा जुनेपणा बराच दिसतो परंतु पुढें शिवाजीच्या कारकीर्दीतलीं कित्येक महत्वाचीं पत्रें प्रसिद्ध झालीं आहेत, त्यावरून भाषेमध्ये एकदम मोठाच फरक पडलेला दिसतो. फारशी शब्द कमी झाले अगदीं जरूर तेथें मात्र लोकव्यवहारात रुळलेले फारशी शब्द येतात. वाक्यें मोठालीं होऊन क्रियापदें येत गेलीं आहेत या लेखाच्या सनधानें एक गोष्ट लक्षात येते कीं, खासगी घरगुती आणि व्यक्तिमात्राचीं पत्रें यात उद्गार वगैरे जुने प्रकार जास्त आणि फारशी शब्द अगदीं कमी, वाक्यें तोकडीं. पण राजकीय उलाढालींचीं दरबारी पत्र यात फारशी शब्द जास्त येतात, भाषेचा जुनेपणा कमी दिसतो आणि वाक्येंही लांब असतात. शाहूच्या कारकीर्दीच्या अखेरचीं ब्रह्मेंद्रस्वामींचीं पत्रें हीं त्या वेळच्या मराठी भाषेचा उत्तम नमुना आहे. स्वामींचीं पत्रें लांबट असूनहा वाक्यें लहान असतात. त्यात एकाददुसरें राजकारण उत्तम वर्णिलेलें असतें ब्रह्मेंद्रस्वामी स्वता कोणत्याही योग्यतेच पुरुष असो, परंतु या पत्रामध्यें ठिकठिकाणीं सावधगिरीच्या सूचना, मान-नाचीपणा, उर्मटपणा, बेपर्वाई, बेमुर्वतपणा, धिटाई, शिव्या, वशीकरण, निषेध, धमकावणी, मनोधारण वगैरे मुत्सद्दीपणाच्या युक्त्या चागल्या ल्हविलेल्या असून त्याना त्या वेळची मराठी भाषा पूर्णपणें पुरी पडली आहे. या वेळचें दाभाड्याच्या लढाईचें वर्णन, सातारकर आणि कोल्हापूरकर याच्या भेटीची हकीगत, वसई घेतल्याची हकीगत, वगैरे लेख हेही तत्कालीन भाषेची शैली दर्शवितात. या लेखावरून त्या वेळीं फारशी शब्द आणि भाषेचा जुनेपणा ह्या गोष्टी अगदीं जाऊन, अर्वाचीन मराठीचा पाया पडला असें ठरविण्यास चिंता नाहीं. मात्र लक्षात ठेविलें पाहिजे कीं, पत्रें व लेख याच्या नकला होत गेल्या-

मुळें त्यांतील भाषा मागाहून नवी बनविल्याची शंका येण्यास जागा असते. तथापि पत्राच्या नकला पुष्कळशा होण्याचा संभव नसल्यामुळें तीं फार बिघडलेलीं असतात असें मानण्याचें कारण नाहीं. यानंतरचा विशेष महत्वाचा पत्रव्यवहार कायगांवकर दीक्षित यांचा होय. दीक्षित हे निजामाच्या राज्यांत राहात असून त्यांचा महत्वाच्या राजकारणाचा पत्रव्यवहार पेशव्यांची मुख्य मंडळी आणि नागपूरकर भोसले यांबरोबर झालेला आहे. ह्या पत्रव्यवहाराची भाषा शुद्ध, निर्मळ मराठी, साधी आणि मार्मिक अशी आहे. नानासाहेब पेशव्याच्या कारकीर्दींतला राजकारणी पत्रव्यवहार पुष्कळ आहे. या कारकीर्दींत मराठी भाषेचें स्वरूप ठाम बनलें, आणि पुढें नानाफडणवीस, महादजी शिंदे आणि पटवर्धन सरदार मंडळी यांच्या लेखांनीं सवाईमाधवरावाच्या कारकीर्दींच्या अखेरीपर्यंत भाषेची पूर्ण घटना बनून तिचें चांगलेंच संवर्धन झालें.

बखरी लिहिण्याचा आरंभ राजारामाच्या वेळीं झालेला दिसतो. शिवाजीच्या पांच बखरी प्रसिद्ध आहेत. त्यांतली सभासदकृत बखर ही तत्कालीन भाषेमध्यें आहे. चिटणीसांचें सप्त प्रकरणात्मक चरित्र आणि शिवाजीच्या दुसऱ्या बखरी त्यांतल्या विषयांच्या संबंधानें चांगल्या आहेत, पण भाषा बदललेली आहे असें दिसून येतें. शाहूच्या कारकीर्दीच्या अखेरीपर्यंत कित्येक बखरी लिहिलेल्या आहेत. पानपतच्या लढाईच्या भाऊसाहेबांची आणि गोपिकाबाईची अशा दोन बखरी प्रसिद्ध आहेत. भाऊसाहेबांची बखर फार मोठी व दुसरी लहान आहे. या दोन्ही अगदीं तत्कालीन असून भाषा जोरदार, ऐतिहासिक ग्रंथाला

गोष्टींचीं किरकोळ टिपणें अनेक आहेत. बखरी वगैरे लेख हे भाषेच्या संबंधानें पत्रापेक्षा जास्त आस्थापूर्वक लिहिलेले दिसतात, परंतु त्यांत अतिशयोक्ती आणि जबाबदारी न ओळखतां लिहिलेला मजकूर पुष्कळ असतो. पत्रें भाषेच्या दृष्टीनें चांगलीं नसतात, पण तीं जास्त खरेपणानें आणि अधिक जबाबदारीनें लिहिलेलीं असतात. उदेगिरीच्या लढाईनंतर नानासाहेब पेशवे, सदाशिवरावभाऊ आणि दुसरे कित्येक मुत्सद्दी यांचीं सर्व हिंदुस्थान एकवटण्याच्या प्रयत्नाचीं राजकीय पत्रें, गोविंद पंत बुंदेल्याचा आणि भाऊचा पत्रव्यवहार, दिल्लीचे हिंगणे यांचीं पत्रें, नानाफडणवीस आणि महादजी शिंदे यांच्या पत्रव्यवहारांतील कित्येक पत्रें, अहिल्याबाई होळकरणीचीं आणि रघुनाथरावाचीं पत्रें, पटवर्धन मंडळीच्या ठिकठिकाणच्या कारकुनांचा पत्रव्यवहार आणि दुसऱ्या बाजीरावाच्या स्थापनेच्या वेळचीं निरनिराळ्या मुत्सद्यांच्या उद्योगाच्या वर्णनाचीं पत्रें, यावरून मराठी भाषा या पन्नास वर्षांत योग्यतेनें कशी वाढत गेली हें उत्तम रीतीनें दिसून येईल. हा पत्रव्यवहार इतिहास संग्रह, खरे यांचा संग्रह आणि राजवाडे यांचीं खंडें यांत छापला आहे. दुसऱ्या बाजीरावाच्या स्थापनेच्या वेळीं दौलतराव शिंद्यानें परशुराम भाऊस लिहिलेलें एक पत्र खरे यांच्या नवव्या खंडांत छापलें आहे. ह्या पत्रांतील राजकारस्थानाच्या संबंधाचा मजकूर आणि पूर्ण मुत्सद्देगिरीची भाषा यासंबंधानें तें पत्र पाश्चात्य देशांतील कोणत्याही तशा प्रकारच्या पत्राची बरोबरी करील. नानाफडनवीस यांनीं एक लहानसें आत्मचरित्र लिहिलें आहे तें, आणि त्यांनीं सवाईमाधवरावाच्या लग्नाच्या वेळीं व्यवस्था कशी ठेवावी या विषयींची लिहिलेली याद, हे लेख मोठे मासलेवाईक आहेत.

या काळामध्यें उत्तम लेखक अमुक झाले असा नामनिर्देश करणें शक्य नाहीं. कारण त्या वेळीं ग्रंथ आणि ग्रंथकार अशा प्रकारची थोरवी कोणी मानीत नसे. शिवाजीच्या वेळीं चिटणीस हे चांगले लेखनकर्ते होते. संभाजीच्या स्वतःच्या नांवचीं बरींच पत्रें उपलब्ध आहेत. शाहू हा मोठा कारस्थानी आणि जाग्यावर बसून उलाढाली करणारा होता. त्याचा प्रधानमंडळी आणि सरदार यांच्यावर मोठा

मुळें त्यांतील भाषा मागाहून नवी बनविल्याची शंका येण्यास जागा असते. तथापि पत्राच्या नकला पुष्कळशा होण्याचा संभव नसल्यामुळें तीं फार बिघडलेलीं असतात असें मानण्याचें कारण नाहीं. यानंतरचा विशेष महत्त्वाचा पत्रव्यवहार कायगांवकर दीक्षित यांचा होय. दीक्षित हे निजामाच्या राज्यांत राहात असून त्यांचा महत्त्वाच्या राजकारणाचा पत्रव्यवहार पेशव्यांची मुख्य मंडळी आणि नागपूरकर भोसले यांबरोबर झालेला आहे. ह्या पत्रव्यवहाराची भाषा शुद्ध, निर्मळ मराठी, साधी आणि मार्मिक अशी आहे. नानासाहेब पेशव्याच्या कारकीर्दीतला राजकारणी पत्रव्यवहार पुष्कळ आहे. या कारकीर्दीत मराठी भाषेचें स्वरूप ठाम बनलें, आणि पुढें नानाफडणवीस, महादजी शिंदे आणि पटवर्धन सरदार मंडळी यांच्या लेखांनीं सवाईमाधवरावाच्या कारकीर्दीच्या अखेरीपर्यंत भाषेची पूर्ण घटना बनून तिचें चांगलेंच संवर्धन झालें.

बखरी लिहिण्याचा आरंभ राजारामाच्या वेळीं झालेला दिसतो. शिवाजीच्या पांच बखरी प्रसिद्ध आहेत. त्यांतली सभासदकृत बखर ही तत्कालीन भाषेमध्यें आहे. चिटणीसांचें सप्त प्रकरणात्मक चरित्र आणि शिवाजीच्या दुसऱ्या बखरी त्यांतल्या विषयांच्या संबंधानें चांगल्या आहेत, पण भाषा बदललेली आहे असें दिसून येतें. शाहूच्या कारकीर्दीच्या अखेरीपर्यंत कित्येक बखरी लिहिलेल्या आहेत. पानपतच्या लढाईच्या भाऊसाहेबांची आणि गोपिकाबाईची अशा दोन बखरी प्रसिद्ध आहेत. भाऊसाहेबांची बखर फार मोठी व दुसरी लहान आहे. या दोन्ही अगदीं तत्कालीन असून भाषा जोरदार, ऐतिहासिक ग्रंथाला शोभेल अशी आहे. भाऊसाहेबांच्या बखरीची हकीगत सांगण्याची शैली अतिशयोक्तीची आहे. ही बखर एकाद्या ग्रंथासारखी अगदीं व्यवस्थीत अशी लिहिलेली आहे. लहान बखरींत सरदारांच्या वगैरे नांवनिशा फार आहेत. कदाचित् त्या खऱ्याही नसतील. यांशिवाय भोसले, होळकर, गायकवाड, दाभाडे, विंचूरकर, परभू घराणीं, यांच्या वंशांच्या बखरी, हकीगती, कैफीयती वगैरे अनेक ऐतिहासिक प्रकरणें प्रसिद्ध झालीं आहेत. पेशवाईनंतर लिहिलेली सोहनीकृत पेशव्यांची बखर सर्वांत उत्तम आहे. या बखरींशिवाय बारीकसारीक हकीगती आणि महत्त्वाच्या

गोष्टींचीं किरकोळ टिपणें अनेक आहेत. बखरी वगैरे लेख हे भाषेच्या संबंधानें पत्रापेक्षा जास्त आस्थापूर्वक लिहिलेले दिसतात, परंतु त्यांत अतिशयोक्ती आणि जबाबदारी न ओळखतां लिहिलेला मजकूर पुष्कळ असतो. पत्रें भाषेच्या दृष्टीनें चांगलीं नसतात; पण तीं जास्त खरेपणानें आणि अधिक जबाबदारीनें लिहिलेलीं असतात. उदेगिरीच्या लढाई-नंतर नानासाहेब पेशवे, सदाशिवरावभाऊ आणि दुसरे कित्येक मुत्सद्दी यांचीं सर्व हिंदुस्थान एकवटण्याच्या प्रयत्नाचीं राजकीय पत्रें, गोविंद-पंत बुंदेल्याचा आणि भाऊचा पत्रव्यवहार, दिल्लीचे हिंगणे यांचीं पत्रें, नानाफडणवीस आणि महादजी शिंदे यांच्या पत्रव्यवहारांतील कित्येक पत्रें, अहिल्याबाई होळकरणीचीं आणि रघुनाथरावाचीं पत्रें, पटवर्धन-मंडळीच्या ठिकठिकाणच्या कारकुनांचा पत्रव्यवहार आणि दुसऱ्या बाजीरावाच्या स्थापनेच्या वेळचीं निरनिराळ्या मुत्सद्यांच्या उद्योगाच्या वर्णनाचीं पत्रें, यावरून मराठी भाषा या पन्नास वर्षांत योग्यतेनें कशी वाढत गेली हें उत्तम रीतीनें दिसून येईल. हा पत्रव्यवहार इतिहास-संग्रह, खरे यांचा संग्रह आणि राजवाडे यांचीं खंडें यांत छापला आहे. दुसऱ्या बाजीरावाच्या स्थापनेच्या वेळीं दौलतराव शिंद्यानें परशुराम-भाऊस लिहिलेलें एक पत्र खरे यांच्या नवव्या खंडांत छापलें आहे. ह्या पत्रांतील राजकारस्थानाच्या संबंधाचा मजकूर आणि पूर्ण मुत्सद्दे-गिरीची भाषा यासंबंधानें तें पत्र पाश्चात्य देशांतील कोणत्याही तशा प्रकारच्या पत्राची बरोबरी करील. नानाफडनवीस यांनीं एक लहानसें आत्मचरित्र लिहिलें आहे तें, आणि त्यांनीं सवाईमाधवरावाच्या लग्नाच्या वेळीं व्यवस्था कशी ठेवावी या विषयींची लिहिलेली याद, हे लेख मोठे मासलेवाईक आहेत.

या काळामध्यें उत्तम लेखक अमुक झाले असा नामनिर्देश करणें शक्य नाहीं. कारण त्या वेळीं ग्रंथ आणि ग्रंथकार अशा प्रकारची थोरवी कोणी मानीत नसे. शिवाजीच्या वेळीं चिटणीस हे चांगले लेखनकर्ते होते. संभाजीच्या स्वतःच्या नावचीं बरींच पत्रें उपलब्ध आहेत. शाहू हा मोठा कारस्थानी आणि जाग्यावर बसून उलाढाली करणारा होता. त्याचा प्रधानमंडळी आणि सरदार यांच्यावर मोठा

दाब असे. हें त्यानें आपलें वजन पत्रांनीं राखलें होतें. त्यानें आपल्या तोंडानें मजकूर सांगून लिहविलेलीं अनेक वजनदार आज्ञापत्रें उपलब्ध आहेत. बाळाजी, सदाशिवराव आणि रघुनाथराव हे सर्व चांगले पत्रें लिहिणारे होते. येथें हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, मोठाले मुत्सद्दी व सरदार स्वदस्तें पत्रें लिहीत नसत. तर तोंडानें वाका सांगून कारकुनांकडून पत्रें लिहवीत. असे हुषार आणि राजकारस्थानें चांगलीं जाणणारे कारकून त्या काळांत पुष्कळ होऊन गेले आहेत. ह्या कारकुनीचा धंदा त्या वेळीं मोठा महत्त्वाचा गणला होता. बाळाजीपासून पुढें पेशवाईअखेरपर्यंत मराठ्यांच्या स्वाऱ्या आणि धामधुमी दरवर्षास पुष्कळ चालू असत आणि त्यांकडे अनेक सरदार गुंतलेले असत. त्या सर्वांचे नानाप्रकारचे लेख बाहेर पडत आहेत. आजपर्यंत असले लेख पुष्कळच प्रसिद्ध झाले आहेत आणि राजवाडे, खरे, पारसनीस इत्यादि उद्योगी गृहस्थांच्या आणि इतिहास संशोधक मण्डळाच्या प्रयत्नांनीं उघडकीस येत आहेत. धावडशीकर स्वामींच्या आणि कायगांवकर दीक्षित यांच्या पत्रांचा उल्लेख मागें आलाच आहे. दिल्ली येथें असणारे पेशव्यांचे वकील हिंगणे याचा पत्रव्यवहार चांगला आहे. नाना आणि महादजी शिंदे यांचा सुमारें दहा वर्षांचा पत्रव्यवहार राजकारस्थानांप्रमाणें भाषेच्यासंबंधानेंही अत्यंत महत्त्वाचा असा आहे. तसाच प्रकारचा अहिल्याबाई होळकरीण आणि पुर्णेदरबार यांमधील पत्रव्यवहार आहे. या संबंधाचें भाषेच्या संबंधाचें महत्त्व मुख्यतः कारकुनांकडे जरी असलें, तरी त्यांतील मुत्सद्देगिरीच्या खोंचाखोंचा आणि डावपेंच यांचें महत्त्व बाळाजी, सदाशीवराव, रघुनाथराव, नाना, महादजी, वगैरे खाशा मंडळीसच दिलें पाहिजे. पटवर्धन सरदार हे सर्वच स्वतां कारकून असून त्यांचे कारकूनही हुषार असत. पटवर्धनांच्या कारकुनीचा व्याप सर्व मराठी राज्यामध्यें असून त्यांच्या ठिकठिकाणच्या पत्रांच्या जुळणीनें थोरल्या माधवरावांच्या कारकीर्दीच्या आरंभापासून पेशवाईच्या अखेरपर्यंत अगदीं संगतवार इतिहास जुळला आहे. या गोष्टीचें सर्व श्रेय खरे यांस आहे.

या वेळीं पुष्कळ स्त्री लेखकही झाले आहेत. राजारामाची स्त्री ताराबाई व शाहूच्या राण्या या पत्रानीं कारस्थानें चालवीत. पेशव्याच्या कुळातल्या राधाबाई, गोपिकाबाई आणि आनदीबाई याचा पत्रव्यवहार आहे मात्र 'ध'चा 'मा' केलेलें प्रख्यात पत्र निवळ काल्पनिक असावें असें वाटतें. राघोबा इग्रजाकडे गेला, त्या वेळीं आनदीबाईनें कार मान्यास लिहिलेलीं सावधगिरीच्या सूचनेचीं पत्रें, भाषा आणि राज कारस्थान यासबधानें मासलेवाईक आहेत शिंद्याच्या बाया शेवटपर्यंत राजकारस्थानात पडलेल्या असून त्याचा पत्रव्यवहार प्रसिद्ध आहे कोंकणा तील आग्रे घराण्याच्या स्त्रियाचा पत्रव्यवहार पुष्कळ आहे. अहिल्याबाईचा पुणेंदरबाराबरोबरील पत्रव्यहार खोंचदार आणि मुत्सद्देगिरीचा आहे. पटवर्धनाच्या आणि इतर सरदाराच्या स्त्रियाचाही पत्रव्यवहार सापडतो. गोपाळराव पटवर्धन याची पत्नी मोठ्या जमावासह काशीयात्रेस गेली होती. तिने लिहिविलेली प्रवासाची हकीगत त्या वेळच्या मराठी भाषेचा चागल्या प्रकारचा मासला आहे. नारायणरावाच्या मृत्यूनतर पुण्यात चाललेलें बारभाईचें कारस्थान ज्यात आहे, असे त्रिंबकराव पेठे याच्या पत्नीनें आपल्या आईस लिहिलेलें पत्र नमुनेदार आहे या स्त्रियाच्या लेखा वरून असें दिसून येतें कीं, त्या काळीं स्त्रिया अज्ञानात असत, ही समजूत खरी नाहीं या वेळीं ज्या गोष्टी विद्या म्हणून मानल्या होत्या, त्यामध्यें तत्कालीन स्त्रिया आपल्या घराण्यातील पुरुषाप्रमाणेंच सुशिक्षित असत आणि त्याचें त्या वेळच्या घडामोडींत अग असे. मात्र हें स्त्री शिक्षण घराण्याच्या राजकीय नावलौकिकाप्रमाणें असे.

या पत्रव्यवहारानें आणि इतर प्रकारच्या लेखानीं मराठी भाषेच्या घटनेस, वाढीस आणि सुसवर्धनास मोठें साह्य झालें. नाना फडणवीस याची सत्ता कायम झाल्यानतर मराठी मुलखात वीस वर्षें फार चागली स्वस्थता होती आणि लोकस्थितीही उत्तम होती. अनेक मुत्सद्दी आणि सरदार व इतर दरबारी लोक याचीं घराणीं चागल्या स्थितींत होतीं. त्याच्या पदरीं कारकून, शास्त्री, पडित, भिक्षुक, वगैरे दुपार आश्रित मडळी असत. सर्वांच्या राजकीय आणि सामाजीक उलाढाली चालत आणि पत्रव्यवहार होता. याच वेळीं मोरोपत

रामजोशी, अमृतराय वगैरे चांगले कवी झाले. पोवाडे व लावण्या रचणारे शाईर आणि हरदास-पुराणीकही पुष्कळ झाले. त्यांना आश्रय होता. भाषा वाढावयास राजकीय आणि सामाजीक सुस्थिती पाहिजे, ती या वेळीं होती. यामुळें केवळ एकांगी कां होईना, पण भाषेचें संवर्धन झालें. या वेळीं भाषा प्रौढ दशेस पोंचली. खुबीदार, विनोदप्रचुर, डौलदार, अलंकारिक अशीं संभाषणें आणि पुराण व कीर्तन यांचे द्वारें व्याख्यानें होत. निरनिराळ्या राजकारणी लेखकांचे राजकारणें आणि मतलब साध्य करून घेण्याचे प्रयत्न लेखनद्वारें चालत. यामुळें साधी भाषा सजविण्याचे प्रयत्न पत्रव्यवहारांतही चालत होते. अशा प्रकारें बहुधा दुसऱ्या बाजीरावाच्या कारकीर्दीच्या अखेरीपर्यंत भाषासंवर्धन चांगल्या प्रकारें चालू होतें. या वेळच्या आणि त्यानंतरच्या राजकीय आणि ऐतिहासिक गोष्टी आणि महदाख्यायिका यांचा संग्रह लोकहितवादीनें चार भागांत केला आहे, त्यावरून हें चांगलें लक्षांत येईल. पेशव्यांची बखर हा या काळाच्या अखेरचा ग्रंथ होय. अशा आणखीही कित्येक बखरी झाल्या. पुढें इंग्रजी झाल्यावर जुने मुत्सद्दी आणि सरदार, राजघराणीं इत्यादि खालावलीं आणि भाषेचा आश्रयही तुटला. तेव्हां छापखाने असते आणि वर्तमानपत्रें व मासिकपुस्तकें यांसारखीं साधनेंही असतीं, तर भाषेची सुस्थिती कायम राहिली असती. परंतु साधनांच्या अभावीं आणि वाङ्मयाची किंमत कोणास कळत नव्हती यामुळें, त्या वेळचें वाङ्मय खालावलेल्या वाड्यांतून कोनाकोपऱ्यांत जाऊन पडलें. त्याचा शोध अलीकडे पंचवीस तीस वर्षांत लागत चालला आहे. यानंतरची म्हणजे इंग्रजी राज्यसंस्थापनेनंतरची मराठी भाषा एकप्रकारें नवीनच उत्पन्न झाली, आणि तिचें संवर्धन निराळ्याच तऱ्हेनें होत चाललें. याचें विवरण पुढें येईल.

इंग्लंड देशांत आणि त्याचप्रमाणें युरोपांत मुद्रणकलेचें साधन प्राप्त होण्यापूर्वी तिकडल्या देशांच्या वाङ्मयाची बहुतेक अशीच स्थिती होती. विद्वत्तेच्या विषयांवर फारसे ग्रंथ नसत; कारण तसे विषयच फारसे नव्हते. धार्मिक विषयांवरही देशभाषांत ग्रंथ नसत. अशा प्रकारचे ग्रंथ आमच्या इकडे जसे संस्कृतांत, तसे तिकडे ल्याटीन भाषेंत असत.

राजकीय उलाढाली आणि कारस्थानें यांवर इंग्लंड देशांत आपल्या इकडील बखरी, कैफीयती, हकीगती यांप्रमाणे 'क्रानिकल्स' म्हणून ग्रंथ असत. ते कांहीं तत्कालीन उद्योगी लेखक आणि खिस्ती मठवासी लिहीत. हे लिहिणारे त्या वेळीं आमच्यापेक्षांही धर्मभोळे, मूढविश्वासी आणि श्रद्धान्ध असे होते. यामुळें त्यांच्या लेखांत अविश्वसनीय गोष्टी, अतिशयोक्ती वगैरे आमच्या बखरींतल्या पेक्षांही जास्त असत. शिवाय तिकडे धर्ममतांचे पक्ष आमच्या इकडल्यापेक्षां जास्त प्रबल होते. यामुळें पक्षाभिमानानें लिहिलेल्या हकीगती फार होत्या. अशा तत्कालीन लेखाच्या आधारानेंच पुढें इंग्लंडचा आणि इतर देशाचेही इतिहास लिहिले आहेत. त्याचे मूळचे आधार आमच्या इकडल्या रजपूत, मोंगल, मराठे, या लोकांच्या इतिहासांच्या आधारांपेक्षां जास्त योग्यतेचे नाहींत. पुढें तिकडे मुद्रणकलेचा प्रसार आणि ग्रीस वगैरे युरोपांतल्या प्राच्य देशांतील विद्यांचें पुनरुज्जीवन झाल्यानंतर सर्व मनू फिरला. इंग्रजी वाङ्मयाची वाढ आणि प्रसार या गोष्टी मुद्रणकला चांगली उपयोगांत आल्यानंतर आणि धर्मक्रान्ती झाल्यानंतर झालेल्या आहेत.

आमच्या देशांत विशेषतः बौद्धधर्माच्या स्थापनेपासून मुसलमानी सत्तेच्या आरंभापर्यंत अनेक राजकीय उलाढाली झाल्या आणि अनेक मोठालीं साम्राज्येंही स्थापित झालीं. यांतील कित्येक चांगल्या भरभराटीस आलीं होतीं. परंतु यासंबधानें ऐतिहासिक लेख अथवा साध्या हकीगतीदेखील कधीं लिहिल्या गेलेल्या दिसत नाहींत. थोडें-बहुत लिखाण असलें तर तें काव्यरूपानें अथवा पौराणिक रूपाचें असे. असें लिखाणही रजपूत लोकांत विशेषसें दिसून येतें; इतर लोकांत तें नाहींच म्हटलें तरी चालेल. मराठे लोकांच्या उदयाच्या आरंभापासून राजकीय पत्रव्यवहार, बखरी, कैफीयती, हकीगती आणि इतर लेख पुष्कळ उपलब्ध आहेत. आपले लोक आपला इतिहास लिहून ठेवण्यास मुसलमानांच्या अनुकरणानें शिकले. हा लेखग्रथित इतिहास उत्तम विश्वसनीय आहे असें नाहीं; परंतु त्यांतल्यांत बरा आहे. बखरी, हकीगती यांपेक्षां पत्रव्यवहार जास्त विश्वसनीय असतो, हें उघडच

रामजोशी, अमृतराय वगैरे चांगले कवी झाले. पोवाडे व लावण्या रचणारे शाईर आणि हरदास-पुराणीकही पुष्कळ झाले. त्यांना आश्रय होता. भाषा वाढावयास राजकीय आणि सामाजीक सुस्थिती पाहिजे, ती या वेळीं होती. यामुळें केवळ एकांगी कां होईना, पण भाषेचें संवर्धन झालें. या वेळीं भाषा प्रौढ दशेस पोंचली. खुबीदार, विनोद-प्रचुर, डौलदार, अलंकारिक अशीं संभाषणें आणि पुराण व कीर्तन यांचे द्वारें व्याख्यानें होत. निरनिराळ्या राजकारणी लेखकांचे राजकारणें आणि मतलब साध्य करून घेण्याचे प्रयत्न लेखनद्वारें चालत. यामुळें साधी भाषा सजविण्याचे प्रयत्न पत्रव्यवहारांतही चालत होते. अशा प्रकारें बहुधा दुसऱ्या बाजीरावाच्या कारकीर्दीच्या अखेरीपर्यंत भाषासंवर्धन चांगल्या प्रकारें चालू होतें. या वेळच्या आणि त्यानंतरच्या राजकीय आणि ऐतिहासिक गोष्टी आणि महदाख्यायिका यांचा संग्रह लोकहितवादीनें चार भागांत केला आहे, त्यावरून हें चांगलें लक्षांत येईल. पेशव्यांची बखर हा या काळाच्या अखेरचा ग्रंथ होय. अशा आणखीही कित्येक बखरी झाल्या. पुढें इंग्रजी झाल्यावर जुने मुत्सद्दी आणि सरदार, राजघराणीं इत्यादि खालावलीं आणि भाषेचा आश्रयही तुटला. तेव्हां छापखाने असते आणि वर्तमानपत्रें व मासिक-पुस्तकें यांसारखीं साधनेंही असतीं, तर भाषेची सुस्थिती कायम राहिली असती. परंतु साधनाच्या अभावीं आणि वाङ्मयाची किंमत कोणास कळत नव्हती यामुळें, त्या वेळचें वाङ्मय खालावलेल्या वाड्यांतून कोनाकोपऱ्यांत जाऊन पडलें. त्याचा शोध अलीकडे पंचवीस तीस वर्षांत लागत चालला आहे. यानंतरची म्हणजे इंग्रजी राज्यसंस्थापने-नंतरची मराठी भाषा एकप्रकारें नवीनच उत्पन्न झाली, आणि तिचें संवर्धन निराळ्याच तऱ्हेनें होत चाललें. याचें विवरण पुढें येईल.

इंग्लंड देशांत आणि त्याचप्रमाणें युरोपांत मुद्रणकलेचें साधन प्राप्त होण्यापूर्वी तिकडल्या देशांच्या वाङ्मयाची बहुतेक अशीच स्थिती होती. *विद्वत्तेच्या विषयांवर फारसे ग्रंथ नसत; कारण तसे विषयच फारसे* नव्हते. धार्मिक विषयांवरही देशभाषांत ग्रंथ नसत. अशा प्रकारचे ग्रंथ आमच्या इकडे जसे संस्कृतांत, तसे तिकडे ल्याटीन भाषेंत असत.

राजकीय उलाढाली आणि कारस्थानें यावर इग्लड देशात आपल्या इकडील बखरी, कैफीयती, हकीगती याप्रमाणे 'क्रॉनिकल्स' म्हणून ग्रंथ असत. ते काहीं तत्कालीन उद्योगी लेखक आणि खिस्ती मठवासी लिहीत. हे लिहिणारे त्या वेळीं आमच्यापेक्षाही धर्मभोळे, मूढविश्वासी आणि श्रद्धान्ध असे होते. यामुळें त्यांच्या लेखात अविश्वसनीय गोष्टी, अतिशयोक्ती वगैरे आमच्या बखरींतल्या पेक्षाही जास्त असत शिवाय तिकडे धर्ममताचे पक्ष आमच्या इकडल्यापेक्षा जास्त प्रबल होते या मुळें पक्षाभिमानानें लिहिलेल्या हकीगती फार होत्या. अशा तत्कालीन लेखाच्या आधारानेंच पुढें इग्लडचा आणि इतर देशाचेही इतिहास लिहिले आहेत त्याचे मूळचे आधार आमच्या इकडल्या रजपूत, मोंगल, मराठे, या लोकाच्या इतिहासाच्या आधारापेक्षा जास्त योग्यतेचे नाहींत पुढें तिकडे मुद्रणकलेचा प्रसार आणि ग्रीस वगैरे युरोपातल्या प्राच्य देशातील विद्याचें पुनरुज्जीवन झाल्यानतर सर्व मनू फिरला इग्रजी वाङ्मयाची वाढ आणि प्रसार या गोष्टी मुद्रणकला चागली उपयोगात आल्यानतर आणि धर्मक्रान्ती झाल्यानतर झालेल्या आहेत.

आमच्या देशात विशेषत बौद्धधर्माच्या स्थापनेपासून मुसलमानी सत्तेच्या आरभापर्यंत अनेक राजकीय उलाढाली झाल्या आणि अनेक मोठाली साम्राज्यही स्थापित झालीं यातील कित्येक चागल्या भर भराटीस आलीं होतीं. परतु यासबधानें ऐतिहासिक लेख अथवा साध्या हकीगतीदेखील कधीं लिहिल्या गेलेल्या दिसत नाहींत. थोडें बहुत लिखाण असलें तर तें काव्यरूपाचें अथवा पौराणिक रूपाचें असे. असें लिखाणही रजपूत लोकात विशेषसें दिसून येतें, इतर लोकात तें नाहींच म्हटलें तरी चालेल. मराठे लोकाच्या उदयाच्या आरभापासून राजकीय पत्रव्यवहार, बखरी, कैफीयती, हकीगती आणि इतर लेख पुष्कळ उपलब्ध आहेत आमचे लोक आपला इतिहास लिहून ठेवण्यास मुसलमानाच्या अनुकरणानें शिकले. हा लेखग्रथित इतिहास उत्तम विश्वसनीय आहे असे नाहीं, परतु त्यातल्यात्यात बरा आहे. बखरी, हकीगती यापेक्षा पत्रव्यवहार जास्त विश्वसनीय असतो, हें उघडच

आहे. या सर्व साधनांचा कामापुरता पूर्ण शोध होऊन संगती लागल्या-वर मराठी राज्याचा चांगला इतिहास लिहितां येईल.

या सर्व जुन्या मराठी वाङ्मयाचें परिश्रमानें आलोडन करून निवडक उताऱ्यांचा कालानुरूप आणि निरनिराळ्या राजकारणां आणि उलाढालींना अनुलक्षून संग्रह केला असतां, तो शाळांतून कालेजांमधून वाचावयास नेमितां येऊन भाषेच्या अभ्यासास मो साह्य होईल.

---

## २–अर्वाचीन गद्य

मागील विवरणावरून दिसून येतें कीं, इंग्रजी राज्यसंस्थापनेच्या आरंभीं मराठी भाषेला एका राष्ट्राची भाषा असें व्यवस्थीत स्वरूप आलें होतें. ह्या वेळीं नानाविषयांवर जरी गद्य नव्हतें, तरी राजकीयें उलाढालींचें जें गद्य होतें, त्याची भाषा साधी परंतु मार्मिक, जोरदार, आणि त्या काळच्या लोकांचे भाव सहज व्यक्त करील अशी बनलेली होती. तिला ज्ञानदेव-एकनाथापासून मोरोपंतापर्यंत कवींचें चांगलें साह्य झालें होतें. अशी मराठी भाषा तशीच पुढें वाढत चालली. तिच्या वाढीला पुण्यांतील चांगल्या लेखकांचें साह्य मिळालें. मुंबईमध्यें भाषेच्या नवीनप्रकारच्या रचनेस आरंभ झाला.

इंग्रजी राज्य झाल्यावर सरकारानें लगेच सार्वजनिक लोकशिक्षणाला मुंबई आणि पुणें येथें आरंभ केला. मुंबईंत विचारातें उद्भूत होऊन शालोपयोगी कांहीं पुस्तकें तयार झालीं. बाळमित्र, वाचनपाठमाला, लिपिधारा, बोधवचन, शब्दवाचन, पंचोपाख्यान, विदुरनीति, सिंहासनबत्तिशी, हे प्रथमारंभींचे मराठी ग्रंथ होत. कांहीं शास्त्रीय विषय आणि इतिहास यांवरही लहान पुस्तकें झालीं. सदाशिव काशिनाथ छत्रे, हरी केशवजी, बाळशास्त्री जांभेकर, कृष्णशास्त्री, गोविंद नारायण माडगांवकर, दादोबा पांडुरंग, हे त्या वेळचे ग्रंथकार होत. यांनीं अनेक लहान लहान पुस्तकें लिहिलीं. गोविंद नारायण यांचीं एकट्यांचींच पंचविशांहून अधिक पुस्तकें असतील. मुंबईची

मराठी भाषा अगदीं साधी, सोपी, वाक्यें लहान लहान अशी आणि बोलण्याच्या आणि साध्या इंग्रजी भाषेच्या धोरणावर होती. तीमध्यें संस्कृत शब्द फार नसून अगदीं साधारणप्रतीच्या लोकांच्या उपयोगातले शब्द असत. मुंबईच्या भाषापद्धतीची पुढें वाढ होत गेली, आणि मुंबई आणि पुणें यामधील दळणवळण पुष्कळ वाढल्यावर आणि वर्तमानपत्रें सुरू झाल्यानंतर मुंबईच्या साध्या भाषेवर जरी पुण्याच्या भाषेचा पगडा पडला, तरी तिचें बालबोध, अकृत्रीम स्वरूप पुढें बरेच वर्षे कायम होतें. विनायक कोंडदेव ओक हे मुंबईच्या भाषेच्या वळणाचे प्रख्यात प्रवर्तक होत यांनीं या मुंबईच्या साध्या भाषेला मुख्यरथीत वळण लाविलें आणि स्वतंत्र, भाषांतररूप आणि इंग्रजी ग्रंथाच्या साह्यानें अनेक ग्रंथ आणि लेख लिहिले. त्याच्या इतके ग्रंथ व लेख मराठींत अद्यापि कोणीं लिहिले नाहींत 'बालबोध' हें त्यांचें मासिक पुस्तक प्रसिद्धच आहे. यांचें भाषावळण पुष्कळ दिवस लोकप्रिय होतें. परंतु पुढें मराठीचें वाङ्मय वाढलें, निबंधमाला, सुधारक, केसरी, इत्यादिकांनीं पुण्याचीं भाषा वळणें पुढें सरसावलीं, तेव्हां ओकांच्या भाषासरणीची लोकप्रियता कमी झाली. तरी त्यानीं आपली स्पृहा शेवटपर्यंत कायम राखिली होती. ही मुंबईची भाषासरणी पुण्यासही गेली, आणि पुण्याच्या भाषासरणीचा परिणाम मुंबईच्या भाषावळणावरही झाला

पुण्यास प्रथमत. संस्कृतशिक्षणक्रम सुरू झाला पुढें लौकरच त्याच्या जोडीला इंग्रजीही शिकवू लागले त्या वेळीं कित्येक बुद्धिमान विद्यार्थीमंडळींचें नवीन तऱ्हेचें ग्रंथकारमंडळ तयार झालें. कृष्णशास्त्री चिपळूणकर, परशुरामपंत गोडबोले, कृष्णशास्त्री राजवाडे हे त्यांपैकीं प्रमुख होत यांनीं भाषेचें एक नवीन वळण बनविलें. पेशवाईच्या अखेरची गद्यभाषा बरीच तयार होती, तिला संस्कृताची व पुढें इंग्रजी भाषापद्धतीची जोड मिळून आरंभींचें पुण्याचें वळण उत्पन्न झालें हें वळण उत्पन्न करण्यात मुख्य कृष्णशास्त्री चिपळूणकर होत. कारण स्वतंत्र असें गद्य यांचेंच पुष्कळ आहे या वळणामध्यें भाषेचा साधेपणा असून जरूर तेवढेच सोपे आणि प्रचारातील

संस्कृत शब्द असतात. वाक्याची मांडणी इंग्रजी भाषेच्या तऱ्हेवर परंतु संस्कृत वाक्यरचनेला फारशी न सोडतां असते. वाक्यें मुंबईच्या वळणांतल्या वाक्यांहून लांबट असतात; आणि शब्दवटिका पुण्याच्या ब्राह्मणवर्गाच्या उच्चभाषेतली असते. वरील तीन गृहस्थांनीं मुख्य मुख्य संस्कृत नाटकांचीं भाषांतरें करून मराठी भाषेंत नाटकें अगदीं नवीन उत्पन्न केलीं. या वेळापर्यंत नाटकें केवळ संस्कृतांतच होतीं. कृष्णशास्त्री चिपळूणकर यांचे 'अरबी भाषेंतील गोष्टी', 'रासेलस', 'साक्रेटीस याचें चरित्र', 'अनेकविद्यामूलतत्त्वसंग्रह' हे ग्रंथ आणि दुसरे अनेक निबंध व लेख हे या भाषासरणीचे उत्तम मासले होत. गोपाळराव देशमुख हे या वेळीं लोकहितवादी या नांवानें एक उत्तम ग्रंथकार होऊन गेले. त्यांनीं पुण्याच्या वळणाला मुंबईच्या साधेपणाचें साह्य घेऊन ज्याच्या योगानें जुन्या गोष्टींची निरर्थक आवड नष्ट होऊन नवीन लोकमत बनेल, अशा प्रकारचे निबंध पुष्कळ लिहिले आहेत. त्याचप्रमाणें त्यांनीं इतिहास, जुनी माहिती यांवर आणि दुसऱ्या अनेक उपयुक्त विषयांवर स्वतंत्र आणि भाषांतररूप ग्रंथ आणि लेख निर्मिले आहेत. यांची भाषासरणी सुगम, गंभीर, मन वळविणारी, मधून मधून विनोदपर अशी आहे. लोकहितवादी हे मराठीमध्यें ओक यांचे खालोखाल लेख लिहिणारे होऊन गेले. त्यांनीं जुन्या समजुतींना दोष दिलेला न आवडून त्यांच्यावर निबंधमालाकारांनीं आणि इतरांनीं कडक टीका करून लेख लिहिले आहेत. लोकहितवादींचें मराठी वाङ्मयघटनेस अगदीं आरंभीं फार मोठें आणि चांगल्या प्रकारचें साह्य झालें. तें त्यांच्या मूळच्या लेखांनीं आणि त्यांच्यावर लोकांनीं केलेल्या टीकांनींही झालें. लोकांची सामाजीक, धार्मीक आणि कौटुंबीक गृहस्थिती आणि समजुती, यांसंबंधानें टीकाविषयक लेख लोकहितवादी यांनींच प्रथम निर्भयपणें आणि निर्भीडपणें लिहिले. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं जरी लोकहितवादींच्या लेखांवर कडक टीका केली, तरी त्यांनीं लोकहितवादीच्या गुणवर्णनपर अखेरचा एक निबंध मुद्दाम लिहिला आहे.

सुमारें १८७५ पर्यंत मराठी भाषेला नवीन तऱ्हेचें वळण मिळत होतें. युनिव्हर्सिटीमध्येंही उच्च परीक्षापर्यंत मराठीचा अभ्यास चालत होता. व्याकरणविषयक चर्चा चालू होती. जुन्या कवींचे ग्रंथ प्रसिद्ध होत होते. स्वतंत्र, आणि इंग्रजी व संस्कृत यांतून भाषांतररूपानें नाटकें, प्रबंध, प्रवासवर्णनें, इत्यादि लिहिण्यांत येत होतीं. मुंबईस आणि पुण्यास कित्येक चांगलीं वर्तमानपत्रें आणि मासिकपुस्तकें भाषासंवर्धनाचें काम करीत होतीं. अशा वेळीं मराठी भाषाघटनेच्या संबंधाचें नवीनच परिवर्तन झालें. प्रख्यात मराठी ग्रंथकार कृष्णशास्त्री चिपळूणकर यांचे चिरंजीव विष्णु कृष्ण चिपळूणकर यांनीं निबंधमाला नावाचें मासिकपुस्तक, आणि पुढें ते आणि त्यांचे कित्येक मित्र यांनीं मिळून केसरी पत्र काढलें. या वेळेपर्यंत मराठीला इंग्रजी आणि संस्कृत भाषासरणीनें हळू हळू वळण लावण्याचा प्रयत्न चालू होता. त्याला यांनीं फार मोठा जोर आणिला. संस्कृत आणि इंग्रजी यांचें योग्य तेवढें साह्य घेऊन गंभीर, मनोहर, विनोदपर, कडक, टीकापर, डौलदार, पीळदार, लोंचदार आणि वाचकाचें मन आपल्या कडे वळवून घेईल अशा प्रकारची नवीन प्रकारची भाषासरणी विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं काढली. पाश्चात्य संस्कृती आपल्या संस्कृतीपेक्षा फार श्रेष्ठ आहे, आपल्या लोकांमध्यें वेडेवेडे अज्ञानाचे विचार फार आहेत, त्यामध्यें सुधारणा होऊन आपण पाश्चात्यांच्या संगतीनें आपली उन्नती करून घेतली पाहिजे, इत्यादि प्रकारचे विचार त्या वेळीं सुशिक्षितामध्यें चालू होते, तेच विष्णुशास्त्री यांच्या निबंधमालेंतील आणि केसरींतील लेखांत आहेत. परंतु ते मांडण्याची पद्धत मात्र निराळी आहे. शिवाय आपल्या खेरीज इतर सर्व लोक चुकत आहेत, आजपर्यंत आपल्यामध्यें पाश्चात्य पद्धतीनें झालेले नवीन विद्वान् मूर्ख, अशा प्रकारचा तरुण लोकांना साहजीक प्रिय होणारा ध्वनी यांच्या लेखांत असे, यामुळें त्यांचे लेख फार लोकप्रिय झाले, आणि अजूनही लोकप्रिय आहेत. परंतु यासंबंधानें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, यांचे लेख लोकप्रिय होण्यास चटकदार भाषासरणी हेंच प्रमुख कारण झालें आहे. यांनीं कांहीं नवीन विचार सांगितले असें नाहीं. त्यांच्या

वेळची सुशिक्षित मंडळी एकंदर जनतेस जें सांगत होती, तें चिपळूणकर सांगत होते; मात्र त्यांची तऱ्हा 'स्तुपातऋन्यायाची' होत लोकहितवादी आणि चिपळूणकर या दोघांच्या लेखांमधून उता घेऊन दोघांचेही सर्व प्रकारच्या सुधारणांच्या संबंधाचे विचार अगद एकसारखेच आहेत, असें ओक यांनीं 'महाराष्ट्र वाङ्मय' या पुस्तकां स्पष्टपणें दाखविलें आहे. विष्णुशास्त्री चिपळूणकर हे आपल्या लेखां *ठिकठिकाणीं मराठीवर इंग्रजीची छाया पडूं नये म्हणून बोध करितात* परंतु विष्णू कृष्ण चिपळूणकर यांच्या इतकें इंग्रजी भाषेचे अनुकरण त्यांच्यापूर्वी दुसऱ्या कोणींही केलें नाहीं, असें त्यांचे लेख वाचिले असतां तेव्हांच दिसून येईल. त्यांनीं डा॰ जानसन, लार्ड मेकाले आणि आडिसन यांचा कित्ता वळविण्याचा प्रयत्न केला आहे. जानसन याची आढ्यता आणि लार्ड मेकाले यांचा निंदखोरपणा व दुसऱ्याचा पाणउतारा करण्याची आवड, या गोष्टी त्यांना चांगल्य साधल्या आहेत. परंतु स्पेक्टेटर यांतील गंभीर विनोद त्यांना मुळींच न साधतां या गुणाच्या त्यांच्या अनुकरणास चटोरपणाचें स्वरूप आलें आहे. मेकालेच्या संबंधानें एका इंग्रजी ग्रंथकारानें असें लिहिलें आहे कीं, त्याच्या चांगल्या लेखांची लोकांना आठवण नसून कडक टीकेचे निंदापर लेख मात्र लोकांच्या वाचनांत आणि आवडींत जास्त आहेत. तोच प्रकार मराठींत विष्णुशास्त्री यांच्या लेखांच्या संबंधानेंही म्हणतां येईल; आणि याला दोहोंकडे चटकदार भाषासरणी हें एकच कारण आहे.

विष्णुशास्त्री यांनीं भाषेला नवीन वळण लाविलें, त्याचप्रमाणें पुढें त्यांच्या कालानंतर लौकरच आणखी एक नवें वळण उत्पन्न झालें. तें आगरकर यांचें वळण होय. विष्णुशास्त्री आणि कित्येक मंडळी यांनीं त्या वेळीं शिक्षण वगैरे लोकोपयोगी कामें सुरू केलीं. त्या मंडळीमधले आगरकर होते. विष्णुशास्त्र्यांच्या भाषासरणीचें पर्यवसान केसरीमध्यें झालें. आगरकर यांच्या लेखांचा आरंभ केसरींत झाला. या दोघांचे लोकशिक्षणाचे हेतू एकच, पण मार्ग निराळे असल्यामुळें दोघांच्या भाषासरणींत मोठा फरक झाला आहे. आगरकर यांची

भाषा प्रौढ, गभीर, जोरदार आणि संस्कृत आणि इंग्रजी यांच्या योग्य साह्यानें सजविलेली असते. परंतु त्यांचा विष्णुशास्त्री याप्रमाणें मोहक आणि चटकदार लिहून आणि अन्याविषयीं मत्सर उत्पन्न करून लोकांना आपल्या मताकडे वळविण्याचा, रूष्ट करण्याचा आणि उपहासानें व विनोदानें हास्यरस उत्पन्न करून कोणाचा पाणउतारा करण्याचा प्रयत्न नसे. आगरकर यांना जें काय वाटलें, तें त्यांनीं अंतःकरणापासून सरळपणें लोकांपुढें ठेवण्याचा आणि लोकांना काहीं वाटलें तरी त्यांचे दोष आणि चुका यांचें त्यांच्या दृष्टीसमोर आविष्करण निर्भीडपणानें करून त्यांना ताळ्यावर आणण्याचा प्रयत्न केला आहे. चिपळूणकर यांचे लेख वाचकानें प्रथमतः च वाचले, म्हणजे त्यांच्या मोहकपणामुळें त्यांत लिहिलेलें सर्व खरें आणि योग्य असें वाटून वाचक त्यांच्या बरोबर जाऊं लागतो. परंतु दुसऱ्यांदा, तिसऱ्यांदा वाचल्यावर त्यांतील मोहकपणा आणि शब्दावडंबर उघड होऊन त्यांच्या लेखामध्यें सुंदर भाषेपलीकडे काहीं नाहीं, वरतीं पुष्कळसा फेंस असून त्याच्या खालीं केवळ उथळ पाणी आहे, असें वाटूं लागतें. आगरकर यांचे अंतःकरणास खरा खरा पीळ पडून निघालेले विचार भ्रामक स्वाभिमानानें वाचकास प्रथमतः कडूसे भासले, तरी त्यांतील सत्य मनाला पटून ते निरंतर आवडते होतात. चिपळूणकर आणि आगरकर या दोघांच्याही भाषा सुंदर आहेत. पण आगरकरांच्या भाषेमध्यें साधें स्वाभावीक सौंदर्य असून, चिपळूणकर यांच्या भाषेंत नटवेपणाचें फसविणारें सौंदर्य आहे. दोघांच्याही भाषासरणींनें मराठीला नवीन प्रकारचें उत्तम वळण लागून, आपली भाषा तऱ्हेतऱ्हेच्या विषयांना पुरी पडण्याजोगी झाली आहे असा अनुभव आला, आणि दोघांचेंही अनुकरण सांप्रतचे लेखक करीत आहेत.

या वेळापर्यंत मराठी लिहिण्याच्या ज्या तऱ्हा किंवा वळणें उत्पन्न झालीं, त्यांचें विवरण करूं. प्रथमतः पेशवाई वळण. याचें स्वरूप मागें सांगण्यांत आलेंच आहे. यामध्यें भाषेची ठाकठिकी अथवा ज्याला आपण व्याकरणशुद्धता म्हणतों, तिकडे पूर्ण लक्ष नसे. आपले राजकीय धामधुमीचे आणि मुत्सद्देगिरीचे विचार चांगल्या प्रकारें प्रगट झाले

एकच होतें. त्यांच्या वेळची पोक्त व शिकलेली मंडळी पाश्चात्य संस्कृतीकडे झुकत आहे, तिला परतवून लोकांमध्यें देशाभिमान आणि [illegible] जागृत करावा हा या मंडळीचा मुख्य उद्देश. या धोरणावर आणि अर्थात् निबंधमालेच्या वळणावर प्रथमतः केसरींत लेख येत. परंतु पुढें मतभेद होऊन केसरी चालविणाऱ्यांत फुटाफूट झाली. यानंतर केसरी पत्र निबंधमालेचे वळण जसेंच्या तसेंच चालविणाऱ्यांच्या हातीं राहून आगरकर यांनीं सुधारक काढला. केसरीच्या भाषेचा मूळ पाया जरी निबंधमालेचा आहे, तरी त्यावर पुष्कळ सुधारणा होऊन आतां केसरीचें वळण नवीनच बनलें आहे. निबंधमालेंत अथवा कोणत्याही मासिकांतील लेख लौकिकांतील सामान्य विषयांवर असावयाचे. परंतु वर्तमानपत्रांतील लेख लोकांत प्रत्यक्ष चालू असलेल्या विषयांवर असावयाचे. यासंबधानें मराठी भाषेची एक विशेष पद्धत केसरीच्या भाषेंत परिणती पावली आहे.

याप्रमाणें मराठीमध्यें प्रथमतः मुख्य मुख्य वळणें उत्पन्न झालीं. नंतर अलीकडल्या तीसचाळीस वर्षांत त्या वळणांचीं स्वरूपें निरनिराळ्या विषयांवरील ग्रंथरचनेंत कशीं पालटत गेलीं आणि त्यांची सुधारणा कशी होत गेली, आणि ही सुधारणा करण्याचें काम मुख्यतः कोणीं कोणीं केलें, हें त्या त्या विषयांच्या ग्रंथरचनेसंबंधानें लिहितांना सांगण्यांत येईल.

वर्तमानपत्रें:—नवीन प्रकारच्या वाङ्मयाच्या प्रारंभाचा अगदीं पहिला मान वर्तमानपत्रांस आहे. प्रथमतः मुंबई येथें मराठी वर्तमानपत्रें सुरू झालीं आणि नंतर लौकरच पुणें येथें आणि इतरत्र त्यांचा प्रसार झाला. नानाविषयांवर लोकमत उत्पन्न करणें हें वर्तमानपत्रांचें कार्य. त्याचें साधन करितांना लोकांना आवडेल आणि प्रतिपादित विषय वाचकांच्या मनांत भिनेल अशी भाषेची योजना झाली पाहिजे. अशा प्रकारें वर्तमानपत्रांची भाषा लोकांच्या तोंडीं लागते. आजपर्यंत मराठी भाषेंत अनेक वर्तमानपत्रें उदयास आलीं आणि त्यांतील पुष्कळ लयास गेलीं. त्यांपैकीं ज्यांनीं भाषाघटनेचें

बरेच चांगलें कार्य केलें अशीं थोडींच आहेत. मृतपत्रांपैकीं मुंबईंत मित्रोदय, हिंदू रिफारमर, आणि नेटिव्ह ओपीनियन व पुण्यास लोककल्याणेच्छू, जगद्धितेच्छू, किरण, पुर्णवैभव, वृत्तप्रसारक, ज्ञानचक्षू, काळ, माला, हीं पत्रें होऊन गेलीं. रत्नागिरीस जगन्मित्र नावाचें पत्र निघत होतें. विद्यमान पत्रांपैकीं इंदुप्रकाश, सुबोधपत्रिका, ज्ञानप्रकाश, ज्ञानोदय, इत्यादि पत्रे आपलें कर्तव्य करीत आहेत. वर्तमानपत्र हें साप्ताहीक असता त्याच्या हातून भाषावर्धनास जसें साह्य होतें, तसें तें दैनिक झाल्यावर होत नाहीं. इंदुप्रकाश आणि ज्ञानप्रकाश हीं पत्रें दैनिक होण्यापूर्वी भाषासंवर्धनाचीं उत्तम साधनें होतीं. आता रोजच्यारोज जगातल्या बातम्या देण्यापलीकडे अथवा इंग्रजी पत्रांतील लेखांच्या आधारें मुख्य लेख खरडण्याबाहेर त्यांचें नावाजण्यासारखें भाषेचें कार्य चाललेलें नाहीं. मराठी पत्रांपैकीं केसरी आणि (जुना) सुधारक यांचा यासंबधानें अगदीं निराळा उल्लेख केला पाहिजे. त्यांच्या आपापल्या पक्षाभिमानाच्या निर्भीड, जोरदार आणि सुव्यवस्थीत मांडारचनेच्या योगानें निदान सुशिक्षीत जनतेच्या भाषेस चांगले वळण लागलें आहे. दोन्ही पत्रांची भाषासरणी विष्णुशास्त्री चिपळूणकर आणि त्यांचे सहकारीमंडळ यांच्यामध्यें मूळ उत्पन्न झाली. सुधारक पत्र अल्पायुषी झालें. त्यांची भाषासरणी आणि विषय प्रतिपादनाची पद्धत यांच्यासंबंधानें आगरकरांच्या भाषासरणीविषयीं मागें चर्चा झाली आहे, तेथें उल्लेख केलाच आहे. वाचक खूष होवोत, किंवा नाखूष होवोत, आपल्याला जें योग्य आणि बहुजनहितकारक वाटतें तें निभीडपणें लिहावयाचें, हा आगरकरांचा बाणा असे. सुधारणा केव्हाही अप्रिय असावयाचीच. परंतु आगरकरांच्या कळकळीच्या विचारामुळें 'सुधारक' लोकांना आवडत असे. आगरकरांच्या मागें सुधारक चालविणारे देवधर, पटवर्धन आणि जोशी यांनीं त्याच वळण पूर्णपणे कायम राखिलें होतें. केसरी इतके वर्षे आपलें कार्य करीत आहे. केसरांतील मतप्रतिपादन, वाचक ज्या पक्षाचा व समजुतीचा असेल त्याप्रमाणें त्याला प्रिय असेल वा नसेल. परंतु भाषासरणी, विषयप्रतिपादन, टापटीप आणि सुव्यवस्थीतपणा या गोष्टींत केसरी

हें मराठी भाषेचें एकच उत्तम पत्र आहे. निबंधमालेचें भाषावळण मागें वर्णिलें आहे, तेंच केसरीचें असून, लोकरंजन कसें होईल, लोकांना विवक्षित विषयाचें शिक्षण कसें द्यावें, त्यांचें एकाद्या गोष्टीकडे मन कसें वळवावें आणि पक्षाभिमानास पेटल्यावर प्रसंगीं सत्यासत्याचें धोरणही सोडून देऊन प्रतिपक्षाचा पाडाव करण्याचा प्रयत्न कसा करावा आणि वाचकांना आपल्या पक्षाकडे तात्पुरतें तरी कसें वळवून घ्यावें, या कामांत केसरीचें धोरण सर्वांना मान्य नसलें तरी मोठ्या कुशलतेचें आहे. तसेंच लोकांपुढे चालू विषय कोणते ठेविले पाहिजेत आणि त्यांची माहिती कशी करून दिली पाहिजे, यासंबंधानेंही केसरी नेहमीं दक्ष असतो. अर्थात् असें पत्र सर्व विचारांचे आणि सर्व पक्षांचे वाचक आस्थेनें आणि औत्सुक्यानें वाचतात, आणि त्यामुळें लोकांच्या बोलण्यावर व लेखनावर केसरीच्या भाषेचा योग्य परिणाम होतो.

मासिक पुस्तकें:—वर्तमानपत्रांनंतर मासिक पुस्तकें दृष्टीपुढें येतात. मासिकपुस्तकांचें भाषेच्या संबंधाचें कार्य थोडें निराळें असतें. वर्तमानपत्रें केवळ चालू विषयांवर चर्चा करून लोकमत बनविण्याचा प्रयत्न करितात. मासिकपुस्तकांतले लेख चालू विषयांच्या चर्चेमुळेंच प्रथमतः उत्पन्न होतात, परंतु त्या विषयांपैकीं ज्या विषयांना चिरकालिक किंवा बरेच दिवस टिकणारें महत्त्व असतें, असे विषय मासिकपुस्तकें घेतात आणि ते अधीक आस्थापूर्वक लिहिलेले असतात. यामुळें वाङ्मयामध्यें वर्तमानपत्रांपेक्षां मासिक पुस्तकांचें महत्त्व जास्त आहे. पाश्चात्य देशांत रिव्हू आणि त्रैमासिकें असा एक नियतकालिक पुस्तकांचा प्रकार असतो. त्यांमध्यें सर्व प्रकारच्या गहन विषयांवरही लेख येतात आणि चर्चा होते. ज्या विषयांवर पुढें मोठालीं पुस्तकें तयार व्हावयाचीं असतात, त्यांवरचे आद्यलेख प्रथमतः असल्या रिव्हूंमध्यें येतात आणि त्यांवर चर्चा होते. नवीन पुस्तकांवर अल्प किंवा विस्तृत टीका लिहिणें हेंही मासिकें आणि त्रैमासिकें यांचें कार्य गणलें आहे. कित्येक मासिकें केवळ विवक्षित विषय, विवक्षित पक्ष अथवा ठरीव कार्य यांनाच वाहिलेलीं असतात. आमच्याकडे

गेल्या पन्नास वर्षांत अनेक मासिकपुस्तकं उत्पन्न झालीं, कांहीं चालू आहेत आणि पुष्कळ लयास गेलीं. आजमितीस सुमार पन्नास मासिकपुस्तकं चालू असून त्यांच्याकडून भाषासंवर्धनाचं आणि घटनेचं बरेंच कार्य होत आहे.

या पुस्तकाच्या प्रस्तुत भागांत मराठी वाङ्मयाचें जें स्वरूपवर्णन केलें आहे, त्यांतील बरेंच वाङ्मय प्रथमतः मासिक पुस्तकांमध्यें आलें आहे. मराठींत निरनिराळ्या विषयांवर स्वतंत्र पुस्तकं प्रसिद्ध होणें अजून शक्य नाहीं, यामुळें बहुतेक सर्व भिन्नभिन्न विषयांवर मासिक पुस्तकांमध्यें निबंध येत असतात. स्वतंत्र ग्रंथरचनेच्या अभावीं ह्या वाङ्मयाच्या वाढीचें काम मासिकपुस्तकांच्या द्वारें चांगलें होत आहे. इंग्लंडांत रोजच्या आणि अल्पकालिक महत्वाच्या विषयांची चर्चा करून त्यावर लोकमत बनविण्याचें काम वर्तमानपत्रं करितात. विशेष गहन आणि जास्त काळ टिकणाऱ्या विषयांची चर्चा, चिकित्सा आणि टीका हीं कामं मासिकपुस्तकांच्या वांट्यास जातात. कोणत्याही नवीन विषयाच्या चर्चेला आरंभ इंग्रजींत प्रथमतः मासिक आणि त्रैमासिक पुस्तकांत होत असतो. अशा रीतीनें ऊहापोह होऊन मग स्वतंत्र पुस्तकें होतात. आमच्या इकडे साधारणतः अशीच स्थिति आहे असें म्हटलें तरी चालेल. परंतु आमच्या इकडे एकेकट्या विषयावर स्वतंत्र पुस्तकं होण्याची सोय कमी, यामुळें मासिकपुस्तकांचा उपयोग फार आहे, आणि त्यांना उत्तरोत्तर अधीक महत्व येण्याचा संभव आहे. आजपर्यंत मराठींत चांगलीं मासिकपुस्तकं अनेक होऊन गेलीं आहेत. आरंभींच मुंबईंत त्रैमासिक ज्ञानदर्शन आणि ज्ञानप्रसारक यामध्यें त्या वेळीं पाश्चात्य तऱ्हेनें शिकूं लागलेल्या कालजातील विद्यार्थ्यांचे चांगले लेख आलेले आहेत. मृत मासिकपुस्तकांमध्यें निबंधमाला ह्रं श्रेष्ठ होय. त्याचा उल्लेख अनेकवार आलेला आहेच. त्याच्या नमुन्यावर निबंधचंद्रिका थोडे दिवस चालून तिनें राजकीय आणि सामाजीक विषयांवर स्वतंत्र लेख लिहिण्याचा प्रघात प्रथमतःच चालू केला. ज्ञानसंग्रह नांवाचें पुस्तक वऱ्हाडामध्यें महाजनी वगैरे कांहीं विद्वान् मंडळीनें थोडे दिवस चांगलें चालविलें. मुंबईचें

दंभहारक हें निर्भीडपणें टीका करणारें पुस्तक थोडे दिवस चाललें. याची भाषाही उत्तम असे. ज्यांनीं मागें भाषासंवर्धनाचें पुष्कळ काम केलें, अशीं मासिक पुस्तकें केरळकोकीळ, सरस्वतीमंदीर, ग्रंथमाला, विश्ववृत्त, सुविचारसमागम, इत्यादि होत. त्यांत प्रसिद्ध झालेले कित्येक लेख वाङ्मयसंबंधानें निरंतर महत्त्वाचे गणले जातील. विविधज्ञानविस्तार हें पन्नास वर्षें अव्याहत चालू आहे. यानें बहुधा सर्व विषयांवर मराठीमध्यें चर्चा, चिकित्सा आणि टीका चालविली आहे; यांतले लेख भारदस्त आणि भाषा प्रौढ व व्यवस्थीत असते. यानें भाषासंवर्धनाचें काम चांगल्या प्रकारें चालविलें आहे. कित्येक मासिकपुस्तकें एकेक विषय घेऊन त्याचीच चर्चा करीत असतात. यांतलीं मुख्य काव्यरत्नावली, लोकशिक्षण, मराठी शिक्षक, भारतवर्ष व शेतकरी हीं होत. कांहीं पुस्तकें एकाद्या मोठ्या विषयावरचें वाङ्मय खंडशः प्रसिद्ध करीत असतात. यांचें मासिकपुस्तकें म्हणून महत्त्व नसून त्या त्या विषयाच्यासंबंधानें महत्त्व आहे. सांप्रत मनोरंजन, चित्रमयजगत्, नवयुग, उद्यान, हीं पुस्तकें बऱ्या प्रकारें चाललीं असून भाषाघटनेचें काम करीत आहेत. आमच्या मासिकपुस्तकांमध्यें प्रथमतः गोष्टी वगैरे मनोरंजक लेख लिहिण्याकडे भर होता. पण सध्या महत्वाच्या विचारणीय विषयांवर लिहिण्याची प्रवृत्ती वाढत आहे, आणि लोकस्थितीच्या प्रगतीबरोबर ही प्रवृत्तीही उत्तरोत्तर वृद्धिंगत होण्याची आशा दिसत आहे. पुण्याच्या चित्रशाळेनें चालविलेलें मासिकपुस्तक चित्रमयजगत् यानें मासिकपुस्तकांचें पूर्वापार ठरीव धोरण वरचेवर सोडून देऊन अनेक शास्त्रीय, औद्योगिक आणि कला-कौशल्यविषयक माहितीनें पूर्ण असे निबंध प्रसिद्ध करण्याचें काम चालविलें आहे. हें आमच्या मासिकपुस्तकाच्या उपयुक्ततेच्या संबंधानें पुढें पाऊल आहे. यांत प्रवास आणि स्थलवर्णनें यांवरही लेख असतात, आणि प्रसिद्ध पुरुषांचे मृत्युलेख सचित्र येत असतात. युद्ध सुरू झाल्यापासून या मासिकपुस्तकांत युद्धाची प्रत्येक महिन्याची हकीगत नियमितपणें येत असते. हिचे लेखक खाडीलकर हे आहेत, आणि ही हकीगत तिकडील वर्तमानपत्रें व पुस्तकें पाहून शोधपूर्वक

लिहिलेली असते, असें दिसून येते. मराठी भाषेत या घनघोर युद्धाचा हा स्वतंत्र इतिहासच तयार झाला आहे; आणि तो नकाशे व चित्रपट यासह स्वतंत्र पुस्तकरूपानें प्रसिद्ध झाल्यास मराठी भाषेंतला चांगलाच ग्रंथ होईल.

**मराठींतील ग्रंथसमूह आणि ग्रंथप्रसिद्धीकरणः**—अनेक प्रकारच्या अडचणी असताही आपल्या भाषेंत ग्रंथसमूह बराच झाला आहे आणि तो निरनिराळ्या विषयावरही आहे. त्यात विद्याविषयक ग्रंथ कमी आहेत, पण केवळ वाचनविषयक असे पुष्कळ आहेत. अगदीं अलीकडे आमच्या सुशिक्षितास स्वभाषेंत लिहावेसें वाटू लागलें आहे, आणि लोकांची वाचनाची अभिरुचीही वाढत आहे. वाचणारामध्यें स्त्रिया, मुलें आणि तरुण विद्यार्थीही आहेत असें दिसून येतें. केवळ मनोरंजनार्थ वाचणें, हे उत्तम प्रतीचें नव्हे. परंतु ती पुढील चांगल्या वाचनाची पायरी आहे, आणि तिच्यामुळें पुढील वाचनाची अभिरुची वाढत गेलीच पाहिजे. केवळ वाचनविषयक ग्रंथामध्यें बरेच क्षणिक महत्वाचे आणि कित्येक वाईटही असतात. पण उत्तरोत्तर चांगल्याची निवड होत जाईल.

मराठींत वाङ्मय फार थोडें आहे असें आपण नेहमीं म्हणतो. याचें कारण वाङ्मयाच्या प्रत्येक भागामध्यें सर्वमान्य, शास्त्रपूर्वक लिहिलेले स्वतंत्र ग्रंथ नाहींत, हे आहे. निरनिराळ्या विद्या आणि शास्त्र यांचा अभ्यास आणि विचार आपल्या भाषेंत होत नाहींत. तो सर्व व्यवहार इंग्रजींत चालतो. एकंदर जनतेमध्यें विद्याप्रसार मराठींमध्यें व्हावयाचा, परंतु तत्संबंधाची विशेषशी आस्था अजून आपल्यास वाटत नाहीं. अशी स्थिती जरी आहे, तरी गेल्या पन्नास वर्षांत मराठींत काय लिहिलें गेलें आहे, याचें सहज निरीक्षण केलें तरी आपल्याला अगदींच निराश व्हावयास नको असेंच दिसून येईल. नागपूर येथील ज्ञानकोश तयार करणाऱ्या मंडळीनें महाराष्ट्रीय वाङ्मयसूची या नावाचा ग्रंथ नुकताच प्रसिद्ध केला आहे. त्यामध्यें आजपर्यंत मराठींत निरनिराळ्या विषयावर झालेले लहान मोठे ग्रंथ, आणि वर्तमानपत्र व मासिक-

पुस्तकें यांत प्रसिद्ध झालेले निबंध आणि किरकोळ लेख यांचा पूर्ण आढावा संगृहीत केला आहे. त्यावरून दिसून येतें कीं, मराठींत भिन्नभिन्न विद्या, कला, शास्त्रें, उद्योगधंदे वगैरे विषयांवर केवळ सामान्य लेख प्रसिद्ध होऊन बनलेलें वाङ्मयही बरेंच विस्तृत आहे, व त्या विस्तारावरून भाषेची आणि वाङ्मयाची चांगलीच प्रगती होत आहे असे दिसून येतें. प्रस्तुत पुस्तकांत एवढ्या मोठ्या माहितीचें आलोडन करणें अशक्य आहे, आणि हे सर्व वाङ्मय किरकोळ योग्यतेचें असल्यामुळें तसें करण्याची जरूरीही नाहीं. तर भाषेची आणि वाङ्मयाची घटना आणि वाढ साधारणतः कशी काय होत चालली आहे, आणि मुख्य-मुख्य ग्रंथ किंवा लेख कोणते, कसे आहेत, त्यांनीं भाषेचें कार्य कसा प्रकारचें झालें आहे, तसेंच भाषेची अभिवृद्धी होण्यास साह्य करणारे मुख्य मुख्य ग्रंथकार व निबंधकार कोण, याची चर्चा बहुतेक संक्षेपतः करण्याचा आणि त्या योगानें विशेषतः तरूण मंडळीची भाषेच्या आणि वाङ्मयाच्या अभ्यासाकडे आणि अभिवृद्धीला साह्य करण्याकडे प्रवृत्ती करण्याचा प्रस्तुत ग्रंथाचा उद्देश आहे.

भाषेच्या अभिवृद्धीचें ग्रंथप्रसिद्धीकरण हें महत्त्वाचें साधन असतें. पाश्चात्य देशांत ग्रंथप्रसिद्धी करण्याचा उद्योग फार दिवसांपासून अगदीं स्वतंत्र असून त्यामुळें ग्रंथप्रसिद्धीस साह्य झालें आहे, आणि ग्रंथ-कारांस उत्तेजन मिळालें आहे. यासंबधाची आमच्या इकडली स्थिती पाहिली तर आमच्या इकडे आपला ग्रंथ लोकांपुढें आणण्याचें काम ग्रंथकारांनाच करावें लागतें. लोकहितवादी आणि निबंधमालाकार यांपासून तों अलीकडील ग्रंथकारांपर्यंत बहुतेकांनी आपले ग्रंथ स्वताच प्रसिद्ध केले आहेत. ग्रंथप्रसिद्धी करण्याचें अल्पस्वल्प काम मागेंपासून कित्येक छापखाने आणि मंडळ्या करीतही आहेत. अलीकडे केवळ मनोरंजक वाङ्मय प्रसिद्ध करण्याचें काम कित्येक मंडळ्या बरेंच करीत आहेत. मुंबईत प्रथमतः प्राचीन काव्यग्रंथ प्रसिद्ध करण्याचा माधव चंद्रोबा यांचा उद्योग फार चांगला झाला. त्यांच्या सर्वसंग्रहात अनेक मराठी काव्यें प्रसिद्ध झालीं. विविधज्ञानविस्तार, इंदुप्रकाश ( यंत्र ) आणि पुण्याची चित्रशाळा यांनीं पुष्कळ ग्रंथ प्रसिद्ध केले आहेत. मनोरंजन मासिक

पुस्तकाच्या मंडळीकडून सुमारें शंभर ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत. बडोदेसरकार आणि शाळाखातें, व तेथील सद्विचारिणी सभा यांच्या कडून अनेक ग्रंथ प्रसिद्ध होत असतात. निर्णयसागर छापखान्यानें तर नानाप्रकारचे पुष्कळ लहानमोठे ग्रंथ मासिकपुस्तकरूपानें आणि स्वतंत्रपणें प्रसिद्ध केले आहेत. या छापखान्यानें आणि त्याचे साह्यकारी ओक यांनीं पुष्कळ ग्रंथकारांना पुस्तकें प्रसिद्ध करण्यास हातभार लावून वाङ्मयाचें मोठेंच काम केलें आहे. पुण्याचे दाभोळकर यांचा यासंबंधाचा उद्योग प्रशंसनीय आहे. त्यांनीं केवळ एकट्यानें विद्वानांकडून ग्रंथ करवून छापिले. यांच्या आजपर्यंत प्रसिद्ध झालेल्या बत्तीस ग्रंथांपैकीं निम्मे तरी चांगल्यापैकीं आहेत. दाभोळकर यांनीं हा उद्योग केला नसता तर हे ग्रंथ आमच्या मंडळींना आपण होऊन लिहिले नसते. त्याचप्रमाणें पुण्याची भट आणि मंडळी यांचा देखील यासंबंधाचा उद्योग चालू असतो. याशिवाय पुण्याची ट्रान्सलेशन सोसायटी, इतिहाससंशोधक मंडळी, साहित्य मंडळी, धुळ्याची रामदासी मंडळी, इत्यादि वाङ्मयाच्या विशेष कामासाठीं स्थापित झालेल्या संस्था याच आपापल्या खात्याच्या संबंधाची पुस्तकें प्रसिद्ध करण्याचें काम चालू असतें. जळगावचें 'काव्यरत्नावली' हें मासिक पुस्तक केवळ नवीन काव्यें प्रसिद्ध करीत असतें. अशा प्रकारें पुस्तकें प्रसिद्ध होत आहेत. तथापि ह्या बहुतेक प्रसिद्धीकाराची आजची स्थिती अशी आहे कीं, पुस्तक लोकप्रिय होऊन खपेल असें वाटलें तरच ह्या मंडळ्या प्रसिद्धीकरणाचें काम अंगावर घेतात. एखाद्या ग्रंथकारास आपल्या आवडत्या आणि अभ्यासिलेल्या विषयावर ग्रंथ लिहावासा वाटल्यास तो ग्रंथ स्वतः प्रसिद्ध करण्याची हिंमत ग्रंथकर्त्यास नसली तर त्याला 'दरिद्र्याच्या मनोरथाची' प्रतीति येते.

कोशग्रंथ —इंग्रजी राज्य झाल्यावर सरकारानें प्रथमतः कोश तयार करविणें हें मराठी भाषेच्या संबंधाचें मोठें महत्त्वाचें काम केलें. सरकारानें मेजर क्यांडी व मोल्स्वर्थ हे विद्वान् गृहस्थ नेमून त्यांच्या साह्यास कांहीं शास्त्री मंडळी दिली. त्यांनीं एक उत्तम मराठी कोश

तयार केला, आणि त्याच्याच आधारें मोलस्वर्थ आणि क्यांडी यांनीं इंग्रजी-मराठी व मराठी-इंग्रजी असे कोश केले. हें काम सन १८३० च्या अगोदर झालें, आणि तें प्रशंसनीय झालें आहे. इंग्रजी भाषेंतले सर्व शब्द घेऊन त्यांना मराठी शब्द योजावे आणि अशा रीतीनें मराठींत शब्द आणण्याची व्यवस्था करावी, म्हणून रानडे यांनीं चांगला उद्योग केला. त्याला मंडळीचें चांगलें साह्य मिळालें नाहीं, यामुळें हा कोश साधारणच झाला आहे. वास्तवीक मराठीचा चांगला कोश तयार करण्याची वेळ आली आहे. हें काम एकट्यादुकट्याचें नाहीं. कांहीं विद्वान् मडळी मिळून त्यांनीं तें हातीं घेतलें पाहिजे, व मुख्य मुख्य छापखान्यांनीं मिळून छापण्याचें काम उचललें पाहिजे. सध्या नागपूर येथें डा० केतकर व त्यांची मित्रमडळी यांच्या उद्योगानें ज्ञानकोश तयार होत आहे. हा महत्त्वाचा उद्योग उत्तम रितीन तडीस जाईल असें चिंतण्यास हरकत नाहीं.

व्याकरण पुस्तकें:—आपल्या शास्त्रीपंडितांना संस्कृतभाषा व तिचें व्याकरण यांच्या पलीकडे कांहीं महत्त्वाचें वाटत नसे. यामुळें मराठी ही प्रचलित भाषा असून सुद्धां तिचें व्याकरण असावें किंवा लिहावें ही कल्पना आमच्यापैकीं कोणासच स्वतंत्र रीतीनें सुचली नव्हती. परकी लोक जेव्हां ही भाषा शिकण्याचा प्रयत्न करूं लागले, तेव्हां त्यांस या भाषेच्या व्याकरणाची आवश्यकता वाटूं लागली. ख्रिस्तपुराणकार फादर स्टीफन याने पोर्तुगीज भाषेंत कोंकणी भाषेचें व्याकरण (१६४०) लिहिलें आहे, पण त्या पुस्तकास मराठी भाषेचें व्याकरण असें म्हणतां येणार नाहीं. तसेंच त्यान ज्या भाषेंत ख्रिस्तपुराण लिहिलें, त्या भाषेचेंही व्याकरण लिहिलें असा उल्लेख आहे, पण तें पाहाण्यांत नाहीं. यापुढील व्याकरण म्हणजे वुइल्यम केरी याचें. तें इंग्रजींत होतें, पण तेंही उपलब्ध नाहीं. मराठी भाषेच्या आगरांत म्हणजे महाराष्ट्रांत सन १८२४ पर्यंत या व्याकरणविषयक प्रयत्नांची दादही नव्हती; व त्या वेळीं जेव्हां जार्विससाहेबानें गंगाधर

शास्त्री फडके, जगन्नाथशास्त्री व बाळशास्त्री यांस मराठी भाषेचें व्याकरण तयार करण्यास सांगितलें, तेव्हां या शास्त्रीमंडळास असें व्याकरण लिहावें कसें, याचीच पंचाईत पडली! शेवटीं यांनीं असें ठरविलें कीं, मराठी भाषा संस्कृतापासून उत्पन्न झाली, तेव्हां संस्कृत व्याकरणांत असणारे सर्व प्रकार मराठींत असलेच पाहिजेत. या अनुरोधानें या शास्त्रीमंडळानें एक प्रश्नोत्तररूप व्याकरण १८२४ सालीं तयार केलें. त्याच्या हस्तलिखीत प्रती शाळांतून ठेविल्या होत्या. हेंच पुढें सुधारून १८३६ सालीं प्रथमतः छापिलें. या व्याकरणानें मराठी व्याकरणाचा पाया घातला हें खरें, पण त्याबरोबरच संस्कृत भाषेंतील सर्व व्याकरणव्यवस्था युक्तायुक्ततेचा विचार न करितां आणि ऐतिहासिक दृष्टी न ठेवितां मराठींत आणिल्या, व त्या अजूनही बद्धमूल होऊन बसल्या आहेत. यापैकीं प्रयोगव्यवस्थेंत कसे घोटाळे केले आहेत, हें व्याकरणघटनेच्या भागांत सांगितलेंच आहे. मराठीचें व्यवस्थीत मोठें व्याकरण १८३५ सालीं दादोबा पांडुरंग यांनीं लिहिलें. यांत त्यांना संस्कृत व्याकरणाची पद्धत केवळ कारणापुरती घेऊन इंग्रजी व्याकरणपद्धतीचें अनुकरण केलें आहे आणि सर्व प्रकरणें व्यवस्थीत व सुसंगत लिहिलीं आहेत. यामध्यें साहजीकच इंग्रजी आणि संस्कृत या दोन पद्धतींचा घोटाळा झाला आहे. दादोबा हे हुशार असून स्वभाषेचे अभिमानी होते, परंतु आग्रहीपणाचा प्रकार बराच होता, यामुळें त्यांनीं उत्तरोत्तर सुधारणा करण्याचें धोरण ठेविलें नाहीं. या व्याकरणावर कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनीं विस्तृत टीका करून ती भाजी शालापत्रकांत छापली आहे. हींत दादोबांच्या व्याकरणांतील दोष दाखवून शिवाय ते कसे सुधारतां येतील याचें दिग्दर्शन केलें आहे. पण बरोबरी सुधारणा कोणत्या कराव्या हें स्पष्ट सांगितलें नाहीं. या टीकेच्या अनुरोधानें कृष्णशास्त्री गोडबोले यांनीं नवीन मराठी व्याकरण तयार केलें. या व्याकरणांत व्युत्पत्तीसंबंधानें थोडेंसें ऐतिहासिकदृष्ट्या विवेचन केलें आहे, तरी प्रातिपदिक, क्रियापद आणि प्रयोग वगैरे गोष्टींचें सम विवेचन झालेलें नाहीं. वाक्यपृथक्करणपद्धतीची तर सुरवातही झालेली

तयार केला, आणि त्याच्याच आधारें मोलस्वर्थ आणि क्यांडी यांनीं इंग्रजी-मराठी व मराठी-इंग्रजी असे कोश केले. हें काम सन १८३० च्या अगोदर झालें, आणि तें प्रशंसनीय झालें आहे. इंग्रजी भाषेंतले सर्व शब्द घेऊन त्यांना मराठी शब्द योजावे आणि अशा रीतीनें मराठींत शब्द आणण्याची व्यवस्था करावी, म्हणून रानडे यांनीं चांगला उद्योग केला. त्याला मंडळीचें चांगलें साह्य मिळालें नाहीं, यामुळें हा कोश साधारणच झाला आहे. वास्तवीक मराठीचा चांगला कोश तयार करण्याची वेळ आली आहे. हें काम एकट्यादुकट्याचें नाहीं. कांहीं विद्वान् मंडळी मिळून त्यांनीं तें हातीं घेतलें पाहिजे, व मुख्य मुख्य छापखान्यांनीं मिळून छापण्याचें काम उचललें पाहिजे. सध्या नागपूर येथें डा० केतकर व त्यांची मित्रमंडळी यांच्या उद्योगानें ज्ञानकोश तयार होत आहे. हा महत्त्वाचा उद्योग उत्तम रितीनं तडीस जाईल असें चिंतण्यास हरकत नाहीं.

व्याकरण पुस्तकें:—आपल्या शास्त्रीपंडितांना संस्कृतभाषा व तिचें व्याकरण यांच्या पलीकडे कांहीं महत्त्वाचें वाटत नसे. यामुळें मराठी ही प्रचलित भाषा असून सुद्धां तिचें व्याकरण असावें किंवा लिहावें ही कल्पना आमच्यापैकीं कोणासच स्वतंत्र रीतीनें सुचली नव्हती. परकी लोक जेव्हां ही भाषा शिकण्याचा प्रयत्न करूं लागले, तेव्हां त्यांस या भाषेच्या व्याकरणाची आवश्यकता वाटूं लागली. ख्रिस्तपुराणकार फादर स्टीफन याने पोर्तुगीज भाषेंत कोंकणी भाषेचें व्याकरण (१६४०) लिहिलें आहे, पण त्या पुस्तकास मराठी भाषेचें व्याकरण असें म्हणतां येणार नाहीं. तसेंच त्यानें ज्या भाषेंत ख्रिस्तपुराण लिहिलें, त्या भाषेचेंही व्याकरण लिहिलें असा उल्लेख आहे, पण तें पाहाण्यांत नाहीं. यापुढील व्याकरण म्हणजे वुइल्यम केरी याचें. तें इंग्रजींत होतें, पण तेंही उपलब्ध नाहीं. मराठी भाषेच्या आगरांत म्हणजे महाराष्ट्रांत सन १८२४ पर्यंत या व्याकरणविषयक प्रयत्नांची दादही नव्हती; व त्या वेळीं जेव्हां जार्विससाहेबानें गंगाधर

शास्त्री फडके, जगन्नाथशास्त्री व बाळशास्त्री यांस मराठी भाषेचें व्याकरण तयार करण्यास सांगितलें, तेव्हां या शास्त्रीमंडळास असें व्याकरण लिहावें कसें, याचीच पंचाईत पडली ! शेवटीं यानीं असें ठरविलें कीं, मराठी भाषा संस्कृतापासून उत्पन्न झाली, तेव्हां संस्कृत व्याकरणांत असणारे सर्व प्रकार मराठींत असलेच पाहिजेत. या अनुरोधानें या शास्त्रीमंडळानें एक प्रश्नोत्तररूप व्याकरण १८२४ सालीं तयार केलें. त्याच्या हस्तलिखीत प्रती शाळांतून ठेविल्या होत्या. हेंच पुढें सुधारून १८३६ सालीं प्रथमतः छापिलें. या व्याकरणानें मराठी व्याकरणाचा पाया घातला हें खरें, पण त्याबरोबरच संस्कृत भाषेंतील सर्व व्याकरणव्यवस्था युक्तायुक्ततेचा विचार न करितां आणि ऐतिहासिक दृष्टी न ठेवितां मराठींत आणिल्या, व त्या अजूनही बद्धमूल होऊन बसल्या आहेत. यापैकीं प्रयोगव्यवस्थेनें कसे घोटाळे केले आहेत, हें व्याकरणघटनेच्या भागांत सांगितलेंच आहे. मराठींचें व्यवस्थीत मोठें व्याकरण १८३५ सालीं दादोबा पांडुरंग यानीं लिहिलें. यांत त्यांना संस्कृत व्याकरणाची पद्धत केवळ कारणापुरती घेऊन इंग्रजी व्याकरणपद्धतीचें अनुकरण केलें आहे आणि सर्व प्रकरणें व्यवस्थीत व सुसंगत लिहिलीं आहेत. यामध्यें साहजीकच इंग्रजी आणि संस्कृत या दोन पद्धतींचा घोटाळा झाला आहे. दादोबा हे हुषार ग्रंथकार असून स्वभाषेचे अभिमानी होते, परंतु आढ्यतेचा प्रकार बराच होता, यामुळें त्यानीं उत्तरोत्तर सुधारणा करण्याचें धोरण ठेविलें नाहीं या व्याकरणावर कृष्णशास्त्री चिपळूकर यानीं विस्तृत टीका करून ती भाजी शालापत्रकांत छापली आहे. हींत दादोबाच्या व्याकरणांतील दोष दाखवून शिवाय ते कसे सुधारतां येतील याचें दिग्दर्शन केलें आहे. पण खरोखरी सुधारणा कोणत्या कराव्या हें स्पष्ट सांगितलें नाहीं. या टीकेच्या अनुरोधानें कृष्णशास्त्री गोडबोले यानी नवीन मराठी व्याकरण तयार केलें. या व्याकरणांत व्युत्पत्तीसंबंधानें थोडेंसें ऐतिहासिकदृष्ट्या विवेचन केलें आहे, तरी प्रातिपदिक, नियापद आणि प्रयोग वगैरे गोष्टींचें तसें विवेचन झालेलें नाहीं. वाक्यपृथक्करणपद्धतीची तर सुरवातही झालेली

नाहीं. या सर्व गोष्टी विचारांत घेऊन संस्कृताच्या पायावर शब्दांचीं रूपें वगैरे व्यवस्था कायम ठेवून, आणि मराठी ही चालू भाषा इंग्रजीच्या धरतीवर गेली पाहिजे हे ध्यानांत घेऊन इंग्रजी ग्रंथकारांच्या व्याकरण-विषयक शास्त्रीय पद्धतींस अनुसरून माझ्या प्रौढबोध व्याकरणाची रचना मीं केली आहे. यांत प्रत्यय, प्रयोग, प्रातिपदिकांचीं आणि क्रियापदांचीं रुपें, यांची ऐतिहासिकदृष्ट्या छाननी करून त्यांचें मूळ ठरविण्याचा प्रयत्न जागोजाग केला आहे. वाक्यपरिच्छेदाचे विवेचन तर प्रथमतः मराठींत पूर्णपणे केलेलें याच पुस्तकांत पाहावयास सांपडेल.

यानंतरचा व्याकरणविषयक प्रयत्न म्हटला म्हणजे मोरो केशव दामले यांचें शास्त्रीय व्याकरण हा होय. या पुस्तकांत शास्त्रीय या नांवाखालीं पुष्कळ अशास्त्रीय गोष्टी दडपून दिल्या आहेत, व आढ्यतेमुळें ग्रंथकारानें पूर्वीच्या व्याकरणकारांनीं व्याकरणाच्या शास्त्रीयते-साठीं जे जे प्रयत्न केले त्यांचें नीटपणें अवलोकन देखील केलें नाहीं. या पुस्तकांतील कित्येक प्रकरणें वाचून ग्रंथकारांना व्याकरणशास्त्र म्हणजे काय हें सुद्धां नीट कळत नव्हतें, असें मोठ्या खेदानें म्हणणें भाग पडत आहे. या एवढ्या मोठ्या पुस्तकांत दुसऱ्याचें खंडन करण्याचा प्रयत्न आणि उपहास यांपलीकडे दुसरें कांहीं नाहीं. आपल्याखेरीज दुसऱ्या कोणास स्वतंत्र मत देण्याचा अधिकारच नाहीं अशी दामल्यांची समजूत होती. या पुस्तकानें मराठी व्याकरणासंबंधीं गोष्टींचा निकाल तर लागला नाहींच, पण उलट बऱ्याच नवीन भानगडी मात्र उत्पन्न झाल्या आहेत.

शाळांच्या उपयोगासाठीं म्हणून प्रथमतः गंगाधरशास्त्री यांचें व मग बाळशास्त्री जांभेकर यांचें अशीं लहान पुस्तकें झालीं. नंतर दादोबांच्या व्याकरणाचे अनुरोधानें गगाधर रामचंद्र टिळक यांनीं एक लघु व्याकरण तयार केलें होतें. पुढें सरकारी हुकुमाप्रमाणें दादोबांनीच एक लघु-व्याकरण तयार केलें. तें पुस्तक व माझी बालबोध व्याकरणाचीं दोन पुस्तकें हीं आज शाळांतून चालू आहेत. शब्दसिद्धीच्या संबंधाचीं हीं दोनतीन पुस्तकें आहेत. प्रौढबोधांतून शब्दसिद्धीचा भाग निराळा काढून तयार केलेलें माझेंही एक निराळें पुस्तक आहे.

ग्रंथकार ग्रंथरचना करू लागले असता व्याकरणाची वाट पाहात बसत नाहींत. लोकांच्या बोलीमध्यें काय व्यवस्था आहे हें लक्षात घेऊन ते आपल्या ग्रंथरचनेस जुळेसें धोरण ठरवितात आणि लिहू लागतात. मराठींतला पहिला ग्रंथ ज्ञानेश्वरी. यांतली व्यवस्था कशी आहे हें पाहून टिपण तयार केलें असता तो व्याकरणाचा पाया होईल. राजवाडे यांनी ज्ञानेश्वरीचें व्याकरण लिहिलें आहे. परंतु मागील विवेचनांत सांगण्यांत आलेंच आहे कीं, ज्ञानेश्वरीची अजून विश्वसनीय प्रत ठरली नाहीं. यासाठीं तिचें व्याकरणही कायमचें ठरवितां येणार नाहीं. त्यानंतर एकनाथाच्या भाषेचें वळण बरेंच व्यवस्थित आहे, हेंही सांगण्यांत आलेंच आहे. तेव्हां ज्ञानदेव, एकनाथ, यांच्या नंतर त्यांच्या भाषेचें स्वरूप ठरवून, आणि तिच्या जोडील ख्रिस्तपुराणाची भाषा घेऊन, मराठीचें एक प्रथम व्याकरण बनवितां येईल. त्यानंतर मोरोपंतापर्यंतचे कवी व्यवस्थितपणें लिहिणारे नव्हते. मोरोपंतानें मात्र आपल्या भाषेला सुव्यवस्थितपणा आणिला आहे. त्यानें संस्कृत व्याकरणाचे नियम मराठीला लावण्याचा प्रयत्न करून सर्व प्रकारचीं रुपें नियमित केलीं आहेत, आणि वाक्याचें स्वरूपही बनविलें आहे. मोरोपंताचे ग्रंथ आपल्यास विश्वसनीय स्वरूपांत प्राप्त आहेत, यासाठीं मोरोपंताच्या भाषेचें व्याकरण बनवितां येईल. मात्र त्या वेळेपर्यंत मराठी गद्यही चांगलें नावारूपास आलें होतें, यामुळें त्याचाही विचार करावा लागेल. याप्रमाणें मोरोपंती भाषेच्या व्याकरणास गद्याच्या व्याकरणाची पुरवणी जोडून अठराव्या शतकाच्या अंतीच्या मराठीचें चांगलें व्याकरण तयार करितां येईल. सांप्रतच्या व्याकरणांतून जुने प्रकार ठिकठिकाणीं सांगितलेले असून भाषा कशी बनत गेली, याचें निवरण केलेलें असतें. एकाद्या चालू भाषेचें स्वरूप कोणत्याही एका वेळीं कायम बनलेलें दाखवितां येत नाहीं. फेरफार सारखे चालू असतात. परंतु हे फेरफार कां होत गेले आणि त्यांच्या योगानें भाषेत विशेष कार्य कोणतें घडून आलें, अशा प्रकारचें त्या फेरफारांचें स्वरूप समजण्यास मध्यंतरीच्या व्याकरणाचा मोठा उपयोग असतो.

**साहित्य आणि अलंकारः**—संस्कृतामध्यें साहित्य असें व्यवस्थीत शास्त्र झालेलें असून तद्विषयक ग्रंथ पुष्कळ आहेत. व्याकरण, न्याय, वेदान्त, योग, इत्यादि शास्त्रांप्रमाणेंच अलंकारशास्त्रही पढतात आणि त्यांवर वादविवाद चालतात. परंतु जुने शास्त्री यांची आधुनीक शोधकदृष्टी नसल्यामुळें जें मागून चालत आलें आहे त्याचेंच पुन्हा पुन्हा चर्वण होत असतें, आणि संस्कृत ही चालू भाषा नाहीं यामुळें या वादविवादाचा वाङ्मयाला तादृश उपयोग नाहीं. संस्कृतांत रस, काव्यगुण, काव्यदोष, आणि इतर प्रकारची साहित्यचर्चा यांवर अगदीं सूक्ष्मदृष्टीनें पुष्कळ विचार झालेला असून अलंकारांची संख्या तर सुमारें दीडशेंपर्यंत वाढली आहे. यासंबंधाचे कित्येक संस्कृत ग्रंथ उत्तमांपैकीं आहेत. तसेंच संस्कृताचा विशेषेंकरून शृंगारिक आणि विलासविषयक वर्णनें यांकडे भर फार. या गोष्टी हल्लींच्या वाचकांस मान्य होणार नाहींत. अर्थातच या वाङ्मयाचा मराठीला कांहीं उपयोग नाहीं. मागें सांगण्यांत आलेंच आहे कीं, प्राचीन मराठी कवींनीं साहित्य आणि अलंकार यांची मुळींच परवा केली नाहीं. रघुनाथ पंडित आणि मोरोपंत यांनीं एतद्विषयक विशेष प्रयत्न केलेले दिसतात. बाकीचे संत कवी आणि इतर कवी यांच्या वर्णनांत सहजगत्या अलंकार आले आहेत तेवढेच. त्यांतही त्यांचा उपमा, रूपक, दृष्टान्त यांच्या पलीकडे भर नसतो. अर्वाचीन कवींचें तर संस्कृतांतील गुंतागुंतीच्या जुन्या अलंकारादिकांकडे लक्ष फारच कमी. त्यांनीं नवीन तऱ्हेचे पाश्चात्य कवितेच्या साहित्याचे साधे प्रकार कवितेंत आणण्याचा प्रयत्न चालविला आहे. इंग्रजी भाषेंत वाङ्मयसाहित्य म्हणजे भाषेची रचना, व्यवस्था, आणि ठेवण चांगली कशी असावी, निरनिराळ्या तऱ्हेच्या विषयांची भाषा भिन्न भिन्न कशी पाहिजे, एवढाच विचार असतो. त्या भाषेंत ज्यांना आपण अलंकार म्हणतों तशा रचनेचे प्रकार अगदीं थोडे मानलेले आहेत. संप्रत मराठीमध्यें जुनें आणि नवें साहित्य मिळून नवीनच साहित्य तयार होत आहे. तेव्हां जुनें किती टिकतें आणि नवीन काय येतें हें पाहून, मग या विषयाची चर्चा व यावर ग्रंथरचना झाली पाहिजे.

संस्कृतातील साहित्यचर्चा आपणास फार नको असली तरी संस्कृताच्या धर्तीवर बनलेली मराठी कविता नीट समजण्यासाठीं संस्कृत साहित्यशास्त्राची माहिती मराठींत यावयास पाहिजे. त्यापासून मराठी मध्यें घेण्यास योग्य काय आहे हेंही पण समजेल. मराठींत संस्कृतावरून कांहीं साहित्यग्रंथ झाले आहेत. साहित्यावर निर्णयसागरमध्यें साहित्यशास्त्र नावाचा केवळ शास्त्रीय ग्रंथ छापलेला आहे. धुळकर्णी याचें भाषासौंदर्यशास्त्र हें ल्हानसें पुस्तक चांगलें आहे, आणि अलंकारावर लेलेकृत अलंकारप्रकाश आणि गोरेकृत अलंकारचंद्रिका हीं पुस्तकें चांगलीं आहेत. तथापि या ग्रंथामध्यें केवळ संस्कृतवाङ्मयाच्या दृष्टीनें विवरण केलें आहे. मराठींतल्या साध्या आणि स्वभावोक्तिप्रधान कवितेला उपयोगी पडेल अशी चर्चा यांत नाहीं. मराठींत उदाहरणें सांपडलीं नाहींत तेथें मुद्दाम नवीं करून घातलीं आहेत. मराठी कवितेलाच जुळेल अशी थोडीशी साहित्यचर्चा कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनीं अनेकविद्यामूलतत्वसंग्रह या पुस्तकामध्यें एका ल्हानशा निबंधांत केली आहे. राजारामपंत भागवत यांनी अलंकारमीमांसा म्हणून एक ल्हान पुस्तक लिहून त्यांत केवळ मराठीच्या विद्यार्थ्यांस उपयोगी अशी माहिती सांगितली आहे. त्याच पुस्तकाच्या नमुन्यावर, परंतु त्यापेक्षांही विषय सोपा करून, आणि मराठी विद्यार्थ्यांस अगदीं जरूर तितकीच माहिती घेऊन सुलभ अलंकार हें पुस्तक प्रस्तुत ग्रंथकारानें लिहिलें आहे

इंग्रजी आणि संस्कृत यांतून भाषान्तरें आणि रूपान्तरें:— मराठी गद्यवाङ्मयाचा आरंभ मुंबई येथें आणि पुण्यास भाषान्तररूपानें झाला, आणि इंग्रजांतून व संस्कृतांतून बरेच चांगले चांगले भाषान्तररूप ग्रंथ मराठींत झाले. यांतील कांहीं चांगल्या ग्रंथांचा उल्लेख निरनिराळ्या विषयामध्यें केला आहे. जुनी भाषांतराची पद्धत अशी होती कीं, मूळ ग्रंथांतील वाक्यसमूह अथवा कलम घेऊन तीं भावार्थ कायम ठेवून मराठीमध्यें आणावीं. शब्दाला शब्द आला आहे कीं नाहीं हें भाषांतरकार पाहात नसत. ही भाषांतराची रीत

चांगली होती, पण ती सध्या बिघडली आहे. सध्या शब्दाला शब्द जुळविण्याची प्रवृत्ती फार. यामुळें मूळांतला भावार्थ मराठींत चांगला उतरण्याकडे लक्ष राहात नाहीं, वेडेवांकडे शब्द येतात, आणि भाषाही बिघडते. इतकें होऊनही इंग्रजी मूळ शब्दांना मराठींत चांगले शब्द नाहींत अशी ओरड उत्पन्न होते ती निराळीच. आगरकर यांच्या लेखांमध्यें भाषांतर अथवा रूपांतर पुष्कळ आहे. ते मूळ इंग्रजीला पुष्कळसें धरून भाषांतर करीत, पण मराठीची रचनाही सोडीत नसत. पुष्कळदां त्यांचें म रा ठी जसेंच्या तसें इंग्रजींत परत नेतां येतें. याचें कारण दोन्ही भाषा त्यांच्या चांगल्या स्वाधीन होत्या. जुन्या पद्धतीनें चांगलीं भाषांतरें करणारे ग्रंथकार कृष्णशास्त्री चिपळूणकर, विनायक कोंडदेव ओक, गोविंदशास्त्री बापट, हरी कृष्ण दामले, आनंदराव बर्वे, गो० वा० कानिटकर, कृ० प० गाडगीळ, इत्यादि गृहस्थ होत. मूळांतला भावार्थ जसा सोडावयाचा नाहीं, तसे शब्दही सोडावयाचे नाहींत अशा निश्चयानें मंडलीक यांनीं एलफिन्स्टनकृत इतिहासाचें भाषांतर केलें, तें अगदीं गचाळ निपजलें. मराठ्यांची बखर आणि दक्षिणेचा प्राचीन इतिहास ह्या ऐतिहासिक पुस्तकांचें भाषांतर चांगलें झालें आहे. आरबी गोष्टी, पाल आणि व्हर्जिनिया, राबीनसन क्रूसोचें चरित्र व कोलंबसाचा वृत्तान्त, हीं भाषांतरमय चांगलीं पुस्तकें मागें झालीं आहेत. संस्कृत नाटकें व दुसरे कित्येक ग्रंथ यांचीं संस्कृताचा मूळचा भावार्थ कायम ठेवून मराठीला जुळतील अशीं भाषांतरें झालीं आहेत. बडोद्यास सरकारी आश्रयानें आणि पुण्याचे दाभोळकर यांच्या प्रशंसनीय उद्योगानें बऱ्याच प्रख्यात इंग्रजी ग्रंथांचीं भाषांतरें झालीं आहेत. त्यांतलीं कांहीं—विशेषेंकरून दाभोळकरांच्या ग्रंथांपैकीं बरींच—चांगलीं झालीं आहेत. पण त्यांतलीं पुष्कळ अशींही आहेत कीं, तीं समजावयास मूळचा ग्रंथ जवळ घ्यावयास पाहिजे. केवळ मराठी जाणणारास त्यांतील मतलब मुळींच कळणार नाहीं. मराठी क्रमिक पुस्तकांमध्यें इंग्रजींतून भाषांतर करून घेतलेले धडे बरेच आहेत. ते जुन्या धर्तीवर रचलेले आहेत. मराठींत भाषांतररूपानें ग्रंथ उतरतांना इंग्रजींतले एकंदर शब्द आणि वाक्यें

आणलीं आहेत असें मुख्यतः पाहात न बसता मूळांतला सर्व भाव आणला आहे हेंच पाहिलें पाहिजे. चागलें भाषांतर कसें असावें याविषयीं विष्णुशास्त्री चिपळूणकर यानीं निबंधमालेंत निबंध लिहिला आहे. चागलें भाषान्तर अथवा रुपान्तर कसें असावें, इकडे नीट लक्ष न पोचल्यामुळे मराठींत असल्या ग्रथाच्या रचनेला अजून यश आलें नाहीं, असेंच साधारणतः म्हणणें भाग पडत आहे.

मराठीला सस्कृत ग्रथसग्रहाचा मोठा आधार आहे. यासाठीं वास्तवीक सस्कृतातील चागल्या ग्रथाचीं मराठींत भाषातरें झालीं पाहिजेत, परतु तसें होत नाहीं. याचें कारण असें आहे कीं, सस्कृतातील उपनिषदें, वेदान्त व आध्यात्मिक विषयावरचे अथवा पौराणिक ग्रथ हे लोकाना संस्कृतात थोडेबहुत समजतात, आणि त्याचा स्पष्ट अर्थ होण्याजोगी टीका मराठींत झाली कीं पुरे, अशी साधारणतः समजूत असते. यामुळें सस्कृत ग्रथ आणि त्याचा केवळ शब्दार्थ, किंवा सस्कृत ग्रथाचा अर्थ समजेल असा मराठींत सारांश, असे ग्रथ मराठींत झाले आहेत. मराठींत रुपातर करण्याकडे लक्ष देऊन सस्कृत ग्रथाच्या आधारें लिहिलेले ग्रथ मराठींत बहुधा मुळींच झाले नाहीत. एवढा लोकाना आवडता ग्रथ भगवद्गीता, त्याचा भावार्थ निरनिराळ्या पथाच्या मताप्रमाणें त्यात थोडक्यात किंवा विस्तृत सांगितला आहे असे ग्रथ पुष्कळ आहेत. पण केवळ मराठी भाषेस चागलें शोभेसें गीतेचें गद्यमय अथवा पद्यमय भाषातर अथवा रुपातर नाहीं. जुन्या ग्रथात वामनाचें समश्लोकी आणि मोरोपताचें प्रत्येक श्लोकास एकेक आर्या अशीं भाषातरें आहेत. हीं दोन्हीं चागलीं आहेत. निर्णय-सागरची गुजीकरानीं अर्थ केलेली गीता वरीलसारखी अशा प्रकारची आहे. इग्रजी भाषेमध्यें बायबलाचें भाषातर हा भाषेच्या सबधानें उत्कृष्ट ग्रथ आहे. मराठींत आर्य लोकाचा सर्वमान्य ग्रथ जो ऋग्वेद त्याचें श्रुतिबोधामध्यें थोडेंसें झालेलें भाषातर अगदीं नादान आहे. भागें पडित यानीं वेदार्थयत्नाच्या द्वारें भाषातर करण्याचा उद्योग केला. तो चिकित्सेच्या दृष्टीनें बरा आहे; पण भाषेच्या दृष्टीनें नावाजण्यासारखा नाहीं. महाभारत, रामायण आणि भागवत याचीं भाषातरें मराठींत

झालीं आहेत, तींही भाषेच्या दृष्टीनें यशस्वी झालीं नाहींत. महाभारताचें समग्र भाषांतर करण्याचा उद्योग पुण्याची *चिपळूणकर आणि मंडळी* यांनीं केला. त्यांची त्यासंबंधाची कळकळ आणि दीर्घ उद्योग या गोष्टी स्तुत्य आहेत. राजेरजवाड्यांकडून पैशाचें साह्य मिळवून त्या मंडळीनें हें काम चौदा वर्षांत तडीस नेलें, हें त्यांनीं भाषेचें मोठेंच कार्य केलें आहे. परंतु भाषासंवर्धनाच्या दृष्टीनें पाहिलें तर मराठी भाषांतर जसें व्हावयास पाहिजे होतें तसें झालें नाही. त्यांना चांगले लेखक मिळाले नाहीत. एकंदर कामावर एखाद्या विद्वान शोधक गृहस्थाची दृष्टी असावयास पाहिजे होती, तशी नव्हती. संस्कृत वाङ्मयांत महाभारत या ग्रंथाचा लौकिक वेदग्रंथांच्या खालोखाल आहे. मराठी ग्रंथ तशा योग्यतेचा झाला नाहीं. कांहीं भागांचें भाषांतर बरें आहे, तर कांहीं अगदीं वाईट आहे. भाषांतरकारांमध्यें एकाचा दुसऱ्याला मेळ नव्हता. एकंदर ग्रंथावरून उपसंहारामध्यें अनेक गोष्टींचें तात्पर्य काढतांना हा भाषांतराचा अ-मेळ घोटाळयास कारण झाला आहे. हरिवंश या भागाची प्रस्तावना वाचतांना ती मोडक यांसारख्या अलीकडल्या काळांतील विद्वानाच्या लेखणींतून कशी निपजली, याचें आश्चर्य वाटतें. आजमितीस एखाद्या लहान पोरालाही ज्या गोष्टी खोट्या, कल्पनामय आणि हास्यास्पद वाटतील, त्यांचें या प्रस्तावनेंत समर्थन केलें आहे; आणि तें करितांना त्या गोष्टी ज्यांना असत्य वाटतात, त्यांचेवर तोंडसुख घेतलें आहे! त्यांतले त्यांत शेवटचा उपसंहार रा० च० वैद्य यांच्या हातून निपजला, हें चांगलें झालें. या उपसंहारांत सर्व महाभारताचें नवीन दृष्टीनें निरीक्षण करून नवीन विचाराच्या अनेक गोष्टी वाचकांपुढें मांडल्या आहेत. यांतही पाल्हाळ, असंबद्धता, पौराणिक गोष्टींचें समर्थन, मतभेदावर उगाच वादविवाद हे प्रकार आहेतच. तथापि हा उपसंहार एकंदरींत मराठींतला चांगला ग्रंथ झाला आहे. मात्र भाषेच्या संबंधानें या ग्रंथाला बरेंच खालच्या प्रतींत ढकलावें लागेल, असें मोठ्या दिलगिरीनें म्हणावें लागत आहे.

*संस्कृत भाषेचा व्यासंग आमच्या मंडळींकडून इतके दिवस होत* असून संस्कृतांतल्या उत्तम ग्रंथांचीं मराठींत अंशतः तरी भाषांतरें

निपजू नयेत, ही दु:खाची गोष्ट आहे. बाकी याचा दोष एकदर समाजाकडे अथवा त्यातील धनिक लोकाकडे पुष्कळसा आहे. आश्रयाच्या अभावीं ही गोष्ट होणें कठीण आहे. संस्कृतातील सुदर ग्रथ उपनिषदें यांचेंही मराठींत भाषातर नाहीं. ब्रह्मसूत्रें, भगवद्गीता आणि त्यावरील निरनिराळीं भाष्यें यातील एकाचेंही मराठींत भाषातर झालें नाहीं. या ग्रथाना परमपूज्य मानणारे आणि ते जवळ ठेवून त्यावर गधपुष्प वाहाणारे लोक पुष्कळ आहेत. परतु त्यात काय आहे हें समजून घेण्याची कोणाला फारशी आस्था नाहीं. अशा ग्रथावर, ज्यातून सार भूत असें काय काढून घ्यावें हें साधारण लोकाना मुळींच कळणार नाहीं, असें भाराभर वाङ्मय विपुल आहे आणि तें लिहिण्यामध्यें चागल्या विद्वानानीं आपला वेळ व्यर्थ खर्चिला आहे. बडोदेसरकारान कित्येक उपनिषदाचें भाषातर श्रीयुत मोरो रानडे याकडून करविलें आहे. शिवरामपत पराजपे यानीं तर्कभाषा आणि त्यावरील टीका याच्या भाषातराचें एक चागलें पुस्तक मराठींत लिहिलें आहे. बडोदें सस्थानच्या आश्रयानें वासुदेवशास्त्री अभ्यकर आणि प्रो० चादोरकर याच शाकर भाष्याचे भाषातर झालें आहे. या भाषातराला मराठी भाषेचा ग्रथ असें थोडेसें तरी स्वरूप आहे. सस्कृतातून मराठींत ग्रथ आणताना मूळचा संस्कृत ग्रथ बाजूला राहून त्याचें मराठींतल चागलें स्वरूप पुढें यावें, असें होत नाहीं. तसा ग्रथ होतो तो सस्कृताची छाया म्हणून होतो.

सस्कृतातील पुराणादिकाच्या आधारानें मराठींत कित्येक चागले ग्रथ झाले आहेत. जगद्धितेच्छूचे मालक गोंधळेकर यानीं काहीं वर्षांपूर्वी भारतसार म्हणून एक चागला ग्रथ तयार करवून छापविला होता. द्रविड याच भारतामृत, रामकथामृत आणि कौरवपाडवाचा इतिहास हीं पुस्तकें चागलीं आहेत. वैद्य याचा रामचरित्र आणि कृष्णचरित्र हीं चागलीं पुस्तकें आहेत. केसरीचे माजी सपादक लिमये यानीं भारतीययुद्ध, भारतीय उपकथा इत्यादि कित्येक चागलीं पुस्तकें लिहिलीं आहेत. लिमये याची भाषासरणी

चांगली आहे. जामदार यांचें तुळशीदासकृत हिंदी रामायणाचें भाषांतर चांगलें झालें आहे.

संस्कृतांतील जुन्या नव्या वेदकालीन आणि पौराणिक वाङ्मयाच्या आधारानें आणि बौद्ध व जैन धर्मांतील गोष्टी आणि इतर वाङ्मय यांच्या आधारें मराठींत सुंदर, बालबोध आणि मनोरंजक, आबालवृद्धांस आणि स्त्रियांस वाचावयास योग्य असें सोपें वाङ्मय हवें तेवढें उत्पन्न होण्याजोगें आहे. इंग्रजींत अशा प्रकारचें पौराणिक वाङ्मय पुष्कळ आहे. मराठीमध्यें तसें वाङ्मय तयार करितांना त्यांतील जुन्या समजुतीचे, पोरकट, अद्भुत, असंभाव्य भाग काढून टाकले पाहिजेत अथवा त्यांना नवीन प्रकारचें स्वरूप दिलें पाहिजे, परंतु हें काम चांगले शोधक आणि जुन्या गोष्टींचा उगाच खोटा अभिमान न धरणारे लेखक यांच्या हातून झालें पाहिजे.

**वाङ्मयविषयक चिकित्सा, टीका आणि पुस्तकपरीक्षणें:—** अर्वाचीन गद्यवाङ्मयास आरंभ झाल्यानंतर लौकरच पुस्तकपरीक्षणें आणि नवीन ग्रंथांवर टीका यांना आरंभ झालेला दृष्टीस पडतो. विविधज्ञानविस्तार आणि दंभहारक यांत पुस्तकपरीक्षणें येऊं लागलीं. आरंभीं पुस्तकपरीक्षण लिहिणारे टीकाकार मुख्यतः हरीपंत पंडित होत. यांची टीका मार्मिक असे, परंतु तिच्यामध्यें खरमरीतपणा विशेष असे, आणि ग्रंथकाराचा पाणउतारा करण्याचें पंडितांचें धोरण असे. आरंभीं टीका वर्तमानपत्रांत व मासिकपुस्तकांत येत. सध्या तसाच प्रकार सुरू आहे. परंतु सांप्रत परीक्षणांची आणि टीकांची मुख्य जागा मासिकपुस्तकें ठरली आहे. जुन्या शालापत्रकांत कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनीं कांहीं टीका लिहिल्या आहेत. त्यांमध्यें दादोबाच्या व्याकरणावरील टीकात्मक निबंध मुख्य होत. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं मेकालेच्या नमुन्यावर टीका व परीक्षणें लिहिण्यास सुरवात केली. मेकालेचा नमुना असा आहे कीं, पुस्तकावर टीका करून शिवाय त्यामध्यें जी उणीव दिसेल ती आपण पुरी करावयाची. मेकाले मोठा विद्वान्, बहुश्रुत आणि मार्मिक टीकाकार होता. त्याचें

इतिहास आणि वाङ्मय यांचें ज्ञान विस्तृत होतें, यामुळे त्यांचीं परीक्षणें इंग्रजी वाङ्मयातील उत्तम निबंध ठरलेले आहेत. तसाच प्रकार विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं सुरू केला. मेकॉलेच्या वेळचें इंग्रजी वाङ्मय आणि चिपळूणकर यांच्या वेळचें मराठी वाङ्मय यामध्यें मात्र मोठा फरक होता. मेकॉलेच्या वेळचें इंग्रजी वाङ्मय चांगलें नावारूपास आलेलें असून, त्या वेळचे ग्रंथकार योग्यतेनें मेकॉलेच्या बरोबरीचे होते. मराठी वाङ्मय अगदीं बाल्यावस्थेंत असून ग्रंथकार थोडे आणि वाङ्मयाच्या प्रसारास आणि ग्रंथप्रकाशनास अडचणी फार होत्या. यामुळें मराठी पुस्तकपरीक्षणें जास्त कडक आणि नवीन ग्रंथलेखकांना निरुत्साहकारक झालीं. असाच प्रकार अद्यापिही चालू आहे. आमच्या परीक्षणाची व टीकाची दिशा अजून नीट ठरलेली नाहीं. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं आपल्या मालेंत 'ग्रंथावरील टीका' म्हणून कांहीं लेख चांगले लिहिले आहेत. माथ्यू आर्नोल्ड या प्रख्यात इंग्रजी टीकाकाराचें वाङ्मयविषयक टीकेचें मुख्य धोरण भाषा व विचार यांपैकीं जें जें उत्तम असेल त्याचा पुरस्कार करणें, हें असे. ही व्याख्या जरी सर्वमान्य धरली नाहीं, तरी प्रथमतः परीक्षण किंवा टीका सौम्य आणि नवीन लिहिणारांना उत्साहकारक पाहिजेत. मराठी वाङ्मयात ग्रंथ होण्यास साधनें कमी, ग्रंथाची गरज कोणास नाहीं, आणि वाचकही वेताचेच. लेखकांनीं केवळ स्वताच्या हौसेनें ग्रंथ लिहून ते स्वताच प्रसिद्ध करावयाचे, अशी स्थिती आहे. तेव्हां टीकाकारांनीं ग्रंथप्रसारास उत्तेजन मिळेल असेंच धोरण ठेविलें पाहिजे. यावरून अयोग्य व वाईट प्रयास नाव ठेवू नये असें नाहीं ज्यामुळें वाङ्मयाचें नुकसान होईल अशा ग्रंथातील दोष दाखवावे, परंतु ते सौम्यपणें दाखवावे आमचे टीकाकारही पुष्कळ वाचन केलेले, बहुश्रुत व मोठ्या योग्यतेचे असतात असें नाहीं. खुद्द निबंधमालाकार यांना 'आपण मोरोपंतावरील निबंध केवळ नवनीतातील मोरोपंतांची कविता वाचून लिहिला,' असें ओक यांनीं कबूल करावयास लाविलें हे प्रसिद्धच आहे. एकाद्या ग्रंथकारानें हौसेनें एकाद्या आवडत्या विषयाचा कित्येक वर्षें अभ्यास करून ग्रंथ लिहावा, आणि त्यावर उगाच सामान्य माणसा-

चांगली केली आहे. वाङ्मयविषयक चर्चा आणि त्याबरोबर प्राचीन इतिहाससंबंधीं विचार यासंबंधानें प्रो० भागवत यांचीं *मराठ्यांविषयीं चार उद्गार*, *संस्कृत भाषेची विचिकित्सा* आणि *प्राकृत भाषेची विचिकित्सा* हीं पुस्तकें आणि *विविधज्ञानविस्तारांत* प्रसिद्ध झालेले *पंचजन विचार* वगैरे निबन्ध मोठ्या शोधक बुद्धीनें लिहिलेले आहेत. दादोबांनीं आपल्या व्याकरणास *प्रस्तावना* लिहिली आहे. ही संस्कृत शब्दप्रचूर आणि फार प्रौढ भाषेंत आहे, पण असली भाषा विषयास साजेशी असून, हा मराठी भाषेंतला एक चांगला निबन्ध आहे.

वाङ्मयचिकित्सेवर वैद्य यांचे कित्येक निबन्ध प्रसिद्ध झाले आहेत. प्राचीन मराठी कवींचे ग्रंथ निर्णयसागरच्या काव्यसंग्रहांत प्रसिद्ध झाले. त्यांवर ओक आणि त्यांचे साह्यकारी पंडित, परांजपे वगैरे यांनीं लिहिलेलीं चिकित्सात्मक टिपणें उत्तम आहेत. हरी नारायण आपटे यांनीं *विदग्ध वाङ्मय*, *मराठी भाषेचा अभ्यास* हे अल्प पण सुंदर लेख लिहिले आहेत. मराठी साहित्यसंमेलनामध्यें अनेक चिकित्सापर लेख वाचलेले आहेत. ते बहुतेक संमेलनाच्या वार्षिक वृत्तांतांत प्रसिद्ध झाले आहेत. त्यांतले मुख्यतः कादंबऱ्या, नाटकें आणि मासिकपुस्तकें यांवरील टीकाविषयक लेख चांगले आहेत. इतिहाससंशोधक मंडळीचे चिकित्साविषयक लेख प्रसिद्ध होत असतात. यांमध्यें प्राचीन आणि अर्वाचीन इतिहाससंबंधीं गोष्टींवर टीका व त्यांची चिकित्सा असतेच; परंतु त्याबरोबरच लेखांची भाषाविषयक चिकित्साही झाली पाहिजे. मराठी प्राचीन कवी आणि गद्यलेखक यांच्या लेखांची चांगली मार्मिक चिकित्सा व्हावयास पाहिजे आहे. ती होण्यास त्यांचा अभ्यास सुरू असला पाहिजे, तो कोठेंही नाहीं. पुण्याच्या प्रार्थनासमाजांत भांडारकर, पटवर्धन वगैरे मंडळीच्या उद्योगानें *तुकारामाच्या अभंगांची चिकित्सा* कित्येक वर्षें चालू असून सुमारें बाराशे अभंगांचा विचार झाला आहे. परंतु ते प्रसिद्ध करण्याचें अजून कोणी मनावर घेत नाहीं. सांप्रत बहुतेक सर्व मासिकपुस्तकांतून चिकित्सात्मक लेख वारंवार येत असतात. विविधज्ञानविस्तारांत आलेले देव, कोल्हटकर, खरे, भिडे,

चाफेकर, आपटे, महाराष्ट्रीय इत्यादि लेखकाचे आणि विशेषतः ब्रह्मनाळकर याचे लेख चागले आहेत.

मोरोपतांचें विस्तीर्ण काव्य उत्तम रीतीनें प्रसिद्ध झाल्याचा उल्लेख मागें केलाच आहे. पराडकराच्या आवृत्तीतील निरनिराळ्या भागास जोडलेले उपोद्घात सुप्रसिद्ध लेखकानी लिहिले असून त्यामध्यें सामान्य चिकित्सा केली आहे, आणि यामुळें आता मोरोपताचा अभ्यास सर्वांना सुलभ झाला आहे. खुद्द मोरोपताच्या ग्रथाची विशेष चिकित्सा मात्र झाली पाहिजे. ती त्या काव्याचा चागला अभ्यास होण्यावर अवलबून आहे.

महाभारत आणि रामायण यावर मराठीमध्यें चिकित्साविषयक लेख बरेच आले आहेत आणि नेहमी येतही असतात. कालनिर्णयसबधी लेख अनेक आले आहेत. परतु ते निर्णय अजून ठरले नाहींत, यामुळें त्याच्यासबधानें काहींच म्हणता येत नाहीं. महाभारतावरील मुख्य टीकात्मक लेख म्हणजे भाषातराच्या भागाच्या प्रस्तावना व उपसहार हे होत. रामायणातील गोष्टींवर म० गो० अभ्यकर यानीं कित्येक चिकित्सात्मक लेख लिहिले आहेत. अलीकडे लोकशिक्षण मासिक पुस्तकामध्यें 'महाराष्ट्रीय' यानें रामायणावर चागले चिकित्सात्मक लेख लिहिले आहेत.

निबंधलेखन —मराठात स्वतत्र ग्रथ प्रसिद्ध होण्याची सोय नसल्यामुळें प्रथमपासून निबधलेखनाकडे प्रवृत्ती विशेष आहे. हे निबध सर्व प्रकारच्या उपयुक्त व ज्ञानवर्धक विषयापासून साधारण मनोरजक विषयापर्यंत सर्व गोष्टींवर लिहिलेले आहेत ते पुष्कळ आहेत. 'वाङ्मयसूची' च अवलोकन केल असता निबधवाङ्मय केवढे विस्तृत आहे हें कळून येईल. निबध वर्तमानपत्र आणि मासिक पुस्तकें यातून प्रसिद्ध होऊ लागले, पण साप्रत ते मासिकपुस्तकातून फार येतात. निबध प्राय: पारितोषिक मिळविण्याच्या आशेनें फारसे कोणी लिहीत नाहीं. केवळ स्वभाषेत लिहिण्याच्या हौसेनेंच पुष्कळ निबध लिहिलेले आहेत. अगदीं आरभीं लोकहितवादी यानीं नाना विषयावर पुष्कळ निबध लिहिले आणि त्याना निबधरूपी वाङ्मयाचा उत्कृष्ट पाया घातला.

यांनीं पेशवाईंतली आणि इंग्रजीच्या आरंभींची लोकस्थिती, गृहस्थिती, लोकांच्या समजुती व अंधपरंपरेचे आचारविचार यांवर स्पष्टपणें टीका केली. ते गृहस्थ बहुश्रुत आणि माहितगार असल्यामुळें त्यांचे निबंध लोकशिक्षण आणि लोकरंजन यांना साह्यकारक झाले आहेत. त्यांच्याप्रमाणें कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनीं कित्येक निबंध लिहिले. अनेक विद्यामूलतत्त्वसंग्रह या पुस्तकांत त्यांचे निबंध छापले आहेत. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं निबंधलेखनास प्रौढ, मनोरंजक असें निराळेंच वळण लाविलें, हें मागें सांगण्यांत आलेंच आहे. विष्णुशास्त्री यांच्या वेळापर्यंत इंग्रजी विद्येचा प्रसार पुष्कळ होऊन त्या वेळच्या सुशिक्षीत मंडळीस तिकडलें आणि आपलें वाङ्मय यांतील तारतम्य कळूं लागलें होतें. खेरीज चिपळूणकर हे मार्मिक लिहिणारे, मराठी भाषेवर त्यांचें उत्तम स्वामित्व आणि त्यांना इंग्रजींतून मराठीमध्यें विचार आणण्याची हातोटी हे गुण साध्य होते, यामुळें त्यांचे लेख 'खोल, पीळदार आणि चपेटदार' आहेत; आणि ते वाचीत असतां वाचकाचें मन तन्मय होतें. चिपळूणकर यांचे निबंध मुख्यतः टीकाविषयक आणि वाङ्मयचिकित्साविषयक आहेत. त्यांनीं राजकीय आणि सामाजीक विषयांवरही निबंध लिहिले आहेत. लोकांचें सामाजीक वर्तन आणि नवीन सुशिक्षितांमध्यें आलेले पाश्चात्य विचार यांच्यावर त्यांचा मुख्यतः कटाक्ष असे. चिपळूणकरांनीं आपल्या भाषेंतील निबंधलेखनास लावलेलें वळण इतर निबंधकारांच्या परिश्रमानें सुधारत जाऊन आजमितीस आमच्या भाषेमध्यें निरनिराळ्या विषयांवर अनेक चांगले निबंध लिहिले जात आहेत.

चिपळूणकरांच्या बरोबर—थोडे मागून—आगरकर झाले. त्यांची भाषा जरी चिपळूणकरांच्या इतकी चित्तवेधक आणि ओघाबरोबर घेऊन जाणारी नाहीं, तरी त्यांचा स्वाभिमान, खरी स्वदेशप्रीती, आपल्या कल्याणाची कळकळ आणि अंतःकरणाचा उघडेपणा यामुळें त्यांचे लेख परिणामाच्या दृष्टीनें चिपळूणकरांच्यापेक्षां फार सरस आहेत; आणि त्यांचे विचार चिरकाल टिकणारे आहेत. या वेळीं आणि यानंतर पुष्कळ दिवस मुंबईंत विनायकराव ओक यांनीं निबंधलेखनाचें काम

सारखे पुष्कळ वर्षे चालविले. त्याच निबंधलेखन फार विस्तृत आहे. त्याचे निबंध बाल्बोध, सोप्या भाषेत लिहिलेले असून माहितीनें परिपूर्ण आहेत. याच्या निबंधांची हिंदुस्थानकथासार, मधुमक्षिका, प्रपंचरहस्य, महाराष्ट्रवाङ्मय, मुलास उत्तम बक्षीस, वगैरे लहान मोठी अनेक पुस्तकें झाली आहेत. बाल्बोध मासिकपुस्तक ते पुष्कळ वर्षे काढीत होते. या निबंधकारानीं मराठीची चांगलीच कामगिरी केली आहे. सुरुईंत प्रथमारंभींच्या निबंधकारांत भाऊ महाजन हे नागपुराकडील एक लेखक झाले. हे त्या वेळच्या मासिकपुस्तकांतून आणि वर्तमानपत्रांतून चांगले लेख लिहीत असत. विद्यमान निबंधकारांत राजकीय, सामाजीक आणि टीकाविषयक विविध विषयांवर चांगले लिहिणारे प्रमुख निबंधकार टिळक, विजापूरकर, महाजनी, केळकर, आठल्ये, शिवरामपंत परांजपे, वैद्य, पाध्ये, कोल्हटकर, प्रो० लिमये, प्रधान, आगाशे, हे आहेत यांपैकी कांहींचे लेख स्वतंत्र पुस्तकरूपानें प्रसिद्ध झाले आहेत. मराठींत विषयाविषयावर स्वतंत्र पुस्तकें होऊं लागतपर्यंत निबंधलेखना वरच भिस्त आहे आणि त्यावरच भाषासंवर्धनाचें व लोकशिक्षणाचें काम भागवून घ्यावयाचें आहे. यामुळे निबंधाला विशेष महत्त्व आहे. दाभोळकर यांचे शास्त्ररहस्य आणि निबंधरत्नमाला हे निबंधमय चांगले ग्रंथ आहेत. वासीकर यांचा वाचन म्हणून एक चांगला निबंध आहे.

**मनोरंजक वाङ्मयः**—मराठीमध्यें निबंधवाङ्मयाच्या खालोखाल मनोरंजक वाङ्मय आहे. विषयाच्या मानानें निबंधवाङ्मय श्रेष्ठ असावयाचेंच. पण परिमाणाच्या मानानें मनोरंजक वाङ्मय फार आहे, आणि त्याची वाढ निरंतर चालू आहे, व ती कांहीं दिवस तरी तशीच चालू राहील. पाश्चात्य देशांतून केवळ मनोरंजनार्थ काढलेलीं अनेक साप्ताहीक आणि मासिक पत्रकें आणि पुस्तकें असतात. त्यांचा मनोरंजनाच्या द्वारें लोकशिक्षणाचा प्रसार करण्याचाही उद्देश असतो. आमच्या इकडे असे प्रयत्न झालेले आहेत. हरीभाऊ आपटे आणि रा० भि० कुळकर्णी यांचें करमणूक हें अशा तऱ्हेचें साप्ताहीक पत्र

बरेच वर्षे चाललें होतें. त्यांत मनोरंजक आणि ज्ञानवर्धक असे बरेच लेख येत. हरीभाऊंचे सर्व प्रबंध प्रथमतः यांतच प्रसिद्ध झाले. यांतील पुष्कळ चांगले लेख पुस्तकरूपानें निराळे प्रसिद्ध झाले आहेत. करमणुकीची भाषा चांगली असे आणि तें पत्र लोकप्रिय होतें. त्याचप्रमाणें मनोरंजन या नांवाचें मासिक पुस्तक आपटे, गोविंदराव कानिटकर आणि त्यांच्या पत्नी काशीबाई यांनीं चालविलें होतें. त्याला पुढें निबंधचंद्रिका मासिक पुस्तक जोडलें होतें. त्यांत मुख्यतः गोष्टी येत. नाट्यकथार्णव आणि कादंबरी कलाप हीं या प्रकारचीं मासिक पुस्तकें होतीं. यांमध्येंही कित्येक चांगलीं नाटकें आणि प्रबंध प्रसिद्ध झाले. यांचे लेखक मुख्यतः शं० मो० रानडे, प्रो० वासुदेवराव केळकर व श्री० भि० सरदेसाई हे होते. ही मंडळी नांवाजलेले मराठी लेखक असल्यामुळें या पुस्तकांच्या द्वारें भाषाघटनेस पुष्कळ साह्य झालें आहे. सध्या चालू असलेल्या बहुतेक मासिक पुस्तकांचें पूर्व स्वरूप लोकरंजन हेंच आहे. त्यांमध्यें सांप्रत इतर लौकिक विषयांवरही लेख येतात. यांत येणारे मनोरंजनपर लेख मात्र नेहमीं भारदस्त व निर्दोष असतातच असें नाहीं. कित्येक वेळां तर कांहीं मासिकांतील गोष्टी अगदीं पोरकट, गचाळ आणि असभ्य असतात. या मासिक पुस्तकांपैकीं कांहींत अलीकडे चांगले लेखक जास्त लिहूं लागले आहेत, यामुळें त्यांचें केवळ मनोरंजनाचें धोरण सुटून त्यांस भारदस्त स्वरूप येत आहे, हें चांगलेंच आहे.

कादंबऱ्या, नाटकें आणि लहानसान गोष्टी हें मनोरंजक वाङ्मय होय. कादंबरीमध्यें गोष्ट सांगावयाची असते आणि तिचा कालावधीही हवा तेवढा धरितां येतो. नाटक हें रंगभूमीवर प्रत्यक्ष पात्रें आणून संवादरूपानें करून दाखवावयाचें असतें, यामुळें मूळ गोष्टीचा कालावधी कितीही लांब असला, तरी एकेक प्रसंग लहान लहान कल्पावा लागतो. मराठीमध्यें प्रथमतः नाटक सुरू झालें. आमच्याकडे अगोदर संस्कृतांत नाटकें होतीं, त्यांचीं भाषांतरें आरंभींच मराठींत झालीं, आणि यामुळें त्यांची परंपरा सुरू राहून तींत इंग्रजी नाटकांच्या अनुकरणाची भर पडली. नाटक कसें असावें,

रंगभूमी कशी सजवावी, पात्राच्या अंगीं गुण कसे हवेत, नाटकाची एकंदर रचना दृश्य काव्य या दृष्टीनें कशी करावयास पाहिजे, वगैरे गोष्टींची चर्चा मनोरंजक आहे परंतु प्रस्तुत ग्रंथामध्यें केवळ वाचावयाचे ग्रंथ या दृष्टीनं नाटकाची चर्चा करावयाची असल्यामुळें या गोष्टी आमच्या प्रतिपादनाच्या मर्यादेंत येत नाहींत. कादंबरी लेखनावर भाटे यानीं आपल्या वाचनाच्या निबंधात चांगली चर्चा केली आहे. ही विशेषत इंग्रजी कादंबऱ्यावर दृष्टी ठेवून केली आहे. कादंबऱ्या आणि नाटक, त्याचप्रमाणें ल्हानसान गोष्टी यांच्या योगानें मनोरंजनाबरोबर नीतिबोध, शास्त्रीय शिक्षण, अनेक गोष्टींची माहिती, जगाचा अनुभव, संसारघटना, मनुष्यस्वभावाचें चित्र, वगैरे प्रकार साधता येतात चांगल्या कादंबऱ्या, नाटक अथवा गोष्टी लिहिणें हें काम सोपे नाहीं त्याला मनुष्य कल्पक व बहुश्रुत लागतो आणि शिवाय त्याच्या मनामध्यें एकादी विशेष कल्पना, विचार अथवा ध्येय असाव लागतें तसेंच गांभीर्य, विनोदीपणा, एकंदर जगाची आणि मानवी स्वभावाच्या निरनिराळ्या अंगाची माहिती, वाचकाचें मनोरंजन करून त्याचें अंत करण आपल्या नर्मीत गुरफटून घेण्याचें धोरण आणि त्यायोगानें वाचकाचे मनावर आपल्या ध्येयाचा पगडा बसविण्याचें कौशल्य हे गुण अनुकूल पाहिजेत परंतु नुसती कथा लिहीत जावें, मग ती जिकडे झुकेल तिकडे झुकेल, अशी साधारण समजूत असल्यामुळें हवा तो कथा लिहितो, तिच्या प्रसिद्धीस मासिकपुस्तकांत जागा मिळते, आणि यामुळें हें वाङ्मय विपूळ झालें आहे

**प्रबंध, नवलकथा आणि कादंबऱ्या** —कल्पित नवलकथा किंवा प्रबंध यास कादंबरी हें नाव रूढ झालें आहे. यासाठीं या विवेचनात तोच शब्द कायम ठेवू गोष्टी सांगण्याची आणि त्याच्याद्वारें मनोरंजन किंवा बोध करण्याची सर्व राष्ट्रांत आणि सर्व लोकांत अगदीं जुनी चाल आहे. सध्या कादंबरीचें स्वरूप असें झालें आहे कीं, तीमध्यें कल्पित कथा असते तिला क्वचित् दंतकथेचा अथवा ऐतिहासीक गोष्टीचा आधार असतो एक नियमीत काळ कल्पिला असतो आणि

मग त्या काळाला अनुरूप अशी कथा रचून तींत नीतिबोध, त्या वेळची लोकस्थिती, संसारांतले नानाप्रकारचे प्रसंग व त्यांचे बरेवाईट परिणाम आणि अनुभव, नामांकित पुरुषांचीं चरित्रें, त्यांचे लोककल्याणाचे अथवा एकादी गोष्ट साध्य करून घेण्याचे उद्योग, वगैरे गोष्टी आणलेल्या असतात. यामुळें कादंबऱ्यांना वाङ्मयांत उच्च स्थान असतें. छापण्याची कला नव्हती, तेव्हां कथा लहान असून त्या तोंडीं सांगत आणि कोणी त्या लिहून ठेवीत. क्वचित् त्यांना काव्याचें स्वरूप येऊन त्या लांबही असत. छापखान्यांची सोय झाल्यावर सर्व देशांतून कथा पुष्कळ होऊं लागल्या. इंग्रजी भाषेत कादंबऱ्या लिहिण्याची तऱ्हा फार उच्च दर्जाला पोंचली आहे आणि ह्या भाषेत केवळ मनोरंजक गोष्टी आहेत असें नाहीं; तर, तत्त्वज्ञानासारख्या गहन विषयांवर आणि धार्मिक पंथ व व्यवहारांतील नानाप्रकारचीं मतें स्थापन करणें, अथवा त्यांचा प्रसार करणें, यांवरही कादंबऱ्या आहेत. यामुळें अर्थात त्यांचे केवळ मनोरंजक स्वरूप असतें असें नाहीं, तर त्यांत गंभीर व तात्विक विषयांचेंही प्रतिपादन असतें. आमच्या इकडे दंतकथा प्राचीन काळापासून आहेत. बौद्धधर्मांत तर नीतिबोधाच्या कामीं त्यांचा फार उपयोग केला आहे. संस्कृतामध्यें कल्पितकथांना पौराणीक आख्यानांचें स्वरूप आहे. कांहीं अर्वाचीन प्रबंधांसारखीं बाणाची कादंबरी, दंडीचें दशकुमार चरित्र, सुबंधूची वासवदत्ता, वगैरे ग्रंथ झाले आहेत. जुन्या मराठी वाङ्मयांत यांची आख्यानांच्या पुढें प्रगती झाली नाहीं. याचीं दोन कारणें दिसतात. एक, आमच्या लोकांना निवळ माणसांच्या कथांनीं मनोरंजन करणें बरें वाटत नसे. देवादिकांच्या कथांनीं धर्मप्रसार, नीतिबोध आणि मनोरंजन हीं तीनही एकदम साधून येत. दुसरें कारण असें कीं, या असल्या प्रकारच्या वाङ्मयाच्या प्रसाराचीं सुलभ साधनें नव्हतीं. मराठी कवींनीं काव्यरूपानें सोप्या ओवीवृत्तामध्यें पौराणीक आख्यानें पुष्कळ लिहिलीं, त्यांचा मनोरंजक गद्यकथांच्या ऐवजीं उपयोग होत असे. इंग्रजी अंमल सुरू झाल्यावर कादंबऱ्यांची नवीन तऱ्हेवर रचना होऊं लागली. ही रचना आतांपर्यंत फार वाढली आहे. कादंबऱ्या, लहानमोठ्या सुरस आणि चमत्कारिक गोष्टी व कथा हीं मराठींत एक-

सारखी प्रसिद्ध होत आहेत. बहुतेक मासिकपुस्तकात मुख्य स्थान याना असून शिवाय अनेक 'पुस्तकमाला' ही नित्य ग्रथित होत आहेत. या कथामध्ये ज्याच्या योगानें वाङ्मयाच्या घटनेस साह्य झालें आहे अशा फार थोड्या असतात. कोणी तरी लिहिलेल्या, एखाद्या चागल्या कादबरीच्या अनुकरणाने झालेल्या, आणि निरनिराळ्या कादबऱ्यातला इकडला भाग तिकडे व तिकडला इकडे करून, नाव व प्रसग फिरवून आणि अन्य फेरफार करुन रचलेल्याच पुष्कळ. त्यात काहीं थोडे दिवस जीवित राहून त्या नष्ट होतात. चागल्या टिकण्यासारख्या कादबऱ्या थोड्याच आहेत. कादबरीच नेहमींच स्वरूप म्हटले म्हणजे एखादा नायक आणि नायिका घेऊन त्याचा प्रणय कल्पावयाचा, काहीं दिवस त्याचा सुयोग कल्पून मग त्याचा वियोग करावयाचा, त्यामध्य त्यावर सकटें आणावयाची, दुष्टानीं त्याचा छळ करावयाचा, मग त्यातून त्याची सज्जनाच्या साह्यानें सुटका झाली असे कल्पून त्यास सुखात आणून सोडावयाचें. कादबरीत मुख्य पात्रें बहुधा चागली अशीं करिपलीं असतात. परतु त्यात वाईट गोष्टींचही वर्णन असतेंच, यामुळे कच्चा अशा प्रथाच्या वाचनान वाचकाच्या मनावर केवळ चागल्या गोष्टींचा ठसा न उमटता त्याची वाइटाकडही प्रवृत्ती होत्ये. आमच्या इकडे रेनाल्डच्यासारख्या अथवा रहस्यासारख्या दुष्ट कादबऱ्या फारशा झाल्या नाहींत, म्हणून तशा प्रथाच विवरण येथे करीत नाहीं. तसच आमच्या कादबऱ्यामध्य दु खान्त फारशा नसतात. बहुतेक सुखान्तच असतात.

कित्येक कादबऱ्या अद्भुत असतात. म्हणजे त्यामध्यें आकस्मीक आणि अगदीं क्वचित् घडणाऱ्या प्रसगाचें वर्णन असत कित्येक वेळा अशक्य गोष्टी घडल्याच आणि केव्हा अतिशयोक्तीचही वर्णन असतें. असल्या कादबऱ्या मराठींत प्रथमारभा झाल्या. आता फारशा होत नाहींत. सध्या ऐतिहासीक आणि सामाजीक किंवा ससारीक कथावर भर आहे. ऐतिहासीक कादबरी म्हणजे एखादा घडलेला खरा प्रसग किंवा इतिहासप्रसिद्ध पुरुष घेऊन त्याच्या भावती एखादी गोष्ट घडली म्हणून कल्पावयाचें; ती गोष्ट शोभविण्यासाठीं

नानाप्रकारचे मनोवेधक प्रसंग कल्पावयाचे. परंतु मूळच्या प्रसंगाच्या वर्णनांत अथवा ऐतिहासीक पुरुषाच्या चरित्रांत, त्या प्रसंगाचें अथवा पुरुषाचें स्वरूप फिरेल असा फेरफार करावयाचा नाहीं. अशा कादंबरींत घेतलेला प्रसंग आणि पुरुष प्रख्यात असला म्हणजे कादंबरी लोकप्रिय होते; आणि ज्यांतले प्रसंग आपल्यास हवे तसे कल्पितां येतील अशा खोट्या गोष्टीपेक्षां ती लोकांना नीतिबोध करण्यास अथवा एकादें प्रमेय त्यांच्या मनावर ठसविण्यास अधीक उपयोगी पडते. परंतु ऐतिहासीक कादंबरी रचण्यास बरेंच कौशल्य लागतें. वास्तवीक तीमध्यें मूळचा इतिहास फिरविणें किंवा केवळ ऐकींव किंवा मानीव, खऱ्या न ठरलेल्या, गोष्टींवर विश्वसणें योग्य नसतें. ऐतिहासीक नायकाचा स्वभाव फिरविला तर अगदींच विघाड होऊन वाचकाची भलतीच समजूत होते. ग्रंथकार एकाद वेळ खऱ्या इतिहासाचा नीट शोध न करितां अथवा लोकप्रियता संपादण्याचे नादानें इतिहासाकडे दुर्लक्ष करून केवळ दंतकथेच्या आधारें कथा रचून ऐतिहासीक पुरुषाचें महत्व कमी करितो. अशा चुका चांगल्या ग्रंथकाराकडूनही होतात. आपण हरीभाऊ आपटे यांच्या उ:काल या उत्तम कादंबरीचेंच उदाहरण घेऊं. हीमध्यें शिवाजीच्या राज्यस्थापनेच्या आरंभाची कथा मुख्य आहे. तिच्या जोडीला आणखी दोन कल्पित कथानकें आणलीं आहेत. पण वाचकाचें अवधान शिवाजीकडेसच असतें. शिवाजी शूर, धाडसी, दयाळू, देशाभिमानी, धर्माभिमानी, कारस्थानी असा दाखविला असून त्यानें आपला देश मुसल्मानांच्या हातून सोडवावा व लोकांना जुल्मांतून मुक्त करावें म्हणून आटोकाट प्रयत्न केल्याचें वर्णिलें आहे. तसें करितांना शिवाजीच्या गुणांच्या द्योतक अशा ज्या गोष्टी कल्पिल्या आहेत, त्या शोभण्यासारख्या आहेत, आणि त्यांच्या योगानें कथेचा परिपोष होतो. परंतु एकंदर कथा वाचून असें वाटतें कीं, शिवाजीनें स्वयंस्फूर्तीनें कांहीं केलें नाहीं. तो केवळ निमित्तमात्र असून मराठी राज्यस्थापनेचें सारें श्रेय रामदास आणि त्याचे शिष्य यांना आहे. शिवाजीच्या हातून जें घडलें तें रामदासासारख्या तपस्वी पुरुषाच्या प्रभावानें, अनुग्रहानें आणि प्रसादानें घडलें! ज्या पुरुषानें आपलें

शीर हातावर घेऊन आणि नाना प्रकारचीं संकटें सोसून एवढें मोठें देशकार्य केलें, त्याची एकाद्या गोसाव्याच्या शिष्याच्या हातांतल्या बाहुल्या इतकीच योग्यता कीं काय? सध्या लोकांमध्यें अशा प्रकारची दृढ समजूत आहे तिला आधार नाहीं. यत्कश्चित् कुळव्याचा पोर शिवाजी; त्याचे हातून काय होणार होतें ! ब्राह्मण साधूचा वरदहस्त मस्तकीं होता म्हणून सर्व घडून आले असें समजतात. यात खरेपणा किती आहे, हें नीट तपासून मग या गोष्टीचा ग्रथांत उपयोग करणें, हे हरीभाऊसारख्या ग्रथकारास उचित होतें. दुसरा प्रकार सामाजीक कादंबरी. हीमध्यें आपल्यास पाहिजे तरी नित्यांतली गोष्ट कल्पून तिच्या योगानें मनोरंजन आणि नीतिबोध करून परिणामाच्या दृष्टीनें शहाणपण शिकवावयाचें. यावरोवर समाजातील चालीरीतींचे गुणावगुणही कळतात. तिसरा प्रकार आपल्यास ह्वा तसा जुना नवा काळ घेऊन आणि कल्पित पात्रें घेऊन एकादें प्रमेय शिकवावयाचें. यामध्यें चालू सामाजीक गोष्टी, जुन्या काळच्या गोष्टी अथवा इतिहास यातले अमुकच घ्यावयाचे असें नसतें. आपल्या उद्देशाप्रमाणे गोष्ट सजवून सांगावयाची असते. सांप्रत मराठींत तिन्ही प्रकारच्या कादंबऱ्या होत असतात.

अगदीं आरंभीं रिसबूडकृत 'मंजुघोषा' आणि 'विश्वासराव', हळबे याच्या 'मुक्तामाला' व 'रत्नप्रभा', आणि 'विचित्रपुरी', 'सुलोचना आणि माधव' वगैरे कित्येक कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या. केवळ भाषेच्यासंबधानें या बऱ्यापैकीं आहेत. या कादंबऱ्यापैकीं मुक्तामाला ही नामांकीत आहे. या आरंभींच्या कादंबऱ्याना ठरीव काळ नाहीं; वर्णनें असंभाव्य व अतिशयोक्तीनें भरलेलीं, केवळ मौजेकरिता आणलेले अयोग्य आणि आणि असभ्य प्रसंग फार, त्या लिहिण्यामध्यें विशेष हेतू नाहीं, यामुळें त्या नाराजण्यासारख्या नाहींत. रत्नप्रभेंत स्त्रीपुनर्विवाह घडविला आहे. विचित्रपुरीमध्यें भुतारोतासारख्या लोकभ्रमावर टीका आहे. सन्मार्गाचा जय आणि कुमार्गाची अधोगती हें तात्पर्य सर्वांत दाखविलें आहे. परंतु या आरंभींच्या कादंबरींतून मनोरंजक वर्णनें, सज्जनाचा छळ, वगैरे गोष्टींचा अतिरेक आहे. सुमारें १८७२ सालीं काशिनाथ बाळकृष्ण मराठे यांनीं मुंबईच्या ज्ञानप्रसारक सभेपुढें नाव्हलन

नाटक असा एक निबंध वाचला. त्यांमध्यें त्या वेळापर्यंत झालेल्या कादंबऱ्यांवर टीका करून त्यांतले गुणदोष दाखविले आहेत, आणि कादंबरींतील कथाभाग, भाषा आणि त्यांची रचना यांत कोणते गुण असावे याची चर्चा इंग्रजी ग्रंथांच्या साह्यानें केली आहे. यामुळें यापुढील काळांत झालेल्या कादंबऱ्यांत बरीच सुधारणा झाली असें दिसतें. त्यानंतर झालेल्या हंबीरराव आणि पुतळाबाई ही बंडाच्या धामधुमीची आणि नारायणराव आणि गोदावरी नामक सामाजीक कादंबरी, आणि गुंजीकरकृत मोचनगड ही शिवाजीच्या वेळची ऐतिहासिक गोष्ट, हीं पुस्तकें चांगलीं आहेत.

इंग्रजींत उत्तम कादंबऱ्या पुष्कळ आहेत, तेव्हां त्यांतून भाषांतर करून त्या घ्याव्या असें पुष्कळांस वाटूं लागलें. अन्य भाषेंतल्या आणि देशांतल्या कादंबऱ्या आणण्याचे तीन प्रकार आहेत. एक मूळचे पुरुष, स्थळें वगैरे यांचीं नांवें जशींच्या तशींच कायम ठेवावयाचीं, प्रसंग तेच ठेवावयाचे, फक्त वर्णनें मराठींत आणावयाचीं. अशा कादंबऱ्या लिहिणें सोपें. मात्र भाषांतर चांगलें झालें तर त्या लिहिण्याचा हेतू सफळ होईल. मूळ इंग्रजींतले कलम अथवा नियमीत वाक्यें वाचून त्याचा समग्र अर्थ चांगल्या मराठींत उतरून देणें अशी भाषांतराची पद्धत असावी. या योगानें अन्य देश आणि अन्य लोक यांच्या रितीभाती, लोकस्वभाव, वर्तनाचे प्रकार वगैरे गोष्टी आपणास कळून त्यांतून काय घ्यावें, काय न घ्यावें हें समजेल. अशा गोष्टी मूळ इंग्रजींतही पुष्कळांना वाचतां येतील. परंतु मूळ इंग्रजी ग्रंथ वाचून त्यांतलें इंगीत ज्यांना चांगलें समजेल असे लोक आपल्यामध्यें थोडे असतात. शिवाय चांगल्या ग्रंथांच्या भाषांतरांनीं स्वभाषेंतील वाङ्मय वाढेल हा लाभ होईलच. अशा प्रकारचीं कित्येक पुस्तकें मराठींत झालीं आहेत, त्यांमध्यें चिपळूणकरकृत रासेलस आणि आरबी गोष्टी, बर्वे यांचें ठगाची जबानी हीं उत्तमांपैकीं आहेत. गोविंदशास्त्री बापट यांचें हरी आणि त्रिंबक आणि दामले यांचीं अशीं कित्येक भाषांतरें झालीं आहेत. दुसरा प्रकार रूपांतर. यांत मुळांतले पुरुष, प्रसंग वगैरे सर्व आपल्या इकडल्याप्रमाणें कल्पून घ्यावयाचे. रूपांतर

करणें फार कठीण असतें. कारण पाश्चात्य देश आणि आपला देश यांमधील रितीभाती, समाजव्यवस्था, गृहस्थिती आणि विचार सर्वच भिन्न असल्यामुळें तिकडल्या गोष्टींबद्दल इकडल्या गोष्टी घालणें फार कठीण असतें. आधीं कादंबरी म्हटली म्हणजे नायक, नायिका, त्यांचा विवाह, त्यांचें प्रेम वगैरे गोष्टी असल्याच पाहिजेत, आणि स्त्रीपुरुषांच्या एकत्र वागणुकीचे प्रसंग घडले पाहिजेत. हे त्यांचे आणि आमचे प्रकार तर अगदींच भिन्न आहेत. आमच्यातले ब्राह्मणेतर वर्ण, राजेरजवाडे वगैरे यांमध्यें विवाह प्रौढपणीं होतात, यामुळें अशा लोकांतील पात्रें कल्पून कादंबऱ्या आणि नाटकें यांचीं रूपांतरें करण्याचे प्रयत्न कोणीं केले आहेत. पण तेही साधले नाहींत. कारण केवळ प्रौढविवाह कल्पिला कीं, तेवढ्यानें तिकडल्या रितीभाती इकडे येत नाहींत. आणखी अनेक गोष्टींमध्यें भिन्नपणा आहे. या गोष्टीही जुळवून घ्यावयाच्या असतात. कल्पक आणि कुशल लेखक असतां केव्हा असले प्रकार साध्य होतात. साधले तर इंग्रजींतल्या उत्तम कादंबऱ्या मराठींत उतरतां येतील. शंकर मोरो रानडे यांच्या **विलासिनी** आणि **मधुरा** या रूपांतरीत कादंबऱ्या चांगल्या साधल्या आहेत, पण त्या अपुऱ्याच राहिल्या आहेत. 'डान क्विझोट' या स्पेन-देशीय गोष्टीचें रूपांतर **रामभट आणि शिष्य बटो** व 'व्हिकार आफ् वेकफील्ड' याचें रूपांतर **वाईकर भटजी** हीं टिकेकर—(**धनुर्धारी**-)कृत रूपांतरें बरीं आहेत. रोमोलाचें जोशीकृत रूपांतर **केवळ स्वार्थापायीं** याची मूळची गोष्ट तात्त्विकविचारमय असून रितीभातींचा विशेष संबंध नसल्यामुळें मराठींत चांगली उतरतां आली आहे. आपटेकृत 'माणिकबाग' आणि 'दुसरा अंतीं सुरस' हीं अगदीं साधलीं नाहींत. 'प्राइड एन्ड प्रेजुडीस' या उत्तम इंग्रजी कादंबरीचें रूपांतर गोखले यांनीं पुष्कळ बऱ्यानीं आमचे इकडे घडतील असे प्रसंग कल्पून जरी केलें आहे, तरीही विलक्षण वाटतें. गोखले यांची गोष्टी लिहिण्याची—विशेषतः सामाजीक कथा लिहिण्याची—हातोटी चांगली आहे. त्यांचेकडून स्वतंत्र कादंबऱ्या चांगल्या निपजतील. तिसरा प्रकार इंग्रजींतील सामाजीक, ऐतिहासीक वगैरे कादंबऱ्यांचा केवळ

नमुना घेऊन तशा धर्तीवर रचना करणें. हा प्रकार चांगल्या लेखकांस केव्हांही साधेल. हरीभाऊ आपटे यांनीं हेंच धोरण ठेविलें आहे, आणि अशा नमुन्यावर मराठींत कादंबऱ्या होत आहेत.

मराठींत कादंबऱ्या लिहिण्याचें काम हरीभाऊ आपटे यांनीं उत्तम प्रकारें करून दाखविलें. त्यांच्या सात ऐतिहासीक आणि सात सामाजीक अशा कादंबऱ्या पुस्तकरूपानें प्रसिद्ध आहेत. त्यांची भाषा साधी असून उच्च प्रकारची आणि मनोवेधक असते. सर्व कादंबऱ्यांतून प्रसंग, पुरुष, त्यांच्या कृती व वर्तनें यांचा परिपोष चांगला केला असून प्रत्येकींत कांहीं तरी ध्येय आहे, आणि त्याच्या द्वारें वाचणारांस सुमार्ग दाखविला आहे. 'मी' ही तत्वविचारमय कादंबरी आहे. तींतील गोष्ट आणि आमच्या समाजांत सध्या चोहींकडे पसरलेले साधुसंत यांच्या वर्तनाची अवश्य तुलना करून पाहिली पाहिजे. यशवंतराव ही अशाच प्रकारची तत्वविचारमय कथा आहे. आपटे यांच्या कादंबरींतील संवाद, भाषणें, सृष्टीचीं आणि इतर प्रकारचीं वर्णनें अगदीं अनुरूप असतात आणि पाल्हाळही नसतो. गोष्टीच्या प्रशांत ओघाबरोबर तल्लीन वाचकांस घेऊन जाऊन मनावर कोणत्या तरी एकाद्या चांगल्या ध्येयाचा ठसा उठविणें हा जो असल्या पुस्तकांच्या वाचनापासून होणारा परिणाम, तो हरीभाऊंच्या कादंबरीच्या वाचनानें नेहमीं होतो. तसेंच असल्या मनोरंजक पुस्तकांच्या चांगलेपणाचा द्योतक असा गुण म्हटला म्हणजे श्रांत मनाला रंजन हवें असेल तेव्हां पुनःपुन्हा वाचल्या तरी त्यांचा कंटाळा येऊं नये, प्रत्येक वाचनाच्या वेळीं नवीन रुची वाटावी, हा आहे. हाही आपटे यांच्या कादंबऱ्यांत दिसून येतो. अलीकडे तयार होणाऱ्या कादंबऱ्या आपटे यांच्या नमुन्यावर असतात, तथापि रचनेच्यासंबंधानें त्यांच्या पुढें पाऊल पडण्याचें राहोच, पण त्यांचा किता मराठींत चालू झाला असेही अजून म्हणतां येत नाहीं.

कित्येक चांगल्या लेखकांनीं एकाददुसरी चांगली कादंबरी लिहिली, अशीं बरींच पुस्तकें झालीं आहेत. वैद्य यांची दुर्दैवी रंगू ही पाणिपतच्या युद्धाच्या वेळची गोष्ट चांगली आहे. जोशी यांची

रागिणी ही तत्वविचारमय गोष्ट मराठींत अगदीं नवीन आणि उत्तम झाली आहे. रागिणीमधील अखेरचा अद्भुत आणि असंभाव्य कथाभाग नसता तर ही मराठींतली पहिल्या प्रतीची कादंबरी ठरली असती. आश्रम हरिणी ही त्याची जुन्या कालस्थितीची दर्शक गोष्ट ही चांगली आहे. नारायण हरी आपटे यांच्या अजिंक्यतारा आणि ग्रहदशेचा फेरा या गोष्टी, गडकरी यांची सुधारणेचा मध्यकाल ही गोष्ट, हीं पुस्तकेंही चांगलीं साधलीं आहेत अनाथ पांडुरंग ही एक चांगल्यापैकीं ऐतिहासीक गोष्ट आहे. सांप्रत मराठींत नाना गोष्टी लिहिण्याचा सारखा सपाटा सुरू आहे त्यांतून पुढें चांगल्या गोष्टी म्हणून किती तगून राहातील, याचें अनुमान अजून कांहींच करितां येत नाहीं.

*बंगाली भाषेंत कादंबऱ्या लिहिण्याचें काम बरेंच उच्च स्थितीला* जाऊन पोंचलें आहे त्या भाषेंतील कित्येक चांगल्या कादंबऱ्या मराठींत आल्या आहेत. त्यांतल्या सुधा, नरेन्द्रनाथ, जीवनसंध्या, मृणालिनी, अमृतपुलिन, राजा तोडरमल, वगैरे सामाजीक व ऐतिहासीक कादंबऱ्या मुख्य आहेत.

आपटे यांनीं कादंबऱ्या लिहिल्या त्यापूर्वींच्या मराठींतल्या कादंबऱ्या अगदीं लहान असत त्यानंतरही विस्तृत कादंबऱ्या अगदीं थोड्या झाल्या आहेत. *केवळ एकादी मनोरंजक गोष्ट सांगितली की कादंबरी* झाली, अशी साधारण स्थिती आहे. कादंबरींत घडून आलेल्या सामाजीक, व्यावहारीक अथवा बोधपर गोष्टीवर टीका करून त्यांतलें सार किंवा तत्व काढण्याचें काम कोणी फारसें करीत नाहीं. 'गोष्ट पाहिजे, पण तें शेवटचें तात्पर्य नको' असें लहान मुलें म्हणतात, असाच प्रकार होऊन आपली गोष्ट कंटाळवाणी होईल कीं काय, अशी ग्रंथकारास भीती वाटते. तात्पर्यमय, बोधप्रद, परिणामदर्शक, सामाजीक, धार्मीक अथवा व्यावहारीक, तात्वीक विचार प्रथमतः आपटे यांनीं *आपल्या कादंबऱ्यांत आणून असल्या ग्रंथांना नवीन वळण लावून दिलें.* रागिणी ही पूर्णतत्वविचारमय गोष्ट आहे. हा नवीन प्रकार अजून आमच्या कादंबऱ्यांत फारसा नसतो. असलाच तर त्याला लोकांस अप्रिय

अशा एकाद्या सामाजीक अथवा नवीन प्रकारावर खरमरीत टीका करणें अथवा त्याचा दुष्परिणाम दाखविणें असें स्वरूप आलें आहे. त्यापासून लोकशिक्षण साध्य करून घेण्याचें अथवा लोकांमध्यें नवीन मत उद्भुत करण्याचें श्रेय अजून कोणास नाहीं.

**नाटकें**—मराठींत नाटकें लिहिण्याची सुरवात कादंबऱ्यांच्या सुरवातीच्या अगोदर झाली. कादंबरीपेक्षां नाटक लिहिणें जास्त कठीण आहे. यामुळें नाटकें कमीच झालीं आहेत. त्यांपैकीं कित्येक त्या त्या कालीं उत्पन्न झालेल्या एकाद्या प्रसंगास अनुलक्षून झालीं, यामुळें आतां त्यांचें महत्त्व राहिलें नाहीं. तसेंच मराठींत नाटकरूपी वाङ्मयापेक्षां कादंबरीरूपी वाङ्मय जास्त चांगलें आहे. भाषेंत निरंतर टिकून, ज्यांचा वाङ्मयास उपयोग होत आहे, अशीं नाटकें अगदीं थोडीं आहेत.

कादंबरी केवळ गद्यमय असते. नाटकामध्यें पद्यें असतात. कादंबरींत विस्तृत वर्णनें शोभतात. नाटकांत शोभत नाहींत. नाटकांत एकेक प्रवेश थोडक्यांत दाखवावयाचा असतो, त्यामध्यें वस्तुस्थिती चटदिशीं दाखवून द्यावयाची असते. संवाद किंवा आत्मगत भाषण यांच्या योगानें नाटकांतील प्रत्यक्ष कथेशीं संबद्ध असा एकादा प्रसंग सांगितलेला असतो, पण तो थोडक्यांत असावा लागतो. मुख्य कथा घडून आलेली निरनिराळ्या पात्रांच्या बोलण्यामध्यें दाखविलेली असते. नाटकांत विशेष ध्यानांत ठेवण्याजोगे उद्गार, एकाद्या गोष्टीचें वर्णन, अथवा उत्पन्न झालेला तात्पर्यार्थ यांचें पद्य केलेलें असतें. संस्कृतांतील मुख्य नाटकांतून सरासरी एक तृतीयांश पद्य असतें. केवळ गद्यमय अशीं नाटकें संस्कृतांत नाहींत. इंग्रजी भाषेंतील नाटकांत पद्य बरेंच असतें. तथापि केवळ गद्यमय नाटकेंही आहेत. मराठीमध्यें पद्य संस्कृताप्रमाणें असतें, आणि कित्येक नाटकें केवळ गद्यमय झालीं आहेत. अलीकडे संगीतावर भर असल्यामुळे बहुधा पद्याशिवाय नाटकें होत नाहींत. पण संगीत नाटकांतूनही सरासरी चौथा हिस्सा किंवा तिसरा हिस्साच पद्यें असतात. नाटकांत पद्यें असतात यावरून

नाटकास संगीताची जोड असते, हें उघडच आहे. केवळ भाषेच्या दृष्टीनें विचार केला तर एकादें ध्येय स्थापन करण्याच्या विशेष उद्देशानें लिहिलेलीं महत्त्वाचीं नाटकें केवळ गद्यमय असावीं हेंच बरें. ज्यांचा मुख्य उद्देश मनोरंजन असेल, त्यांत पद्यें गावयाचीं असल्यास चिंता नाहीं; कारण असलीं नाटकें आपण आतां पाहिलीं आणि उद्यां विसरून गेलों तरी हरकत नसते. आमच्या इकडे नाटकरूपी वाङ्मयाला आरंभ बरा झाला होता. आमची मंडळी इंग्रजी वाङ्मयाचा अभ्यास करूं लागल्यानंतर प्रथमतः शेक्सपियरच्या नाटकांतून कांहींचीं चांगलीं भाषांतरें आणि रूपांतरें झालीं आणि आणखी होतात असें चिन्ह दिसत होतें. पण तितक्यांत संगीत नाटकें होऊं लागलीं. गायन हें सुशिक्षीत, अशिक्षीत या सर्वांसच प्रिय असतें. यामुळें संगीत नाटकांत, गावयाच्या उत्तम पद्यांच्या नमुन्यावर पदें होऊं लागल्यावर प्रेक्षकांचीं मनें तिकडे वेधलीं, आणि संगीत नाटकांस ऊत आला. या नाटकांत त्यांतील तात्पर्य, ध्येय अथवा नीतिबोध यांजकडे लक्ष न राहातां केवळ गीताकडे लक्ष लागतें. नाटकांत कांहीं सांगितलेलें असलें तरी चालतें. यामुळें असलीं नाटकें वाङ्मयाच्या दृष्टीनें गचाळ किंवा नादान समजलीं पाहिजेत. त्याच्या योगानें नाटकाचा खरा उपयोग होत नाहीं. असल्या नाटकांचें महत्त्व केवळ तात्कालीक असतें. परंतु तीं लिहिण्याकडे चांगले लेखक गुतून त्यांच्या प्रतिभेचा दुरुपयोग होतो, ही फार वाईट गोष्ट आहे. अशा रीतीनें आमच्या कित्येक उत्तम लेखकांच्या हातून चांगलीं नाटकें निपजण्यासारखीं असतां तसें झालें नाहीं. नाटकामध्यें ज्या गोष्टींचें चिरकालीन स्मरण राहावयास पाहिजे त्या पद्यांत असाव्या, पण त्या पद्यामध्यें केवळ ताल सुराकडे लक्ष राहील, अशी स्थिती नसावी. नाटकांतील पद्यें साध्या श्लोकांमध्यें केवळ सुभाषितांसारखीं किंवा आठवण ठेवण्याच्या वचनांसारखीं असतील, तरच शोभतील. साधे श्लोक, आर्या, अभंग, हीं पद्येंही चांगलीं शोभतील, कारण तीं गातां येतात. त्यांतच साधीं पदेंही रचतां येतील. परंतु सध्या केवळ तालसुरावरील आणि रागदारीच्या गायनाकडे लक्ष असल्यामुळें नाटकांचा मूळ उद्देश व्यर्थ झाला आहे.

मराठींत प्रथमारंभीं पुण्यांतील शास्त्रीमंडळीनें मुख्य मुख्य संस्कृत नाटकांचीं भाषांतरें करून संस्कृत नाटकांची मराठी वाचकांस गोडी लावून दिली हें मागें सांगितलेंच आहे. हीं भाषांतरे चांगलीं झालीं आहेत. परंतु तीं आतां उपलब्ध नाहींत. प्रथमतः हीं नाटकें लिहिलीं, तेव्हां संस्कृत नाटकांच्या निरनिराळ्या प्रती फारशा उपलब्ध नव्हत्या, आणि पाश्चात्य नमुन्यावर जुन्या ग्रंथांचा अभ्यासही सुरू झाला नव्हता. सध्या संस्कृत नाटकांचा जास्त शोध होऊन त्यांचा अभ्यासही आस्थेनें होत असतो. तेव्हां आतां त्या नाटकांच्या रूपांतरांच्या सुधारून आवृत्या निघाल्या असतां त्यांची मराठी वाङ्मयाला चांगली जोड होईल, आणि इंग्रजी व संस्कृत यांप्रमाणें मराठीच्या अभ्यासास त्यांचा उपयोग होईल. हीं नाटकें मूळच्या संस्कृत नाटकांसारखींच गद्यपद्यमय आहेत. लेखक चांगला असल्यास यांचीं केवळ गद्यमय अशीं भाषांतरेंही चांगलीं वठतील. महादेव चिमणाजी आपटे यांनीं अभिज्ञान शाकुंतल याचें केवळ गद्यमय रूपांतर केलें तें उत्तम झालें आहे. मोडक यांनीं जुन्या संस्कृतपद्धतीवर गद्यपद्यात्मक असें उत्तरनैषध नांवाचें सुंदर, स्वतंत्र नाटक लिहिलें आहे. अगदीं आरंभीं कीर्तने यांनीं थोरले माधवराव आणि जयपाळ हीं दोन स्वतंत्र गोष्टींवर नाटकें लिहिलीं. हीं नवीन तऱ्हेचीं नाटकें प्रथमच झाल्यामुळें आणि त्यांची भाषासरणी उत्तम असल्यामुळें चांगलीं लोकप्रिय झालीं होतीं. इंग्रजी नाटकांचा अभ्यास सुरू झाल्यावर त्यांच्या आधारें अथवा त्यांचीं भाषांतरें मराठींत लिहिलीं गेलीं. शेक्सपियरच्या बहुतेक नाटकांचीं भाषांतरें मराठींत झालीं आहेत. कित्येक नाटकांचीं तर दोनदोन तीनतीन रूपांतरें झालेलीं आढळतात. अगदीं आरंभीं महादेवशास्त्री कोल्हटकर यांनीं शेक्सपियरच्या अथेल्लो या प्रख्यात नाटकाचें कथा व पात्रें न बदलतां भाषांतर केलें. हें चांगलें झालें आहे. त्यानंतर देवल यांनीं त्यास झुंझारराव असें इरकडलें स्वरूप दिलें. तेंही चांगलें आहे. हामलेट या प्रख्यात नाटकाचीं आगरकरकृत विकारविलसित, बर्वेकृत हिंमतबहादर आणि कानिटकरकृत वीरसेन अशीं तीन भाषांतरें झालीं. या तीहींची

माडणी साधारणतः आमच्या इकडल्या स्थितीशीं जुळेल अशी करण्याचा प्रयत्न आहे. परतु तो तिहींतही चागलासा साधला आहे असें म्हणता येत नाहीं. तीन्ही ग्रथकार विद्वान् असल्यामुळे भाषेच्या सबधानें हीं नाटकें चागली आहेत; तिहींत हिंमतबहादूर हें श्रेष्ठ आहे. तथापि ह्यामलेटचीं आत्मगत भाषणें, आईवरोबरचा सवाद वगैरे आगरकरांच्या जोरदार भाषेत अधीक चागले वठले आहेत. शेक्सपियरच्या रोमियो आणि जुलियट या प्रख्यात नाटकाचें शशिकला आणि रत्नपाल हें नारायणराव कानिटकरकृत भाषातर चागलें आहे. या नाटकाचें रोमकेतू आणि विजया हें रूपातर विविधज्ञानविस्तारमध्यें येत असे, तें विशेष चागलें होतें, परतु तें अर्धवट राहिलें आहे. केळकर याचें नाटिका हें टेमिग आफ धिश्रू याचें रूपातर मराठींत उत्तम नाटक झालें आहे. केळकर याना नाटकें लिहिण्याची हातोटी फार चागली होती. त्यांनीं कित्येक लहान प्रहसनें लिहिलीं आहेत. त्याचे हातून पुष्कळसं वाङ्मयाचें काम झालें नाहीं ही दुर्दैवाची गोष्ट आहे. महाजनी याचें मोहविलसित चागलेंच आहे. म्याकवेथ याचें मानाजीराव आणि सिंबेलाईन याचें तारा हीं रूपातरेंही चागल्यापैकीं आहेत. पुण्याचे काशीनाथपत नातू याचें जयसिंह नामक ज्युलियससीझर याचें रूपातर चागलें झालें आहे. मागें पुण्यामध्यें सुशिक्षीत खासगी लोकाची आर्योद्धारक मडळी नाटक करीत असे. त्याचें अतिपीडचरित्र हें किंगलियरचें रूपातर उत्तम होतें. पण छापलेलें आढळण्यात नाहीं. शकर मोरो रानडे हे कादबरी आणि नाटकें लिहिणारे चागले लेखक झाले. त्याचीं पुष्कळ विडबनें व उपहासात्मक प्रहसन आणि किरकोळ नाटकें नाट्यकथार्णवात प्रसिद्ध झालीं आहेत.

शेक्सपियर वगैरे इग्रजी कवींच्या नाटकाचीं भाषातरें आणि रूपातरें याखेरीज आमच्या इकडल्या गोष्टींवरही नाटकें झालीं आहेत. काहीं जुन्या चालींचे दोष उघडे करण्याकरता झालीं आहेत, तर काहीं सुधारणेच्या किंवा नवीन प्रकारच्या गोष्टींची थट्टा करण्याकरता झालीं आहेत. कित्येक ऐतिहासिक व काहीं केवळ पौराणिक गोष्टींवरही

झाली आहेत. सामाजीक गोष्टींवर झालेल्या नाटकांचें—त्यांतही चांगल्या गोष्टींची थट्टा करण्यासाठीं झालेल्या नाटकांचें—आयुष्य त्यांच्या योग्यतेप्रमाणें अल्पकालिकच असतें. यांतल्या कित्येक चांगल्या पुस्तकांची आठवण राहाते. कित्येक वर्षामागें मनोरमा नांवाचें नाटक झालें होतें. त्यांत विधवांच्या संबंधाच्या अनाचाराच्या आणि जुलमाच्या गोष्टींचे दुष्परिणाम दाखविले होते. हें नाटक भाषा आणि रचना यांसंबंधानें चांगल्यापैकीं होतें. परंतु विधवांचा कैवार घेतलेला किंवा त्यांचीं दुःखें जगापुढें आणलेलीं लोकांना खपत नसल्यामुळें तें नाटक वाईटांत गणलें गेलें. तें अर्वाच्य म्हणून सरकारी हुकमानें दडपून टाकावें, असाही प्रयत्न झाला होता. अलीकडे देवल, देवधर, गडकरी, कोल्हटकर वगैरे मंडळींचीं संगीत आणि इतर नाटकें बहुधा सामाजीक गोष्टींवरच आहेत. त्यांमध्यें सामाजीक गोष्टींवर स्पष्ट अथवा गर्भीत टीका असते. नेने यांनीं सैरंध्री नांवाचें एक पौराणीक नाटक लिहिलें आहे. यांत रचनेच्या दृष्टीनें कृत्रिमपणा आहे. पण त्यांत अलंकार वगैरे भाषेसंबंधीं चमत्कार आहेत, आणि भाषाही चांगली आहे. तसेंच प्रबोधचंद्रोदय नांवाचें एक आध्यात्मिक विषयावर मराठींत चांगलें नाटक किंवा रूपक झालेलें आहे. वास्तवीक हीं दोन्ही नाटकें दृश्य नसून श्राव्य काव्यें होत.

देवल यांनीं शारदा आणि दुर्गा हीं दोन चांगलीं नाटकें लिहिलीं आहेत. खरेशास्त्री यांचीं गुणोत्कर्ष आणि तारामंडळ हीं चांगलीं नाटकें आहेत. कादंबरीकार हरीभाऊ आपटे यांचींही कांहीं लहान नाटकें आणि प्रहसनें आहेत. त्यांत जयध्वज, श्रुतकीर्ति, धूर्तविलसित व मारून मुटकून वैद्यबुवा हीं चांगलीं आहेत.

देवल यांनीं कांहीं संगीत नाटकें लिहिलीं आहेत, त्यांत संस्कृत कादंबरीच्या आधारानें लिहिलेलें शापसंभ्रम हें वाङ्मयाच्या दृष्टीनें चांगल्यापैकीं आहे. किर्लोस्कर यांचें 'सौभद्र' हेंही अगदीं नवीन कथा रचून लिहिलेलें संगीत नाटक चांगलें आहे. गडकरी यांचीं प्रेमसंन्यास व पुण्यप्रभाव हीं नाटकें चांगलीं झालीं आहेत. यांची नाटकें लिहिण्याची पद्धत चांगली आहे, परंतु संगीताचा नाद सुटला

पाहिजे. विद्यमान नाटकें लिहिणारांमध्यें कोल्हटकर, खाडिलकर, केळकर, हे नांवाजण्यासारखे लेखक आहेत. कोल्हटकर हे मार्मीक व विनोदी लेखक आहेत. यांची गुप्तमजूष, मतिविकार, मूकनायक हीं नाटकें चांगल्यापैकीं आहेत. न० चिं० केळकर यांचीं तोतयाचें बंड आणि चंद्रगुप्त हीं नाटकें चांगलीं झालीं आहेत. केळकर यांचें नाटकाचें संविधानक आणि त्यांचा परिपोष, भाषा, आणि एकंदर सभ्यपणा, भारदस्तपणा आणि नेमस्तपणा इकडे चांगलें लक्ष असतें. खाडीलकर यांनीं लिहिलेलीं मोहना, विद्याहरण, कीचकवध, सवाई माधवराव, स्वयंवर आणि भाऊबंदकी यांची चांगल्या नाटकांत गणना होईल. खाडिलकरांची भाषा चांगली असते. ते आपल्या नाटकांतील पात्रांचे स्वभावही योग्यप्रकारें बनवितात. एकंदर रचना चटकदार आणि मोहक असते. परंतु खाडिलकर हे आपल्या ऐतिहासीक आणि पौराणीक पात्रांच्या स्वभावामध्यें सध्यांच्या कित्येक गोष्टींचा उपहास करण्याच्या उद्देशानें फरक करितात, यामुळें मूळ पात्रांचें महत्त्व कमी होतें. कोल्हटकर, खरेशास्त्री आणि खाडीलकर यांनीं आपल्या नाटकांत संगीताची मिसळ केल्यामुळें त्यांच्या कृती वाङ्मयाच्या दृष्टीनें बिघडल्या आहेत. वास्तवीक पाहिलें तर हे ग्रंथकार कुशल लेखक आहेत, यामुळें त्यांना आपल्या कृतींची वाङ्मयसंबंधीं योग्यता राखून त्यांत केवळ रंगभूमीवर उपयोगी पडेल अशा व्यवस्थेनें संगीत घालतां येईल. नाटकमंडळ्यांना संगीत नाटकें रचून देण्याचे भरांत चांगल्या लेखकांची प्रतिभा भलतीकडे वाहायत आहे, ही वाङ्मयाची मोठीच हानी होत आहे, असें मोठ्या दिलगिरीनें म्हणणें भाग आहे.

हल्लीं साधुसंतांवर लिहिलेलीं कित्येक नाटकें झालीं आहेत. अगोदर तुकारामासारख्या एखाद्या संताचें नाटक आणि तेंही संगीत नाटक हेंच फार चमत्कारीक वाटतें. या नाटकांपासून लोकांमध्यें संतांविषयीं विशेष पूज्यभाव उत्पन्न होणें किंवा ईश्वरभक्ती वाढणें हें तर एकीकडेसच राहिलें, पण यामुळें साधुसंतांचा अगदीं अयोग्य असा उपहास मात्र होत असतो. मनुष्याची द्रव्य मिळविण्याची हाव कोणत्या स्वरूपाला

पोंचेल, याचा कांहींच नियम नाहीं! नाटकें करून दाखविणारे लोक अशिक्षीत असतात; त्यांना आपण थोर साधूंचें विडंबन करितों हें कळत नसतें. पण असलीं नाटकें लिहिणाऱ्या विद्वान लेखकांना तरी यांतला सारासार विचार कळावयास पाहिजे.

इतिहासः—नवीन शिक्षण सुरू झाल्यानंतर कांहीं इतिहास पुस्तकें शाळांत चालण्यासाठीं म्हणून तयार झालीं. जांभेकर हे पाहिले इतिहास लिहिणारे होत.' ग्रॅंटडफकृत मराठ्यांची बखर हा ग्रंथ प्रथमारंभींच झालेला असून त्याचें भाषांतर मराठींतल्या चांगल्या ग्रंथांपैकीं आहे. मंडलीक यांनीं एलफिन्स्टनकृत इतिहासाचें भाषांतर केलें. लोकहितवादी यांनीं गुजराथ, राजस्थान, काठेवाड, या प्रांतांचे इंग्रजी पुस्तकांवरून भाषांतर करून इतिहास लिहिले. टाड याच्या उत्तम पुस्तकाचें यांनीं बहुतेक पूर्ण भाषांतर केलें आहे. हे स्वतां बहुश्रुत होते यामुळें त्यांनीं मराठी अमदानींतील अनेक ऐतिहासीक आख्यायिका आणि हकीगती एकत्र जुळवून प्रसिद्ध केल्या आहेत. प्राचीन आर्यसंस्कृतीच्या इतिहासावर पावगी यांची ग्रंथमाला प्रसिद्ध आहे. यांचे विचार सर्वांस पटण्यासारखे नाहींत, तथापि यांची शोधक बुद्धी आणि दीर्घ उद्योग मराठी वाङ्मयाच्यासंबंधानें अत्यत प्रशंसनीय आहे. टिळक यांचीं प्राचीन आर्यांच्या इतिहासावरील पुस्तकें मराठींत झालीं आहेत. भांडारकर यांच्या दक्षिणेच्या इतिहासाचें भाषांतरही चांगलें झालें आहे. याचप्रमाणें वैद्य यांचा महाभारताचा उपसंहार या ग्रंथांबरोबर घेतला म्हणजे, आमच्या पूर्वजांच्या प्राचीन इतिहासावर पाश्चात्य शोधकबुद्धीनें लिहिलेले एवढेच ग्रंथ आहेत. आणखी कित्येक निबंधही आहेत. भागवत यांचीं कित्येक पुस्तकें आणि लेख यांचा उल्लेख मागें एकवार आलाच आहे. दक्षिणेंतील मुसलमानी राज्यांचा इतिहास कोल्हापूरचे मोडक यांनीं बहुतेक समग्र लिहिला आहे. बडोद्याचे सरदेसाई यांनीं मुसलमानी, मराठी आणि इंग्रजी कारकीर्दीचा पूर्ण इतिहास लिहिला आहे. हीं इतिहास-पुस्तकें मराठींतले चांगले ग्रंथ झाले आहेत.

आमच्या लोकांमध्यें इतिहास लिहिण्याची चाल नाहीं ही मोठी उणीव आहे. यामुळें आमचा प्राचीन इतिहास सगतवार नाहीं. मराठेशाहीचा सगतवार इतिहास लिहावयासही मोठेच परिश्रम पाहिजे आहेत. सर्व मराठी देशभर जुने ऐतिहासीक लेख पसरलेले असून ते किड्याच्या भक्ष्यस्थानीं पडत आहेत. ही गोष्ट प्रथमतः निळकंठराव कीर्तने याच्या लक्षात आली. त्यानीं डेक्कनकालेजात असतानाच ग्राट डफच्या इतिहासावर टीकात्मक निबंध लिहून असें दाखवून दिलें कीं, या ग्रंथात अनेक चुका आहेत, त्या तत्कालीन लेख मिळवून दुरुस्त केल्या पाहिजेत. या उद्देशानें त्यानीं कित्येक बखरी मिळविल्या आणि विविधज्ञानविस्तारात एक बखर छापण्यासही आरंभ केला. त्यानंतर चिपळूणकर, साने आणि मोडक यानीं काव्येतिहाससंग्रह नावाचें मासिकपुस्तक सुरू केलें. हे मासिकपुस्तक कांहीं वर्षें चालून मदतीचे अभावीं बंद पडलें. साने बखरी आणि इतर कागदपत्र प्रसिद्ध करण्याचें काम करीच केलें. त्यानंतर वासुदेवशास्त्री खरे याना पटवर्धनाचें दप्तर उपलब्ध होऊन त्यानीं मोठाच उद्योग सुरू केला. थोरले माधवराव पेशवे याच्यापासून पेशवाईच्या अखेरपर्यंतचा इतिहास मराठी अस्सल लेखावरून रचण्याचा त्याचा उद्योग सपत आला आहे. साताऱ्चे पारसनीस आणि निर्णयसागर छापखाना यानी मिळून इतिहाससंग्रह नामक मासिकपुस्तक सुरू केलें. त्याचप्रमाणें पेशव्याच्या दप्तरांतील कित्येक इतिहासाला उपयोगीं पडणारे कागद व लेख प्रसिद्ध झाले सुमारें दहा वर्षांपूर्वी पुण्यास कांहीं इतिहासप्रिय लोकांच्या उद्योगानें इतिहाससंशोधकमंडळ स्थापन झालें. त्याचा चागला उद्योग चालू आहे. खरे, पारसनीस आणि राजवाडे याच्या उद्योगाची मुख्य गोष्ट अशी आहे कीं, ते केवळ लेख प्रसिद्ध करीत नसून पाश्चात्य इतिहासशास्त्राच्या धरतीवर कागदपत्राची छाननी करून, संगती लावून आणि तत्संबंधाचा चागला ऊहापोह करून लेख प्रसिद्ध करीत आहेत, आणि मराठी इतिहासाच्यासंबंधाच्या अनेक चुकीच्या समजुती नाहींशा करून नवीन पुस्तकेंही लिहीत आहेत याचे केवळ लेख प्रसिद्ध करण्याचें कामही फार मोठें झालें आहे व सारखें चालू आहे. खरे याचे

ऐतिहासिक लेखांच्याबरोबर प्रसिद्ध झालेले प्रास्ताविक लेख मोठ्या शोधकबुद्धीनें लिहिले आहेत. ते सर्व एकत्र प्रसिद्ध झाले असतां तेवढ्या काळाचा एक संगतवार संक्षिप्त इतिहासच होईल. शिवाय त्यांनीं नाना फडनविसांच्या चरित्रावर दोन उत्तम पुस्तकें लिहिलीं आहेत. पारसनीस यांचीं अयोध्येचे नवाब, झांशीचा इतिहास, ब्रह्मेंद्रस्वामीचें चरित्र, मराठ्यांचें आरमार, हीं पुस्तकें चांगलीं आहेत. राजवाडे यांचे ऐतिहासीक खंडांना प्रस्तावना अथवा उपोद्घात म्हणून लिहिलेले सर्व लेख त्यांतील नवीन ऐतिहासीक दृष्टींची विस्तृत टीका आणि तत्त्वशोधन, यांच्यासंबंधानें फार महत्वाचे आहेत. ते तिवेही लेखक इतिहासाच्या संबंधानें आस्थापूर्वक शोध करून आणि त्या शोधांना पाश्चात्य इतिहासशास्त्राची जोड देऊन विचारपूर्वक लिहीत असतात. राजवाडे यांचा एककल्लीपणा आणि स्वाभिमानाचा अतिरेक यांमुळें मात्र पुष्कळदां विरस होतो. परंतु त्याचें धोरण आतां सर्वांना माहीत झाल्यामुळें कोणास फारसा विषाद वाटत नाहीं; आणि त्यांच्या मतांविषयींचा ग्राह्याग्राह्यविचार करितां येतो. राजवाडे हे लेख प्रसिद्ध करतांना प्रत्येक लेखाच्या काळाची आणि इतिहासाची संगती लावण्याच्या भंवाइतींत पडत नाहींत. पण ही उणीव ते पुष्कळसे लेख सटीक प्रसिद्ध करण्यानें भरून काढतात. इतिहासाच्यासंबंधानें साने आणि भानू या दोघांचाही उद्योग मराठी वाङ्मयास हितकारक झाला आहे. साने यांनीं जुन्या बखरी वगैरे प्रसिद्ध केल्या, त्यांना उपोद्घात, टीपा वगैरे शोधकपणानें लिहिल्या आहेत. त्यांची या विषयाची माहिती आणि पोक्त विचार या गोष्टींचा या विषयाची नीट संगती जुळविण्यास फार उपयोग होतो. भानू यांचे नाना आणि महादजी हा निबंध आणि कांहीं किरकोळ ऐतिहासीक लेख चांगले आहेत. परंतु भानू यांनीं अलीकडे या सर्वोपयोगी विषयांतील मन काढून निरुपयोगी आध्यात्मीक विषयाकडे त्यांविल्यामुळे मराठी वाङ्मयाची मोठीच हानी झाली आहे.

इंग्रजींतून भाषांतर केलेलीं अशीं कित्येक देशांच्या संक्षिप्त इतिहासाचीं पुस्तकें बडोदें संस्थानच्या आश्रयानें मराठींत झालीं आहेत.

परंतु हीं भाषांतरें या दृष्टीनें चांगलींशीं साधलेलीं नाहींत. फडके यांनी व्हिक्टोरिया महाराणीच्या राज्याचा इतिहास भाषांतर-रूपानें लिहिला आहे. हें म्याकार्थे यांच्या अत्युत्तम इंग्रजी पुस्तकाचें रूपांतर आहे असें म्हणण्यास मात्र संकोच वाटतो. केळकर यांचा आयर्लंडचा इतिहास चांगला आहे तसाच इटलीचा व नेदर्लंडचा इतिहासही चांगला आहे. केळकर यांचे अगदी अलीकडे प्रसिद्ध झालेलें पुस्तक इंग्रज आणि मराठे हें चांगलें आहे. हें वास्तवीक इतिहासपर नसून राजकीय विषयावरचें अथवा इतिहासाच्या तत्त्वांना वरील विकिसच पुस्तक आहे. पाश्चात्य देशाच्या इतिहासाची आमचे देशाच्या इतिहासाशीं तुलना होऊन अशा प्रकारचीं ऐतिहासीक तत्व ज्ञानपर पुस्तकं व्हावयास पाहिजेत. आपटे तिवेदी इतिहाससंशोधक यांची या प्रकारची दृष्टी आहे, असें त्यांच्या प्रास्ताविक लेखावरून दिसून येतें. अशा प्रकारचे कित्येक चांगले लेख प्रो० लिमये यांनीं मासिक पुस्तकांतून आणि इतरत्र मोठ्या शोधक बुद्धीनें आणि स्वाभिमानानें लिहिले आहेत. लिमये यांची भाषापद्धतीही चांगली असते. विजापूरकर यांचाही ऐतिहासीक लेख लिहिण्याचा उद्योग असतां त्यांनीं विशेषतः राजवाडे यांचे लेख प्रसिद्धीस आणण्यास मोठें साह्य केलें आहे. सुप्रसिद्ध निबंधलेखक धनुर्धारी (टिककर) यांचे ऐतिहासिक गोष्टीनिरूप लहान लहान चटकदार आणि मनोरंजक लेख आले आहेत. वासुदेवराव आपटे यांचें मराठ्यांचा दरारा हें लहानसें ऐतिहासीक पुस्तक चांगलें आहे.

चरित्रें —मराठींत चरित्रलेखनाचा उद्योग म्हणण्यासारखा चांगला झालेला नाहीं. वास्तवीक पाहातां वाङ्मयाच थोर पुरुषांचीं चरित्रें हें महत्त्वाचें अंग आहे. इंग्रजीमध्यें अनेक थोर पुरुषांचीं चरित्रें त्यांच्याच तोडीच्या थोर पुरुषांनीं लिहिलीं आहेत, यामुळें पिट, बर्क, पील, रसेल, ग्लाडस्टन इत्यादि प्रख्यात पुरुषांचीं उत्तम चरित्रें निर्माण झालीं आहेत. आमच्या इकडे गल्या पन्नास वर्षांत झालेले मंडलीक, रानडे, गोखले, यांच्यासारख्यांचीं चरित्रही कोणीं लिहिलीं नाहींत.

अशी स्थिती असण्याची कारणें सांगण्याची ही जागा नाहीं. परंतु यामुळें वाङ्मयघटनेचें एक महत्त्वाचें अंग फार मागें आहे, असें दिलगिरीनें म्हणावें लागतें. प्राचीन गद्यवाङ्मयामध्यें शिवाजी वगैरे राजेमंडळापैकीं कित्येकांच्या चरित्रावर राजकीय बखरी लिहिलेल्या आहेत. नाना फडनवीस यांनीं लहानसें स्वतांचें आत्मचरित्र लिहिलें असल्याचा उल्लेख मागें एकवार आलाच आहे. पुष्कळ वर्षांपूर्वी एका इंग्रजानें नानाफडनविसाचें बऱ्यापैकीं चरित्र लिहिलें होतें. खरे यांनीं नानांचें चांगलें चरित्र लिहिलें आहे. थोरल्या चिपळूणकरांचा साकेतिसाचें चरित्र हा मराठींतला एक उत्तम लहान ग्रंथ आहे. हा भाषांतररूप आहे. ना० वि० बापटकृत थोरले बाजिरावाचें चरित्र हा उत्तम मराठी भाषेचा नमुना आहे. परंतु तें वस्तुतः चरित्र नसून ऐतिहासीक कादंबरी आहे. तसाच प्रकार बापट यांच्या राजगुरु दादोजी कोंडदेव व शिवाजी या पुस्तकाचाही आहे. पारसनीसकृत ब्रह्मेंद्रस्वामी आणि देवकृत अहिल्याबाई होळकरीण हीं पुस्तकें भाषेच्या संबंधानें चांगलीं आहेत. परंतु त्यांतील इतिहाससंबंधाच्या वृत्तांतांविषयीं नीट शोध व्हावयास पाहिजे आहे. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचें चरित्र त्यांच्या बधूनें लिहिलें आहे. यांत पुष्कळ ऐकींव खोट्या गोष्टी दडपून दिलेल्या असल्यामुळें कित्येक सद्गृहस्थांची बदनामी झाली आहे. इतिहासकार गोगटे यांना शाहूमहाराज, बाळाजी विश्वनाथ, नानासाहेब पेशवे, औरंगजेब, इत्यादि चांगलीं चरित्रें लिहिलीं आहेत. राजाराम भागवत यांनीं शिवाजी आणि संभाजी यांचीं लहानच परंतु मार्मिक चरित्रें लिहिलीं आहेत. केळुसकर यांनीं एक शिवाजीचें चांगलेंच चरित्र लिहिलें आहे. ओक यांनीं आल्फ्रेड धि ग्रेट, आलेक्झांडर, जानसन, वेलिंगटन, लिंकन, ग्लाडस्टन वगैरे पाश्चात्य पुरुषांचीं चरित्रें आपल्या नेहमींच्या गोड भाषेंत लिहिलीं आहेत. काशीबाई कानिटकर यांचें आनंदीबाई जोशी यांचें चरित्र आणि अवंतिकाबाई गोखले यांचें देशभक्त गांधी यांचें चरित्र हीं मराठींतलीं चांगलीं पुस्तकें आहेत. के० ना० बापटकृत नेपोलियन बोनापार्ट हें चांगलें

चरित्र आहे नी० स० ओक यांचें 'थोर पुरुषांच्या सुरस कथा' हें एका सर्वमान्य इंग्रजी ग्रंथाचें रूपान्तर चांगलें आहे इ ल्हान ल्हान चरित्रमयच आहे

ही चरित्रमालिका वाचून मराठींत चरित्रे चांगली नाहींत असें मी प्रथमारंभीं म्हटलें आहे, तें कसें, असा कोणी प्रश्न करील तर्से म्हणण्याचें कारण असें आहे कीं, यांतील पाश्चात्य पुरुषांची चरित्रें इंग्रजी भाषेतील अगदीं सामान्य पुस्तकांचीं भाषांतरें व रूपांतरें आहेत. स्वतंत्र चरित्रें आहेत, त्यांमध्ये त्या पुरुषाच्या विशेष गुणांचें किंवा दोषांचें विवेचनात्मक विवरण नाहीं, अथवा त्यांच्या आयुष्यक्रमापासून त्यांच्या राष्ट्राचें काय हिताहित झालें, अथवा त्यांच्या वेळीं झालेल्या घडामोडींत त्यांनीं विशेष काम काय केलें, याचा विस्तृत इतिहास यांमध्ये नाहीं त्याचप्रमाणें आपल्यामध्ये गेल्या पन्नाससाठ वर्षांत जे थोर पुरुष आणि देशकार्यकर्ते होऊन गेले, त्यांचीं चरित्रें बहुधा नाहींतच यामुळें मराठींतलें चरित्रवाङ्मय समाधानकारक नाहीं असें म्हणणें भाग आहे त्यांतल्या त्यांत आनंदीबाई जोशी यांचें चरित्र आणि गांधींचें चरित्र हे स्तीलसमानें ग्रंथ चांगले झाले आहेत

आमच्या आयुष्यांतील आठवणी हें पुस्तक रानडे यांच्या समग्र मोठ्या चरित्राच्या अभावीं तात्पुरतें समाधान मानून घेण्यासारखें आहे श्रीमती रमाबाई यांची भाषासरणी प्रौढ, सरस आणि मनोहर आहे. परंतु विषयप्रतिपादनाच्या दृष्टीनें हें पुस्तक नावाजण्यासारखें नाहीं पुस्तक वाचून झाल्यावर असें वाटू लागतें कीं, रानडे हे एवढे थोर कर्ते गृहस्थ होऊन गेले असा जो लोकांचा समजूत आहे, ती चुकीची आहे, त्यांच्यावर रमाबाईंची पाखर होती, म्हणूनच त्यांचा या जगांत निभाव लागला! तसेंच यामध्ये ग्रंथकर्तीनें पुष्कळ अप्रमाण गोष्टी लिहिल्या आहेत, असें मोठ्या दिलगिरीनें म्हणावें लागतें

प्रा० कर्वे यांचें आत्मचरित्र हें मराठी भाषेतें फार उत्साहक असें उत्तम पुस्तक आहे. पुण्यांतले एक प्रख्यात लेखक आणि ज्ञानचक्षूचे संपादक वा० गो० रानडे यांना आपल्या वळच्या थोर पुरुषास भेटून त्यांचें जीवनवृत्तांत टिपून घेतले, आणि त्यावर

ज्ञानचक्षूमध्यें सुमारें तीस अल्प चरित्रें लिहिलीं. हीं सर्व लहानशींच पण चांगलीं असून स्वतंत्र पुस्तकरूपानें प्रसिद्ध व्हावयास पाहिजे आहेत.

ज्ञानदेव, एकनाथ, तुकाराम, रामदास वगैरे साधुसंत यांचीं बरींच निरनिराळीं चरित्रें लिहिलेलीं आहेत. यांतील कित्येक भाषा-वगैरे संबंधानें चांगलींही आहेत. परंतु या साधुसंतांचें खरें जन्मवृत्त कोणास ठाऊक नाहीं. केवळ दंतकथांच्या आधारावर हे ग्रंथ लिहिलेले आहेत, आणि ह्यांत अद्भुत, असमान्य गोष्टीही फार असतात. यामुळें हीं चरित्रें म्हणजे निव्वळ, पौराणिक गोष्टी होत. संतकवींच्या कवितांवर त्यांत विशेष लिहिलें आहे, असे वरील संतांच्या संबंधाचे ग्रंथ आहेत; पण तीं चरित्रें नसून त्यांच्या काव्यांचें वर्णन आहे. यासाठीं त्यांचा उल्लेख अन्यत्र केला आहे. आजगांवकर यांनीं कविचरित्र नांवाचा *विस्तृत ग्रंथ लिहिण्याचें काम चालविलें असून त्याचे चार भाग प्रसिद्ध* झाले आहेत. यांमध्यें बऱ्याच स्थळीं कवींच्या कृतींवर आणि त्यांच्या वाङ्मयसामर्थ्याविषयीं मार्मिक विवरण आहे. आजगांवकर चांगले मराठी लेखक आहेत. परंतु यांनीं कवींच्या जीवनक्रमाविषयीं आधुनिक दृष्टीनें शोध करण्याचे प्रयत्न केलेले दिसत नाहींत. त्यांचा दंतकथांवर आणि अद्भुत गोष्टींवरही विश्वास व भर असून त्यांची त्यांनीं तरफदारी केली आहे; अन्य लेखकांच्या मतांच्या खंडनमंडनाकडे फार लक्ष दिलें आहे; आणि कवींची सख्या भाराभर वाढविण्याकडे त्यांचें लक्ष फार आहे. केव्हां तर त्यांचा ग्रंथ कविचरित्र नसून साधुसंतांविषयींच्या ऐकीव भाकडकथांचा संग्रह आहे असें वाटतें.

मराठीमध्यें अनेक कल्पित प्रबंध, कादंबऱ्या आणि लहान मोठ्या गोष्टी लिहिल्या जात असून चरित्रें लिहिण्यास कोणी धजावत नाहीं, ही वाङ्मयाची मोठी हानी होत आहे. कल्पित गोष्टी लिहिणें सोपें असतें. त्यांत ग्रंथकारास वाटेल तसें लिहितां येतें. चरित्र म्हटलें कीं, त्यांत जशा गोष्टी खऱ्या घडल्या असतील तशा लिहिल्या पाहिजेत. ही जबाबदारीची गोष्ट असते. शिवाय खरी खरी माहिती मिळावयास पाहिजे. आमच्या लोकांना रोजनिशी लिहिण्याची अथवा झाल्या गोष्टींची नोंद ठेवण्याची संवय नाहीं. एकाद्याचें चरित्र लिहिणें म्हटलें कीं,

त्याच्या स्वभावाच्या, वर्तनाच्या आणि मताच्या संबंधाच्या सर्व गोष्टी शोधपूर्वक आणि निर्भीडपणें लिहिल्या पाहिजेत. तशी सवय अजून आम्हांस नाहीं. अगदीं अलीकडल्या काळचीं निरनिराळ्या वेळचीं वर्तमानपत्रें, मासिकपुस्तकें वगैरे ज्यामध्यें माहिती मिळावयाची, त्याचा संग्रह मूळ छापखान्यांतही सांपडत नाहीं. या कारणानें चरित्र लिहिण्यास कोणी धजावत नाहीं. पुढील पिढ्यांना स्फूर्तिदायक होतील अशीं ज्यांचीं चरित्रें आहेत, अशा थोर पुरुषांचीं चरित्रें, हीं कादंबऱ्या अथवा गोष्टी लिहिणाऱ्या साधारण लोकांच्या हातून लिहून होणार नाहींत. तें काम चांगल्या विद्वान् लेखकांनींच हातीं घेतलें पाहिजे. परंतु आमच्या विद्वान् मंडळींपैकीं चरित्रनायकासंबंधानें जें खरें असेल तें निर्भीडपणें लिहावयास आमचे ग्रंथकार अजून कचरतात, आणि कोणीं खरें खरें किंवा योग्य असें स्वताविषयीं किंवा आपल्या मित्राविषयीं लिहिलेलें सहन करण्याची आमच्या मंडळीस अजून सवय झाली नाहीं, हेंही चरित्रें न होण्याचें कारण आहे. चरित्र कसें लिहावें यासंबंधानें आमच्या मंडळींतील कित्येकांचीं चमत्कारिक मतें असतात. थोरले बाजीराव, परशुरामभाऊ पटवर्धन, अहिल्याबाई होळकरीण, धावडशीकर स्वामी, रामदास, इत्यादिकांचीं चरित्रें कादंबरीसारखीं लिहिलेलीं आहेत. चरित्रनायकाबद्दल वाईट असें कांहीं लिहितां कामा नये, त्याचे दोष झांकलेच पाहिजेत, चुका दाखवू नयेत, असें कित्येक प्रतिपादितात. वि० को० ओक यांनीं चरित्र कसें असावें याविषयीं लिहितांना चरित्रनायकाचे गुण तेवढे दाखवावे, दोषांबद्दल कांहीं लिहूं नये, असें म्हटलें आहे, आणि त्यांनीं स्वता चरित्रें लिहिलीं आहेत, तीं अशाच तऱ्हेचीं आहेत. हें म्हणणें अयोग्य आहे, असेंच पुष्कळांना वाटेल, यासाठीं याची चर्चा येथें करण्याची जरूर नाहीं. चांगल्या लेखकांनीं केवळ भाषासंवर्धनाच्या दृष्टीनें चरित्रलेखनाचें काम हातीं घेतल्यावांचून मराठींत चरित्रें निर्माण होणार नाहींत.

**राजकीय आणि सामाजीक वाङ्मय**—राजकीय गोष्टींचा संबंध सर्व देशाशीं येतो, यामुळें आपलें महत्त्वाचें राजकीय वाङ्मय इंग्रजी

भाषेंत असावे अशी चालच पडली आहे. केवळ मराठींत राजकीय वाङ्मय म्हटलें तर वर्तमानपत्रें आणि मासिक पुस्तकें यांतले लेख. वास्तवीक पाहिले तर एकंदर जनतेस राजकीय विषय चांगले समजावे म्हणून त्यांची चर्चा लोकभाषेंत होण्याची जरूर आहे. पण तसें फारसें होत नाहीं. वर्तमानपत्रांत अगदीं आरंभापासून राजकीय विषयावर लेख येतात. नांवाजण्यासारखे लेख मित्रोदय, हिंदुरिफार्मर, काळ, भाला, सुधारक, या पत्रांतून पुष्कळ आले आहेत. सांप्रत इंदुप्रकाश, ज्ञानप्रकाश आणि केसरी यात येतात. काळ, सुधारक आणि केसरी यांतले पुष्कळ निवडक लेख पुस्तकरूपानें छापले आहेत. मासिकपुस्तकांमध्यें प्रथमतः राजकीय विषयांवर लेख निबंधमालेंत आले, पण ते चालू राजकारणावर नसत. निबंधचंद्रिकेनें केवळ राजकीय आणि सामाजीक विषयांवरच मुख्य लेख लिहावयाचे असा बेत केला आणि त्याप्रमाणें चार वर्षांत बरेच राजकीय आणि सामाजीक लेख या मासिकपुस्तकांत आले. चालू मासिक पुस्तकांत विविधज्ञानविस्तार हें केवळ वाङ्मयास वाहिलेलें आहे. त्यांत राजकीय आणि सामाजीक विषयांवर लेख क्वचित् येतात. परंतु बाकीचीं मासिकपुस्तकें मनोरंजन, चित्रमय-जगत्, प्रभात, उद्यान वगैरे यांत राजकीय आणि सामाजीक विषयांवर भरपूर लेख येतात. भारतमित्र हें मासिकपुस्तक केवळ राजकीय विषयांच्या चर्चेसाठीं निघालें आहे. राजकीय विषयांवर लिहिणारे जुने प्रख्यात लेखक लोकहितवादी व चिपळूणकर हे होत; आणि विद्यमान लेखक टिळक, प्रो० लिमये, केळकर, शिवरामपंत परांजपे, खाडीलकर, रा०ब० वैद्य, पाध्ये, प्रधान हे आहेत. विष्णुशास्त्री चिपळूणकर आणि त्यांची राजकीय आणि सामाजीक विषयांवरील मतें आणि लेख यासंबधानें उगाच गैरसमज झालेला आहे. दुसऱ्यावर कडक टीका करण्याचा त्यांचा स्वभाव असे. पण त्यांचे लेख वाचले असतां त्यांचीं राजकीय आणि सामाजीक विषयांवरील मतें लोकहितवादी, आगरकर, यांच्या मतांपेक्षां फारशीं भिन्न नव्हतीं. लोकांतल्या अज्ञानमूलक वेड्या समजुतींवर तर त्यांनीं फार कडक पण अत्यंत योग्य आणि समर्पक टीका केली आहे.

प्रथमारंभीं मराठीमध्ये राजकीय विषयावरील लेख बरेच स्वतंत्रपणें आणि विचारपूर्वक, शांतपणें लिहिलेले असत, आणि सरकारच्या व्यवस्थेवर टीकाही चांगली येत असे. पण पुढे राजकीय विषय लिहिणाऱ्यास प्रधानें कायदे झाले, तसेंच प्रथमतः राजकीय विचाराचे पक्ष नव्हते ते पुढे उत्पन्न झाले. कडक कायद्यामुळे सरकारच्या विरुद्ध लिहितां येत नाहीं, यामुळे आपसांत एकमेकांच्या विरुद्ध लिहिण्याची आणि पक्षप्रतिपक्ष करण्याची तऱ्हा उत्पन्न झाली. यामुळें मराठींतलें चालू राजकीय वाङ्मय चांगल्यापैकीं आहे असें म्हणतां येत नाहीं. आपल्यास चांगल्या प्रकारची राजकीय स्थिती आणि राज्यव्यवस्था पाहिजे आहे. त्यासाठीं एकंदर जनता तयार झाली पाहिजे. या उद्देशानें राजकीय वाङ्मय फारसें बनत नाहीं.

सामाजीक विषयावरील वाङ्मयाची स्थिती याहून बरीच चांगली आहे. या विषयावर स्वतंत्र पुस्तकें थोडीच आहेत. हें वाङ्मय बनविण्याचें काम वर्तमानपत्रें आणि मासिकपुस्तकें करीत आहेत. सामाजीक व्यवस्थेंत सरकारचा हात कितपत असावा याविषयीं निबंधचंद्रिका मासिक पुस्तकांत विस्तृत चर्चा झाली आहे. सुधारकामध्यें आगरकर यांनीं आणि नंतर त्यांच्या अनुयायांनीं सामाजिक विषयावर अनेक लेख लिहिले. आगरकर यांचे लेख निराळे पुस्तकरूपानं छापले आहेत, आणि ही मराठी वाङ्मयाची निरंतरची उत्तम पुस्तकं झालीं आहेत. सुधारक हें पत्र मुख्यतः सामाजीक सुधारणेच्या चर्चेसाठीं होतें. प्रार्थनासमाजाचें पत्र सुबोधपत्रिका यांत सामाजीक विषयांवर चांगले लेख येतात. रत्नागिरी येथील बकुलपत्र मुळारंभीं ज्यांनीं काढलें, त्या गार्ग्यांच्या नेतृत्वाखालीं असतां त्यांत सामाजीक विषयावरील चर्चा सुधारकापेक्षाही अधिक येत असे. वैद्य यांनीं अचलोजतिलेखमाला या नांवाचीं सामाजीक गोष्टींच्या चर्चेचीं चांगलीं पुस्तकें लिहिलीं आहेत. कांहीं विशेष कारणानें जेव्हां जेव्हां सामाजीक विषयावर चर्चा होण्याची वेळ येते, तेव्हां त्या विषयावर लहान लहान पुस्तकं तयार होतात. विधवा-विवाहाचा वाद झाला, त्या वेळीं नित्यातल्या सामाजीक लेखांखेरीज

स्वतंत्र लेख प्रसिद्ध झाले. जुन्या मंडळींत लोकहितवादी, राजारामशास्त्री भागवत, गोळे, आगरकर हे सामाजीक विषयांवर लिहिणारे झाले. निबंधमालेंतही बरेच सामाजीक विषयांवर लेख आले आहेत. *एका पुनर्विवाहाची हकीगत* प्रथमतः सुधारकांत येऊन पुढें स्वतंत्र प्रसिद्ध झाली. ही प्रख्यात गुजराथी सुधारक माधवदास यांच्या आत्मवृत्ताच्या आधारें लिहिली आहे. आगरकरानंतर सुधारकांत सामाजीक विषयांवर लिहिण्याचें काम सितारामपंत देवधर आणि प्रो० पटवर्धन यांनीं चांगल्या प्रकारें चालविलें. पटवर्धन यांचे *अज्ञेयमीमांसा* ह्या विषयावरचे लेख प्रख्यात आहेत. पटवर्धन यांनीं एकंदर लोकशिक्षणावर *शिक्षण, शिक्षक आणि अभ्यासक्रम* असा एक चांगला विस्तृत निबंध लिहिला आहे. केसरीमध्येंही आरंभीं सामाजीक विषयांवरील चर्चेचे अनेक लेख आले आहेत. ते इतके स्पष्ट आणि जोरदार आहेत कीं, सध्याच्या केसरीच्या स्थितींत तसे लेख केसरींत आलेले दिसणार नाहींत. हेही पुस्तकरूपानें छापले आहेत. यांतले बरेच लेख चिपळूणकर यांचे आहेत. लोकांच्या वेडगळ व अज्ञानमूलक जुन्या समजुतींवर मालाकारांनीं *लोकभ्रम* हा फक्त एकच लेख लिहिला आहे. परंतु तेवढ्यावरून त्यांचीं सामाजीक गोष्टींच्या संबंधाचीं मतें स्पष्टपणें कळून येतात. सुधारकामध्यें तर असे निबंध पुष्कळच आलेले आहेत, आणि ते आगरकर आणि त्यांचे अनुयायी यांच्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें निर्भीड, जोरदार व निर्णायक आहेत. भांडारकर यांचीं व्याख्यानें मुख्यतः धर्मपर आणि नीतिपर आहेत; परंतु त्यांमधून ठिकठिकाणीं सामाजीक विषयांवर पुष्कळ चर्चा आली आहे. गोळे यांचीं *ब्राह्मण आणि त्यांची विद्या* व *हिंदुधर्म आणि सुधारणा* हीं भाषा आणि प्रतिपादनाची शैली यांसंबंधानें मराठी भाषेंतलीं दोन उत्तम पुस्तकें आहेत. त्यांतील मतें मात्र पुष्कळांना मान्य होण्यासारखीं नाहींत. मराठींत शिक्षणविषयावर कायकटे यांचें *शिक्षण आणि अध्यापन* एवढेंच एक प्रसिद्ध पुस्तक आहे. या विषयाच्या निरनिराळ्या अंगांची चर्चा *शालापत्रकांत* होत असे, आणि सध्या *मराठी शिक्षक* या मासिकपुस्तकांत होत असते.

लोकशिक्षण हें एक त्या विषयावरील स्वतंत्र मासिकपुस्तक आहे. हतवळणे यांनीं नकल्कृत प्रख्यात पुस्तकाच्या आधारें सृष्टपदार्थ नियम आणि सुधारणा हें चांगलें पुस्तक लिहिलें आहे. तसें त्याच सुशिक्षित स्त्री हेंही सामाजीक विषयावरील पुस्तक चांगलें आहे. पटवर्धन आणि कर्वे यांच स्पेन्सरच्या ग्रंथाच्या आधारें लिहिलेलें राजनीतीचीं मूलतत्वें (प्रकाशक दाभोळकर) हें चांगलें पुस्तक आहे. दाभोळकर यांनीं ल्यकवृत मूळ पुस्तकाचीं संसारसुख (गाडगीळ) जीवितकर्तव्य (नागर) आणि सुख आणि शान्ती (गोडक) हीं चांगलीं रूपान्तरें प्रसिद्ध केलीं आहेत तशींच दाभोळकर यांचींच मार्टेकृत जीवनशास्त्र आणि जननमरण मीमांसा हीं चांगलीं पुस्तकें आहेत हीं अगदीं स्वतंत्रपणे मराठींत लिहिलीं असून यामध्ये समाजशास्त्राच्या दृष्टीनें चर्चा केली आहे. कानिटकर यांचें स्त्रियांची परवशता हें रूपांतरही चांगलें आहे. प्रो० भाटे यांचें समाजशास्त्राचीं मूलतत्वें हें पुस्तक सामाजीक विषयासंबंधींच आहे यांत सामाजीक शास्त्रसिद्धांताची थोडक्यांत चांगली चर्चा केली आहे. *श्रीसयाजीसाहित्यमालेमध्यें* सुधारणा आणि प्रगती हें पुस्तक इंग्रजी पुस्तकाच्या आधारें दाजी गणेश आपटे यांनीं लिहिलें आहे. यांतील विषयाचें विवरण बरें आहे, यांत आमच्या इकडील स्थितीला धरून प्रतिपादन केलें आहे, आणि उदाहरणें वगैरे घतलीं आहेत. भाषांतराची अथवा रूपान्तराची पद्धतही बरी आहे पण शब्दशः *भाषांतर करण्याचा यत्न केल्यामुळें भाषा बोजड झाली आहे.* लोकशिक्षणवर्धक पुस्तकें साध्या, सोप्या भाषेंत व्हावयास पाहिजेत. आतां सांगितलेलें कित्येक ग्रंथ 'शास्त्रीय ग्रंथ' या नांवाखालीं घालण्यासारखे आहेत, परंतु येथें तितका भेद केला नाहीं, आणि त्याच सामाजीक विषयासंबंधानेंच महत्त्व मानिलें आहे

व्यवहार, व्यापार, उद्योगधंदे यावर बहुधा इंग्रजींत चर्चा होते. यावर मराठीमध्यें वर्तमानपत्रें आणि मासिकपुस्तकें यांतून ल्हानसान लेख येतात. वास्तवीक पाहिलें तर लोकशिक्षणासाठीं असल्या विषयावर मराठांत ग्रंथ व्हावयास पाहिजेत.

वर्तमानपत्रें आणि मासिकपुस्तकें यांतून आलेले लेख पुन्हा पुस्तकरूपानें छापले जातात, त्यासंबंधानें येथें सूचना केली पाहिजे. ती अशी कीं, असले लेख प्रथमतः लिहिले जातात तेव्हां एकाद्या विशेष प्रकारच्या तत्कालीन चळवळीमुळे लिहिलेले असतात. तिची आठवण पुढे नष्ट होते. यासाठीं ती चळवळ महत्त्वाची असल्यास स्वतंत्र पुस्तकांत तिचा थोडा इतिहास दिला पाहिजे; अथवा चळवळ महत्त्वाची नसल्यास तद्विशिष्ट उल्लेख गाळले पाहिजेत. तसेंच मूळचे—विशेषतः वर्तमानपत्रांतले—लेख तितके काळजीपूर्वक लिहिलेले नसतात. ते स्वतंत्र पुस्तकरूपाने छापल्यावर भाषेंत कायमचे राहावयाचे असतात. यासाठीं ते पुन्हा प्रसिद्ध करितांना भाषा, प्रतिपादन आणि इतर व्यवस्था यांसंबधाने नीट तपासले पाहिजेत. असा उद्योग होत नाहीं, यामुळे असल्या पुस्तकाची रचना अव्यवस्थीत होऊन ठिकठिकाणीं दुर्बोधत्वही येते. केसरी आणि सुधारक यांतील निबंधांच्या संबधानें पुष्कळ ठिकाणीं अशी स्थिती झाल्याचें आढळून येते. निबंधमालेंतील लेख तीन वेळा स्वतंत्रपणें प्रसिद्ध झाले, त्याचीही अशीच स्थिती झाली आहे. थोड्या दिवसांपूर्वी नवीन आवृत्ती प्रसिद्ध झाली ती तर यासंबंधानें जास्त अव्यवस्थीत आहे. या निबंधांतील कित्येक उल्लेखाचे मूळसंबंध मुद्दाम शोध करून व्यक्त केले पाहिजेत; नाहीं तर हे निबंध ठिकठिकाणीं उत्तरोत्तर अधिकाधिक दुर्बोध आणि अर्थात् निरुपयोगी होत जातील.

धार्मिक, नीतिपर आणि बोधपर ग्रंथ किंवा निबंधः—संस्कृतांत धर्मपर, बोधपर आणि नीतिपर वाङ्मय पुष्कळ आहे. त्यातील मतें वगैरे त्या कालानुरूप आहेत, ही गोष्ट निराळी. एकादे आख्यान सांगून नीतिबोध करावयाची जुनी पौराणीक तऱ्हा नावाजण्यासारखी आहे. या तऱ्हेनें मराठींत कवितावद्ध आख्यानें, कथा आणि नीतिपर पद्यवाङ्मय झालें आहे, पण तसें गद्यवाङ्मय झालें नाहीं. आमच्या लोकांत अशीं व्याख्यानें होत असत, पण तीं एकादें संस्कृत मूळ घेऊन त्यावर करावयाचीं. तें काम पुराणीक आणि हरदास बरेंच चांगलें

करीत आले आहेत, हें मागें सांगितलेंच आहे. हीं धर्मपर, नीतिपर आणि उपदेशपर व्याख्यानें ग्रंथरूपानें टिकविण्याचा प्रयत्न साधनाच्या अभावीं झाला नाहीं. अलीकडे प्रार्थनासमाज, आर्यसमाज, य सारखे धर्मपंथ निघाल्यापासून उपासना, व्याख्यान व उपदेश पुष्कळ होतात. यातील काहीं ग्रंथरूपानें राखण्याचा प्रयत्न झाला आहे मोडक, रानडे आणि भांडारकर यांचीं धर्मपर व्याख्यानें आणि उपदेश पुस्तकरूपान छापून झाले आहेत. मोडक यांना भगवद्गीता, उपनिषदें वगैरे प्राचीन वाङ्मयावर भर असे. रानडे हे एकनाथाचे चाहाते होते. या दोघांनीं इंग्रजी धर्मोपदेशाचेंही साह्य घेतलें आहे भांडारकर यांचा आरंभापासून उपनिषदें वगैरे जुन्या संस्कृत ग्रंथांवर भर आहेच, पण त्यांचा अलीकडे आपले साधुसंत–विशेषत नामदेव आणि तुकाराम—या दोघांवर भर फार. मोडक, रानडे आणि भांडारकर या तिघांची ही भाषासरणी उत्तम आहे. परंतु त्यातल्या त्यात बराच फरक आहे. मोडक यांची भाषा शांत, प्रेमळ, सौम्य आणि गोड असून तिचा गंभीर ओघ चालत असे. त्यांचे विषयप्रतिपादन बरेंच जुन्या विचारांना धरून असतें. अगोदर जुन्या विचारांत काय ग्राह्य आहे त पाहून, तें कालोचित सुधारणा करून स्वीकारावें, मग जरूर तर नवीन घ्यावें, असे त्यांच्या उपदेशाचें सार त्यांच्या भाषणांत आणि लेखांत दृष्टीस पडतें. रानडे यांचें युक्तीनें श्रोत्यांचे मन आपल्या प्रतिपादनाकडे ओढून नेण्याकडे लक्ष असतें जुने हिंदीमत, वेदान्तमत, ख्रिस्तीमत, यातून अथवा दुसऱ्या कोणत्याही धर्ममतांतून आपल्या मतास जुळेल असें सार काढण्याची त्यांची हातोटी असे भांडारकर यांच्या प्रतिपादनांत भक्तिप्रेम विशेष, आणि प्रतिपादन अगदी सरळ, स्पष्ट, निर्भीडपणाचें व ठासून असावयाचें. तिघांचेंही प्राच्य व पाश्चात्य या भाषांतील धर्मपुस्तकांचें अध्ययन मोठें असल्यामुळे त्यांनीं मराठी भाषेत नवीन धर्मविचाराचें विस्तृत वाङ्मय उत्पन्न केलें आहे. भांडारकर यांचा पुष्कळ मोठा व्याख्यानसंग्रह प्रसिद्ध झाला आहे. या तिघांच्या आणि विशेषतः भांडारकर यांच्या गुरुत्वाखालीं मुंबई आणि पुणें येथें कित्येक चांगले धर्मोपदेशक तयार झाले असून आणखीही कित्येक धर्मोपदेशपर

व्याख्यानांचीं पुस्तकें छापून झालीं आहेत. प्रार्थनासमाजांत दर आठवड्यास होणारे उपदेश सुबोधपत्रिकेमध्यें प्रसिद्ध होत असतात, आणि हें धर्मोपदेशपर वाङ्मय चांगलें तयार होत आहे.

नीतिपर आणि बोधपर लहान लहान पुस्तकें पुष्कळ झालीं आहेत. नीतिमंदीर, नीतिमुक्ताहार, शील आणि नीतिमत्ता ( दाभोळकर ) हीं पुस्तकें तरुणांना वाचावयास चांगलीं आहेत. नीतिबोध आणि उपदेश ह्या गोष्टी साधारणतः मनुष्यस्वभावास कंटाळवाण्या वाटत असतात. आणि मनुष्याच्या मानी स्वभावास दुसऱ्यांनीं वारंवार बोध केलेला आवडत नसतो. यामुळें नीत्युपदेशपर आणि धर्मोपदेशपर ग्रंथही जनांना तितके प्रिय नसतात. गोष्टींच्या द्वारें नीत्युपदेश करणें विशेष चांगलें असतें.

**आध्यात्मिक, वेदान्तपर आणि तत्वज्ञानविषयक वाङ्मयः—** आमच्या प्राचीन मराठी वाङ्मयाला आरंभ झाला तो प्राचीन वेदान्तपर अथवा तत्त्वज्ञानविषयक वाङ्मयानें झाला, आणि हें बहुधा सर्व वाङ्मय ओवीबद्ध आहे, हें मागें सांगण्यांत आलेंच आहे. ज्ञानदेवाच्या ग्रंथांत भगवद्गीतेचा एकेक श्लोक घेऊन त्यावर उपमा, रूपकें, दृष्टान्त, उदाहरणें इत्यादिकांनीं नीट समजेल असें व्याख्यान केलें आहे.

यानंतर तीन शतकें अशाच प्रकारचें वाङ्मय आणि व्याख्यानें, चर्चा वगैरे चालू होतीं. या काळांतले नामदेवाचे अभंग भक्तिपर व उपदेशपर आहेत, तसेच आध्यात्मिक, वेदान्तपरही आहेत. मुक्तेश्वरापासून आख्यानपर वाङ्मयास आरंभ झाला. तथापि आध्यात्मिक वाङ्मयाची रचना इंग्रजी राज्यसंस्थापनेपर्यंत चालू होती. हे आध्यात्मिक व वेदान्तपर वाङ्मय ओवीबद्ध, म्हणूनच केवळ त्याला पद्यवाङ्मय म्हणावयाचें, बाकी त्यांत कवित्व फारसें नसतें; तें गद्यच होय. तसेंच थोड्या ग्रंथांखेरीज या वाङ्मयांत कांहीं तत्व आढळत नाहीं. या ग्रंथांतील एकेक ग्रंथ घेऊन वाचूं लागल्यास तो शेवटपर्यंत कोणाच्यानें वाचवणारही नाहीं, आणि त्यांत काय सांगितलें आहे, हेंही कळणार नाहीं. नवीन वाङ्मय सुरू झाल्यावर असलें वाङ्मय होण्याचें बंद पडेल असें वाटत होतें. पण मराठी

भापेच्या दुर्दैवाची गोष्ट अशी आहे की, त्याची सुरवात गद्यातही झाली, आणि कित्येक चागले मराठी लेखक या निरुपयोगी विषयाचा नादाला लागले उपनिषद, वेदान्त, गीता, यावर जुनीं नाना मत आणि नाना पथ आहेत आणि सस्कृतात त्यावर चागलें, वाईट, हवें तितकें भारूड आहे; तें मराठींत आणण्याचें काम सुरू आहे. भानू याच्या यासारख्याच्या दीर्घ उद्योगान वाङ्मयाला किंवा मराठी वाचकवर्गाला काय फायदा झाला, हे कोणाला सागता येणार नाही. तेव्हा असल्या विषयावर मराठींत लिहिण्याचे प्रयत्न अगदी व्यर्थ होत. सेरीज या योगान चागले लेखक भलतीकडे वाहावले आणि चागल्या प्रथाची जागा निरुपयोगी भारुडानें घेतली. असल वाङ्मय सस्कृतात होत, तेंच वरें होत. त्यातलें जे समजेल अथवा जे न समजेल तें केवळ भाविकबुद्धीनें वाचून लोक समाधान मानून घेत आले, तेवढें पुरे होतें. आताचा काळ फार निराळा आला आहे. या वेळीं ज्याच्या योगान आपल्यास बाहेरच्या उद्योगशील जगाबरोबर टक्कर मारण्यास आणि चढाओढ करण्यास ताकद येईल, अशा प्रकारचे वाङ्मय उत्पन्न होण्यास हवें आहे.

अध्यात्मज्ञान आणि वेदान्त यावर थोडे स्वतत्र ग्रथ मराठींत झाले आहेत. गोंदवलेकृत आत्मविद्या व जीवितविद्या (दाभोळकर) आणि प्रा० जोशी याचा अधुनिक सुशिक्षिताचा वेदान्त हे ग्रथ चागले आहेत. अशा रीतीनें सस्कृतातील अध्यात्मविद्या आणि वेदान्त याचीं मूलतत्त्वे मराठींत प्रविष्ट झाली म्हणजे पुरेत. गीतेवर नानाप्रकारचीं व्याख्यानें झालीं व निरतर होतच आहेत. मोडक याचें गीतार्थसार हें व्याख्यान गीतेचें खरे तत्त्व कळण्यास पुरेस आहे.

'मनुष्यानें आपल कर्तव्य निरपेक्षबुद्धीन करावें, इतकेंच नव्हे, तर तसें करण्यास तो बाधला गेला आहे,' हे गीतेंतले प्रमेय सर्वांस कळावें. यासाठीं टिळक यानीं भगवद्गीतारहस्य अथवा कर्मयोगशास्त्र हा सुप्रसिद्ध ग्रथ लिहिला. हा ग्रथ त्याच्या बुद्धिमत्तेस, विद्वत्तेस आणि बहुश्रुतपणास शोभण्यासारखा आहे. तसच त्यानीं नवीन शोधकबुद्धीनही विचार केला आहे. परतु त्यात त्यानीं खडणमडण

आहे. परंतु त्यांचे प्रयत्न मराठी भाषेच्या दुर्दैवानें भलतीकडेसच वाहावत आहेत, त्याला उपाय नाहीं.

दाभोळकर यांच्या उद्योगानें आत्मनीतीचीं तत्त्वें आणि परोपकार (फडके व कर्वे), धर्ममीमांसा (दीक्षित), नीतिशास्त्राचे सिद्धांत, अज्ञेयमीमांसा (फडके), वगैरे कांहीं ग्रंथ चांगले झाले आहेत.

अलीकडे विशेषतः बंगालमध्ये स्वामीरामकृष्ण परमहंस, विवेकानंद, रामतीर्थ, इत्यादि कित्येक पुरुष झाले. त्यांना आपल्या आणि पाश्चात्य तत्त्वज्ञानाची माहिती होती. यांनीं दोहोंच्याही कुलैनें अनेक ग्रंथ लिहिले आहेत व व्याख्यानें दिलीं आहेत. हें वाङ्मय मराठींत आणण्याचा प्रयत्न चालला आहे. विवेकानंद यांचीं व्याख्यानें आणि चरित्र यांच्यावर मुंबईतील कर्नाटक छापखाना, भा० वि० फडके व रा० ना० मंडलीक यांनीं मिळून सुमारें बारातेरा चांगले मराठी ग्रंथ प्रसिद्ध केले आहेत. रामकृष्ण यांच्या संबंधाच्या इंग्रजी ग्रंथावरून किनरे यांनीं लिहिलेलें रामकृष्ण वाक्सुधा हें पुस्तक चांगलें झालें आहे. तथापि या उद्योगाचा अतिरेक होऊन तो कंटाळवाणा होऊं नये म्हणजे झालं !

इंग्रज किंवा इतर पाश्चात्य तत्त्वज्ञानी यांच्यापैकीं कित्येकांच्या—विशेषतः स्पेन्सर यांच्या—ग्रंथांना मराठी स्वरूप देण्याचा प्रयत्न ग्रंथप्रसिद्धीकार दाभोळकर यांच्या उद्योगानें झाला आहे व चालू आहे. या उद्योगांत फडके, भानू, कर्वे वगैरे कित्येक चांगल्या लेखकांनीं भाग घेतला आहे. दाभोळकर यांच्या मालेंत आणि इतरत्र जीं अशा प्रकारच्या मूळच्याच गहन विषयावरील ग्रंथांचीं रूपांतरें मराठींत होतात तीं केवळ मराठी वाचणारास समजण्यासारखीं बहुधा नसतात. ज्यांना थोडेंबहुत इंग्रजी येतें त्यांनीं मन लावून प्रयत्न केल्यास त्यांना ते ग्रंथ इंग्रजींतच कळतात. उलट मराठींत—स्वभाषेंतच—कळत नाहींत, असा प्रकार असलेला दिसून येतो. यांत अशी चुकी होत आहे का, प्रथमतः हें पाश्चात्य तत्त्वज्ञान मराठींत आणावयास मराठी भाषासरणी कशी पाहिजे, हें ठरवावयास पाहिजे

होतें. तसेंच यासंबंधाचे नवीन शब्द मराठींत अर्थ ठरवून कायम करावयास हवे होते. त्याचप्रमाणें तिकडलें तत्वज्ञान आणि आमचें तत्वज्ञान यांतलें साम्य आणि भिन्नपणा यासंबंधी निराळी वाङ्मयचर्चा प्रथमतः व्हावयास पाहिजे होती. अशा रीतीनें भूमी तयार करून मग तींत पाश्चात्य तत्वज्ञानाचें बीजारोपण झालें असतें तर त्यानें जीव धरला असता. सांप्रत आमचे लोक चालत आलेल्या वेदान्ताच्या चर्वित चर्वणाला कंटाळले आहेत. त्यांत नवीन गोष्टी उत्पन्न होईल असें आतां कांहीं राहिलें नाहीं. आतां आम्हास पाश्चात्य तत्वज्ञान हवें आहे. तें केवळ इंग्रजांतलेंच हवें असें नाहीं, तर प्राचीन ग्रीक लोकांचें देखील हवें आहे. व जर्मनी, फ्रान्स, स्पेन या देशांतलेंही हवें आहे. अशा रीतीनें यापुढें प्राच्य आणि पाश्चात्य तत्वज्ञानांचा संगम होईल तर आमच्या इकडे नवीनच तत्वज्ञान उत्पन्न होईल. आमच्याकडे अशा प्रकारच्या अभ्यासाचीही सुरुवात आहे. वर ज्यांचीं नांवें आलीं आहेत ते आणि दुसरेही कित्येक विद्वान् लेखक हें काम हातीं घेण्यासारखे आहेत. परंतु सध्यां अशा विषयांचा व्यासंग इंग्रजी भाषेंत चालतो. यामुळें अशा विषयांवर मराठींत ग्रंथ लिहिण्याचा चांगला उद्योग होण्याचें व तो फलप्रद होण्याचें कठीण आहे.

मराठींत निरनिराळ्या धर्मांवर फारशीं पुस्तकें झालीं नाहींत. बौद्धधर्मविषयक कांहीं पुस्तकें धर्मानंद कोसंबी यांनीं लिहिलीं आहेत. जैन धर्माचीं जुन्या तऱ्हेचीं कांहीं पुस्तकें आहेत. आर्य धर्माची एवढी चळवळ झाली, आणि तो पथ एवढा जोरावर आणि लोकप्रिय आहे, पण मराठीमध्यें तत्संबंधीं ग्रंथ नाहींत. खिस्ती आणि महंमदी धर्मविचारांवर मराठीमध्यें चांगलीं पुस्तकें व्हावयास पाहिजेत. तशीं पुस्तकें लिहिण्याजोगे विद्वान एतद्देशीय खिस्ती आणि मराठी चांगले जाणणारे मुसलमान आपल्या मंडळींत आहेत. अशीं निरनिराळ्या धर्मविचारांवर पुस्तकें होण्याचा सांप्रत काळही आला आहे.

**प्रवासवर्णनें आणि स्थलवर्णनें**:—मराठींत प्रवासवर्णनपर ग्रंथ कांहीं थोडे झाले आहेत. जुन्या वाङ्मयांत कांहीं प्रवासवर्णनें आहेत.

नानासाहेब पेशव्यांच्या एका पत्राचा उल्लेख मागें आलाच आहे. सरदार गोपाळराव पटवर्धन यांच्या पत्नीनें लिहिविलेली काशी यात्रेची हकीकत त्या वेळेच्या लेखांत चांगली आहे. अगदीं आरंभीं इंग्लंडचा प्रवास म्हणून एक चांगलें पुस्तक झालेलें आहे. पंडिता रमाबाई यांचा अमेरिकेतील प्रवास चांगला आहे. तसेंच पावगी यांचें विलायतेचा प्रवास (दोन भाग) हें मराठींतलें उत्तम पुस्तक आहे; यांत संस्कृत शब्द फार आहेत, आणि चालू शब्दांनीं काम भागलें असते, अशा ठिकाणीही मुद्दाम संस्कृत शब्द तयार करून घातले आहेत, हा या ग्रंथाचा अल्प दोष आहे. पण सुरस, चटकदार, मार्मिक आणि विनोदपर भाषा आणि वर्णनें या गुणांमध्यें हा दोष लोपून जातो. मराठींत नवीन शब्द हवे असल्यास ते संस्कृतावरून कसे तयार करून घ्यावे हें या ग्रंथावरून उत्तम प्रकारें शिकतां येईल. मिरजेच्या गोखले नांवाच्या गृहस्थानें काश्मीरचें प्रवासवर्णन चांगलें लिहिलें आहे. मागें केसरीमध्यें हंस या सहीनें हिमालयांतील प्रवासवर्णनपर लेख चांगल्यापैकीं प्रसिद्ध झाले आहेत. मासिक-पुस्तकांतून प्रवासवर्णनात्मक आणि स्थलवर्णनात्मक लेख नेहमीं येत असतात आणि त्यांतील कित्येक चांगले असतात. चित्रमयजगत् यामध्यें असे लेख नेहमीं असतात. यावरून या विषयावरील वाङ्मयास इष्ट स्वरूप येत आहे असें म्हणावयास चिंता नाहीं.

प्रवासवर्णन म्हटलें म्हणजे त्यामध्यें केवळ आपण इकडून तिकडे कसे हिंडलों, किंवा जाता येतां विशेष काय घडलें, एवढेंच सांगण्यानें कार्य झालें असें म्हणतां येत नाहीं. तर प्रवासांत आपल्या अवलोकन-पथांत जें जें कांहीं आलें, त्याचें नीट निरीक्षण करून त्यासंबधानें वाचकांस उपयुक्त आणि बोधप्रद असें कांहीं तरी सांगितलें पाहिजे. अन्य प्रदेशांतील सामाजीक स्थिती, लोकस्थिती, उद्योग, व्यापारधंदे यांचें आपल्या प्रदेशांतील त्या त्या गोष्टींशीं तुलना करून वर्णन केलें पाहिजे. तसेंच विवक्षित स्थळें पाहून त्याच्या साहचर्यानें ग्रंथकारास जुन्या इतिहासाचें स्मरण होऊन तद्विषयक नवीन माहिती सांगता आली पाहिजे, आणि त्या गोष्टीवर दर्शीच्या दृष्टीनें टीका करिता आली

प्रतीचा विनोद फारसा नाहीं. एक तर खासगी गोष्टींकडे लक्ष देऊन अथवा एकाद्याच्या जिव्हाळ्यास लागेल असा उपहास करण्याची आमच्या लेखकांची चाल फार.पुष्कळदां एकाद्या गोष्टीची किंवा माणसाची सार्वजनीक गोष्टीसंबंधानें थट्टा करण्याची जरूर असते. पण ती सभ्य रितीनें आम्हांस करितां येत नाहीं, आणि असा उपहास सोसून घेण्याची संवय ही आम्हांस नाहीं. बरेच वर्षांमागें पुण्यांत घाशीराम कोतवाल या नांवाचें एक विनोदी पुस्तक गाजत होतें. त्यामध्यें घाशीरामाच्या गोष्टीच्या पडद्यामागें तत्कालीन ऐतिहासीक पुरुषांचा फाजील उपहास केला होता, आणि विशेषतः ब्राह्मणांवर तोंडसुख घेतलें होतें. असल्या फाजील विनोदानें परस्पर द्वेषभाव मात्र वाढतो. हास्यविनोद, उपहास, विडंबन या ज्या टीकेच्या तऱ्हा आहेत, त्या मर्यादशीलपणानें केल्या असतां, आणि सार्वजनीक कामांत शिरल्यावर या गोष्टी सोसल्या पाहिजेत अशी उदारबुद्धी असल्यावर, त्यांचा वाङ्मयांत मोठा उपयोग असतो. इंग्रजीमध्यें वर्तमानपत्रें आणि मासिकपुस्तकें यांमध्यें अशा प्रकारचा विनोद नेहमीं येतो आणि तो बहुधा सचित्र असतो. मराठींत हिंदूपंच या नांवाचें एक विनोदी पत्र ठाण्यास पुष्कळ वर्षे चालू होतें. त्यांत चित्रेंही येत असत. सध्या मुंबईत हिंदीपंच हें सचित्र विनोदी पत्र इंग्रजी, मराठी आणि गुजराथी भाषेत चालू आहे. याची लिहिण्याची आणि टीकेची तऱ्हा तशा प्रकारच्या इंग्रजी पत्रांसारखी पोक्त असते. गंभीर लेखांतही जातां जातां सहज विनोद करून आपल्या मतांचें समर्थन करण्याची तऱ्हा असते. विद्यमान निबंध-कारांमध्यें शिवराम पंत परांजपे यांच्या लेखांत हा प्रकार अगदीं स्वाभावीक आढळून येतो. परंतु त्यांचा विनोद औपरोधिक असतो, आणि ते पक्षाच्या भरीस पडले असतां एकादी विशेष गोष्ट अथवा व्यक्ती यांचा प्रत्यक्ष उपहास केला असतो. स्वभावांत आणि लिहिण्यांत विनोदीपणा मुद्दाम आणून येत नसतो. तो स्वभावताच अंगीं असला पाहिजे. निबंधमालकारांना आपण विनोदी आहों असें वाटत असे; आणि त्यांनीं आपल्या लेखांत विनोद करण्याचा प्रयत्न जागोजाग केला आहे; पण त्यांना तो कधींच साधला नाहीं. याचें कारण त्यांचा

स्वभाव खरोखरी विनोदी नसून, लोक ज्यांना मानतात, त्यांचा उपहास करण्याची सवय मात्र त्यांस होती. निबंधमालेंत रसातळची मराठी भाषा असा एक विनोदी लेख बराच चांगला आला होता. आगरकर यांना त्यांच्या स्वाभावीक गंभीरपणामुळें विनोद साधत नसे. परंतु त्यांच्या लेखांत आपल्या लोकांतील जुन्या चालीरीती आणि समजुती यांचा निषेध करितांना आणि दोष दाखवितांना प्रथमतः केसरींत आणि त्यानंतर सुधारकांत गंभीर विनोद आणि उपहास केलेला बराच आढळतो. संमतीचा कायदा पास झाला तेव्हांच्या वाटाघाटींवर केसरी-मध्यें 'आतां कसें ?' असा एक विनोदी आणि उपहासपर चांगला लेख आला होता. हा पांचचारजणांनीं मिळून लिहिला होता. कोल्हटकर यांनीं बरेच विनोदी लेख लिहिले असून ते सुदाम्याचे पोहे म्हणून पुस्तकरूपानें प्रसिद्ध झाले आहेत. विनोद हा मनुष्याचें वर्तन, मतें, आणि पुस्तकें व लेख यांवरही असतो. ठोसर आणि मराठे यांचा शुतमजूपावरील नाट्यकलारक्कुठार हा विनोदी टीकापर लेख चांगला साधला आहे. परंतु हा फार लांबट आहे. ज्याप्रमाणें मनुष्यास एक-सारखें फार वेळ हांसत राहाणें आवडत नाहीं, त्याप्रमाणें सारखी पुष्कळ थट्टाही वाचवत किंवा ऐकवत नाहीं. पटवर्धन यांचें नाटक्याचे तारे हेंही एक नाटकमंडळ्याच्या टीकेचें चटकदार विनोदी पुस्तक आहे. त्याचप्रमाणें करंदीकर यांचें गुजराथीमधून घेतलेलें भद्रंभद्र हें विनोदी पुस्तकही चांगलें आहे.

विनोद आणि उपहास करण्यास विषयही योग्य असावयास पाहिजे. धर्ममतें, राजकीय गोष्टी, नीतिविषयक गोष्टी, धार्मीक चालीरीती, माण-सांचे जुन्या काळापासून चालू असलेले पोषाख वगैरे, स्वाभावीक शरीर-दोष, यांचा विनोद करणें चांगलें नसतें. याच्या योगानें चीड उत्पन्न होते. यामुळें राष्ट्राराष्ट्रांत युद्धें उत्पन्न झाल्याचेंही दाखले सांपडतात. मालाकार अशा गोष्टींचाही विनोद करीत, यामुळे त्यांचा आणि मालेचे 'हितचिंतक' (वा० आ० मोडक) यांचा मालेंतच झालेला पत्र-व्यवहार वाचण्यासारखा आहे. हा वादविवाद भाषेच्या सवघानेंही

चांगला असून मराठी भाषेच्या लेखकांनीं—विशेषतः नवीन लेखक होऊं इच्छिणारांनीं—ध्यानांत ठेवण्यासारखा आहे.

शालोपयोगी पुस्तकें—शाळेमध्यें शिकवावयाच्या पुस्तकांपासून भाषेच्या संवर्धनास चांगलें साह्य व्हावयाचें असतें; कारण त्यांच्या अभ्यासानें मुलांच्या मनामध्यें आरंभींच चांगल्या भाषेचा पाया पडण्यास साह्य होतें. यासाठीं हीं पुस्तकें चांगलीं असावयास पाहिजेत. आमच्या शिक्षणक्रमांत मराठी पुस्तकें प्राथमिकशिक्षणांत आणि त्यानंतरच्या शिक्षणांत कांहीं कालपर्यंत असतात. युनिव्हर्सिटीच्या प्रवेशपरीक्षेच्या अगोदर दोनतीन वर्षांतलें शिक्षण आणि कालेजमधील शिक्षण इंग्रजीच्याद्वारें होतें. यामुळें शालोपयोगी मराठी पुस्तकांचा उपयोग अत्यंत मर्यादीत आहे. या पुस्तकांमध्यें वाचनाचीं पुस्तकें आणि इतिहासाचीं पुस्तकें यांचाच वाङ्मयाच्या अभ्यासाला उपयोग व्हावयाचा; यासाठीं फक्त त्यांचेंच स्वरूप सांगतों. वाचनासाठीं प्रथमारंभीं क्रमीक पुस्तकें असतात, आणि नंतर कित्येक गद्यपद्यात्मक पुस्तकें वाचण्यामध्यें येतात. यांपैकीं क्रमीक पुस्तकांचा विचार केला तर त्यांच्यापासून भाषावृद्धीला होणारें साह्य नांवाजण्यासारखें नाहीं असें मोठ्या दिलगिरीनें म्हणावें लागत आहे. इंग्रजीमध्यें वाङ्मयविषयक क्रमीक पुस्तकांचे शेंकडों संच असतात, आणि चढाओढीमुळें ते उत्तम असतात. मराठी क्रमीक पुस्तकांचा एक सरकारी संच असून दुसरा एक निर्णयसागरचा आहे. याचीं पुस्तकें थोडींच आहेत. प्रथमारंभीं चांगलीं पुस्तकें तयार व्हावीं आणि तीं स्वस्त मिळावीं म्हणून क्रमीक पुस्तकें आणि शालोपयोगी इतर कांहीं पुस्तकें सरकार छापवीत असे. पण आतां तशी व्यवस्था असण्याचें विशेष कारण नसूनही क्रमीक पुस्तकांचा संच अजून सरकारीच आहे. या पुस्तकांच्या गेल्या पन्नास वर्षांत सुधारलेल्या चार आवृत्त्या निघाल्या असें दिसून येतें. परंतु यांमध्यें उत्तरोत्तर सुधारणा न होतां त्यांची अधोगतीच झालेली आहे. थोड्या वर्षांपूर्वीं आमच्या प्रांतांतील चारी देशी भाषांतलीं क्रमीक पुस्तकें मुद्दाम कमेटी नेमून तयार करविलीं.

ह्या कामास अतोनात खर्च झाला, कमेटीदारही चांगले नेमलेले होते, परंतु निदान आमचीं मराठी पुस्तकें तरी चांगलीं झालीं नाहींत, असें म्हणणें भाग आहे. याला कारण हे काम केवळ सरकारी हुकमाप्रमाणें झालें, प्रत्यक्ष काम करणारांना स्वातंत्र्य नव्हतें, हें आहे. मराठी भाषेच्या जुन्या आणि नव्या विद्यमान वाङ्मयांतून जसेच्या तसेच अथवा जरूर तेवढी सुधारणा करून धडे घ्यावयाचे, इंग्रजी आणि संस्कृत यामधून भाषांतर अथवा रूपांतर करून धडे घ्यावयाचे व काहीं धडे मुद्दाम लिहावयाचे अशा प्रकारें हीं पुस्तकें तयार करावयाचीं. यांतला मोठा दोष म्हटला म्हणजे अत्यंत संक्षेप. एकेक धडा अमुक पृष्ठांत अथवा अमुक ओळींतच झाला पाहिजे असा सक्तीचा संकेत असल्यामुळें भाषेला चांगलीशी मोकळीक मिळाली नाही. आरंभापासूनच्या निरनिराळ्या काळांतल्या लेखातले आणि भिन्न भिन्न ग्रंथकाराचे उतारे घेतलेले नाहींत. आमच्या लोकांना जसें काय मुळींच लिहितां येत नाहीं अशा बुद्धीनें म्हणा, वा दुसऱ्या कोणत्याही कारणानें प्रथमतः एकाद्या इंग्रज लेखकाकडून धडे लिहवून त्याचीं भाषांतरें करविलीं आहेत. मुद्दाम लिहविलेले धडे फारसे नाहींत आणि चांगलेही नाहींत. एकंदर सर्व काम करवितांना चांगल्या लेखकाचें साह्य कधींच घेतलेलें नाहीं. सर्व काम भाडोत्री व्यवस्थेनें झालेलें आहे. या शिक्षणक्रमांत यांचावयाचीं इतिहासाचीं पुस्तकें लहान संक्षिप्त असणार. तींही भाषांतरें आहेत. ओक यांचा संक्षिप्त इतिहास आणि दुसरीं पुस्तकें मागें उपयोगांत असत. तीं स्वतंत्र लिहिलेलीं होतीं. तीं कां रद्द केलीं हें कळत नाहीं. अशा प्रकारें सर्व काम अगदीं कृत्रिम असल्यामुळें या पुस्तकांतील भाषा नावाजण्या सारखी नाहीं. हीं पुस्तकें तयार करणें आणि दुसरीं पुस्तकें शिकविण्या साठीं नेमणें यामध्यें भाषेच्या आणि मजकुराच्या योग्यायोग्यतेची कसोटी पाहाण्याची चाल पडली आहे. याला काही ठरीव नियम नाहींत आणि धरबंद नाहीं. हवें त्यानें वाटेल तो मजकूर कोणत्यातरी कारणानें अयोग्य म्हणावा आणि तो खालावरच्या वरिष्ठाच्या सक्त हुकुमानें काढून टाकावा. याचा दोष वास्तवीक अधिकाऱ्याकडे नसतो, कारण त्यांना मराठी कळत नसतें. 'रिपोर्ट' करणारामध्यें स्वाभिमान

पाहिजे; पण त्याची आमच्यामध्यें बरीच उणीव असल्यामुळें असे प्रकार होणें साहजीक आहे. याचें चांगलें उदाहरण पाहाणें असल्यास नवनीत या कवितेच्या पुस्तकाच्या आरंभापासून आतांपर्यंतच्या आवृत्त्या पाहाव्या. त्यांमध्यें त्या मूळच्या उत्तम ग्रंथाची अत्यंत वाईट स्थिती झाली आहे. मुलांस प्रथमारंभींच शिकवावयाच्या पुस्तकांची अशी असमाधानकारक स्थिती असावी हें खरोखर फार वाईट आहे. अगदीं अलीकडे मध्यप्रांतांतील शाळाखात्यानें मराठी क्रमीक पुस्तकें तयार केलीं आहेत. हीं मुंबईच्या क्रमीक पुस्तकांहून पुष्कळ चांगलीं आहेत. त्यांमध्यें एकंदर वाङ्मयामधून उतारे निवडून घेऊन धडे रचले आहेत. तसेंच त्यामध्यें उगाचच्या उगाच योग्यायोग्यतेचाही ताजवा लावलेला दिसत नाहीं. लहान वयाच्या मुलांना वाचायला हवें काय आणि नको काय याची निवड हीं पुस्तकें रचणारांनीं चांगली केली आहे. आमच्या इकडील क्रमीक पुस्तकांत भूगोल, इतिहास, शास्त्रें वगैरे सर्व विषय कोंबून भरले आहेत. मध्यप्रांतांतील क्रमीक पुस्तकें केवळ भाषा-विषयक उतारे निवडूनच रचिलीं आहेत. वाचावयाचीं पुस्तकें म्हटलीं म्हणजे तीं भाषाविषयकच असलीं पाहिजेत. इतर विषयांची माहिती होण्यासाठीं पाहिजे तर निराळीं पुस्तकें लिहावीं. आमच्या इकडे मुलीं-साठीं म्हणून तीन निराळीं पुस्तकें केलीं आहेत. तीं मुलांच्या पुस्तकां-हून कांहीं बरीं आहेत.

शालोपयोगी पुस्तकांच्या संबंधानें एक गोष्ट मात्र नांवाजण्यासारखी आहे. ती ही कीं, यांची भाषा व्याकरणशुद्ध, टापटिपीची आणि विषयानुरूप असून छापणें वगैरे गोष्टी व्यवस्थितपणाच्या आहेत.

**शास्त्रीय वाङ्मयः**—आमचा शास्त्रीय विषयांचा अभ्यास इंग्रजी भाषेच्या द्वारें चालतो. यामुळें शास्त्रीय वाङ्मय मराठीमध्यें ग्रंथरूपानें पुष्कळसें उत्पन्न होणें अशक्य आहे. तथापि हें वाङ्मय निबन्धरूपानें पुष्कळ उत्पन्न झालें असून भौतिक शास्त्रें आणि शिल्प, कारागिरी वगैरे इतर किरकोळ शास्त्रें यांवर नेहमीं निबंध येतात. यामुळें ज्या कोणास मोठाले आणि किंमतीचे इंग्रजी ग्रंथ घेण्याचें किंवा त्यांतील विषयांचें

आकलन करण्याचें सामर्थ्य नाहीं, अशाचें थोडें कार्य होत आहे. तसेंच या विषयाचा अभ्यास जे सुशिक्षीत आणि शिकणारे लोक करितात, त्यांना आपल्या आवडीच्या विषयावर लिहिण्याची हौस आहे आणि आपल्या देशबांधवामध्यें ज्ञानप्रसार करण्याची आस्था वाटते असेंही पण दिसून येतें हीं चिन्हें चांगलीं आहेत आणि पुढें देशभाषांतून या शास्त्राचा अभ्यास सुरू झाला म्हणजे सांप्रतच्या अल्प उद्योगाचें श्रेय झाल्याशिवाय राहाणार नाहीं

आता शास्त्रीय वाङ्मयासंबधानें आपल्या भाषेमध्यें कोणते उद्योग झाले आहेत, हें पाहिलें तर अगदीं आरंभी जांभेकर आणि कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनीं शास्त्रीय विषयावर ग्रंथ लिहिले कोल्हापूरचे मोडक यांनींही पदार्थविज्ञान आणि रसायनशास्त्र यांवेवर ग्रंथ लिहिले आहेत. पाश्चात्य वैद्यक प्रथमत देशी भाषांत शिकवीत असत. तेव्हा तत्संबधीं सर्व विषयावर मराठी ग्रंथ डा॰ डिमाक नांवाच्या इंग्रज गृहस्थानें लिहविले होते या जुन्या ग्रंथाच्या प्रती क्वचित दृष्टीस पडतात, त्यावरून ते चांगले झाले होते असें दिसून येत दीक्षितकृत ज्योतिर्विलास (दाभोळकर) हें मराठींतलें उत्तम पुस्तक आहे भारतीय ज्योतिषाचा इतिहास आणि भारतवर्षीय भूगोल हींही दीक्षित यांचीं चांगलीं पुस्तकें आहेत उमरावतीचे चिटणीस यांनीं ज्योतिषशास्त्रावर चांगला ग्रंथ लिहिला आहे छत्रे, मराठे, यांनीं शाळाखात्याच्या आश्रयानें कांहीं शास्त्रीय पुस्तकांचीं भाषांतरें केलीं गोळे यांनीं संबध शास्त्रीय विषयावर मराठी स्वतंत्र पुस्तक शाळाखात्यासाठीं केलें होत एकदरींत मराठींत शास्त्रीय ग्रंथ थोडे आहेत यांचें कारण शास्त्रीयशिक्षण हें इंग्रजींत चालत शिवाय तात्कालीक जरूरीमुळें अथवा एकाद्याच्या आवडीमुळ शास्त्रीय ग्रंथ कोणास लिहावासें वाटलें, तरी शास्त्रीय विषयाचें ज्ञान वाढत असल्यामुळ तसा ग्रंथ थोड्या वर्षांतच फुकट जाईल म्हणून असला ग्रंथ लिहिण्यास कोणी धजावत नाहीं देशातील उद्योगधंदे वाढण्यास आणि त्यांचें नवीन तऱ्हेचें ज्ञान धंदे करणारास होण्यास शास्त्रीय ग्रंथ देशीभाषेत झाले पाहिजेत, आणि ते व्हावयाचे म्हणजे शास्त्रीयशिक्षण अगदीं आरंभापासून शेवटपर्यंत देशीभाषेंतच

झालें पाहिजे. या परस्परावलंबी गोष्टींचा जम बसेतों मराठींत चांगले आणि पुष्कळ शास्त्रीय ग्रंथ होण्याची आशा नको.

**बालोपयोगी वाङ्मयः**—जुन्या वाङ्मयामध्यें मुलांसाठीं लिहिलेल्या पुष्कळ पौराणीक बखरी आढळतात. त्यांतल्या कित्येक छापल्याही आहेत. सवाई माधवरावासाठीं लिहिलेली एक मराठी राज्याची बखर आणि दुसऱ्या कित्येक गोष्टीही आढळल्या आहेत. नवीन तऱ्हेचा विद्याक्रम सुरू झाल्यावर लहान मुलांस वाचनाची गोडी लागून सुलभतेनें उपयुक्त गोष्टींचें ज्ञान व्हावें आणि सुनीतीचें वळण लागावें या उद्देशानें पुस्तकें लिहिण्याचा प्रघात प्रथमारंभीं बालमित्र व इसापनीती या पुस्तकांच्या द्वारें सुरू झाला. बालमित्र हें भाषा आणि गोष्टी या दोहोंच्याही संबंधानें लहान मुलांमुलींना वाचावयास उत्तम पुस्तक आहे. इसापनीतीच्या निरनिराळ्या बऱ्याच सचित्र आवृत्त्या निघाल्या आहेत. इसापनीतींतल्या गोष्टी ज्यांत जोडाक्षरें नाहींत अशा सोप्या, लहान शब्दांनीं लिहिल्या आहेत, अशी एक आवृत्ती चित्रशाळेंत प्रसिद्ध केली आहे. निर्णयसागर छापखान्यानें प्रख्यात ओक यांच्याकडून बालबोध हें उत्तम मासिकपुस्तक चालविलें होतें. तें अजूनही अन्य नेतृत्वाखालीं चालू आहे. वा०गो०आपटे यांनीं आनंद या नांवाचें एक मुलांचें मासिकपुस्तक बरेच वर्षे चांगल्या प्रकारें चालविलें आहे. बालबोध हें गंभीर वृत्तीचें आणि आनंद अगदीं साधें, यामुळें आनंदच मुलांचें अधिक आवडतें आहे. आपटे यांनीं पुराणांतील आख्यानें आणि ऐतिहासिक गोष्टी यांवर मुलांकरितां बालरामायण, बालभारत वगैरे सुलभ लहान लहान पुस्तकें बरींच लिहिलीं आहेत. आपटे यांचा मराठींतील वाङ्मयाच्या संबंधाचा हा उद्योग फार उपयुक्त आणि प्रशंसनीय आहे. बालोद्यान नामक एक लहान मुलांचें सचित्र मासिकपुस्तक पुण्यास नुकतेंच (सन १९१८) सुरू झालें असून त्याचा आरंभ चांगला दिसत आहे. निर्णयसागर छापखान्यानें मुलांसाठीं पुराणांतील बोधपर कथा, चरित्रें आणि संस्कृत नाटकांतील गोष्टी ज्यांत आहेत अशा सुमारें पन्नास लहान पुस्तकांची

माला प्रसिद्ध केली आहे, ती चांगली आहे. हरी कृष्ण दामले यांचीं गलिव्हरचा वृत्तांत, नऊ रत्नें, मुलांस देणगी, सुबोध गोष्टी, शिक्षणसार, नीतिबोध, सायंकाळची करमणूक, थोरांच्या आख्यायिका, इत्यादि लहान पुस्तकें वाचावयास चांगलीं आहेत. या पुस्तकांतील बरेच भाग भाषांतरमय असून भाषांतर चांगलें झालें आहे. बापटशास्त्री यांचें हरी आणि त्रिंबक हें एका बालोपयोगी इंग्रजी पुस्तकाचें सुंदर भाषांतर आहे. हरिभाऊ आपटे, किनरे, सहकारी कृष्ण, काशीबाई कानिटकर, कृ० के० गोखले यांनीं लहान मुलांसाठीं पुष्कळ गोष्टी—कांहीं स्वतंत्र पुस्तकरूपानेंही—प्रसिद्ध केल्या आहेत. आपटे यांचे शाळेंत झालेले मुलांस उपदेश आणि गोळे यांचा शाळेचा अभिमान हीं पुस्तकें मुलांना वाचावयास चांगलीं आहेत. पुण्याच्या चित्रशाळेनें मुलांसाठीं लहान लहान पुस्तकें बरींच काढलीं असून तीं बहुतेक मुलांना हवींत तशीं सचित्र आहेत. इंग्रजींतलें बालोपयोगी वाङ्मय बोधपर आणि ज्ञानवृद्धीपर सोप्या शास्त्रीय गोष्टींचें असतें. तसेंही प्रयत्न आमचे इकडे होत आहेत. एकंदरींत बालोपयोगी वाङ्मयाची आपल्या भाषेंत समाधानकारक वाढ होत आहे, असें म्हणण्यास चिंता नाहीं.

वक्तृत्वः—पाश्चात्य देशांत सर्व राजकीय कारभार आणि तत्संबंधीं सर्व व्यवहार वक्तृत्वाच्या जोरावर चालतात. यामुळें त्या देशांत वक्तृत्व हें भाषावृद्धीला नेहमीं साह्यकारी झालें आहे. आमच्या इकडे अशी स्थिती नाहीं. मराठी अमदानींत राजकीय दरबारांमध्यें थोडेंबहुत वक्तृत्व चालत असेल असें वाटतें. परंतु त्या वेळचीं राजकारस्थानें थोड्या मुत्सद्यांनीं ठरवावयाचीं असत, लोकमत म्हणून कांहीं नव्हतें, म्हणून या दृष्टीनें वक्तृत्वाची वाढ झालेली नाहीं. हरदास, पुराणीक आणि धार्मिकपंथांचे सांप्रदायीक यांचें वक्तृत्व चाले, पण तें एकांगी असे. अलीकडल्या काळीं, पुढें राज्यकारभारांत आणि स्थानीक संस्थांच्या कारभाराकरितां जनतेला तदुपयोगी असें शिक्षण देऊन तयार करण्यासाठीं मराठी वक्तृत्वाचें काम अवश्य लागेल, या

आशेनें ती कला चांगल्या स्थितीला यावी म्हणून आमच्या इकडे मुद्दाम प्रयत्न झाले आहेत. या आशेची बहुतेक निराशाच झाली आहे. कारण आमच्या राजकीय व सामाजीक संस्थांत सर्वत्र इंग्रजीच चालतें. इंग्रजींत चांगलें बोलतां आल्याखेरीज मोठ्या शहरांतल्या म्युनिसिपालिटीमध्यें देखील काम चालवितां येत नाहीं, अशी स्थिती आहे. सांप्रत राज्यकारभाराचा बराचसा भाग जबाबदारीनें लोकांच्या अंगावर टाकला जात आहे आणि उत्तरोत्तर अधिकाधीक टाकला जाणार आहे. परंतु त्याची घाटाघाट कायदेकौन्सिलामध्यें तर इंग्रजीच चालेल. परंतु ग्रामसंस्था, लोकलबोर्डें आणि म्युनिसिपालिट्या यांचें काम सर्वस्वी आपल्या लोकांच्या हातीं यावयाचें असल्यामुळें त्यामध्यें मराठीमध्येंच कामें चालण्याचा संभव आहे; इतकेंच नव्हे, तर तशी आवश्यकताही आहे, असें म्हटलें तरी चालेल. यासंबंधानें आपल्यास जास्त चर्चा करावयाची नाहीं. पण यापुढें वक्तृत्वाच्या योगानें भाषासंवर्धनास साह्य होण्याची थोडीफार आशा आहे.

वक्तृत्वास चांगल्या स्थितींत आणण्याचा प्रयत्न आरंभीं पुण्यास पुष्कळ झाला. पुण्यास वक्तृत्वोत्तेजक सभा पुष्कळ वर्षें चालली होती. तिचे उत्पादक छत्रे, कृष्णशास्त्री चिपळूणकर, कुंटे, रानडे, यांसारखी मंडळी होती. वर्षांतून दहाबारा दिवस वक्ते व श्रोते यांचें वाङ्मयसत्र चाले. त्यामध्यें उमेदवार वक्त्यांची राजकीय, सामाजीक, आणि धार्मीक वगैरे विषयांवर चांगलीं भाषणें होत. हीं भाषणें विद्वान् परीक्षकांपुढें आणि पुण्याच्या चिकित्सक श्रोतृसमाजापुढें होत, यामुळें त्यांची तयारीही चांगली होत असे. उमेदवार वक्त्यांचीं भाषणें झाल्यावर परीक्षक लोकांचीं योग्य, मार्गदर्शक आणि गुणदोषविवेचक भाषणें होत. तींही अर्थात् चांगलीं असत. या नमुन्यावर मुंबई वगैरे अन्यत्रही अशा सभा चालत आणि कित्येक वर्षें वक्तृत्वोत्तेजन चांगलें चाललें होतें. असें वक्तृत्व चांगलें चाललें असतां त्यापासून भाषासंवर्धनास साह्य झालें पाहिजे आणि झालेंही आहे. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं दुसऱ्यांनीं केलेल्या गोष्टींची व विशेषतः वडील लोकांची टवाळी करावयाची या आपल्या नित्यस्वभावाप्रमाणें या

प्रयत्नाची बरीच थट्टा केली आहे. पण यापासून फायदा झाला हें त्यांना देखील कबूल करणें भाग पडलें आहे. अशा प्रकारच्या प्रयत्नांनीं तयार करून वक्ते बनावयाचे नाहींत, असें त्यांचें म्हणणें होतें. परंतु वक्तृत्वाच्या बक्षिसासाठीं चारचार वर्षे प्रयत्न करून उत्तम वक्ते आणि पुढें चांगले मराठी लेखक झाल्याचीं त्या काळातील निदान दहा तरी उदाहरणें सांगतां येतील.

चिपळूणकर यांनीं निबंधमालेंत वक्तृत्व या विषयावर चांगले मार्मीक निबंध लिहिले आहेत. नुकतेंच ठाकरे यांनीं वक्तृत्वकलेवर एक पुस्तक लिहिलें आहे. त्यांमध्ये या कलेचे अंगभूत गुण कोणते याचें बरेंच विवरण असून इंग्रजी सुवक्त्याच्या भाषणांतले मासले दाखविले आहेत. वक्तृत्वकलेची समग्र चर्चा ज्यांत केली आहे असें पुस्तक व्हावयास पाहिजे आहे. सध्यां घाटत असलेली नवीन राज्यव्यवस्था सुरू झाल्यावर तिची माहिती जनतेला होण्यासाठीं व लोकांच्यातर्फे राजसभातून आपला शिरकाव होण्याकरितां पुढाऱ्यांना मराठींत वक्तृत्व करणें अगदीं जरूर पडेल. राज्यकारभारामध्यें वक्तृत्वाचा उपयोग सुरू झाला तरी तो इंग्रजीमध्यें होणार. परंतु स्थानिकस्वराज्याचा कारभार प्रथमपासूनच लोकभाषांच्या द्वारें चालवा अशी रीत पाडण्याची फार जरूर आहे. ही गोष्ट देशभाषांच्या संवर्धनार्थच जरूरीची आहे असेंच केवळ नाहीं, तर राजकीय विषय एकदर जनतेस नीट समजून द्यावयास पाहिजे असल्यास वक्त्यांना देशभाषांचाच आश्रय करावयास पाहिजे.

# भाग सहावा



# भाषादूषण आणि भाषासंवर्धन

भाषा म्हणजे मुखानें बोललेलें. बोललेले शब्द लिहिण्याची युक्ती निघून साधनें मिळालीं, तेव्हां मनुष्यें लिहून ठेवूं लागलीं. याप्रमाणें बोललेली भाषा म्हणजे वाणी आणि लिहिलेली म्हणजे लेखन असे दोन प्रकार झाले. वास्तवीक म्हटलें तर वाणी मुख्य आणि लेखन ही वाणीची प्रतिकृती. पण वाणी राखतां येत नाहीं आणि लेखन टिकवितां येतें. यामुळें सुव्यवस्थीत रितीनें लिहिण्याचा प्रघात उत्पन्न होऊन, लेखनाच्या भाषेचे ग्रंथरूपानें अनेक प्रकार उत्पन्न झाले. वाणी मूळची अगदीं साधी, जशी मुखांतून बाहेर पडते तशीच. पण लेखनामध्यें ती ठाकठिकीनें बनविली जाते; अर्थात् लेखनामध्यें कृत्रीमपणा उत्पन्न होतो. आपली वाणी जशी असते तसें लेखन नसतें, तें पुष्कळ निराळें असतें, हें सांगावयास नको. तथापि हा भिन्नपणा पूर्वी जितका असे, तितका आतां नसतो. सांप्रत छापखान्यामुळें ग्रंथप्रसार पुष्कळ, आणि शिक्षणप्रसारामुळें लोक लिहितात वाचतातही फार; यामुळें आतां लेखनानुरोधानेंच लोकांची भाषा असते, आणि लिखित भाषा ही मुख्य होऊन राहिली आहे. वाणी दोन प्रकारची असते, साध्या व्यवहारांतली, आणि व्याख्यानें देण्याची; व्याख्यानें देण्याची भाषा सर्वांशीं लेखनाच्या धोरणावर असते.

आपणास ठाऊक झालेंच आहे कीं, कोणतीही भाषा जुन्या काळापासून बदलत जाते, आणि उत्तरोत्तर तिची निराळी भाषाही बनते. हा फरकही अर्वाचीन काळचे छापखाने, ग्रंथ वगैरे जीं वाङ्मयव्यवहाराचीं साधनें, त्यांच्या योगानें कमी होतो. जुन्या काळीं एकाद्या भाषेमध्यें अगदीं थोड्या काळांतही जो फरक पडलेला

आपणास दाखविता येईल, तो साप्रत फारसा दिसून येणार नाहीं. तसेंच मागें सांगण्यात आलेंच आहे कीं, हा फरक म्हणजे भाषेची परिणती होय. मनुष्यप्राण्याच्या एकंदर परिस्थितींत जसा काळांतराने फरक होतो, तसा त्याच्या भाषेमध्येंही होतो.

प्रत्येक देशाची, प्रांताची, राष्ट्राची अथवा एकाच प्रकारच्या लोकांची भाषाही एकसारखी नसते. हे देश वगैरे ल्हान असले तरी भाषा भिन्न होतात. एकादे वेळीं निरनिराळीं राष्ट्रें, देश, लोक यांची भाषा एक असते. तरी भाषेमध्ये निरनिराळे फरक असतात. फार काय, कुटुंबाकुटुंबाची, माणसामाणसाचीही भाषा निराळी असते. प्रत्येक विद्वान ग्रंथकार, वक्ता, पोक्त मनुष्य अथवा अधिकारी पुरुष, यांच्या भाषेची तऱ्हा पुष्कळदा कांहीं विशेष प्रकारची, निराळीच ठरलेली असते, आणि त्यावरून आपण अमक्या प्रख्यात गृहस्थाची अमकी भाषासरणी, असें म्हणतों. परंतु भाषेच्या निरनिराळ्या प्रकारामध्यें जुळण्याजोग्या गोष्टी पुष्कळ असल्या, म्हणजे त्या सर्वांची एकवाक्यता करून आपण त्याची एक च विवक्षित भाषा समजतों. प्रांतोप्रांतीं, गावोगावीं जरी लोक थोडेंफार निरनिराळ बोलत असले, तरी लेखनभाषा आपण सर्वांची एक करून घेतों, आणि अशा रीतीने एकाद्या ठरीव प्रदेशाची एक नियमीत भाषा ठरते. अशा ठरलेल्या भाषेचें धोरण एक असाव, आणि तिचा व्यवहार सर्वांनीं एकसारखा करावा, म्हणून त्या भाषेचे नियम बनतात, त्यास आपण व्याकरण म्हणतों.

हें व्याकरण म्हणजे काय? याचे नियम सर्वांनीं का मानावे? व्याकरणाप्रमाणें अमुक शुद्ध, अमुक अशुद्ध असें का म्हणतात? हे प्रश्न विचारणीय आहेत. भाषेंत अनेक प्रकार सर्वांच्या अथवा पुष्कळांच्या सवयीचे आणि पुष्कळांना गोड वाटणारे असे बनतात, तशाच रीतीनें सर्वजण ती विवक्षित भाषा नियमीत रीतीने बोलू किंवा लिहू लागतात. मग ते नियम एकत्र जुळविले जातात. हें जें शास्त्र बनतें, त्याला आपण व्याकरण म्हणतो. त्याप्रमाणें भाषाव्यवहार करणें हें शुद्ध, आणि तद्विरुद्ध तें अशुद्ध, असें ठरतें, आणि त्या

धोरणानें भाषेचा व्यवहार करणारांना वागावें लागतें. एकादा सामान्य लेखक एकादी नवी तऱ्हा काढतो. तिला प्रथमारंभीं लोक नांवें ठेवितात. पण पुढें तोच प्रकार मान्य होऊन बसतो. अर्थात ही सर्व कृत्रीम व्यवस्था असते. तींत कालान्तरानें आणि स्थलान्तरानेंही फरक पडणें शक्य असतें; मात्र मागें सांगितलेल्या कारणांनीं सांप्रत हे फरक फार होत नाहींत. सांप्रत प्रत्येक भाषेच्या संबंधानें असा प्रकार झाला आहे कीं, लिखित भाषा शुद्ध आणि मुख्य. सुशिक्षीत आणि वरिष्ठ प्रतीचे लोक तदनुरोधानें बोलतात व अशिक्षीत आणि खालच्या प्रतीचे लोक शुद्धाशुद्धतेकडे तितकें पाहात नाहींत, साधारणतः जशी बोलण्याची रूढी असेल, तसें बोलतात. म्हणजे वास्तवीक बोलण्याची जी साहाजीक भाषा ती मुख्य असतां ती कनिष्ठ ठरली आहे आणि मुद्दाम व्यवस्था ठरवून कृत्रीम बनविलेली जी लिखित भाषा ती मुख्य ठरली आहे.

ज्याप्रमाणें लिखित किंवा ग्रंथोपयुक्त भाषा आणि वाणी किंवा व्यवहारभाषा अशीं प्रत्येक भाषेचीं दोन स्वरूपें असतात, त्याचप्रमाणें भाषेचीं निरनिराळीं जुनीं स्वरूपें असतात. एकाद्या भाषेचा काल फार लांब असला म्हणजे तिच्यामध्यें आरंभापासून फरक होत गेलेला असतो. बोलण्याची भाषा टिकत नाहीं, यामुळें हे वेळोवेळीं झालेले फरक टिकत नाहींत. परंतु मध्यंतरीं जर राष्ट्रामध्यें महत्त्वाच्या राजकीय, सामाजीक, किंवा धार्मीक उलाढाली झाल्या, तर भाषेंत तत्संबंधाचें वाङ्मय उत्पन्न होऊन त्यामध्यें भाषेचीं जुनीं स्वरूपें टिकतात. परंतु चालू व्यवहारभाषा नेहमीं बदलणारी असल्यामुळें हीं जुनीं स्वरूपें मृत-भाषा बनतात. भिन्नभिन्न काळांतली संस्कृत, त्याचप्रमाणें पाली, मागधी, महाराष्ट्री आणि इतर प्राकृत भाषा, हीं हिंदुस्थानांतील चालू भाषांचीं –अर्थात मराठीचींही–मृतस्वरूपें आहेत. त्यांमध्यें ग्रंथरचना होऊन तीं टिकलीं आहेत, इतकेंच. त्याचप्रमाणें प्रांतांच्या निरनिराळ्या भागांत एकाच भाषेचीं निरनिराळीं स्वरूपें असतात, तीं पोटभाषा बनतात; व हे प्रांत मोठे असले व फरक मोठा झाला कीं, मूळ आर्यभाषांपासून झालेल्या जशा आपल्या भिन्न भिन्न देशभाषा आहेत, तशा देशभाषा

5879

बनतात. पोटभापा भिन्न जातींच्या आणि भिन्न धंद्याच्या लोकांमध्येंही उत्पन्न होतात. ग्रियरसनच्या पुस्तकांत मराठीच्या सुमारें शंभर पोटभापा दाखविलेल्या आहेत.

भापेंतले शुद्ध आणि अशुद्ध हे प्रकार वास्तवीक मानीत असतात. भापेच्या रचनेच्या संबंधाच्या ज्या व्यवस्था, त्या बोलणारांच्या आवडीप्रमाणें आणि इतर कित्येक कृत्रीम कारणांनींच प्रथमतः बनतात. मग सर्वांच्या सवयींचें तें शुद्ध आणि तद्विरुद्ध ते अशुद्ध असें म्हणण्याचा प्रघात पडतो, आणि तदनुरोधानें व्याकरण बनतें.

अमुक एक प्रघात कां पडला हें नेहमींच सांगतां येणार नाही. संस्कृतांत स्त्रीलिंगी प्रत्यय 'आ' आहे. पण मराठींत तोच पुल्लिंगी प्रत्यय आहे. पुल्लिंगी प्रत्यय 'आ'च कां, स्त्रीलिंगी 'ई' कां आणि नपुंसकलिंगी 'एँ' का, अशा प्रश्नांचे समाधानकारक उत्तर देतां येणार नाहीं. 'तशी रीत पडली आहे म्हणून', एवढेंच सांगतां येईल.

आपण भापेचा अभ्यास म्हणून म्हणतों, हा नित्य व्यवहारापुरती भापा शिकावयाला करावा लागत नाहीं. ज्याची त्याची जन्मभापा आणि कोणतीही परकी भापादेखील नित्य व्यवहारापुरती मनुष्य अनुकरणानें शिकतो. पण भापेंत विद्वत्तेचा व्यवहार करण्यासाठीं, म्हणजे ग्रंथलेखन करणें, उच्च विपयांवर व्याख्यानें देणें, आणि या गोष्टी चांगल्या प्रकारें समजणें, याकरिता कोणत्याही भापेचा अभ्यास करावा लागतो. तसाच हा अभ्यास स्वभापेचाही करावा लागतो.

ज्ञानप्रसारासाठीं भापेचा फार मोठा उपयोग आहे हें उघडच आहे, आणि भापेला मुद्रणकलेचें साह्य झाल्यानें भापेचा व्यवहार आणि तद्वारें ज्ञानप्रसार करणें, या गोष्टी फार वाढल्या आहेत. यासाठीं सध्याच्या काळीं कोणतीही भापा सुव्यवस्थीत असावी, म्हणून नाना प्रकारचे प्रयत्न चालू असतात. विद्वान् लोक यासाठीं मोठी काळजी घेतात. प्रथमतः सुव्यवस्थितपणाचे नियम बनावितात; त्याप्रमाणें आपण चालतात आणि इतरांना चालावयास लावितात; आणि त्यांच्या मतें भापा दूपित होत असल्यास लोकांना वेळोवेळीं सूचना देतात, आणि भापा व्यवस्थीत राहून तिचें नीट संवर्धन होईल असें करीत असतात.

ही भाषेची व्यवस्था एक व्याकरणशास्त्राच्या मदतीनें होते; शिवाय चांगले लेखक स्वतां उत्तम भाषा व्यवहार करून अन्यांना कित्ता घालून देतात, त्यायोगानें होते. तेव्हां भाषेचा अभ्यास व्याकरणद्वारें व चांगल्या ग्रंथांच्या अभ्यासाच्या द्वारें करावयाचा असतो.

भाषेचें दूषण म्हणजे भाषा वाईट होणें. हें कसें होत असतें, आणि त्याचे खरे प्रकार कोणते आहेत, तसेंच उगाच दूषण म्हणून कोणत्या गोष्टींना नांवें ठेवितात, व भाषा निर्मळ कशी ठेवावी, याविषयीं आणि भाषासंवर्धन अथवा भाषेची सुधारणा म्हणजे काय आणि ती कशी होते अथवा कशी करावी, यासंबंधानें येथें थोडक्यांत चर्चा करूं.

कित्येक असें प्रतिपादन करीत असतात कीं, सांप्रत मराठी भाषा अधोगतीस जात आहे. भाषा दूषित होणें आणि तिची अधोगती होणें या गोष्टी निरनिराळ्या आहेत. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं आपल्या निबंधमालेंत 'भाषादूषण' या विषयावर एक निबंध लिहून त्यांत भाषा वाईट कशी होते, ती गोष्ट टाळण्याचे उपाय कोणते, मराठी भाषा कशी दूषित होत आहे, आणि हें दूषण कसें नाहींसें करावें, याविषयीं चर्चा केली आहे. चिपळूणकर यांनीं वास्तवीक भाषा अधोगतीला चालली आहे, असें कांहीं म्हटलें नाहीं. परंतु या निबंधाच्या आरंभीं त्यांनीं जें संस्कृत अवतरण घातलें आहे त्याचा 'दिवसेंदिवस भाषा अधोगतीला चालली आहे' असा अर्थ होतो. त्यामुळें कित्येकांनीं उगाच पिसाचा कावळा केला आहे. भाषा ही कोणत्याही लोकांच्या मनोभावांचें प्रगटीकरण किंवा त्यांचा प्रसार होय. हे लोक जर अधोगतीला जात असतील तर त्यांचे विचार आणि ते प्रगट करणारी त्यांची भाषाही अधोगतीला जात असेल. आमची उत्तम स्थिती नसली तरी आम्ही कांहीं अधोगतीला चाललों नाहीं. आमचें पाऊल थोडें थोडें कां होईना पण या जगाच्या रंगणावर पुढेंच चाललें आहे. अर्थात् आमच्या भाषेचीही प्रगतीच होत आहे.

ज्ञानदेवानें प्रथमतः मराठी भाषेच्या संवर्धनाचा आणि मराठी वाङ्मयाचा पाया घातला. तेव्हांपासून इंग्रजी राज्यस्थापनेपर्यंत झालेले,

गद्यपद्यलेखक यांच्या प्रयत्नांनीं भाषा ऊर्जित दशेस येत गेली. इंग्रजी अंमल सुरू झाल्यावर इंग्रजी भाषेच्या अनुकरणानें भाषा दूषित होत चालली आहे, असें विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचें म्हणणें दिसतें, तें योग्य वाटत नाहीं. त्यांच्या वेळीं देखील तिची दुःस्थिती नव्हती. ती वेळ म्हणजे भाषेच्या संबंधानें लोकहितवादी आणि कृष्णशास्त्री चिपळूणकर यांचा काळ होय. या काळची मराठी भाषा चांगल्या प्रकारची होती आणि तिला पाश्चात्य भाषांच्या गद्यरचनेचें वळण लागत चाललें होतें.

त्या वेळचीं कित्येक वर्तमानपत्रें आणि मासिकपुस्तकें भाषासंवर्धनाचें काम चांगल्या प्रकारें करीत होतीं. खुद्द थोरल्या चिपळूणकराचे ग्रंथ असे आहेत कीं, ते मराठी भाषेचें उत्तम स्वरूप म्हणून निरंतर गणले जातील. या वेळीं विष्णुशास्त्री यांनीं निबंधमाला सुरू करून भाषेला नवीन प्रकारचें निराळेंच वळण लाविलें, आणि त्यांच्या अनुकरणानें आणखीही लेखक उत्पन्न होऊन येथून पुढें भाषेची उन्नती झपाट्यानें होत गेली. परंतु या उन्नतीची किंमत वाढविण्यासाठीं त्यांच्या अगोदर जें भाषासंवर्धनाचें कार्य झालें होतें त्यावर पांघरूण घालण्याचें अथवा त्याला दूषण देण्याचें मुळींच कारण नाहीं. कित्येक असें म्हणतात कीं, विष्णुशास्त्र्यांपासून काय तो खऱ्या मराठीला आरंभ झाला. पण हें म्हणणेंही खोटें आहे. निबंधमाला निघाली आणि भाषेला नवीन वळण लागलें हें चांगलें झालें. पण मालेची उत्पत्ती झाली नसती तर भाषा रसातळास गेली असती असें मुळींच नाहीं. कित्येकांच्या मतें तर विष्णुशास्त्री यांच्या प्रयत्नानंतरही अजूनपर्यंत भाषा अधोगतीसच चालली आहे! एकंदरींत हें म्हणणें अगदीं गैरसमजाचें आहे. अनेक कारणांनीं भाषेचा विकास जितक्या त्वरेनें किंवा ज्या प्रकारें आपणास व्हावासा वाटतो तसा होत नसेल, आणि प्रसंगीं वाईट वाङ्मयही उत्पन्न होत असेल. परंतु त्यामुळें फार तर भाषा दूषित होत आहे, एवढेंच म्हणतां येईल.

चिपळूणकर यांनीं दूषणाचा मुख्य प्रकार असा सांगितला आहे कीं, 'भाषेची मूळची रचना सुद्धां ती अगदीं परकी अशी जी इंग्रजी

भाषा, तिच्या धर्तीवर जाणें'. आतां हे दोन्ही प्रकार जर खरोखरी होत असतील तर भाषा दूषित होत आहे असें म्हणावें लागेल. परंतु वास्तवीक तसें होत नाहीं. येथें हें लक्षांत ठेवावयाचें कीं, आपणास एकंदर भाषेचा विचार करावयाचा. एखाददुसऱ्या वाईट ग्रंथावरून साऱ्या भाषेचें प्रमाण बांधावयाचें नाहीं. आतां चिपळूणकर मूळची रचना सुटली असें म्हणतात, ती रचना कोणती? मराठीची मूळची रचना म्हणून नव्हती. ठरीव पद्यरचना जी जुनी आहे, तींत म्हणण्यासारखा फरक अर्वाचीन कवींनींही केलेला दिसत नाहीं. काव्यरचनेच्या प्रगतीबरोबर पद्यवाङ्मयाची प्रगती होत आहे, आणि साहजीकच ती इष्ट आहे. तसेंच इंग्रजीच्या अनुकरणानें होणारी पद्यरचना सुद्धां कोणत्याही प्रकारें अयोग्य आहे असें म्हणतां येणार नाहीं. हिचें साधारण स्वरूप मागें वर्णिलेंच आहे. इंग्रजीचा फैलाव होईपर्यंत आमचें गद्य होतें तें केवळ एकांगी, परंतु त्या काळच्या विषयाच्या मानानें बऱ्यापैकीं होतें. त्याचीच वाढ होत गेली असती, तर कदाचित् भाषेच्या प्रगतीला निराळें स्वरूप आलें असतें. परंतु मागें सांगितल्याप्रमाणें हें वाङ्मय प्रसिद्धीस न येतां दबून राहिल्यामुळें इंग्रजीच्या साह्यानें नवीन प्रकारचें वाङ्मय सुरू झालें, याला इंग्रजी वळण आहे. पण मागलें वळण अगदींच सुटलें असें नाहीं; तसेंच जें झालें तें स्वाभाविकच झालें. इंग्रजी अंमलाबरोबर नवीन पाश्चात्य विद्या इकडे आल्यावर भाषेचा फैलाव होण्याची जरूरी पडली आणि ती सुधारत चालली. त्या वेळीं अनुकरण करण्यासारखें आणि वाढत्या संवर्धनाला उपयोग पडण्यासारखें गद्यवाङ्मय नव्हतें. तेव्हां अर्थात् ही नवीन सुधारणेची धर्ती इंग्रजी भाषेच्या नमुन्यावर जावयाची. मात्र जी पद्धत घ्यावयाची ती मराठीला साजेशी करून घेतली पाहिजे, आणि तिची लोकांना जसजशी माहिती होत जाईल तसतशी हळू हळू घेतली पाहिजे. चिपळूणकर यांनीं तरी नवीन भाषासरणी इंग्रजीवरूनच घेतली. त्यांची मराठी भाषा म्हणजे प्रख्यात इंग्रजी निबंधकार आडिसन्, जान्सन् आणि मेकाले यांच्या भाषासरणीचें आणि विचारांचें अनुकरणच आहे. कित्येक निबंधांत तर इंग्रजीमधलीं कलमेंच्याकलमें मराठी स्वरूप देऊन

घेतलेली आहेत, असें दिसून येतें. वास्तवीक पाहिलें तर चिपळूणकर त्यांनीं इंग्रजीचें जितकें अनुकरण केलें आहे, तितकें त्यांचे पूर्वी दुसऱ्या कोणत्याही मान्य ग्रंथकारानें केलेलें नाहीं. चिपळूणकर हे कुशल लेखक असल्यामुळें त्यांना तें अनुकरण उत्तम साधलें, व त्याचा त्यांनीं इतरांस चांगला कित्ता घालून दिला आहे. मराठी वाङ्मय-संवर्धनाचा हा स्वाभावीकच विकास आहे. तें इंग्रजी भाषेच्या साह्यानेंच वाढावयाचें. चिपळूणकरांनीं कित्येक दूषणीय म्हणून अनुकरणाचे प्रकार सांगून त्यांचा निषेध केला आहे. परंतु ते बहुतेक प्रकार आतां-पर्यंत चालूच आहेत. ते चिपळूणकरांच्या तीव्र निषेधानेंही बंद झाले नाहींत. तेव्हां ते केवळ त्याज्य आहेत असें तरी कसें म्हणतां येईल?

चिपळूणकर यांचें भाषादूषणाचें दुसरें चिन्ह म्हणजे भाषेत परकी भाषेंतील शब्द अनिवार घेणें हें होय. नवे शब्द हवे लागल्यास ते परकी भाषेंतून घेण्यास चिपळूणकर विरुद्ध नाहींत. पण ते उठल्या-बसल्या घेऊं नयेत आणि विकृत करून घेऊं नयेत असें ते म्हणतात. प्रथमतः परकी शब्द अनिवार घेणें म्हणजे काय आणि विकृत करणें म्हणजे काय याचा विचार केला पाहिजे. शब्द हवा लागला कीं परकी भाषेंतून घेतला हें उपयोगी नाहीं, हें खरें. तथापि आपल्या भाषेंत शब्दांचा भरणा फार कमी आहे, आणि आपण पाश्चात्य विद्या, कला, शास्त्रें यांवर ग्रंथ लिहीत आहोंत; यासाठीं आपणाला नवीन शब्द लागणारच. तर ते कोणत्या व्यवस्थेनें घ्यावें, हें मुख्यतः पाहा-वयाचें. चिपळूणकरांच्या वेळीं मराठींत इंग्रजी शब्द कोणी अनिवार घेत होता असें मुळींच नाहीं. संस्कृत शब्द घेण्याचा प्रघात पडत होता, पण तोही दूषण देण्यासारखा नव्हता. संस्कृत भाषेत नवीन शब्द बनविण्याचीं साधनें उत्तम आहेत. तेव्हां नवीन शब्दांची गरज लागली असतां ते प्रथमतः संस्कृताच्या साह्यानें तयार करावे. इंग्रजी किंवा कोणत्याही परकी भाषेंतला शब्द असेल, त्या अर्थाच्या मूळच्या शब्दाच्या स्वरूपावरच उपसर्ग, धातू, प्रत्यय, समासरचना यांच्या साह्यानें नवीन शब्द बनवावा. असा शब्द बनवितांना मूळ शब्दाचा अर्थ नवीन शब्दांत चांगलासा आला नाहीं असें वाटून पुष्कळदां

मनाचें समाधान होणार नाहीं. परंतु तो शब्द भाषेंत रुळला असतां आपल्यास हवा असेल तो अर्थ उत्पन्न होतो. कोणत्याही भाषेंत पाहिलें तरी शब्दांचे अगदीं बरोबर अर्थ थोडेच असतात. शब्द प्रथमतः यौगिक अर्थानें भाषेंत उत्पन्न होतात, आणि त्यांना योगरूढ अर्थ मागाहून प्राप्त होतात. एखाद्या शब्दाचा निरनिराळ्या प्रसंगीं उपयोग होऊन त्याचे निरनिराळे अर्थ होतात. तसेंच विषयान्तरानें आणि कालान्तरानें शब्दांचे अर्थ सहज फिरत जातात. हें कोणत्याही भाषेंत टाळतां येणार नाहीं. तात्वीक किंवा शास्त्रीय विषय यांतले मूळ शब्द आरंभीं जे हेतू किंवा विचार यांकडे लक्ष ठेऊन बनविलेले असतात, ते हेतू आणि विचार कायम ठेऊन त्या शब्दांना त्याच तऱ्हेचे संस्कृत शब्द योजितां येतील, अथवा नवीन बनवितां येतील. परंतु केव्हां मूळ परकी शब्दाच्या अर्थावरून मराठींत संस्कृत किंवा शुद्ध मराठी शब्द बनवितां येणार नाहीं. अथवा मूळचा परकी शब्दच जास्त प्रशस्त आहे असें दिसून येईल. उदाहरणार्थ, वस्तूंचीं नांवें त्या नांवांच्या अर्थांकडे लक्ष ठेवून नवीन बनविणें अशक्यही आहे आणि पुष्कळदां हास्यकारकही होईल. तसेंच अशा प्रकारचे शब्द बनवीत बसण्याचे श्रम करण्यांतही विशेषसा फायदा नसतो. स्टेशन, पोष्ट, तिकीट, रबर, पेन्सिल, पेन, स्पंज, टेबल, नोट (पैशांच्या किमतीची), युनिव्हरसिटी, कालेज, पेपर (परीक्षेचा), मार्क, नंबर (वर्गांतला), ट्रेन, गटार, नाटपेड, सायकल, मोटार, वगैरे शेंकडों साध्या आणि नित्यव्यहिवाटींतल्या वस्तूंच्या नांवांना मराठी शब्द योजीत बसण्यांत काय अर्थ आहे? हेच शब्द मराठी-मध्यें घेतले म्हणून कांहींएक हरकत नाहीं. सांप्रत व्यापाराचें दळणवळण वाढल्यामुळें अगदीं माहीत नव्हते अशा प्रकारचे एका देशांतले पदार्थ दुसऱ्या देशांत गेले आहेत. त्यांना त्या त्या देशांत नवीन नांवें ठेवण्यांतही कांहीं फायदा नसतो. मूळचींच नांवें निरनिराळ्या देशांतील भाषांत थोड्या उच्चारभेदानें योजिलीं जातात. तंबाखू, बटाटा, कोबी, सालाड, टोमाटो, हे अशा प्रकारचे शब्द आहेत. केव्हां गमतीदार आणि हुबेहुब असा शब्द बनविण्यांत येतो. उदाहरणार्थ, groundnut याचें भुयमूग. इंग्रजी भाषेंत पृथ्वींतल्या सर्व भाषांतून लागतील तसे

शब्द घेतले आहेत. ह्यामुळ ती भाषा विकृत तर झाली नाहींच, पण आजकाल ती जगामध्यें उत्कृष्ट भाषा म्हणून नावाजली जात आहे. तसेंच इंग्रजींत नवीन शास्त्रीय शब्द बनविले आहेत ते ल्याटीन व ग्रीक भाषाच्या साह्यानें बनविले आहेत. वास्तवीक या भाषा इंग्रजीला परकीच आहेत संस्कृत आणि कोणतीही आपली देशीभाषा याचा जसा परस्पर निकटसंबध व आपलेपणा आहे, तसा ल्याटीन व ग्रीक याचा य इंग्रजीचा नाहा. तेव्हा केवळ वस्तूचीं नावें नवीन ठेवावी लागलीं अथवा नवीन शब्द योजड होऊ लागला, तर परकी शब्द घेण्यास काहीं चिंता नाहीं, असें धोरण त्यानीं ठेविल आहे, व आपणही तेंच धोरण स्वीकारले पाहिजे

आता परकी शब्द घेतला तर तो उच्चारात किंवा लिहिण्यात कितपत विकृत करावा, हाही एक महत्वाचा प्रश्न आहे कोणत्याही भाषेचा स्वभाव म्हणून असतो आणि त्याच्या अनुरोधान भाषेंतील उच्चाराची आणि लिहिण्याची तऱ्हा असते त्यामानान शब्द विकृत व्हावयाचाच. त्या सबधानें कडक नियम घालीत बसण्यात अर्थ नाहीं. संस्कृत भाषेत तर परकी भाषेतील पुष्कळ शब्द घेतलेले आहेत, हें मागें दाखविण्यात आलेंच आहे परकी भाषेतला शब्द बेमालूम आपलासा करून घेण्याची हातोटी संस्कृतास चागली साधली होती. कित्येक शब्द मूळचे देशी भाषेतील असून ते संस्कृत भाषेच्या स्वभावानुरूप विकृत करून घेतले आहेत, आणि पुढ तेच मूळचे संस्कृत शब्द आणि ज्यावरून ते झाले, ते त्या त्या संस्कृत शब्दावरून झालेले देशी शब्द अशी उलट समजूतही रूढ झालेली आहे! तसेंच संस्कृत शब्द विकृत करून प्राकृतात आणि देशी भाषात घेतले आहेत. प्रथमारभीं ते हवे त्यानें हवे तसेच घेतले आहेत, असें म्हटल तरी चालेल पुढ कोणीं शहाण्यानें त्याचें नियमबद्ध वर्गीकरण केलें, हें ठीकच झालें. आरबी आणि फारशी भाषेंतून मराठींत ज शब्द घेतले आहेत ते तर इतके विकृत झालेले आहेत कीं, त्याच्या मूळ रूपाचा आता मागमूसही राहिला नाहीं, अशा रितीनें शब्द विकृत होतात ते मुद्दाम कोणी विकृत करितो अस नाहीं, त्या त्या भाषेच्या उच्चारपद्धती

विशेषसा वेडेवांकडेपणा नसल्यास एक प्रकारें रूढीचें अवलंबन करावें हें प्रशस्त होय. लोकांनीं एकाद्या शब्दाच्या सवयानें रूढी पाडली, तर ती बदलणें अशक्य असतें. सध्या संस्कृत भाषा शिकण्याचा प्रचार झाल्यापासून अमूक शब्द असा नव्हे, असा पाहिजे, असें अल्पवयी विद्यार्थ्यांनाही कळतें. अशा ठिकाणीं सुधारणेचा सक्त प्रयत्न करून पाहावा, पण रूढी नच बदलेल तर *वितंडवाद* करीत बसूं नये. खरें पाहिलें तर मध्यान्हरात्र, अहोदिवस, परस्वाधीन, असे अर्थासंगतीचे प्रयोग बदलले पाहिजेत. तसेंच अधःकार, हाहाःकार दीपोत्साह, अशीं अशुद्ध रूपें टाळावीं. सह्याद्रीपर्वत, गाईचें गोमून हिरवा पितावर, पायाची करगळी, असे उपयोगही करूं नयेत. परंतु कित्येक प्रचार आतां अत्यंत रूढ झाले, ते बदलणें दुरापास्त आहे व तसें करण्यामध्यें काळाचा व प्रयत्नांचा अपव्यय आहे. मोरोपतानें मराठींत *अगदीं शुद्ध संस्कृत रूपें, संस्कृतसारखे प्रयोग,* संस्कृत लिंगशुद्धी वगैरे प्रकार पुष्कळ केले आहेत. भाषेला चांगलें वळण लागण्यास तसें करणें योग्यही आहे. परंतु त्यावरोबर मराठी भाषेला स्वातंत्र्य म्हणून आहेच, हें लक्षांत ठेविलें पाहिजे. त्या स्वातन्त्र्याचा अपहार होऊन उपयोगीं नाहीं. आपण संस्कृतांतल्या गोष्टी घेतल्या म्हणून आपल्या सोईप्रमाणें त्यांत बदल करण्यास आपण मुखत्यार आहों. तो जन्म, ती वस्तू, तें स्वप्न, तो वीणा, असें म्हणणें संस्कृतज्ञाच्या कानास कडू लागेल. *पण अशीं लिंगें बदलण्याची पद्धत फार प्राचीन आहे. ती प्राकृत* भाषांनीं पाडली. मग मराठीनें ती बदलून मूळ संस्कृतावर जावें असा जुलूम काय म्हणून ? शिवाय संस्कृतांतही एकाच शब्दांचीं भिन्न लिंगें मानण्याची पद्धत नाहीं कोठें ? भिन्न लोकमतांमुळें याला आरंभ संस्कृतांतच झालेला आहे. तसेंच 'मी जेवल्यानंतर निजतों' 'त्याला अवदसा आठवली', 'ती बाई विद्वान आहे,' असलीं वाक्यें कोणाला खपत नसतील. पण इतक्या दिवसांची रीत पडली, त्याला इलाज नाहीं. तथापि *'रमाबाई विद्वान आहेत,' 'त्याला सुंदर बायको मिळाली,'* या धर्तीवर 'त्याला चांगला बायको मिळाली,' असें कोणी म्हणेल तर खपणार नाहीं. अशी शुद्धता कोणी करूं लागल्यास, संस्कृत

प्रमाणें ते विकृत होतात. तसेंच विकृत झालेलें रूप पुन्हां बदलीत बसण्यांत अर्थ नसतो. उदाहरणार्थ 'पोष्ट-हपीस' याचा उच्चार आतां 'पोस्ट-ऑफिस' असा मराठींत बदलण्याची खटपट साध्य व्हावयाची नाहीं. 'अबदागीर' याचा मूळ शब्द 'आफ् ताफ् गीर'; हा आतां उपयोगांत कसा येणार ? आतां इतकें खरें कीं, मागें परकी शब्द ज्यांनीं घेतले त्यांच्यापेक्षां आपण अधीक सुशिक्षीत, समजूतदार व शास्त्रीय पद्धतीचे जाणते आहोंत. तेव्हां आपण नवीन शब्द घेतला असतां त्याचें मराठी रूपांतर करतांना जास्त व्यवस्था ठेवूं, व मूळचा शब्द फारसा विकृत होऊं देणार नाहीं. पण त्याला कांहींतरी मराठी स्वरूप म्हणून आलेंच पाहिजे, व या प्रघाताचा कितीही निषेध केला तरी तें येणारच.

नवीन शब्द बनविणें अथवा परकी शब्द घेणें यासंबंधानें एक धोरण मात्र ठेवलें पाहिजे. तें असें कीं, पाहिजे त्यानें हवा तसा शब्द तयार करावा अथवा घ्यावा अशी येयेंदपादशाही असूं नये. संस्कृतावरून झालेल्या देशी भाषांचें स्वरूप जर एकसारखेंच आहे, तर सर्व देशी भाषांनीं असे शब्द एकमतानें ठरवून घेणें हें चांगलें. असे शब्द आपल्या सर्व देशी भाषांत कोणते कसे बनवावे अथवा घ्यावे याचा एक कोश झाला आहे, तसे प्रयत्न व्हावे. ग्रंथकारानें नवीन घ्यावयाचा शब्द प्रसिद्धपणें कळवावा आणि योग्य तितकी चर्चा झाल्यावर जनतेची पसंती पाहून त्याचा उपयोग करावा. *तसेंच त्याचा एकदां उपयोग होऊं लागला आणि तो ग्रंथांतून आला म्हणजे मग तो सर्वांनीं* निमूटपणें घ्यावा. अशा कामांत मतभेदाची चर्चा होऊं लागल्यास ती कधीं संपणार नाहीं, आणि एकवाक्यता होणार नाहीं. तेव्हां परकी शब्द घेणें अथवा ते घेतल्यावर आपल्या भाषेच्या धोरणानें अथवा स्वभावाप्रमाणें थोडेबहुत विकृत करणें एवढ्याच गोष्टींत केवळ भाषादूषण होत नाहीं; परकी शब्दांचा अ नि चा र संक र म्हणजे काय, याचें प्रमाण तर कधींच ठरवितां येणार नाहीं.

*आतां परकी शब्द येडेवांकडे झाले असल्यास केव्हांही ते नीट* करून घेऊं नयेत कीं काय ? असा एक प्रश्न आहे. अशा *ठिकाणीं*

विशेषसा वेडेवांकडेपणा नसल्यास एक प्रकारें रूढीचें अवलंबन करावें हें प्रशस्त होय. लोकांनीं एकाद्या शब्दाच्या संबधानें रूढी पाडली, तर ती बदलणें अशक्य असतें. सध्या संस्कृत भाषा शिकण्याचा प्रचार झाल्यापासून अमूक शब्द असा नव्हे, असा पाहिजे, असें अल्पवयी विद्यार्थ्यांनाही कळतें. अशा ठिकाणीं सुधारणेचा सक्त प्रयत्न करून पाहावा, पण रूढी नच बदलेल तर वितंडवाद करीत बसू नये. खरें पाहिलें तर मध्यान्हरात्र, अहोदिवस, परस्वाधीन, असे अर्थासंगतीचे प्रयोग बदलले पाहिजेत. तसेंच अधःकार, हाहाःकार दीपोत्साह, अशीं अशुद्ध रूपें टाळावीं. सह्याद्रीपर्वत, गाईचें गोमूत्र हिरवा पितांबर, पायाची करंगळी, असे उपयोगही करू नयेत. परंतु कित्येक प्रचार आतां अत्यंत रूढ झाले, ते बदलणें दुरापास्त आहे व तसें करण्यामध्यें काळाचा व प्रयत्नांचा अपव्यय आहे. मोरोपतानें मराठींत अगदीं शुद्ध संस्कृत रूपें, संस्कृतसारखे प्रयोग, संस्कृत लिंगशुद्धी वगैरे प्रकार पुष्कळ केले आहेत. भाषेला चांगलें वळण लागण्यास तसें करणें योग्यही आहे. परंतु त्याबरोबर मराठी भाषेला स्वातंत्र्य म्हणून आहेच, हें लक्षात ठेविलें पाहिजे. त्या स्वातंत्र्याचा अपहार होऊन उपयोगीं नाहीं. आपण संस्कृतातल्या गोष्टी घेतल्या म्हणून आपल्या सोईप्रमाणें त्यांत बदल करण्यास आपण मुखत्यार आहों. तो जन्म, ती वस्तू, तें स्वप्न, तो वीणा, असें म्हणणें संस्कृतज्ञाच्या कानास कडू लागेल. पण अशीं लिंगें बदलण्याची पद्धत फार प्राचीन आहे. ती प्राकृत भाषांनीं पाडली. मग मराठीनें ती बदलून मूळ संस्कृतावर जावें असा जुलूम काय म्हणून ? शिवाय संस्कृतातही एकाच शब्दाचीं भिन्न लिंगें मानण्याची पद्धत नाही थोडी ! भिन्न लोकमतांमुळें याला आरंभ संस्कृतांतच झालेला आहे. तसेंच 'मी जेवल्यानंतर निजतों' 'त्याला अवदसा आठवली', 'ती बाई विद्वान आहे,' असलीं वाक्यें कोणाला खपत नसतील. पण इतक्या दिवसाची रीत पडली, त्याला इलाज नाहीं. तथापि 'रमाबाई विद्वान आहेत,' 'त्याला सुंदर बायको मिळाली,' या धर्तीवर 'त्याला चांगला बायको मिळाली,' असें कोणी म्हणेल तर खपणार नाहीं. अशी शुद्धता कोणी करू लागल्यास, संस्कृत

शब्द, व प्रयोग यांच्याच संबंधानें नाहीं, तर इंग्रजी, पारशी, अरबी, कानडी, हिंदी, गुजराथी, वगैरे निरनिराळ्या भाषांतून घेतलेल्या शब्दांची आणि प्रकारांची मानगड पडून एकच गोंधळ माजेल! सारांश, हा ग्रंथकारांच्या आणि बोलणारांच्या तारतम्याचा भाग आहे. भाषेंत अशुद्ध अथवा विकृत शब्दप्रयोग अथवा वाक्यप्रयोग न येण्याचा व क्वचित आलेले काढून टाकण्याचा प्रयत्न करावा. परंतु ही गोष्ट अतोनात किंवा सक्तीनें केली तर भाषेची सुधारणा होणें एकीकडे राहून बिघाड मात्र होईल. मराठीला संस्कृताचा अशा रितीचा सासुरवास असल्यामुळें मराठीचें कसें नुकसान झालें आहे, याचें विवेचन पुढें येणार आहेच. यासंबंधानें येवढेंच सांगितलें पाहिजे कीं, शब्दशुद्धी, वर्णशुद्धी, वाक्यशुद्धी, यांकडे ग्रंथकारांनीं लक्ष द्यावें. व्याकरणकारांनीं वेळोवेळीं सूचना कराव्या, *परंतु भाषेचें स्वातंत्र्य हिरावण्याचा प्रयत्न करूं नये. अनेक प्रसंगीं शुद्धतेपेक्षां सोयीकडे विशेष लक्ष द्यावें लागेल.* खरें पाहिलें तर शुद्धता म्हणजे तरी बोलणारांस वाटणारा सोयिस्करपणाच नव्हे काय? मात्र तो मान्य झाला असतो, इतकेंच.

हा परकी शब्द घेण्याच्या संबंधाचा प्रकार झाला. याचप्रमाणें चिपळूणकर यांनीं इंग्रजी धर्तीवर मराठी वाक्यें करण्याच्या पद्धतीसही नांवें ठेविलीं आहेत. 'आतां मी अमक्या विषयाकडे वळतों', 'माझे विचार श्रोत्यांपुढें मांडतों', अशा कित्येक पद्धतींचीं उदाहरणें देऊन असें म्हणणें बरोबर नाहीं असें मत त्यांनीं प्रदर्शित केलें आहे. त्यांचें मुख्य म्हणणें असें आहे कीं, ज्याला इंग्रजींत 'ईडियम' म्हणतात, अशा प्रकारचा वाक्यप्रयोग मराठींत रूढ झालेला असतांना परकी भाषेच्या नमुन्यावर आणखी वाक्यें बनवूं नयेत. हें म्हणणें सामान्यतः योग्य आहे. परंतु आपले मूळचे वाक्य-विशेष कायम राहून दुसऱ्या भाषेंतून आणखी प्रकार आपण घेतले, तरी त्यांत काय बिघडलें? यासंबंधानें अमुक करावें आणि अमुक न करावें हें नियम घालून देणारे कितीही सांगत असले तरी रूढी पडली असतां ती सहसा जात नाहीं. अशा गोष्टींच्या संबंधानें चांगल्या लेखकांनीं, ग्रंथकारांनीं इतरांना

वळण लाविलें पाहिजे. विष्णूशास्त्री चिपळूणकर यांनीं निबंधमालेंत वाङ्मयसंबंधीं जे निबंध लिहिले आहेत ते यासंबंधानें तात्विकदृष्ट्या फार उपयोगाचे आहेत.

मराठी भाषा दूषित होण्याला, तिची गैरसोय व्हावयास व तिच्या संवर्धनास अडथळा होण्यास तिला संस्कृत भाषेचा सासुरवास फार कारणीभूत झाला आहे, आणि हल्लींही होत आहे. या गोष्टीचा दोष संस्कृत भाषेकडे नसून संस्कृताच्या फाजील अभिमान्यांकडे आहे. संस्कृतसारख्या उत्तम भाषेचें मराठीस साह्य असणें हें फार चांगले आहे; पण त्या साह्यास जुलमाचें आणि सासुरवासाचें स्वरूप येणें चांगलें नाहीं. ग्रंथरचना करणें ती संस्कृतांतच केली पाहिजे असें अगदीं प्राचीन मत होतें. पुढें लौकीक म्हणजे प्राकृत भाषांत ग्रंथरचना होऊं लागली. तीमध्यें संस्कृत शब्द बिलकूल आणूं नये असा एके काळीं ग्रंथकारांचा बाणा होता, यामुळे प्राकृतांना पुष्कळसा कृत्रीमपणाही आला हें मागें सांगितलेंच आहे. बौद्ध आणि जैन ह्या धर्मांचा प्रसार होत असतां लौकिकभाषेचें पुष्कळच संवर्धन झालें. परंतु त्यानंतर ग्रंथरचना संस्कृतांतच झाली पाहिजे, हा आग्रह पुन्हा चालू झाला, यामुळें लौकिकभाषांना तुच्छ मानण्याचाच प्रघात होता. अगदीं अलीकडील काळांत ज्ञानदेवापासून तों मोरोपंतापर्यंत झालेल्या कवींनीं लौकिकभाषेला पुढें आणण्याचा सक्त प्रयत्न केला. परंतु अभियुक्त ग्रंथरचनेला योग्य भाषा संस्कृतच, हें मत कायम होतें. यामुळें अर्थात् मराठीला चांगलें वळण म्हणजे संस्कृताचें वळण, अशी समजूत कायमची होऊन बसली आहे. ज्ञानदेवाची भाषा अगदीं साधी मराठी आहे. पण त्यानंतर लगेच एकनाथांनीं भाषेला संस्कृताचें वळण लाविलें. तुकारामाची भाषा अगदीं साधी घरगुती मराठीच आहे. पण मोरोपंताची संस्कृतअलंकारभूषणांनीं मंडित अशी मराठी आहे. व आपल्या मराठी कवितेवर टीपा लिहितांनाही कांहीं ठिकाणीं संस्कृत भाषेचा अवलंब त्यानें केला आहे. अलीकडील काळांत लोकहितवादींनीं गद्यांत आणि कुंट्यांनीं पद्यामध्यें साधी मराठी लिहिण्याचा प्रयत्न केला, पण ही गोष्ट, विशेषेकरून कुंट्यांची केवळ मराठी पद्यरचना, स्वभाषेचा

खराखुरा अभिमान बाळगणाऱ्या चिपळूणकरांनाही मानवली नाहीं. त्यांनीं या दोन्ही उत्तम ग्रंथकारांचा पूर्ण पाणउतारा केला आहे. इंग्रजी अंमल सुरू झाल्यावर मराठीला सुस्वरूप देण्याचे प्रयत्न चालू झाले; परंतु आरंभींच मराठीला व्याकरण, कोश आणि इतर साहित्य-सामग्री जोडून देणारे संस्कृत शास्त्री होते. त्यांना संस्कृत चांगलें येत होतें आणि ते मराठी भाषा चांगली जाणत, तरी त्यांना अर्वाचीन भाषाशास्त्राची माहिती नव्हती. यामुळें त्यांनीं मराठीचा स्वभाव, वगैरे गोष्टींचा विचार न करितां संस्कृत भाषेच्या अनेक गोष्टी मराठीवर लादल्या. मोलस्वर्थ, क्यांडी, वगैरे इंग्रज विद्वानांकडे मराठीचें आद्य घळण बनविण्याचें श्रेय आहे. परंतु त्यांना स्वाभावीकच शास्त्री मंडळीची व्यवस्था योग्य वाटली. या वेळचे मराठीचे प्रख्यात ग्रंथकार कृष्णशास्त्री चिपळूणकर यांना हा मराठीवर लादलेला संस्कृताचा सासुरवास मान्य नव्हता. त्यांची मराठी भाषा साधी मराठीच आहे. तींत संस्कृत शब्द आहेत, पण ते मराठीच्या घटनेस शोभतील असे वेंचक आहेत. केवळ संस्कृत भाषेच्या पद्धतीचे प्रकार मराठीला लावून देणें हें तर त्यांना मुळींच मान्य नव्हतें. त्यांनीं मराठीला स्वातंत्र्य मिळवून देण्याचा पुष्कळ प्रयत्न केला, परंतु त्यांना यश आलें नाहीं. विष्णुशास्त्री चिपळूणकर ह्यांनीं यासाठीं विशेष प्रयत्न जरी केला नाहीं, तरी भाषेला स्वातंत्र्य असावें असेंच त्यांचें मत होतें, आणि मोरोपंतादिकांनीं संस्कृताचें वळण मराठीस लावण्याचे जे प्रयत्न केले, त्यांचा त्यांनीं निषेध केला आहे. मराठी भाषेच्या म्हणून ज्या अगदीं स्वाभावीक गोष्टी आहेत त्या मोडूं नयेत, असें आपलें स्पष्ट मत त्यांनीं आपल्या वाङ्मयविषयक निबंधांत ठिकठिकाणीं प्रदर्शित केलें आहे.

संस्कृत भाषेंत सर्व व्यवस्था बहुधा प्रत्ययघटीत असते, आणि नानाप्रकारचीं रूपें बनवावयाचीं असतात. ही व्यवस्था कमी होत जाऊन प्राकृताला जेव्हां अपभ्रंशाचें स्वरूप आलें होतें, त्या वेळीं भाषेची प्रत्ययजुळणी सुटून तिचें स्वरूप शब्दजुळणीचें झालें होतें. तोच प्रकार मराठीमध्येंही अगदीं आरंभीं आला होता. प्रथमा आणि द्वितीया

एकच, पुढील विभक्ती सामान्यरूप नामक एकाच रूपानें दाखवावयाच्या, त्याचे निरनिराळे संबंध व्यक्त करण्यासाठीं स्वतंत्र शब्द सामान्यरूपापुढें जोडावयाचे, अशी सोपी पद्धत सुरू झाली होती. असा प्रकार हिंदी आणि बंगाली या भाषांत बहुतेक पूर्णपणें आला आहे. यासंबंधाची गुजराथी भाषेंतील व्यवस्थाही फार सोपी आहे. त्याप्रमाणें विशेषणाचा लिंगनिर्देश दाखविण्याची भानगडही कमी होत चाल्लेली होती. वाक्यरचनाही सोपी झाली होती, परंतु असंख्या गोष्टी संस्कृतांत आहेत एवढ्याच कारणानें त्या मराठींत मानल्या गेल्या. पुढील संस्कृतांत कृदन्तानीं क्रिया प्रदर्शित करण्याची पद्धत उत्पन्न झाली, तीच चालू देशभाषांनीं घेतली. पण तिच्याबरोबर क्रियापदांना संस्कृत आणि इंग्रजी या भाषांत नसलेली लिंगाची भानगड उत्पन्न झाली, मिळून मराठी आणि इतर अर्वाचीन देशभाषा यांवर संस्कृताचा जुलूम सारखा चालू आहे, आणि तो मराठीवर तर फारच जाचक अशा प्रकारचा आहे.

मागें सांगण्यांत आलेंच आहे कीं युरोपांतील सर्व मुख्य भाषांमध्यें निर्जीव पदार्थांचा लिंगभेद, विभक्तींचीं प्रत्यय घटित रूपें वगैरे प्रकार संस्कृताप्रमाणें असून ते इंग्रजीनें सोडिले आहेत. याचें कारण इंग्रजी भाषेची वाढ एकीकडे बेटामध्यें झाली आणि इंग्रजीवर कोणत्याही जुन्या अथवा नव्या भाषेचा पगडा पडला नाहीं. यामुळे त्या भाषेची योग्य परिणती होण्यास स्वातंत्र्य आणि अवकाश मिळून ती भाषा अगदीं मोकळेपणानें सुधारली आहे. आमच्या इकडे प्रथमारंभीं प्राकृत भाषा अशा प्रकारें बरीच स्वतंत्र झाली, आणि बंगाली व हिंदी या चालू भाषानाही हातपाय पसरण्यास पुष्कळ अवसर मिळाला. मराठीनेंही आरंभीं स्वातंत्र्याचा बराच फायदा घेतलेला दिसतो. परंतु पुढें संस्कृताच्या अभिमान्यांनीं तें तिचे स्वातंत्र्य हिरावून घेतलें. ज्ञानदेवाची व पुढें तुकारामाची भाषा ही आपलें स्वातंत्र्य राखून आहे. हे दोघे कवी त्यांच्या वेळीं असणाऱ्या लोकव्यवहाराच्या भाषेंत आपलें कवन लिहितात, असें स्पष्ट दिसून येतें. पण एकनाथानें आरंभिलेली संस्कृत घाटणी पुढील कवी उचलीत गेले, आणि मोरोपंतानें ती धर्त्ती अगदीं

पूर्णत्वास पोंचविली. वामन आणि रामदास यांनीं तर मराठी भाषा मनमानेल तशी लिहावी, तिला व्यवस्था म्हणून नाहींच, असेंच उलटें मनांत बाळगिलें होतें असें त्यांच्या ग्रंथरचनेवरून वाटतें ! नंतर लौकरच व्याकरण-व्यवस्था सुरू झाली. ती तर मराठींत अमूक एक व्यवस्था अस्तित्वांत आहे कीं नाहीं, इकडेही लक्ष न देतां केवळ संस्कृताचे नमुन्यावर सुरू झाली. अमुक गोष्ट संस्कृतांत आहे तशीच प्राकृतांत असली पाहिजे, हा मोठा आग्रह. संस्कृतांत अमूक विभक्ती आहेत तर मराठींतही त्याच तितक्या आणि तशा असल्याच पाहिजेत, असें अगोदर आग्रहानें मानून मग त्यांचीं रूपें काढिलीं. अशीच स्थिती क्रियापदरूपें, काळ, प्रयोगव्यवस्था यांच्या संबंधानेंही झालेली आहे.

हे प्रकार जुन्या काळींच होऊन थांबले नाहींत. सध्यांही अशा जुलमाच्या गोष्टी होत आहेत, आणि भाषेला स्वातंत्र्य देण्याचे सुप्रसंग येत असून ते आम्हीं घालवीत आहों. संस्कृत शब्द मराठींत घेतले असतां त्यांचें मूळ स्वरूप, मुख्यतः त्यांचे मूळचे अन्त्य आणि उपान्त्य कायम राखावे, असा संस्कृताच्या अभिमान्यांचा आग्रह आहे. हा आग्रह इतका शिखराला जाऊन पोंचलेला आहे कीं, संस्कृत भाषेंत शब्दाचा उपयोग करावयाचा असतां त्याच्या रूपांत जे फेरफार होतात तेही मराठींत होऊं द्यावयाचे नाहींत. संस्कृत शब्दाचें कोशामधलें मूळस्वरूपच मराठींत वापरावें असा मंडळीचा हट्ट आहे. हा केवळ दुराग्रह आहे. मराठी ही चालू—बोलण्यांत असलेली—भाषा आहे. तिच्या व्यवहारावर मृतभाषेची सत्ता चालणार नाहीं आणि ती चालविण्याला योग्य कारण नसतांना तर मुळींच चालणार नाहीं. संस्कृतांतल्या कठीण गोष्टी नको होत्या म्हणून तर प्राकृत आणि लौकिकांतल्या भाषा बनल्या आणि संस्कृत ही मृतभाषा झाली, हें लक्षांत ठेविलें पाहिजे. उच्चारासाठीं अन्त्य आणि उपान्त्य यांमध्यें ऱ्हस्वदीर्घांचा आणि क्वचित् इतर प्रकारचा जो फेरफार मराठीच्या स्वभावाप्रमाणें झालाच पाहिजे, तो कोणालाही टाळतां येणार नाहीं. मराठींत कोणत्याही भाषेंतला शब्द घेतला तरी असलें रूपान्तर झालेंच पाहिजे. असे फेरफार करण्याची सगळ्या भाषांची चाल आहे. आमच्या देशभाषां-

मध्यें असली सक्ती केवळ मराठीमध्यें आहे. इतर भाषांत नाहीं. या जुलमामुळें भाषा शिकणाऱ्या लहान मुलापासून तों भाषेमध्ये ग्रंथरचना करणाऱ्या विद्वान लेखकापर्यंत सर्वांनाच अडचणी येतात आणि भाषेची हानी होते. यासाठींच भाषेची अभिवृद्धी होण्यास हा सासुरवास नाहींसा होऊन मराठीला पूर्ण स्वातंत्र्य मिळालें पाहिजे.

यावर कोणी म्हणेल कीं, भाषेला जर स्वातंत्र्य पाहिजे, तर मग व्याकरणशास्त्रादि निर्बंध हवेत कशाला ? या आक्षेपास उत्तर देण्यासाठीं व्याकरणशास्त्राचें स्वरूप जास्त खुलाशानें सांगितलें पाहिजे. मराठींत नसून आपल्यास पाहिजे आहेत अशा संस्कृत भाषेमधील व्यवस्थांचा निर्बंध मराठीला लावू पाहणें अथवा मराठीच्या स्वभावाला विरुद्ध नाहींत अशा गोष्टी संस्कृतामधून घेणें याला कोणी नांवें ठेवणार नाहीं. परंतु मराठींत स्वाभाविक आहेत अशा गोष्टी बाजूला सारून त्यांच्या जागीं संस्कृतांतील व्यवस्था सक्तीनें आणूं पाहणें म्हणजे मराठी भाषा दूषित करणें आहे. तसेंच व्याकरण म्हणजे एकादें आपोआप ठरलेलें शास्त्र नव्हे, अथवा ब्रह्मवाक्यही नव्हे. साधारणतः वरच्या दर्जाचे बरेच सुशिक्षित लोक जसा भाषा व्यवहार करितात, तसाच एकंदर जनतेनें करावा हे चांगलें; कारण त्यामुळें भाषेला एक ठरीव वळण लागते असे सर्व समजतात. यामुळें अशा वळणाचे नियम जुळवून शास्त्र बनवितात तें व्याकरण. त्याचप्रमाणें मनुष्याचा स्वभाव, वर्तन, रीतभात, यांमध्यें जसा कालान्तरानें फरक पडत जातो, तसा बोलींतही फरक पडत जातो. यामुळें व्याकरणही नेहमीं कायमचें असत नाहीं. त्यातही वारंवार फरक करावा लागतो. आतां सध्याच्या काळीं हा फरक छापील पुस्तकाच्या आणि शिक्षणाच्या व्यवहारामुळें फार कमी होतो, तसेंच एकादी गोष्ट नवीनच भाषेंत शिरू लागली असतां 'अशी रीत नाहीं', 'असें बोलू नये व लिहू नये' असा व्याकरणशास्त्राच्या जोरावर निषेध होऊं लागतो. पण ती नवी रीत भाषेंत पडत चालली व निषेधाला कोणी जुमानलें नाहीं, कीं व्याकरणशास्त्राला तिचा स्वीकार करणें भाग पडतें. व्याकरणव्यवस्था ही कृत्रीम खरी, पण ती व्यवस्था करण्याची जरूरी प्रथमतः भाषेंत उत्पन्न होते, आणि मग

तदनुरूप व्याकरणाचा नियम बनतो. तथापि एकादी गोष्ट जुलमानें भाषेवर लादण्याचा प्रयत्न फुकट जातो. उदहरणार्थ, हरि, विष्णु, शिर, विष, असे शब्द लिहिण्याचा, अर्थात् तसा उच्चार करण्याचा, जुलूम आज इतके वर्षे चालू आहे. पण बोलणारे मराठीच्या स्वभावाप्रमाणें हरी, विष्णू, वीष, असेच दीर्घ उच्चार जोरानें करीत आहेत आणि ज्यांना शुद्ध लिहिणें म्हणजे काय हें कळत नाहीं ते दीर्घच लिहितात. व्याकरणनिर्बंध हा भाषेवरील जुलूम नव्हे. भाषेंत ज्या रिती चालू असतील त्यांचें एकीकरण करून व्याकरण बनविलें असतें आणि त्याचा अंमल चालू असतो. पण व्यवहारांत एकादा कायदा अडचणीचा वाटल्यास जसा बदलावा लागतो, त्याप्रमाणें भाषेचा कायदाही बदलावा लागतो, आणि ही गोष्ट नेहमीं चालू असते. त्या योगानें भाषेस अडचण होत नाहीं. उलट होऊं लागलेली अडचण दूर करण्याचा हा प्रकार असतो.

लेखनपद्धती आणि भाषेंतील शुद्धाशुद्ध—मुख्यत्वेंकरून अन्त्य आणि उपान्त्य स्वरांचें ऱ्हस्वदीर्घत्व—यासंबंधानें मराठीच्या स्वभावाप्रमाणें सर्व व्यवस्था असावी असा प्रघात पाडण्याचे प्रयत्न वारंवार झाले आहेत. पुणें पाठशाळेंत शिकून तयार झालेलें शास्त्रीमण्डळ मराठीला स्वातंत्र्य देण्याच्या मताचें होतें. परंतु क्यांडीसाहेब यांनीं जुन्या शास्त्री लोकांच्या सांगण्यावरून हल्लींची सत्तीची व्यवस्था काढली. मराठींत ठरलेली व्यवस्था कांहीं नाहीं; संस्कृतांत तशी व्यवस्था आहे, तीच घ्यावी, हा शास्त्री लोकांचा उपदेश त्यांना पटला. त्या वेळीं क्यांडीसाहेब व मराठीच्या स्वातंत्र्याचे अभिमानी यांच्यामध्यें एक लेखी वाद चालला होता. हा वाद मनोरंजक होता; आणि त्यामध्यें मराठीच्या अभिमान्यांचें मत स्थापीत होत होतें. परंतु तो वाद मध्येंच एकाएकीं बंद पडला. कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनीं आपल्या व्याकरणावरील निबंधांमध्यें याविषयीं चर्चा करून योग्यायोग्य प्रकार स्पष्टपणें दाखविले आहेत. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं यासंबंधानें विशेष प्रयत्न केला नाहीं. तथापि त्यांचा भाषेच्या स्वातंत्र्याकडे ओढा होता, हें मागें सांगितलेंच आहे. तसेंच त्यांनीं 'भाषाशुद्धी' व 'लेखनपद्धती' या दोन

निबंधामध्यें यासंबधानें सामान्य विवरण केलें आहे. प्रस्तुत ग्रंथकारानें मराठी शालापत्रकामध्यें र्‍हस्वदीर्घ, लेखनसंबधीं शुद्धाशुद्ध आणि इतर व्यवस्था, तसेंच व्याकरणव्यवस्थेसंबधीं अनेक अव्यवस्थेच्या गोष्टी व त्याचें निराकरण याबर पुष्कळ लेख लिहिले आहेत. सन १८९० सालीं हतवळणे, साने आणि गोडबोले यांनीं विशेषतः शुद्धलेखनाच्या सुधारणेसंबधानें पुस्तक आणि लेख लिहून प्रसिद्ध केले आणि अवश्य त्या सुधारणा सुचवून त्यावर विद्वान मंडळीचे अभिप्राय घेतले. या सर्व अभिप्रायाचें नवीन सुधारणाच्या बाजूला बहुमत होते. भांडारकर, महाजनी, टिळक, सहस्त्रबुद्धे, करंदीकर इत्यादि मंडळी नवीन सुधारणांना अनुकूल होती. पुढें सन १९०३ सालीं क्रमीक पुस्तकें तयार करण्यासाठी एक कमेटी नेमली. अखेर विचारासाठीं तज्ज्ञ मंडळींचें 'कान्फरन्स' भरलें. त्यामध्यें चर्चा होऊन नवीन सुधारणेचे नियम ठरले आणि ते उपयोगांत आणण्याविषयीं शाळाखात्यानें ठरावही केला. परंतु सरङ्कताच्या अभिमान्यांनीं, विशेषतः मुंबईतल्या मंडळीनें, सरळ मार्गानें आपला हेतू सिद्धीस जात नाहीं असें पाहून, डा० म्याकिकन या युरोपीयन गृहस्थाच्या मध्यस्थीनें मुंबई सरकारकडे तक्रार केली. सरकार सामाजीक सुधारणाविषयीं तटस्थ असतें. तोच न्याय येथेंही लाविला गेला. 'सरकारी नात्यानें त्यांत पडण्याचें आपणास कारण नाहीं, लोक आपली आपण सुधारणा करतील तेव्हां पाहाता येईल,' असें सरकारानें ठरविलें, आणि क्याडीसाहेबाची पद्धत चालू आहे ती तूर्त चालू ठेवावी असा हुकूम झाला. अशा प्रकारें मराठी भाषेला स्वराज्य मिळण्याची आलेली सुसंधी वाया जाऊन तिचें पारतन्त्र्य, परावलंबन व तिच्यावरील सक्ती या गोष्टी कायम राहिल्या. तथापि सध्याचें वाङ्मय लक्ष्यपूर्वक पाहिलें असतां ही सक्तीची व्यवस्था झुगारून देण्याचा पुष्कळ लेखकाचा प्रयत्न चालू आहे असेंच दिसून येईल. इष्ट सुधारणा झाली तरी ती अशा अनियन्त्रित रीतीनें होणें चांगलें नाहीं, पूर्ण विचार होऊन व्यवस्थीतपणें झाली पाहिजे. सध्या स्वभाषेंत ग्रंथ रचना करण्याकडे सुशिक्षितांचें अधिकाधीक लक्ष जात आहे. तें जर प्रथमतः या गोष्टीकडे जाईल तर चांगलें होईल.

लेखनपद्धतीप्रमाणेंच लिपीच्या संबंधानें मराठीवर सक्ती झालेली आहे. देवनागरी ही संस्कृताची लिपी. हीमध्यें ऱ्हस्वदीर्घांची व्यवस्था विशेष असते. मराठी पद्यग्रंथ साधारणतः या लिपींत लिहीत. परंतु गद्यवाङ्मय तेराव्या शतकापासून मोडींत सांपडतें. मोडी म्हणजे देवनागरी अथवा बालबोध लिपी जलदीनें लिहूं लागल्यानें उत्पन्न झालेली लिपी होय. हिच्यामध्यें जलदी, सफाई आणि सुरेखपणा साधतो. पुष्कळ लिहावयाचें असल्यास मोडीच जास्त सोयीची. मोडींत शब्द तोडून लिहिणें, ऱ्हस्वदीर्घभेद आणि विरामचिन्हें या व्यवस्था अगदीं थोडक्या प्रयत्नानें साधतील. गद्यवाङ्मय पेशवाईच्या अखेरीपर्यंत मोडींत होतें. उत्तम मोडी लिहितां येणें हा गूण गणला जात होता. पुढें छापण्याची कला मराठीला लागू करितांना जुन्या पंडितांच्या सांगण्यावरून बालबोध ही ग्रंथाची लिपी ठरली. प्रथमारंभीं पुस्तकें छापण्याचा प्रयत्न मिशनरींनीं केला. त्यांनाही मोडी लिपीच मराठी वाङ्मयाच्या छपाईला योग्य दिसली. यामुळें त्यांनीं कित्येक पुस्तकें व एक कोशही मोडींत छापला आहे. टाईपांनीं छापलेलीं कांहीं मोडी पुस्तकेंही पाहण्यांत आहेत. गुजराथी भाषेला देवनागरी लिपी घेतली आहे, ती कविता वगैरे लिहिण्यासाठीं घेतली आहे. त्यांचें गद्य हें आपल्या मोडीसारख्याच लिपींत असतें, आणि ती लिपीच गुजराथ्यांनीं छापण्यासाठीं घेतली आहे. यामुळें त्यांची पुष्कळ सोय झाली आहे. शिवाय या व्यवस्थेमुळेंच गुजराथींत शुद्धाशुद्धतेच्या कृत्रीम तऱ्हा शिरल्या नाहींत आणि यामुळें मराठी वाङ्मयाप्रमाणें गुजराथी वाङ्मयाची हानी झाली नाहीं.

आतांपर्यंतच्या प्रतिपादनावरून भाषेची अथवा तिच्या वाङ्मयाची अधोगती होत आहे हें म्हणणें खरें नाहीं असें दिसून येईलच. तसेंच भाषा दूषित होत आहे हें कितपत खरें आहे हेंही कळेल. यावरून मराठी भाषेची उत्तम प्रकारें प्रगती होत आहे असें मात्र नाहीं. आमच्या सर्व देशीभाषा अजून मागें पडलेल्या आहेत, आणि त्यांचें संवर्धन अगदीं अल्पगतीनेंच चालू आहे. त्यांतही आपल्या मराठी /

भाषेची प्रगती याहून चांगली व्हावयास पाहिजे आहे. मराठी, गुजराथी आणि बंगाली या तीनच भाषांत वर्षोवर्ष प्रगट होणाऱ्या वाङ्मयाची परस्पर तुलना केली असता, मराठी मागें आहे असें आढळतें. याला कारण काय आहेत याचा केवळ वाङ्मयाच्या दृष्टीनें विचार केला तर असें दिसून येतें कीं, बंगाल आणि गुजराथ या प्रांतांतील वरच्या पायरीचे हिंदू-पुरुष आणि स्त्रिया-यांच्यापेक्षा मराठी भाषेच्या प्रांतांतील त्याच पायरीचे पुरुष आणि स्त्रिया यांची साक्षरता पुष्कळ मागें आहे. अर्थात् त्यांची वाचनप्रियताही मागासलेलीच आहे आमच्या प्रांतांत स्त्रियांची साक्षरता तर फारच कमी आहे दुसरें कारण असें दिसतें कीं, आमच्या प्रांतांतील राजकीय आणि सामाजीक चळवळीमधील व्याख्यानें लेख आणि ग्रंथ इंग्रजींत फार असतात असाच प्रकार मद्रासेकडे आहे, परंतु गुजराथ आणि बंगाल या प्रांतांत असें वाङ्मय देशी भाषांतही पुष्कळ असतें आणखीही कित्येक कारणें आहेत, परंतु तीं या ग्रंथाच्या विवेचनमर्यादेंत येत नाहींत

सुमारें पन्नास-पाऊणशें वर्षें आमच्या इकडे पाश्चात्य तऱ्हेचें उच्च शिक्षण सुरू असून आमच्या निरनिराळ्या देशी भाषांत तिकडल्या सारखे विद्वत्तेचे ग्रंथ लिहिण्यासारखी मंडळी कोणीच तयार झाली नाहीं असें मुळींच म्हणतां येणार नाहीं कठीण अशा शास्त्रीय विषयावरही आमची मंडळी इंग्रजींत ग्रंथ व निबंध लिहीत आहेत पण तूर्त शास्त्रीयविषय आपण एकीकडे ठेवूं वाङ्मयविषय आणि प्राच्यविद्यांच्या संशोधनाचे ग्रंथ पाश्चात्य विद्वानांच्या अगदीं बरोबरीनें लिहिणारे ग्रंथकार सर्व देशभर तयार होऊन त्यांच्या हातें इंग्रजी भाषेत ग्रंथही लिहिले जात आहेत ही मंडळी जरूर पडल्यास आपापल्या भाषेंत ग्रंथ लिहील आपल्या मराठी प्रांतांतही असे विद्वान ग्रंथकार झाले व आहेत, आणि उच्च शिक्षणांत उपयोगीं पडण्याजोगे ग्रंथ मराठींत होण्यास अडचण पडेल असें वाटत नाहीं परंतु मराठींत ग्रंथ होण्यास वाव नाहीं आणि त्यांची जरूरीही नाहीं स्वभाषेत उच्च शिक्षणक्रम होईल तर असे ग्रंथ हवे लागतील व तयारही होतील. असें असूनही मराठींत उच्च प्रकारच्या विषयावर थोडे थोडे ग्रंथ तयार होतात

घटनेची संवय फार झाली आहे. तथापि त्या भाषेंत पुष्कळ शब्द-घटनेचे प्रकारही आहेत. परोक्षभूताचीं रूपें आणि भविष्यकाळाचीं रूपें अशा शब्दजुळणीनें होतात. संस्कृतांतील समासजुळणी हा शब्द-घटनेचा उत्तम प्रकार आहे. त्यामुळें थोड्या शब्दांत पुष्कळ अर्थ आणण्याचें कार्य चांगलें साधतें. देशीभाषांनीं हा प्रकार घेतला आहे. अलीकडे इंग्रजी भाषाही हा समासघटनेचा प्रकार घेत आहे. जर्मन भाषेंत हा प्रकार फार आहे असें ती भाषा जाणणारे सांगतात. आपल्या सर्व देशी भाषांमध्यें हिंदी आणि बंगाली या भाषांत शब्द-घटनेचा प्रकार फार आहे. मराठीमध्यें तो कमी आहे. तथापि मराठींत विभक्तींचीं पुष्कळ रूपें शब्दघटनेनें बनतात. त्याचप्रमाणें काळांचीं रूपें देखील बनतात, हें मागें दाखविलेंच आहे. मराठींतलीं सर्व संयुक्त क्रियापदें शब्दांच्या जुळणीनें होतात, आणि त्यांपासून भाषेचें उत्तम कार्य होत आहे, याचेंही विवरण मागें केलेंच आहे. तथापि मराठीनें संस्कृताची अशी खोड घेतली आहे कीं, प्रथमतः शब्द जुळणीला आरंभ करून मग अर्थजुळणीसाठीं जोडलेल्या शब्दाचा प्रत्यय बनवून टाकावा. करितो+आहे, याचीं करितोहे, करताहे, करताए, करितोय आणि शेवटीं करितो, इत्यादि रूपें अशा रीतीनें बनलीं. क्रियापदाचीं रूपें अशींच सिद्ध झालेलीं आहेत.

प्रत्ययघटनेपेक्षां शब्दघटना जास्त सोयीची आहे. तिचा प्रघात पुष्कळ असला म्हणजे भाषेंत लागतील तेव्हां नवीन शब्द थोडक्यांत बनवितां येतात. त्याचप्रमाणें अर्थ मनांत येण्यासही शब्दघटनेची योजना अधिक सोयीची असते. 'रामास पागोटें आणा' आणि 'रामा-करितां पागोटें आणा', या दोन वाक्यांत दुसरें वाक्य जास्त सोपें व सोयीवार आहे हें उघड आहे. 'स' या प्रत्ययाचा अर्थ भाषा ज्यांची अंकित झाली आहे त्यांना कळेल. पण परक्याला अथवा अज्ञानाला 'करितां' याचा अर्थ जास्त लौकर कळेल. कारण 'स' हें काय आहे, हें त्याला लौकर कळणें अशक्य. तेव्हां मराठी भाषेची वाढ होण्याला शब्दघटनेच्या पद्धतीचें साह्य घेण्याचा प्रयत्न आपण नेहमीं केला पाहिजे. शब्दाचा प्रत्यय बनविण्याची मराठीची खोड या प्रयत्नास अनुकूल

आहे हे खरं. पण सध्या भाषेच्या स्थिरतेच्या काळात शब्दाचा संक्षेप करून प्रत्यय बनविण्याचे कार्य सुलभतेने होणार नाहीं. अशी शब्द-घटना करून ती एकदां छापी ग्रंथात ग्रथित झाली, कीं ती फिरविणें दुरापास्तच होईल.

कोणत्याही भाषेचा दुसऱ्या भाषेशी निकट संबंध आल्यास एकीवर दुसरीचे परिणाम होत असतात. हे चांगले असतात आणि वाईटही असतात. एका भाषेनें दुसऱ्या भाषेचें साह्य जरूर असल्यास आणि फायदेशीर वाटल्यास अवश्य घ्यावें. तसें केल्याखेरीज भाषेची वाढ होणार नाहीं. आपल्या भाषेत एकादी सोयीची गोष्ट नसेल तर ती दुसऱ्या भाषेतून घेण्यास चिंता नाहीं. मात्र ती आपल्या भाषेंतील निरनिराळ्या व्यवस्थास जुळती करून घ्यावी. इंग्रजी भाषेनें हें धोरण ठेविलें आहे, म्हणूनच ती भाषा एवढ्या योग्यतेस चढली आहे. मराठी भाषेनें प्रथमतः संस्कृताचे साह्य घ्यावें, नंतर अन्य देशी भाषांचें घ्यावें व त्यानंतर इंग्रजीचेंही घ्यावें.

एका भाषेवर दुसऱ्या भाषेचा पगडा पडण्याचीं कारणें अनेक असतात. जिंकलेल्या लोकांच्या भाषेवर जिंकणाऱ्या लोकांच्या भाषेचा परिणाम होतो. फार प्राचीनकाळीं आमच्या देशात हूण, शक, ग्रीक, इ० लोक येऊन त्यांनीं ठिकठिकाणीं राज्यें स्थापिलीं. पण त्यांची सामाजीक संस्कृती आमच्या पूर्वजांच्या संस्कृतीपेक्षां श्रेष्ठ नव्हती, त्यांच्या राजकीय संस्कृतीचाही आमचेवर मोठासा परिणाम झाला नाहीं. ह्या लोकांची संख्या अगदींच लहान असल्यामुळें त्यांच्या भाषांचा आमच्या भाषावर म्हणण्यासारखा परिणाम झाला नाहीं. खेरीज आमचें राष्ट्र, आमचा धर्म आणि आमची भाषा याना दुसऱ्याचें हवें असेल तें आपलेंसें करून घेण्याची युक्ती प्राचीन काळापासूनच साधलेली आहे. यामुळें आमच्या भाषांवर या प्राचीन काळच्या लोकांच्या स्वाऱ्याचा परिणाम झाला असला तरी तो लोपून जाऊन आमचें स्वत्व कायम राहिलें आहे. मुसलमान लोक राजकीय संस्कृतींत आमच्यापेक्षा श्रेष्ठ होते. यामुळें त्यांच्या फारशी आणि आरबी भाषाचा आमच्या भाषांवर पुष्कळ

परिणाम घडला आहे.. फारशी भाषेच्या संगतीनें मराठीवर काय परिणाम घडले हें पुढें सांगितलें आहे. मुसलमानांनंतर इंग्रजांशीं संबंध आला. इंग्रज लोक बहुतेक सर्व बाबतींत आमच्याहून श्रेष्ठ आहेत. यामुळें इंग्रजी भाषेचा परिणाम आमच्या भाषेवर फारच जोराचा झाला पाहिजे. परंतु सुदैवेंकरून हल्लीं परिस्थिती बदलली आहे, यामुळें आतां इंग्रजी भाषेच्या संगतीचा आपल्या भाषेवर वाईट परिणाम होणार नाहीं. आपली भाषा सुधारण्यास दुसऱ्या भाषेंतले सोयीचे प्रकार घेण्यास चिंता नाहीं. पण इंग्रजींतून आपणास जें घ्यावयाचें तें सावधगिरीनें घेतां येईल. फारशी भाषा आपल्याकडे आली, तेव्हां ती कोणी काळजीनें शिकत नसत. मुसलमान राज्यकर्त्यांची भाषा म्हणून तिच्यांतून शब्द वगैरे घेऊन त्यांचा हवा तसा उपयोग करीत. घेतलेल्या गोष्टींच्या शुद्धाशुद्धतेकडे किंवा योग्यायोग्यतेकडे कोणी लक्ष देत नसत. यामुळें फारशीच्या संगतीनें मराठी भाषा पुष्कळ दूषित झाली. फारशीच्या संगतीनें कांहीं उपयुक्त प्रकार मराठींत आले, पण ते थोडे. इंग्रजी भाषेच्या संगतीचा प्रकार तसा नाहीं. इंग्रजी भाषा आपण निराळी स्वतंत्र शिकतों, आणि तींत लिहिण्याचा व बोलण्याचा स्वतंत्र व्यवहार करितों. आपला मराठीचा व्यवहार निराळा चालतो, आणि इंग्रजीचा निराळा चालतो. आपण इंग्रजीची मराठींत मिसळ होऊं देत नाहीं. त्यामुळें मराठी भाषा दूषित होण्याची भीती नाहीं. मराठीच्या सोयीसाठीं इंग्रजींतून शब्द अथवा इतर गोष्टी आपण वेंचून घेतल्या आणि त्या व्यवस्थितपणानें आपल्या भाषेंत ठेवून दिल्या, तर त्यामुळें भाषा बिघडणार नाहीं. तिची योग्य प्रकारें वाढ मात्र होईल.

शेजारच्या लोकांच्या भाषेचाही एकाद्या भाषेवर परिणाम होतो. मराठीच्या शेजारच्या भाषा ह्या मराठीच्या बहिणी आहेत, किंवा एकाच जुन्या आर्य भाषेचीं भिन्न स्वरूपें आहेत. यामुळें त्यांचा मराठीवर दुष्परिणाम झाला आहे असें म्हणतां येणार नाहीं. संस्कृता-पासून झालेल्या एका भाषेनें तशा दुसऱ्या भाषेंतून काय घेतलें हें बहुधा सांगतांही येण्यासारखें नसतें. कारण अशा गोष्टींवर एकीची जितकी सत्ता असते, तितकीच दुसरीचीही असते, आणि विवक्षीत भाषेच्या

उच्चारभेदामुळे शब्दाच्या स्वरूपात भेद असला तरी तो तेव्हाच लोपून जातो. कन्नड भाषा ही मात्र परकी द्राविडी भाषा होय. तिचें सानिध्य मराठीला फार दिवस आहे. तसेंच मराठीच्या प्रातात कानडी आणि कानडीच्या प्रातात मराठी वारवार घुसलेल्या आहेत. यामुळें मराठीवर कानडी भाषेचे परिणाम झालेले असलेच पाहिजेत. त्याचा शोध अद्यापि कोणी केला नाही. तो होण्याची आवश्यक्ता आहे.

फारशी आणि आरबी भाषा हिंदुस्थानात जोडीनें आल्या. आरबी ही मुसल्मानी धर्माची भाषा, यामुळें आपल्या भाषाचा आणि संस्कृताचा जो संबध, तोच फारशीचा आणि आरबीचा संबध. यामुळें मराठीवर आरबीचा प्रत्यक्ष परिणाम झालेला नाहीं. फारशीमधून आरबी शब्द वगैरे आले आहेत. मराठींत फारशी आणि आरबी शब्द कोणते आहेत, हें 'शब्दसिद्धी'मध्ये सागितलें आहे. या ठिकाणीं मराठीवर फारशीचे परिणाम कशा प्रकारें झाले, हे सागावयाचें आहे.

दक्षिणेत मुसल्मानी अमल सन १३३०च्या सुमारें सुरू झाला त्यापूर्वीच्या ज्ञानेश्वरी, पचतत्र वगैरे ग्रथात फारशी शब्द नाहींत. खिस्त पुराणाचा जो भाग पाहाण्यात आला, त्यातही फारशी शब्द आढळले नाहींत. खिस्तपुराणात एके ठिकाणी 'मैदान' हा शब्द आढळला आहे. एकनाथाच्या ग्रथात क्वचित् फारशी शब्द आढळतात. सध्या इग्रजी भाषा जशी आपले इकडे चालू झाली आहे, तशी त्या वेळीं फारशी चालू झाली नाहीं. परतु मूळ भाषासरणी मराठीच असून तींत फारशी शब्द आणि वाक्यघटना येऊ लागली. असा प्रकार हिंदू आणि मुसल्मान दोन्ही प्रकारचे लेखक करीत विजापुरच्या बादशाहानीं दरबारची मुख्य भाषा मराठी केली, पण ती फारशीमिश्रित मराठी असे. इ स १६२८त फारशी शब्दाची शेंकडा सरासरी ८५·६ पर्यंत गेली होती म्हणजे मराठी शब्द शेंकडा १४·४च असत परतु पुढ शिवाजीच्या वेळीं मराठी शब्द शकडा ६२·२ झाले व मराठी राज्य पक्कें स्थापित झाल्यावर ९३·२ झाले फारशी शब्दाचें वर्चस्व मुत्सद्दी लोकाच्या आणि दरबारच्या भाषत झालें होतें. साधारण लोकाच्या आणि एकीकडच्या प्रातातल्या भाषत तें फारसें नव्हतें. मराठी अमलाच्या आरभीं सर्व लोक मुसल

मानी रिवाजामधून आलेले, यामुळें फारशीचा पगडा फार होता. तो कमी करण्याचा *शिवाजीनें मुद्दाम पुष्कळ प्रयत्न केला,* आणि तो सफलही झाला, असें दिसतें. पुढें मराठी अंमल हिंदुस्थानांत पसरल्यावर *मराठ्यांशीं पत्रव्यवहार मराठींतच होई, आणि मराठेही इतरांशीं* आपल्याच भाषेंत व्यवहार चालवीत. परंतु सर्व हिंदुस्थानभर सहज समजण्याजोगी भाषा फारशी असल्यामुळें या मराठी पत्रव्यवहारांत फारशी शब्द पुष्कळ असत.

मराठींत आतां अगदीं रूढ झालेले आणि जे मराठींतून जाणें अशक्य आहे, असे फारशी शब्द मासल्याकरितां येथें सांगतोंः— 'खाना' आणि हा शब्द लागून झालेले शब्द; तसेंच इमारत, सराई, जनाना, दरवाजा, दालन, हौद, महाल, दौत, *दिवाण,* दरबार, अदालत, सदर, ओसरी, बंदूक, संदूक, ऐना, आरसा, दिवाळें, देवळी, कप्पा, घुमट, फरशी, नक्ष, तक्ता, दप्तर, हल्का, कुलूप, किल्ली, छप्पर, तालीम, तावदान, खजिना, अंबारी, कारंजें, फवारा, बुरूज, चुना, गची, जमीन, जागा, खुर्ची, मेज, बाजार, दरबार, फौज, दाद, कचेरी, मुनसफ, मामला, सुभा, कारकून, इलाखा, जिल्हा, तालुका, इत्यादि.

*पुढील अव्ययें वगैरे फारशी आहेतः—अलबत, बस [अव्यय, अर्थ पुरे], हां, बेशक, खूप, वाहवा, छे, छी, शाबास, वा, अगर, की, सबब, जे, दर, बे, देखील, ते [जसें, चार-ते-पांच],* बाजत, बाबत, बराबर, नजीक, बद्दल, ऐवजीं, हमेश, बिलकुल, बेहेत्तर, वार [एकवार, दुवार, इ०] जल्द, दरोबस्त, फक्त, गुदस्तां, पेस्तर, यंदा, अव्वल, दुय्यम, तमाम, इत्यादि. *सर्वनामात्मक विशेषणें:—*खुद, फलाणा, हरएक, इत्यादि.

सांप्रत मराठीला गरज लागेल तेव्हां संस्कृत शब्द घेण्याची सोय जास्त झाली आहे. कारण संस्कृताचा अभ्यास जास्त होतो. शिवाय फारशी शब्द घेण्याचें राजकीय कारणही उरलें नाहीं. यामुळें फारशी शब्द जात चालले आहेत. हें एका अर्थी चांगलें आहे. कारण मराठींत आलेले फारशी शब्द फार विकृत झालेले आहेत. कित्येकांची

तर आता मूळची ओळखही पटावयाची मुष्कील झाली आहे. तेव्हां असले शब्द जाऊन आपल्या ओळखीचे शब्द आले तर बरें. फारशी शब्दाचा हल्लीं आपण तिरस्कारही करितों, असें दिसतें. लाज, लज्जा, शरम, यातला शरम हा फारशी शब्द आपण फार हलक्या प्रतीचा समजतों.

मराठी भाषेंत कित्येक वाक्यरचनेचे प्रकार फारशीमधून आलेले दिसतात. 'केला गेला,' 'मारिला गेला,' 'दिले जाईल' अशा प्रकारची रचना फारशी आहे. मराठींत कृदन्तापुढें अस् धातूचीं आणि इतर धातूचीं रूपें घालून क्रियापदें करण्याची तऱ्हा संस्कृत आणि प्राकृत यावरून आली. पण नामें आणि विशेषणें याच्या साह्यानें अमुक करणें, तमुक करणें, असें असणें, तसें होणें अशा प्रकारचीं संयुक्त क्रियापदें करण्याची पद्धत फारशीवरून आलेली दिसते. जसें:—खाला—मोकळे वगैरे करणें, रस्ता—सूट वगैरे देणें, मान्य करणें, हल्ला करणें, जमा, खर्च, रद्द, सई, प्रयत्न इत्यादि करणें, वाजू घेणें, मैत्री—सल्ला इत्यादि करणें, उडी टाकणें—मारणें—घेणें, मना—जेर—जाहीर करणें, मदत—हात—देणें, दम देणें—मारणे—खाणें—भरणें, कमर बांधणें, इत्यादि. फारशीसंबंधाची ही माहिती राजवाडे यांच्या लेखाच्या आधारें लिहिली आहे.

मराठीमध्यें इंग्रजी शब्द पुष्कळ उपयोगात आहेत. यातले बरेच मराठीच्या पद्धतीप्रमाणें आणि उच्चारास शोभतील असे बदललेही आहेत. जसें:—पोष्ट, इष्टेट, तिकीट, इस्टेशन, रजिष्टर, हपीस, पाकीट, इजनेर, फर्ष्ट ( क्वचित् फष्ट ) इत्यादि. इंग्रजी शब्दांची याद देण्याचें कारण नाहीं.

मराठी भाषापद्धती आणि वाक्यव्यवस्था यावर इंग्रजीचे परिणाम होत आहेत. यांविषयीं ठिकठिकाणीं सांगण्यात आलेंच आहे. शब्द तोडून लिहिणें, विरामचिन्हें देणें, विषयाच्या पोटभागाला अनुसरून कलमें, भाग, विभाग, प्रकरणें पाडणें हे प्रकार इंग्रजीवरून घेतले आहेत. त्याचप्रमाणें वाक्यरचनेमध्यें, वाक्यात शब्दांची जुळणी

करण्यामध्यें आणि निरनिराळे अर्थ आणण्यासाठीं आपल्यास अनुकरण करण्यासाठीं इंग्रजी भाषाच घेतली पाहिजे.

पोर्तुगीज लोकांचा संबंध आल्यानंतर त्या भाषेंतलेही कांहीं शब्द आले आहेत;—इंग्रज ( Port. Inglez ), फिरंगी, विलंदेजी, गलबत, बतेला, फाणस, कंदील, पिस्तूल, बागनेट, पलटण, पाव ( भाकर ), पगार ( होडी ), पाद्री, किरिस्ताव, चावी, बालडी, पीप, लिलांव, चाहा, बांबू, अननस, साबू, साबण, बटाटा, तंबाकू, गोवर्नेर, इजनेर ( Port. Enginhero ) कतान, बुतांव, गोदी ( Port. Godao ), मास्तर, इत्यादि.

मराठीच्या संवर्धनास प्रतिबंधक झालेली अशी फार महत्त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे तिची व्यवहारांत होणारी हेळसांड ही आहे. मराठी कवींनीं आणि संतांनीं स्वभाषेला पुढें आणण्याचा प्रयत्न केला आणि तो उत्तम प्रकारें सफलही झाला. पुढें मराठी राज्यप्रसाराबरोबर मराठी भाषेची पुष्कळ प्रगती झाली. पेशवाईच्या अखेरीस मराठी भाषा त्यावेळच्या लोकस्थितीच्या आणि साधनांच्या मानानें चांगल्या स्थितीला येऊन पोंचली होती. पुढें नवीन वाङ्मय सुरू झाल्यावर मराठीची प्रगतीच चालू होती. मुंबईचे ग्रंथकार व पुण्याची मंडळी यांनीं स्वभाषेंत ग्रंथरचना करण्याचें हातीं घेतलें. पुण्याची मंडळी जरी शास्त्री पंडित होती, तरी त्यांना स्वभाषेचा अभिमान होता. विद्याक्रमामध्यें मराठीला योग्य स्थान मिळालें होतें आणि प्रथमारंभींचे विद्वान् त्यावेळच्या मानानें मराठी चांगलें शिकत. विद्याक्रम इंग्रजी आणि मराठी भाषांत सुरू होऊन मराठी भाषा इंग्रजीच्या जोडीनें चांगली सुधारत जाईल असें वाटत होतें. पण पुढें सर्व शिक्षणक्रम इंग्रजीमध्यें चालावयाचा असें ठरून मराठीला उच्च आणि मध्यम शिक्षणक्रमांमधून मज्जाव झाला. कोणत्याही राष्ट्रांतील लोकांची राजकीय, सामाजीक, व्यावहारीक आणि औद्योगीक वगैरे बाबतींत जशी उन्नती होत जाईल, तशी त्यांच्या भाषेचीही होत जाईलच, परंतु कोणत्याही भाषेची विशेष उन्नती होण्यास त्या भाषेचा आणि तीमधून निरनिराळ्या विषयांचा अभ्यास चालू असला पाहिजे. शिक्षणक्रमांत

इंग्रजी आणि संस्कृत या उच्च भाषांचा अभ्यास सुरू आहे. त्या बरोबर मराठीचा अभ्यास सुरू असेल, आणि भाषांचा व इतर विषयांचा अभ्यास स्वभाषेंत चालेल तरच स्वभाषेची व्हावयास पाहिजे तशी उन्नती होईल. सांप्रत सर्व शिक्षण इंग्रजीमधून होतें. यामुळें तें पक्कें स्वाधीन होणें कठीण आहे. एकंदर हिंदी राष्ट्राच्या व्यवहारासाठीं आपणास इंग्रजी पाहिजे आहे. परंतु इंग्रजी सर्वांची भाषा होणें अशक्य. पाश्चात्य सुधारणा आमचे इकडे होऊन आमची तिकडील लोकांशीं बरोबरी होण्यास शिक्षणप्रसार कोनाकोपऱ्यापर्यंत होण्याकरितां शिक्षण स्वभाषेंतच झालें पाहिजे. प्रमुख लोक जें शिकतात, तें त्यांनीं आपल्या देशांतील सर्व लोकाना शिकवून त्यांना शहाणे करावे यासाठीं मुख्यतः शिकतात. हें त्यांचे एक अत्यंत महत्वाचें प्रमुख कर्तव्य आहे. त्या कामास देशभाषाच पाहिजे. तें काम इंग्रजीमध्यें होईल इतका इंग्रजीचा प्रसार कधींच व्हावयाचा नाहीं. तसेंच हें कर्तव्य चांगल्या प्रकारें पार पाडण्यास आपली भाषाही चांगली असली पाहिजे. ही गोष्ट आमच्या लोकांच्या ध्यानांत येत नाहीं. अलीकडे या गोष्टीची जाणीव अधिकाधीक होत चालली आहे, एवढें खरें. परभाषेंत सर्व शिकावयाचें, असा शिक्षणक्रमाचा द्राविडी प्राणायाम फक्त आमच्या देशांतच सांपडेल. पृथ्वीच्या पाठीवरील कोणत्याही दुसऱ्या देशांत अशी व्यवस्था नाहीं. स्वभाषेंत ग्रंथ आणि इतर सामुग्री नाहीं हें म्हणणें व्यर्थ आहे. मराठी भाषा ग्रंथ होण्यास अयोग्य आहे असें म्हणण्याचें मुळींच कारण नाहीं, आणि विद्वान् ग्रंथकार होणेंही अशक्य नाहीं. पाश्चात्य भाषांतूनही ग्रंथ झाले ते स्वयंभू उत्पन्न झाले नाहींत. त्यांनीं योग्य प्रकारें उद्योग करून आपल्या भाषा आपल्या प्रगतीबरोबर सुधारून घेतल्या. तेव्हां शिक्षणक्रमांत मराठीची जी अनास्था होत आहे, ती पहिल्यानें बंद झाली पाहिजे. संस्कृत ही आपलीच भाषा असतांही ती आपण इंग्रजींतून शिकतों. संस्कृत भाषा आणि तिचें उत्तम वाङ्मय यांचा अभ्यास जर मराठीमधून होईल, तर तो अभ्यास सोपा तर होईलच; परंतु त्या अभ्यासामुळें मराठीची उन्नती होण्यासही मोठें साह्य होईल. एवढी गोष्ट देखील आमच्या प्रमुख मंडळीला पटत नाहीं याचें आश्चर्य वाटतें.

असा प्रकार असतांही मराठीचें वाङ्मय बऱ्या प्रकारें वाढत आहे आणि भाषेचें संवर्धन होत आहे, असे मानण्यास चिंता नाहीं. गहन विषयांवरील ग्रंथ आपण इंग्रजींत वाचतो यामुळे तसलीं पुस्तकें मराठींत होत नाहींत. तरी साधारण लोकांना ज्ञान आणि मनोरंजन होण्याजोगें वाङ्मय उत्पन्न होत असून तें थोडें थोडें वाढत आहे आणि त्याबरोबर भाषाही सुधारत आहे. हाच प्रकार वाढत जाऊन गहन विषयांवरही मराठींत ग्रंथ होत जातील, अशी आशा बाळगण्यास चिंता नाहीं.

भाषासंवर्धन हे भाषेला निश्चित नियम लावून व्हावयाचें नसतें, तर तें अनुकरणानें व्हावयाचें. विद्वान् लोकांनीं स्वतां मराठींत चांगले ग्रंथ लिहिले म्हणजे त्यांच्या धोरणानें भाषेत ग्रंथ होऊं लागतात. असा प्रकार कितपत चालू आहे याचें विवरण मागील भागांत केलेंच आहे. भाषेला विषयानुरूप वळण कसें असावें, यासंबधाचे कडक निर्बंध करीत बसण्यापासूनही फायदा नसतो. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं निबंधमालेंत भाषादूषण, लेखनशुद्धी, भाषापद्धती, भाषांतर, पुस्तकांवरील टीका इत्यादि निबंध लिहून या गोष्टींचा मार्ग दाखविण्याचा चांगला प्रयत्न केला आहे. त्यांचा कित्ता लोकांनीं कितपत उचलला आहे, हें पाहिलें असतां त्यांच्या भाषासरणीचें अनुकरण पुष्कळ झालें आहे, परंतु त्यांनीं घातलेले निर्बंध विशेष कोणीं मानले आहेत असें दिसत नाहीं. ते स्वतां चागले भाषालेखक होते. यामुळें त्यांच्या भाषापद्धतीचा फायदा मात्र आपल्या भाषेला पुष्कळ झाला आहे. हें अगदीं स्वाभावीकच झालें आहे. ग्रंथलेखन करणारांच्या सोयीकरितां आणि भाषानिर्बंधनासाठीं व्याकरण आणि इतर साहित्यग्रंथ असून त्यांमध्ये भाषासंवर्धनाच्या सामग्रीचें वर्णन असावें. तसेंच त्या सामग्रीचा उत्तम उपयोग करून लिहिलेल्या ग्रंथांचे नमुनेही पुस्तकावरील टीकेच्या व परीक्षणाच्या रूपानें लोकांपुढें मांडावे, चागले लेख आणि वाईट लेख दाखवून द्यावे, परंतु कडक नियम घालीत बसू नये. यासंबंधानें भाषा आणि ग्रंथकार यांना अगदीं पूर्ण स्वातंत्र्य असावें हेंच बरें. प्रथमतः वाङ्मय बरें वाईट दोन्ही प्रकारचें

उत्पन्न होईल. मग चांगलें वाङ्मय टिकून वाईट मागें पडेल अथवा नष्ट होईल हें उघडच आहे.

सध्यां आपल्या लोकांचे भाषासंवर्धनाच्या संबंधाचे प्रत्यक्ष आणि अप्रत्यक्ष असे कित्येक प्रयत्न चालू आहेत. भाषांतरमंडळ.ह्या संस्थेकडून नवीन ग्रंथ अथवा भाषांतर यास उत्तेजन मिळत असतें. त्याचप्रमाणें बडोदें संस्थानाकडूनही अशा प्रकारें ग्रंथ तयार झाले आहेत आणि होत आहेत. पण अशा रीतीनें चांगले ग्रंथ फारसे तयार झालेले दिसत नाहींत. हा केवळ कृत्रीम आणि मजुरीनें काम करण्याचा उपाय व्यर्थ आहे असें अनुभवानें दिसून येतें. आपोआप चांगला ग्रंथ तयार झाल्यास त्याच्या प्रसिद्धीला लागलेला खर्च भरून निघून ग्रंथकारास कांहीं फायदा व्हावा अशी तजवीज केल्यानें ग्रंथकारास आणखी ग्रंथरचना करण्यास उत्तेजन येईल, आणि अशा प्रकारें भाषेंत अगदीं स्वाभावीक रितीनें ग्रंथ तयार होऊन वाङ्मयाच्या उत्तेजनार्थ ठेवलेल्या फंडाचें सार्थक होईल. सध्यां प्रांतोप्रांतीं राजकीय, सामाजीक, उद्योगवर्धक आणि इतर प्रकारच्या परिषदा आणि सभा भरत असतात. यांमध्यें मराठींत चर्चा बरीच होते आणि ती भाषासंवर्धनास उपयोगी आहे. असल्या परिषदा भाषांच्या प्रांतवार होऊन त्यांचें काम मुख्यतः देशभाषेंतच चालावें असा निर्बंध केला असतां लोकशिक्षणाचें आणि भाषावृद्धीचें अशीं दोन्हीं कार्यें साधतील. कित्येक परिषदा आणि संमेलनें केवळ भाषेच्या कार्यासाठींच होत असतात. साहित्यसंमेलन सर्वस्वीं त्यासाठीं आहेत. ऐतिहासीक संमेलन आणि नाट्यसंमेलन हीं अंशतः भाषावृद्धीच्या उपयोगाचीं आहेत. साहित्यसंमेलन आणि ऐतिहासिकसंशोधकांचें संमेलन हीं गेलीं दहा वर्षे भरलीं जाऊन त्यांमध्यें झालेलीं भाषणें आणि वाचलेले निबंध हे प्रसिद्धीस येऊन त्यांनीं पुष्कळ कार्य झालें आहे. ठिकठिकाणच्या वेळोवेळीं होणाऱ्या व्याख्यानमालाही यासंबंधानें फार उपयोगाच्या असतात. यांमध्यें वाचलेले उत्तम निबंध छापून काढले असतां यांचा भाषासंवर्धनास उपयोग होईल.

उच्च प्रतीच्या शिक्षणक्रमामध्यें मराठीला स्थान मिळून अभ्यास सुरू असल्यानें भाषेच्या उन्नतीला मोठें साह्य होणार आहे. मराठीची उन्नती आणि वाढ इंग्रजीच्या साह्यानें आणि अनुकरणानें व्हावयाची. तसेंच मराठीच्या संवर्धनाला संस्कृत भाषेचें साह्य तर नेहमींचेंच आहे. इंग्रजी आणि संस्कृत यांचा अभ्यास सध्या उत्तम प्रकारें होत असतो. त्या अभ्यासाबरोबर मराठीचाही अभ्यास झाल्यानें मराठीचें कसें हीत होईल हें वारंवार सांगण्यांत येत आहेच. हा अभ्यास तीन प्रकारानीं व्हावयाचा. एक, गुणदोषविवेचक किंवा टीकाविषयक. इंग्रजी वाङ्मयाचें सर्वांगी गुणदोषविवेचन ज्यांत आहे असे त्या भाषेंत पुष्कळ उत्तम ग्रंथ आहेत. ते ग्रंथ उच्च परीक्षांना जाणारे विद्यार्थी वाचतात. तशाच प्रकारचें विवेचन संस्कृत वाङ्मयाच्यासंबंधानें होत असतें. त्याबरोबर स्वभाषेच्या वाङ्मयाचें तसेंच विवेचन झालें असतां भाषेंत कमजास्त काय आहे आणि काय हवें आहे, आणि तिचें संवर्धन कसें होईल याचा उलगडा होईल. दुसरा प्रकार ऐतिहासीक अभ्यास. यांत भाषा आरंभापासून कशी घडत गेली, तींत ग्रंथ आणि ग्रंथकार कोण, कसे झाले आणि होत आहेत, आणि आतां तिला इंग्रजीच्या तोडीला कशी आणून सोडावी, हें ठरेल. तिसरा तुलनात्मक अभ्यास. यामध्यें इंग्रजी आणि संस्कृत या वाङ्मयाच्या निरनिराळ्या अंगांची आणि ग्रंथ व ग्रंथकार यांची मराठींतल्या त्या त्या गोष्टींशीं तुलना करावयाची. तसेंच केवळ मराठी वाङ्मयाचीं अंगें उपांगें, ग्रंथ आणि ग्रंथकार यांचीही परस्पर तुलना करावयाची. अशा प्रकारच्या अभ्यासानें फार मोठें काम होणार आहे हें अगदीं उघड आहे. हें काम नुसत्या वाचनाचे योगानें होणार नाहीं. तें वाचन अभ्यासाच्या दृष्टीनच सांग आणि आस्थापूर्वक झालें पाहिजे. असा अभ्यास करून जे विद्वान तयार होतील त्यांना इंग्रजी आणि संस्कृत यांतून मराठींत ग्रंथ आणणें आणि मराठींत स्वतंत्र ग्रंथ करणें या गोष्टींची हौस आणि आस्था वाटेल, आणि असा अभ्यास मुख्य विद्यापीठांत असल्यावर तो इतर लोकांतही सुरू राहील. पाश्चात्य विद्यापीठामध्यें उच्च पदवी मिळण्यापूर्वी घेतलेल्या विषयावर स्वतंत्र निबंध अथवा लहान ग्रंथ लिहावा लागतो. आमच्या

इकडे शास्त्रीय पदवी देण्याच्या परीक्षेस अशी योजना झाली आहे, पण ती इंग्रजींत निबंध लिहिण्याची आहे. असा निबंध स्वभाषेंत लिहिल्यानें विद्यार्थ्यांचें ज्ञान योग्य कसोटीला लागून भाषेचाही फायदा होईल.

मराठी वाङ्मयाच्या निरनिराळ्या अंगांमध्यें आजपर्यंत काय झालें आहे आणि आणखी काय व्हावयास पाहिजे, याचें विवरण त्या निरनिराळ्या अंगांचें वर्णन मागील विभागांत केलें आहे तेथेंच सोयीसाठीं केलें आहे. आतां चांगली भाषा कशा प्रकारची असावी आणि तिच्या संबंधाचे मुख्य मुख्य गुण कोणते, या गोष्टींचें थोडक्यांत विवरण करूं.

प्रथमतः भाषेमध्यें शुद्धपणा पाहिजे. शुद्धपणा म्हणजे मान्य बोलणारे आणि लिहिणारे यांनीं वेळोवेळीं जी पद्धत ठरविली असेल, तीप्रमाणें लिहिणें. याविषयीं मागें ठिकठिकाणीं चर्चा झालीच आहे. शुद्धाशुद्धपणा निरंतरचा एक ठरलेला नसतो. वास्तवीक शुद्धाशुद्धपणा म्हणजे व्यवस्थितपणा. हा भाषेच्या सोयीप्रमाणें बदलत असतो. तो बदलण्याचा अधिकारही मान्य ग्रंथकारांस असतो. अशी एकादी शुद्धाशुद्धतेची गोष्ट एकाद्यानेंच हट्टानें घेऊं नये. जें सोडावयास किंवा घ्यावयास पाहिजे असेल त्याचा सकारण ऊहापोह करावा आणि मग ती गोष्ट बहुमान्य झालीसें दिसलें म्हणजे घ्यावी. तथापि सर्वमान्य ग्रंथकारास एकादी गोष्ट आपल्याच अधिकारानेंही घेतां येते, आणि त्याचें इतर ग्रंथकार अनुकरण करितात.

चांगली भाषा म्हटली म्हणजे ती साधी आणि सुबोध असावी. मराठी भाषेची ठेवण मूळपासूनच साधी आहे. वाक्यें लहान असतात. शब्दांचा परस्पर अन्वयही घोटाळ्याचा नसतो. आरंभींचे मुंबईचे आणि पुण्याचे ग्रंथकार यांनीं भाषेला साधें वळण लाविलें आहे. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं त्या वळणांत बरीच सुधारणा केली, पण त्यांनींही भाषेचा साधेपणा आणि सुबोधत्व कायम राखिलें आहे. इंग्रजी भाषेंत वाक्यरचनेच्या कित्येक चांगल्या सोयी आहेत, असें त्या भाषेच्या विशेष संवयीमुळें आपल्यास वाटतें. या गोष्टींचें दिग्दर्शन मागें केलें

आहे. वास्तवीक पाहिलें तर मराठी वाक्याची ठेवण एकदरींत सरळ व सुबोध आहे. चागले ग्रथकार तींत साधेल ती सुधारणा करीतच आहेत. मात्र या सुधारणेमध्यें मराठी वाक्यरचनेचे गुण कायम राहावे, अशी काळजी त्यानीं बाळगिली पाहिजे.

भाषा विषयानुरूप असावी. कठीण अथवा मोठे सस्कृत शब्द कोठें घालावयाचे आणि साधे शब्द कोठें घालावयाचे, याचें धोरण ग्रथकाराना पाहिजे. तत्त्वज्ञानविषयक ग्रथाची भाषा भारदस्त पाहिजे. पण मनोरजक व बोधपर गोष्टी, वर्णनें किंवा लोकाना ज्ञान करून देणारे माहितीचे ग्रथ हे सोपेच असावे शास्त्रीय ग्रथात पारिभाषीक शब्द ठरवून घालावे लागतील, ते कदाचित् आरभीं बोजड वाटतील. पण त्याचा अर्थ ठरून गेल्यानतर ते बोजड व कठीण वाटणार नाहींत. मात्र अशा ग्रथातील विवेचनाची भाषा बालबोध असावी. प्रनध म्हणजे कादवऱ्या, नाटकें याची भाषा चटकदार, अलकारीक आणि मनोरजक असावयास पाहिजे.

केव्हा भाषा वादविवादात्मक आणि खडणमडणपर घालावयाची असते. परतु याव शातंतेचें आणि समतेचें धोरण असावयास पाहिजे. आपला सिद्धात ठरविण्यासाठीं वादविवादच करावयास पाहिजे, अथवा दुसऱ्याच्या मताचें नेहमीं खडण करावयास हवें असें नाहीं. आपणास जें ठरवावयाचें असेल तें स्वताचीं काय असतील ती प्रमाणे आणि दृष्टातादि सागून शातपणें आपणास लिहिता येईल. आपण म्हणतों हे खरें आहे, हें आपल्या स्वताच्या प्रतिपादनानेंच दाखवावें दुसरा म्हणतो तें खोटें आहे म्हणून आपण म्हणतों ते खरें, ही समजूत चुकीची आणि प्रसगीं आपल्याच गळ्यात येणारी असते. दुसऱ्याचें म्हणणें खरें नाहीं असें ज्याप्रमाणें आपल्याला वाटतें, त्याप्रमाणें आपण म्हणतों त खरें नाहीं असें दुसऱ्यासही वाटणें साहजीक आहे, आणि एकादवेळ आपलेंच म्हणणें खोटें ठरणार नाहीं कशावरून ? तेव्हा उत्तम मार्ग म्हटला म्हणजे दुसऱ्याचा सिद्धात आपल्या सिद्धाताच्या बाजूला माडून शातपणें आपल्या सिद्धाताची प्रमाणभूत सत्यता दाखवावी. तसें करिताना दुसऱ्याला तसें वाटत

नाहीं म्हणून नांवें ठेवूं नये, अथवा दुसऱ्याचें म्हणणें खरें नाहीं असें खात्रीनें वाटलें तरी जहालपणा करूं नये. अशा प्रसंगीं दोन्ही पक्ष वाचकांपुढें मांडून अखेर निर्णय करावयाचें काम वाचकांवरच सोपवावें. प्रसंगीं दुसऱ्याचें खंडन करण्याची अथवा खडेजंगी वादविवाद करण्याची जरूर पडेल. पण असा वादविवाद निरुपाय म्हणून प्रसंग-विशेषींच करावा, आणि तेव्हांही प्रतिपक्षी आपला शत्रू आहे असा मनाचा ग्रह करून घेऊं नये. परंतु अशा प्रकारचे कडक वादविवादाचे प्रसंग थोडेच येतात. तेही महत्त्वाच्या आणि चिरकाल टिकावयाजोग्या ग्रंथरचनेंत आणूं नयेत. अशा ग्रंथरचनेमध्यें वादविवादानंतरचा अखेरचा निर्णय ग्रंथांत आणावा; वादविवाद किंवा खंडणमंडण महत्त्वाच्या ग्रंथरचनेंत आणूं नये. त्यासाठीं हवे तर वर्तमानपत्रांतून, मासिक पुस्तकांतून अथवा स्वतंत्र अल्प पुस्तकांतून निराळे लेख लिहावे. ते त्या वेळापुरते कामीं पडून पुढें आपोआपच नष्ट होतील.

आपल्या लेखांत अवतरणें, म्हणी आणि दुसऱ्या लेखांतले उतारे कितपत घ्यावे हा विचाराचा प्रश्न आहे. आपल्या प्रतिपादनाच्या समर्थनार्थ दुसऱ्याच्या म्हणण्याचा आधार देण्याची वेळ पुष्कळदां येते. पण तसे आधार देतांना लांबच लांब उतारे देऊं नये. दुसऱ्याच्या म्हणण्याचा आपल्या म्हणण्यास जुळण्याजोग्या भागाचा थोडक्यांत सारांश काढून द्यावा. दुसऱ्या ग्रंथकारांचीं चटकदार आणि तत्काल मनांत भरणारीं वाक्यें मधून मधून द्यावीं. पण तीं उगाच भाराभर असूं नयेत आणि त्यामुळें आपला लेख कंटाळवाणा होऊं देऊं नये. उतारे देण्याची विशेष जरूर असेल, तेव्हां ते निराळे पृष्ठांखालील टीपांच्या अथवा परिशिष्टांच्या रूपानें द्यावे. संस्कृत, मराठी किंवा इतर भाषांतील वचनें, म्हणी वगैरे प्रकार मधून मधून घालण्याची चाल मागें फार होती, पण आतां ती कमी होत चालली आहे. यावरून हा प्रकार वाचकांना प्रीय नाहीं असें दिसतें. यासाठीं ग्रंथकारानें आपले स्वतांचेच विचार अशा विचारांमध्यें सावधपणानें मिश्रित करून द्यावे, हें चांगलें. आधारासाठीं अन्यांचे विचार द्यावयाचे असतील तेव्हां ते

आपल्या भाषेंतच द्यावे. तसेंच असे विचार घेतले असता ती गोष्ट स्पष्टपणें कबूल करावी. दुसऱ्याचे विचार आपलेच म्हणून दडपून देऊं नये

आमच्या ग्रंथकारांपैकीं पुष्कळांस पाल्हाळीक लिहिण्याची खोड आहे सध्या मराठींत मान्य झालेले ग्रंथ पाहिले तरी दिसून येईल कीं, मराठी ग्रंथकार एकदरींत वाजवीपेक्षा अधिक विस्तारानें लिहितात, कोणत्याही विषयाचा ग्रंथ झाला तरी पाल्हाळ मुळींच चांगला नाहीं. वाचक नेहमीं मुख्य सिद्धान्त जाणण्याविषयीं उत्सुक असतो. आपल्या लिहिण्यामध्यें जी गोष्ट वाचकाचे मनात भरवून देण्याचा आपला उद्देश असतो, ती खंडीभर तुसाच्या ढिगांतून पांचचार दाण्यासारखी वेंचून घ्यावी लागल्यास वाचक कंटाळतात, आणि पुष्कळ वाचकांना तसें करताही येत नाहीं, आणि यामुळें त्यांचा वारंवार विरसही होतो. तसेंच, पाल्हाळीक लिहिण्यांत मागलें पुढलें धोरण सुटतें, पुनरुक्ती होते, आणि एकदां तसें लिहिण्यास सुरुवात झाली असतां तो ओघ आवरतां येत नाहीं. यासाठीं थोडक्यांत पुष्कळ सांगतां येणें हा उत्तम गुण ग्रंथकारांनीं संपादिला पाहिजे.

पाल्हाळीक आणि विस्तृत लिहिण्याप्रमाणेंच सणसणीत व कडक लिहिण्याकडेही आमच्या ग्रंथकाराची पुष्कळ प्रवृत्ती दिसून येते. सणसणीत लिहिण्याचे प्रसंग नसतात असें नाहीं. पक्षप्रतिपक्ष करितांना पुष्कळदां लिहिणारास राग येण्यास कारणें होतात. परंतु अशा वादविवादांत सुद्धां दोन्ही पक्षांनीं शांतता धरूनच प्रतिपादन करावं. तोंडी क्षणीक वादविवादांत कडकपणा खपेल, पण तो चिरकाल टिकणाऱ्या लेखांत नसावा. याचें कारण लेख कायम राहतो, पण त्याच्याबरोबर कडक भाषा वापरण्यास योग्य किंवा अयोग्य कारण काय झालीं होतीं, हे मागाहून कोणाच्या स्मरणांत राहत नाहीं. यामुळें ग्रंथकारच रगीट, उद्दाम अथवा भांडखोर आहे असा समज होतो. तेव्हां लेखांत वाद विवाद करण्याची वेळ आली तरी तो शांतपणें आणि भारदस्तपणेंच करावा.

लेखांची मांडणी आणि ग्रंथाची बाह्यरचना व्यवस्थीत करावी. एकेक मुद्दा विषयवार एका मागून एक योग्य क्रमानें मांडावा. तसेंच पुस्तकाचे भाग-विभागही निरनिराळ्या विषयांच्या अनुरोधानें करावे. पृष्ठेंच्या पृष्ठें लांब कलमें असणें कंटाळवाणें असतें. नेहमीं एकेका मुद्द्याचीं अथवा जुळवितां येतील अशा मुद्द्यांचीं निरनिराळीं कलमें करावीं. पुस्तकांतले विभाग अगदींच तोकडे असूं नयेत, पण फार लांबट, कंटाळवाणेही असूं नयेत. एकच लांबलचक विभाग करण्यापेक्षां निरनिराळे अनेक विभाग करणें बरें. त्याचप्रमाणें एकंदर निबंध अथवा ग्रंथ विषयाच्या स्वरूपाप्रमाणें लहान, मोठा अथवा मध्यम असावा. फार मोठा ग्रंथ होत असल्यास निरनिराळे भाग किंवा पुस्तकें करणें जास्त सोयीचें होय.

प्रथमारंभीं स्वभाषेत ग्रंथरचना करण्याकडे पाश्चात्य तऱ्हेनें सुशिक्षीत झालेल्या विद्वान मंडळीचें चांगलें लक्ष असे. मध्यंतरी या गोष्टीला शिथिलता आली होती असें दिसतें. परंतु अलीकडे सुशिक्षीत मंडळी स्वभाषेमध्यें राजकीय, सामाजीक, शास्त्रीय वगैरे विषयांवर लेख लिहूं लागले आणि ग्रंथरचनाही करूं लागले आहेत. त्याचप्रमाणें धार्मीक, आध्यात्मीक, तात्विकविषयक, प्रवास व देशवर्णनें आणि पुष्कळदां मनोरंजक विषय, यासंबंधानेंही सुशिक्षीत मंडळी ग्रंथ वगैरे लिहूं लागली आहे, आणि ही स्थिती वाढत्या प्रमाणावर आहे. ही गोष्ट मागील भागांत जीं ग्रंथकारांचीं आणि लेखकांचीं नांवें दाखल करण्यांत आलीं आहेत, त्यावरून लक्षांत येईल. हें एकंदरींत चांगलें लक्षण आहे.

यासंबंधानें थोडी सावधगिरीची सूचना करणें इष्ट वाटत आहे. नवीन प्रकारच्या मराठी वाङ्मयास आरंभ झाला, तेव्हां भाषेला चांगलें वळण लावण्याकडे लेखकांचें लक्ष असे. परंतु अलीकडील लेखांमध्यें भाषेची व्याकरणशुद्धता, भाषासरणी आणि टापटीप या महत्वाच्या गोष्टींकडे लेखकांचें असावें तसें लक्ष नसतें असें दिसून येतें. हा प्रकार चांगल्या विद्वान लेखकांच्या कृतींतही दिसून येतो. उभयतां चिपळूणकर हे काळजीपूर्वक लिहीत, आणि त्यांच्या वेळच्या वाङ्मया-

मध्यें अव्यवस्थितपणा दिसून येत नाहीं. इतकेंच नव्हे, तर त्या काळीं इकडे विशेष लक्ष पुरविलेलें आढळून येतें. त्या वेळचीं वर्तमानपत्रें आणि मासिकपुस्तकें यांची भाषाही व्यवस्थीत असे. मुंबईचे प्रख्यात ग्रंथकार ओक यांची यासंबधानें करडी दृष्टी असे. त्यांचे स्वतःचे ग्रंथ यासंबधानें कित्ता घेण्यासारखे आहेतच पण त्यांच्या दृष्टीखालून गेलेले ग्रंथही तसेच आहेत. यासंबधाच्या त्यांच्या कडकपणास प्रसंगीं दोषाचें स्वरूपही येत असे. त्यांच्या सान्निध्यानें मुंबईतील सर्व प्रकारच्या ग्रंथ रचनेस चांगलं वळण लागलें आहे. त्यांच्या देखरेखीखालीं असलेल्या मुंबईच्या निर्णयसागर छापखान्याचा तर भाषेच्या सुव्यवस्थेच्या संबधानें योग्य लौकीक आहे. अलीकडे वर्तमानपत्रें आणि मासिकपुस्तकें यांनीं यासंबधाचें धोरण फारच सोडलेलें आहे, आणि त्याचा परिणाम चांगल्या ग्रंथकारापर्यंतही येऊन पोंचलेला दिसतो. सांप्रतच्या अनेक विद्वान, नामांकीत आणि पदवीधर ग्रंथकारांनीं प्रणीत अशा ग्रंथांत फार अव्यवस्था दृष्टीस पडते. यासंबधानें ग्रंथकारांनीं चांगलेंच लक्ष पुरविलें पाहिजे. तसेंच यासंबधांत त्यांना त्यांचे पुरस्कर्ते आणि साह्यकर्ते यांचीही मदत पाहिजे. भाषेचा जो सर्वमान्य शिरस्ता ठरला असेल, त्याप्रमाणें सर्वांनीं लिहिलें पाहिजे. प्रमुख लेखक हे इतरांना मार्ग दाखविणारे आहेत. तसेच आपल्या छापखान्यांत निघालेला ग्रंथ शुद्ध छापला आहे असें दिसून आल्यानें छापखान्यासही भूषण आहे. या भाषादूषणाकडे सर्वांचें अवश्य लक्ष गेलें पाहिजे.

विद्यमान ग्रंथकारांमध्यें आपटे, महाजनी आणि परांजपे हे विशेष काळजीनें लिहिणारे आहेत केळकर, कोल्हटकर आणि खाडीलकर यांचेंही इकडे चांगलें लक्ष असतें. मासिकपुस्तकामध्यें विविधज्ञानविस्तार हें जुनें पुस्तक सर्वांना कित्यादाखल आहे. परंतु यामध्ये भाषाशुद्धी व भाषेची सुव्यवस्था यांकडे असावी तितकी दृष्टी नसते. लेख लिहिणारे निरनिराळे असले तरी पुस्तकाच्या एकंदर भाषेवर जबाबदार अशा संपादकानें काळजीपूर्वक नजर ठेविली पाहिजे. मात्र एकादे वेळीं लेख लिहिणारास आपल्या इच्छेप्रमाणें लिहावस वाटल्यास त्याच्या जराब दारीवर तसे करण्यास चिंता नसते. अन्य मासिकपुस्तकांत मनोरंजनाचें

—त्यानें ठरविलेल्या पद्धतीप्रमाणें कां होईना—परंतु इकडे चांगलें लक्ष असतें. वर्तमानपत्रांमध्यें केसरीचें या गोष्टीकडे चांगलें लक्ष असतें. इतर वर्तमानपत्रें आणि मासिकपुस्तकें इकडे दुर्लक्ष करितात, हें चांगलें नाहीं.

यासंबंधाचा दोष आमची छापण्याची पद्धत आणि अक्षरांच्या निरनिराळ्या मुद्रा (Types) यांजकडेही आहे. छापण्याच्या संबंधाच्या अडचणींच्या गोष्टी कोणत्या आहेत, याविषयीं जास्त सांगावयाचें हें स्थळ नाहीं. तथापि इकडे तज्ज्ञ लोकांचें लक्ष जाऊन मुद्रा तयार करणें आणि छापणें यांत सुधारणा होणें अवश्य आहे.

या पुस्तकाच्या शेवटल्या दोन भागांतील विवेचनावरून असें दिसून येईल कीं, आपल्या भाषेची सुघटना आणि संवर्धन ह्या गोष्टी चालू आहेत, आणि मार्गांत अनेक अडचणी असतांही तिची प्रगती आणि वाढ या गोष्टी अगदीं पहिल्या प्रतीच्या नाहींत तरी बऱ्याच समाधानकारक होत आहेत. मराठी भाषेची अधोगती होत आहे अशी ओरड उगाच झाली होती. सांप्रत तऱ्हेतऱ्हेची ग्रंथरचना होत आहे, आणि वाचकवर्गही दिवसेंदिवस वाढत आहे. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं 'अहो कष्टं साऽपि प्रतिदिनमधोऽधः प्रविशति' असें जें म्हटलें, तें केवळ त्यांची जी स्वभाषेवरील अत्यंत प्रीति तीमुळें म्हटलें, असेंच समजलें पाहिजे. भाषासंवर्धनाचे कित्येक उपाय सातआठ वर्षें केल्यावर त्यांनीं स्वतांच निबंधरचनेचे त्रोटक उपाय सोडून स्वतंत्र ग्रंथरचना करण्याचें ठरविलें. ही स्वतंत्रग्रंथरचना अन्यांनीं हातीं घेऊन बरीच चालविली आहे. आज जर विष्णुशास्त्री असते तर त्यांना सांप्रतच्या मराठी वाङ्मयाच्या प्रसाराचें आणि भाषासंवर्धनाचें कौतुक वाटलें असतें, असें म्हणावयास हरकत नाहीं.